# मङ्गलाचरणम्




त्याचपरी आतां चिदम्बर। मूळनामें धरोनि अवतार। अगाध महिमा दाविला महीवर। सदगुरुपरात्पर सर्वांसि जो॥

श्रीचिदम्बरमङ्गलमूर्तये नमः ।। चिदम्बरमहागुरवे नमः ।। ॐ श्रीचिदंबरा गुरु-नव-विहारा ।। जय जय भक्तकामपूरा ।। व्यापक तूं सर्वांतरा ।। आनंदसागरा तुज नमो ।। १ ।। ॐ नमोजी मंगलदायका ।। मूळपुरुषा गुरु- नायका ।। महात्मकथा सर्वमंगलसखा ।। भक्तभयभंजका तुज नमो ।। २ ।। चित्तचालका चिदम्बरा ।। चिन्मयमूर्ती चित्रचरित्रा ।। चिंतितार्थदायका चिन्मात्रगात्रा ।। चिंताहरा तुज नमो ।। ३ ।। जय जगज्जनका जन्ममोचका ।। जटाजूटधृतजह्नुकन्यका[१] ।। जय जगद्व्यापका जगदंतका ।। जीवनियामका जगदाधारा ।।४।। जगन्मोहकमाया- जवनिका[२] ।। जन्मजातिव्यक्तिजराप्रकाशका ।। निजभजकजन्मादिसंहारका ।। अजन्माव्यक्ता जगदीशा ।। ५ ।। तूंच ब्रम्हा विष्णु महेश्वर ।। गणपती सरस्वती शचीवर ।। तूंचि सद्गुरु चराचर ।। तुजविण सृष्टीवर आन नसे ।। ६ ।। तुज नमितां जी सद्गुरु ।। सर्व सुरवर तुष्टती अपारू ।। ऐसें जाणोनियां नमस्कारू।। करितो परात्परू तुजला मी ।। ७ ।। तुज नमस्कारितां सर्वारिष्ट ।। दुरावती भक्तांचे कष्ट ।। म्हणोनि तुज मीचि स्पष्ट ।। वंदितों संतुष्ट चित्तें ।। ८ ।। आदिवंद्या मंगलमूर्ती ।। आनंदमूर्ती मंगलकीर्ति ।। वंदितो मी ऋद्धिबुद्धिपति ।। विघ्नसंहति निवारी बा ।। ९ ।। निगमागमवंद्या निर्विघ्नदायका ।। नित्यानंदी नीतिबोधका ।। नित्य निर्जरार्चितनिजपादुका[३] ।। निरुपमसुखा तुज नमो।। १० ।। करिवरकमनीयमुखा[४] ।। कलिकाळांतका शूर्पकर्णका ।। मोदकप्रिया भक्तमोदका ।। विघ्नांधकारभास्करा तुज नमो ।। ११ ।। जे भावें तुज सेविती ।। त्यांसी विघ्नें न बाधती ।। म्हणोनि सुरासुर तुज सेविती ।। कार्यारंभीं गणनायका ।। १२ ।। विघ्नगिरिविदारक तूं वज्र ।। कीं विघ्नांधकारभास्कर ।। तुज देखतांचि विघ्नचोर ।। पळंती रानींवनीं।।१३।। तुझें नामपंचानन[५] ।। करी विघ्नगजविदारण[६]।। कीं तव नामहुताशन[७] ।। विघ्नारण्य जाळित ।। १४ ।। म्यां आरंभिलें चिदम्बरचरित्र ।।

..........................

१. शंकर. २. जगाला मोहविणारा मायारूपी पडदा. ३. देवांनी ज्यांच्या पादुकांचें पूजन केलें आहे असा. ४. श्रेष्ठ हत्तीच्या मुखाप्रमाणें सुंदर ज्याचें वदन आहे असा. ५. नामरूपी सिंह. ६. विघ्नरूपी हत्तींचा नाश करणारा. ७. नामरूपी अग्नि.

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

शि व चि द म्ब र

तत्संबंधी विघ्नें करोनि दूर ।। भालचंद्रा दयानिधी सत्वर ।। सिद्धीसी नेई लंबोदरा ।। १५ ।। ब्रम्हा विष्णू महेश्वर ।। सिद्धसनकादिकसुरासुर ।। स्वकार्यसिद्ध्यर्थ अगोदर ।। तव पदांबुज सेविती ।। १६ ।। तुज न सेवितां गजवदना ।। कोणाच्याही मनकामना ।। न साधती गिरिजानंदना ।। सत्य सत्य त्रिवाचा ।। १७ ।। स्तोत्रप्रिया जे तुज सेविती ।। त्यांच्या कामना निर्विघ्न पुरती ।। मीही तव चरणांप्रती ।। एतदर्थ शरण आलों ।। १८ ।। इतूकेंचि मागणें सुरवरदा ।। दूरं करोनि आलिया आपदा ।। ग्रंथसिद्धी नेई एकरदा[१] ।।तव पदा अनन्यशरण ।। १९ ।। आतां वंदूं वागीश्वरी ।। जिचें नर्तन वेदशिरी ।। परा पश्यंती मध्यमा वैखरी ।। जी ईश्वरी चहूं वाचेची ।। २० ।। जिचे हातीं सुंदर वीणा ।। बर्हिवाहिनी[२] ब्रम्हनंदना ।। जगन्मातेची जोडतां करूणा ।। मूक वदे शास्त्रजाळ[३] ।। २१ ।। शारदे सुरवरदे ।। दूरीकृतनिजभक्तापदे ।। आदिमाये अंबुजपदे ।। शरण तवं पदीं आलो माते ।। २२ ।। अंबे ऐक माझी विनंती ।। विनवितों शिर ठेवोनि पायांवरती ।। माझ्या जीभसिंहासनी करोनि वसती ।। वदवी सुरस चरित्र ।। २३ ।। अगा इंदिरामनमोहना ।। वंदितो तुज मी नारायणा ।। चक्रधरा निवारी सर्वा विघ्ना ।। श्रीचरित्रासि जी अडविती ।। २४ ।। त्रयीमया जगत्प्रकाशका ।। भास्करार्का आरोग्यदायका ।। माझे मुखीं ज्ञानदायका ।। वदवी श्रीचिदंबरलीला ।। २५ ।। श्रुतिशास्त्रप्रतिपादित ।। सर्वपूज्य जें मातृपितृदैवत ।। त्यासी करूं आतां प्रणिपात ।। निज हित साधावया ।। २६ ।। त्रिभुवनपूज्य जो चिदंबर ।। काशीनाथ त्याचा कुमर ।। मातामह तो ज्ञानसागर ।। त्याची कन्या जननी माझी ।। २७ ।। तिचें नाम साजे ललिता ।। पतिव्रता ती माझी माता ।। तिच्या चरणीं ठेवितो माथा ।। निर्विघ्नार्थ ग्रंथारंभी ।। २८ ।। अत्रिगोत्राब्धिसुधाकर ।। जो दीक्षित विश्वेश्वर ।। त्याचा पुत्र गुणाकर[४] ।। राम दीक्षित गुणनिधी ।। २९ ।। तो माझा जनक विख्यात ।। शिरीं घेवोनि त्याचे पदांबुजात ।। साष्टांगें करोनि प्रणिपात ।। आरंभू चरित श्रीगुरूचें ।।३०।।

शि व चि द म्ब र

१. गणपति २. सरस्वती. ३ शास्त्रसमूह. ४. गुणांची खाण.

वंदितां जनकजननीचरणां ।। संतुष्टोनि श्रीगुरुराणा।। निजचरित्र वर्णावया पूर्णज्ञाना ।। प्रगटवित हृदयींबैसला ।। ३१ ।। जो पूज्य असे त्रिभुवनामाझारी ।। ज्याचे ठायी उठती चराचर लहरी ।। तैशाच नाचती लोपती ज्या अंतरी ।। तो तूं हृदयमंदिरी राहे देवा ।। ३२ ।। ज्याचे प्राप्तीकरितां विद्वज्जन ।। वैराग्यें संन्यासपूर्वक विचारण ।। करोनि करिती परपदगमन[१] ।। त्या सद्गुरूचरणां वंदूं आता ।। ३३ ।। सत्य शांत तेजोमूर्ती ।। अविकृत विमल ज्याचिया दीप्ती ।। जो नित्य प्रेरितसे बुद्धिवृत्ती ।। त्या चिदंबराप्रती नमन माझे ।। ३४ ।। त्याचिया स्मरणें विघ्नें पळती ।। होतसे भजनीं स्थिर मती ।। न कळे ब्रम्हादिकां जिची कृती ।। त्या सरस्वतीप्रती वंदूं आता ।। ३५ ।। जो असे सर्वांपरीस दैवत ।। तो होय आम्हांसी सद्गुरू मातापित ।। सखा भ्राता कुळदैवत ।। सर्वसंमत आम्हांसी तो ।। ३६ ।। तुज नमितां सद्गुरू-राया ।। बुद्धी देशी वर्णावया ।। तव चरित्र अपार देवराया ।। करिशी दया दीनावरी ।। ३७ ।। कर्ता करविता तूंची समर्था ।। तुज नमितां मूढही ज्ञाता ।। होतो ऐसी जाणोनि तव वार्ता ।। शरण कृपावंता तुज मी आलो ।। ३८ ।। आतां माझे हृदयमंदिरांत ।। बैसोनि तुवां निश्चित ।। वर्णवी तव सुरस चरित ।। करूनी निमित्तमात्र मजसी ।। ३९ ।। जगदुद्धारार्थ अवतरलासी ।। अमानुष चरित्र केलेंसी।। लोकोद्धारार्थ मज प्रेरिसी।।चरित्ररचनेविषयीं तुझ्या ।। ४० ।। तैसे निर्विघ्नतेनें ग्रंथसिद्धी ।। नेई विघ्नसंहारका आधीं ।।मग पाठकांसी देवोनि सद्बुद्धी ।। बैसवी निजपदी गुरुराया ।। ४१ ।। ऐसे स्मरतां चिदंबरनाथ ।। दासाचे हृदयी होऊनि व्यक्त ।। स्वचरित्र आपण समर्थ ।। आरंभ करित अत्यादरें ।। ४२ ।। शंकर हरी सूर्यासी ।। वंदूनि शक्ती गणपतीसी ।। तैसांच गुरु काशीनाथ याज्ञवल्क्यासी ।। आरंभूं ग्रंथासी सप्रेमें ।। ४३ ।। या चिदंबरचरित्रांत ।। व्यक्त असे धर्म वेदोक्त ।। उपनिषत्पतिप्राद्य आत्मसिद्धांत ।। यथार्थ निरोपिला असे ।। ४४ ।। श्रोतृपापविध्वंसक[२] ।। कलिकल्मषसंहारक[३] ।। सद्यःशुभेच्छाप्रदायक ।। चिदंबरचरित्र शक्त तें

१. मोक्षास जाणें. २. ऐकणाऱ्यांचे पाप नाहीसे करणारें. ३. कलिपाप नाश करणारे.




शिवचिदम्बर

शि व चि द म्ब र

।। ४५ ।। श्रीमद्वंद्यचिदंबरचरित्रीं ।। दंभभयभक्तीनें जरी ।। तो भाविक विश्वास धरी।। सर्वसिद्धी त्या लाभे ।। ४६ ।। चिदम्बर-चरित्र जे पठती ।। ऐकती अथवा नमिती ।। तत्काळ त्यांचिया चित्ती ।। होय पै वस्ती श्रीगुरूची ।। ४७ ।। श्रीचिदंबर-महागुरुचरित्र।। जे भावें पठती नर त्यांच्या पापांचा संहार ।। होय क्षण न लागतां ।। ४८ ।। सादरें ऐके जो भक्त ।। चिदम्बराचें शुद्ध चरित ।। त्याचे दुर्लभही मनोरथ ।। सद्गुरुनाथ पूर्ण करी ।। ४९ ।। नियमें जो वाची सप्तक ।। त्याच्या कामना पुरती देख ।। रोगादिपीडा तात्काळीक ।। दुरावती सत्य सत्य ।। ५० ।। ग्रहरोग पीडा भूतजन्य।। न बाधे सत्य तैसेचि अन्य ।। चिदंबरकृपा होय पूर्ण ।। सप्ताहविधिनें पाठकांसी ।। ५१ ।। श्रीमच्चिदंबरक्षेत्र प्रसिद्ध ।। कैंगेरी नामें स्वतः सिद्ध ।। शैवागम महोत्सव प्रसिद्ध।। होतसे तेथें प्रतिवर्षी ।। ५२ ।। तो पहावया नारीनर ।। सर्व देशजन अपार ।। मिळाले त्यांत द्विजवर ।। आले तैसेंचि पूर्वदेशस्थ ।। ५३ ।। पाहूनि तो शंकरोत्सव ।। चिदंबरीं ठेवोनी प्रेमभाव ।। भवभेषजचरित्रश्रवणास्तव[१] ।। अत्युत्सुक जाहले ।। ५४ ।। प्रातःस्नान करूनि समाहित[२] ।। पूजोनि चिदंबर हृदयांत ।। आणि भक्तीनें ध्यान करीत ।। बैसले नाम जपत सप्तदिन ।। ५५ ।। ब्राम्हणभक्ती ओळखोनी ।। वृद्धब्राम्हणवेष धरूनि ।। आला सद्गुरु तत्क्षणीं ।। त्या ब्राम्हणा सन्निध।। ५६ ।। त्याचें तेज पाहूनि द्विजवर ।। करूनि अभ्युत्थान नमस्कार ।। प्रार्थना करिती होवोनि सादर ।। वारंवार विनविती ।। ५७ ।। स्वामी आपण कोण ।। रूप पाहतां आपुलें जाण।। आनंदसागरीं मन ।। बुडतसे आमुचें ।। ५८ ।। याज्ञवल्क्यशुकदत्तात्रेय ।। योगीश किंवा वामदेव सदय ।। कोण आहां सांगा स्वामी सत्य।। वंदितों पायां आपुलिया ।। ५९ ।। ऐकोनि मुनि बोले मधुरोत्तर ।। कोणी एक ब्राम्हण मी तर ।। चिदम्बरोत्सव पाहावया साचार ।। आलो द्विजवरा या ठायीं ।। ६० ।। मग तयासी बोलती ब्राम्हण ।। महागुरुचरित्रामृतपान ।। करावया तृषित[३] आम्ही जाण ।। पान आपण करवावें ।। ६१ ।। कृपा करूनि

१. भवरोगौषधचरित्र ऐकण्याकरिता. २. एकाग्रचित्तानें. ३. तान्हेले.

शि व चि द म्ब र

शि
व
चि
द
म्ब
र

इतुकें करवाल।। तरी कृतकृत्य होऊं आम्ही निखिल[1] ।। द्विजवचन ऐकुनी तत्काळ।।संतोषें बोलत मुनिवर ।। ६२ ।। ऐका द्विजेंद्र हो तुम्ही भाग्य वंत ।। प्यावया चिदंबरकथामृत ।। एतांवत्काल भूमंडलात ।। कोणी मजप्रती न विचारिलें ।। ६३ ।। चिदंबराख्यान बहुत ।। मज असे दृष्टश्रुत[2]।। तें यथामती तुम्हाप्रत ।। सांगतों स्वस्थ ऐकावें ।। ६४ ।। ज्याचे श्रवणमात्रें जन्ममरण ।। जरादिरोग होतसे खंडण ।। तोडोनि संसारबंधन ।। मुक्त तत्काल होतो मनुज ।। ६५ ।। आतां सोडोनि कलिभय ।। प्रपंच तळमळ कपटमय ।। एकाग्रचित्त होत्साते निर्भय ।। अत्यादरें श्रवण करा ।। ६६ ।। द्विजेंद्र हो धर्महानि कलियुगीं ।। होतसे वारंवार यालागीं ।। सर्वेश अवतरोनियां जगीं।। धर्मरक्षण करीतसे ।। ६७ ।। गतकाली वर्णनीं व्यास ।। ऐसेंचि सांगे शिष्यांस ।। म्हणोनि अवतार महेशास ।। घेणे लागे वारंवार ।। ६८ ।। या कलिप्राप्तीपासून ।। जे जे शिवावतार झाले जाण ।। सांगतसे तुम्हातें खूण ।। धर्मस्थापन जेणें झालें ।। ६९ ।। प्रबल होवोनि जैनमत ।। लोपलें सर्व कर्म वेदोक्त ।। तेव्हां शैवभट्ट नामांकित ।। होऊनि वेदमत स्थापिलें ।। ७० ।। अद्वैतमार्ग उद्धारार्थ ।। शंकर दुजा अवतार धरित ।। नामें शंकराचार्य विख्यात ।। द्वैतांधकार उडविला ।। ७१ ।। त्याचा शिष्य विख्यात मंडन ।। आचार्य भाष्यवार्तिककथन ।। करोनि अद्वैतसंस्थापन ।। सुदृढही त्याने केलें ।। ७२ ।। कर्मकांडी अन्यार्थ जाणोन ।। शिव आपण विद्यारण्य होऊन ।। चतुर्वेद भाष्य रचून ।। वेदमार्ग स्थापिले ।। ७३ ।। प्रभाकरदीक्षित विख्यात ।। वेदमार्ग परंपरागत ।। स्थापूनि शिवक्षेत्रांत ।। सशरीरें गुप्त झाले ।। ७४ ।। मग होवोनि अप्पयादीक्षित ।।धर्मस्थापना करोनि बहुत ।। ऊर्जित दशेसी शैवसिद्धांत ।। आणिला वादीमत खंडोनिया ।। ७५ ।। श्रीपादश्रीवल्लभ कुरवपुरीं ।। प्रख्यात झाले महीवरी ।। धर्मसंस्थापना बहुतां परी ।। केली साचार या जगीं ।। ७६ ।। नृसिंहस्वामींचें बहुत चरित ।। श्रीगुरुचरित्रीं असे प्रख्यात ।। तें पाहतां शिवावतार निश्चित ।। सर्वांसी कळो येतसे ।। ७७ ।। पंपाक्षेत्रीं बिष्टनामा ।। धर्म

शि
व
चि
द
म्ब
र

१. सर्व. २. पाहिलेले

स्थापना करण्या कामा ॥ करोनि अघटित महिमा ॥ तुंगातीरीं गुप्त जाहला ॥ ७८ ॥ त्याच परी आतां चिदंबर ॥ मूळ नामें धरोनि अवतार ॥ अगाध महिमा दाविला महीवर ॥ सद्गुरु परात्पर सर्वांसि तो ॥ ७९ ॥ ज्याचें चरित्र श्रवणीं पडतां ॥ तत्काळ उडे भवव्यथा ॥ इहामुत्र[1] अखंडित तत्त्वता ॥ सुख सदोदित प्राप्त होय ॥ ८० ॥ चिदंबरीं विश्वास जयाचे चित्तीं ॥ त्याच्या सकळ कामना साधती ॥ मोक्षश्री पायीं लागती ॥ अनायासें द्विजवरहो ॥ ८१ ॥ मुनीश्वर - द्विजेंद्र - संवाद ॥ चिदंबरकिंकर ऐकूनि विशद ॥ जरी प्रख्यात मतिमंद ॥ चिदंबराज्ञांकित झाला ॥ ८२ ॥ स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ॥ ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ ॥ श्रवण करा हो श्रोते समस्त ॥ प्रथमोऽध्याय स्वादुतर हा ॥ ८३ ॥ इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे[2] नामवैभवखण्डे मङ्गलाचरणं नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥ ओवीसंख्या ८३ ॥

॥ श्रीचिदम्बरार्पणमस्तु ॥

..........................

१. इह व परलोकी २. मुक्तीचा राजमार्ग

शिव चिदम्बर

शिव चिदम्बर

# आकाशचिदम्बरमहिमवर्णनम्




तव आठवलें शंकरवचन । राजा जाहला सावधान । मुखपसरोनि जो उभा ब्राह्मण । धीरे रस ओती त्याचे मुखीं ॥

शि
व
चि
द
म्ब
र

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। जयजयाजी सद्‌गुरु कल्पवृक्षा ।। जे जन करिती अपेक्षा ।। तदिच्छा पुरवावया बद्धदीक्षा ।। तुज साक्ष दुजी कायसी ।। १ ।। कल्पवृक्षातळीं बैसतां ।। कल्पनानुरुप सिद्धी तत्वतां ।। तुज स्मरतांही दूरस्थां ।। लाभती चारी पुरुषार्थ ।। २ ।। जय अनाथनाथा चिदंबरा ।। दीनबंधू करुणासागरा ।। जयजयाजी जगदुद्धारा ।। भक्तां अभीष्ट तूं देसी ।। ३ ।। तुझा भरंवसा धरुनि सद्‌गुरुराया ।। आणि वंदूनि आपुलिया पायां ।। चिदंबरचरित्र वर्णावया ।। मंदमति मी प्रवर्तलो ।। ४ ।। आतां कृपा करोनि दीनांवरी ।। ग्रंथ सिद्धी नेई सत्वरी ।। इतुकीच कृपा मजवरी ।। मायबापा करी आतां ।। ५ ।। ऐकाहो भाविक श्रोते समस्त ।। गताध्यायीं चिदंबरकथामृत ।। पाजवोनि मुनींद्र सर्वांसी तृप्त ।। करण्यासी सिद्ध झाले ।। ६ ।। मग प्रणाम करोनि द्विजवर ।। मुनीश्वरासी प्रार्थिती सत्वर ।। हा चिदंबर अवतार ।। कवण देवाचा असे ।। ७ ।। चिदंबरें कवण वंशी ।। घेतला अवतार ज्ञानराशी ।। याचें उत्तम चरित्र परियेसी ।। आम्हांसी कथन करा ।। ८ ।। ज्याचिया कीर्तीनें त्रिभुवन ।। सर्वत्र आच्छादिलें पूर्ण ।। हा काय शंकर कीं नारायण ।। याचें निरुपण सांगावें ।। ९ ।। ऐकोनि द्विजवरांची वाणी ।। मुनीश्वर संतोषोनी मनीं ।। सांगावया प्रवर्तले तत्क्षणीं ।। आठवोनी सद्‌गुरूसी ।। १० ।। बहुत मातला कलिराज ।। धर्म होऊं लागला निर्बीज ।। धरणी सांगावया निजरुज[1] ।। निघाली शरण परमेशासी ।। ११ ।। गोरुप धरोनि कैलासासी ।। जाउनि आक्रोशी शंकरापाशीं ।। अधर्मिष्ठांचा भार मजसी ।। जाहला फार शंकरा ।। १२ ।। निवेदित असतां पृथ्वी स्वभार ।। तत्क्षणी जाणोनि चंद्रशेखर ।। अशरीरवाचें वदे गंभीर ।। अवनी ऐक वचन माझें ।। १३ ।। तपस्वी मार्तंड दीक्षित ।। धर्माचरणीं असे सांप्रत ।। त्याचा पुत्र होऊनी विख्यात ।। वेदसमंत धर्म स्थापीन ।। १४ ।। इतुकें ऐकोनिया धरणी ।। राहिली सुस्थिर अंतःकरणीं ।। एतदर्थ दीक्षितभवनीं ।। अवतरला सर्वेश ।। १५ ।। सद्धर्मे भक्तरक्षण ।। नित्य श्रौतकर्म आचरण ।। अनादि

शि
व
चि
द
म्ब
र

..........................

१ स्वतःची यातना

वेदमार्गरक्षण ।। हेचि मुख्य आचार चिदंबरीं ।। १६ ।। शिवावतार म्हणती त्यासी ।। कोणी म्हणती हृषीकेशी ।। पूर्ण ब्रम्ह तो सर्व देवांसी ।। ऐसें असें व्यासवचन ।। १७ ।। एतदर्थी पुराणांतरीं ।। कथा असे अति कुसरी ।। ऐक सांगतों निर्धारीं ।। व्यासवाक्यां अनुसरूनी ।। १८ ।। वसुदेव देवकी एकांतीं ।। बोलते जाहले कृष्णाप्रती ।। बाळा आम्ही कंटकाग्रीं[1] निश्चिती ।। पूर्वी तप आचरलों ।। १९ ।। सप्त जन्मीं पुत्र व्हावा म्हणोन ।। तप आचरतां तुज कृपा येऊन ।। आमुचा पुत्र होवोन ।। उपजलासी जगदीशा ।। २० ।। तरी तुझें बाल्य गोकुळीं गेलें ।। तारुण्य हस्तिनापुरीं हरवलें ।। तव बाल्यतारुण्यलीला वहिलें ।। न पाहिलें आमुचे नयनीं ।। २१ ।। असून पुत्र तुजसारखा ।। अनुभविलें नाही पुत्रहरिखा ।। निष्फळ जाहलों आम्ही देखा ।। व्यर्थ जन्म आमुचा ।। २२ ।। ऐकोनि जनकजननीची उक्ती ।। उत्कंठें बोलिला श्रीपती ।। आतां करुं नये आपण खंती ।। हर्ष चित्ती असों द्यावा ।। २३ ।। कलीयुगीं आपण व्याघ्रपुरीं[2] ।। घोर तप कराल महीवरी ।। घेऊनि अवतार तुमचे उदरीं ।। तेव्हां कामना पुरवीन ।। २४ ।। तें वचन करावया सत्य ।। श्रीकृष्णचि जाहला दीक्षिततनय ।। निवारावया जगद्भय ।। श्रीचिदंबर देव अवतरला ।। २५ ।। मार्तंडदीक्षिताचा पूर्ववृतांत ।। ऐका सांगतों यथाश्रुत ।। विजापूरप्रांतीं गोठे ग्रामांत ।। असे शाश्वत ज्योतिर्वृत्ती ।। २६ ।। होराशास्त्रज्ञ नागेश ।। होता तयाचा मूळ पुरुष ।। त्याची पत्नी गंगा नामें विशेष ।। पतिभक्ती करीतसे ।। २७ ।। त्याचा पुत्र नामें शंकर ।। पार्वतीचा जाहला भ्रतार ।। तत्तनय त्र्यंबक गुणसागर ।। वेदशास्त्रीं पारंगत ।। २८ ।। कृष्णा नामें त्याची जाया सत्य ।। तीस जाहले चार तनय ।। त्यांत जो होय कनीय ।। उत्पत्तिनिलय तो सद्गुरूचा ।। २९ ।। मार्तंड नामें विख्यात ।। शिवभक्त असोनि विरक्त ।। जितेंद्रिय पितृशुश्रूषणीं रत ।। संसारीं वर्तत असतां ।। ३० ।। कदाचित् त्याचे अंतरीं ।। ज्योतिर्वृत्तीचा त्रास भारी ।। उत्पन्न जाहला त्या अवसरीं ।। विचार भारी करूं लागला ।। ३१ ।।

१. कांट्याच्या टोंकासारखें घोर (कांट्यावर उभे राहून). २. आकाशचिदंबर क्षेत्रांत.

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

आमुचा धर्म पराधीन ।। यांत दुष्प्रतिग्रह दुर्दान ।। दुरन्न भोजनादि करून ।। प्रत्यहीं घडोन येतसे ।। ३२ ।। पापसंग्रह होतसे फार ।। ऐसा निश्चय करूनि सत्वर ।। निघोनि निजसदना बाहेर ।। काशीपुरीं पातला ।। ३३ ।। तेथें स्वयंप्रकाश नामक ।। ब्रम्हनिष्ठ संन्यासी होता एक ।। त्याचें शिष्यत्व करुनि निक[1] ।। रांत्रदिन सेवा करी ।। ३४ ।। आदौ शतपथब्राम्हण ।। अभ्यास केला त्याजकडून ।। मग तत्कृपें श्रुतिशास्त्रीं जाण ।। अति निपुण जाहला ।। ३५ ।। मग त्याची आज्ञा घेऊन ।। येऊनि मुरगोडपुरासी आपण ।। गृहस्थाश्रम संपादिला जाण ।। वेदोक्त धर्म आचराया ।। ३६ ।। शांत दांत तपोदक्ष ।। अग्निहोत्री निरपेक्ष ।। केला सोमयाग श्रुतिपक्ष ।। अंगिकारोनि तयानें ।। ३७ ।। बहुत शिष्य संपादिले ।। शास्त्रार्थ सर्वही सांगितले ।। सूत्रभाष्यानुसारें केले ।। प्रयोग ही षोडश ।। ३८ ।। श्रौत प्रयोगही सोमावधी ।। करोनि परोपकारबुद्धी ।। दाविल्या बहुतांसी सिद्धी ।। परहितार्थ गुरुकृपें ।। ३९ ।। ऐसें असतां दीक्षितपोटीं ।। अपत्य नसल्यानें बहुत कष्टी ।। होऊनि मग उठाउठी ।। तप करण्या निघाला ।। ४० ।। येऊनियां सुगोलक्षेत्रासी[2] ।। पूजा प्रार्थना सोमनाथासी ।। करोनि गायत्रीपुरश्चरणासी ।। आरंभित तया ठायीं ।। ४१।। करोनियां तेथ पुरश्चरणें तीन ।। सुब्रम्हण्यक्षेत्रीं येऊन ।। स्वप्रकाशेश्वरलिंगस्थापन ।। विधिपूर्वक केलें तेथें ।। ४२ ।। अश्वत्थ आम्र वृक्ष वापीसी ।। स्थापन करोनि परियेसी ।। एक संवत्सर तपोराशी ।। करी अनुष्ठान त्या ठायीं ।। ४३ ।। मग मार्तंडक्षेत्र हिप्परगी गांव ।। तेथें जावोनि दीक्षितराव ।। विध्युक्त पूजोनि स्वयमेव ।। करी पुरश्चरण वेदमातेचें[3] ।। ४४ ।। षण्मास होता अनुष्ठान ।। मार्तंड वदे स्वप्नीं येऊन ।। तप तुझें सिद्धजाहलें जाण ।। तवाभीष्ट जाणतों मी ।। ४५ ।। संततीकरीतां तुम्ही चिंता ।। करुं नका दीक्षित आतां ।। येथूनि दक्षिणेसि मोठें तत्त्वतां ।। चिदम्बरक्षेत्र असे जाणा ।। ४६ ।। आकाशलिंग पंच सभा तेथ ।। असे गायत्री ग्राम विख्यात ।। उपमन्युकण्वादि ऋषि समस्त ।। वर लाधोनि



१. समीप. २. सोगल क्षेत्रास. ३. गायत्रीचें.

शिवचिदम्बर

प्रसिद्धजाहले ।। ४७ ।। क्षीराब्धि कावेरी शिवगांग ।। तीर्थें असती तेथ चांग ।। विष्णुब्रम्हादिक देव अभंग ।। वर तेथें लाधले ।। ४८ ।। साक्षाच्चिदम्बर भक्तवत्सल ।। सदा तेथें राहोनि निखिल ।। भक्ताभीष्ट पुरवितो केवल ।। सेवकां अढळ पद देतसे ।। ४९ ।। क्षेत्रमहिमा बहुत काय वानूं ।। महासिध्दस्थान भक्तकामधेनू ।। तपोभूमी पापांधकारभानू ।। अनुपम असे महीवरी ।। ५०।। किंचित्कथा संकलित ।। क्षेत्रभूमीवरी असे गुप्त ।। याचा महिमा स्कंदपुराणांत ।। सांगे अपरिमित व्यासमुनी ।। ५१ ।। मार्तंडेश्वर आज्ञा करी ऐसी ।। तुम्ही जावें चिदम्बरक्षेत्रासी ।। चिदम्बर प्रसन्न होऊनि तुम्हांसी ।। अवतरेल तुमचे कुशी निश्चित ।। ५२ ।। मार्तंड बोलोनि अंतर्धान ।। पावल्या दीक्षित हीजागृत होवून ।। प्रातर्नित्य क्रिया सारून ।। आज्ञा घेऊन निघतसे ।। ५३ ।। ग्रंथीं पाहतां क्षेत्रमहिम ।। आनंद पावला निःसीम ।। त्या शिव क्षेत्रां अनुपम ।। जायेसहित निघतसे ।। ५४ ।। क्षेत्रमहिमा ऐका द्विज समस्त ।। ऐकतां वाटेल अद्‌भुत ।। पृथ्वीपती राजा रोगें व्याप्त ।। तीर्थे करीत पृथ्वीवरी ।। ५५ ।। गलितकुष्ठ सर्वांगीं जाण ।। दुर्गंधी सुटे व्याकुल प्राण ।। पृथ्वीचीं सर्व तीर्थे करून ।। श्रमला हिंडोनि चक्रवर्ती ।। ५६ ।। युगचौकडी युगयुगांतरी ।। गुप्त प्रगट दिसे सृष्टीवरी ।। आकाशलिंग निराकारी ।। तेथोनि ईश्वर अवतार होती ।। ५७ ।। सेतुबंध रामेश्वर एक राहिले जाण ।। तेथे जाऊन देईन प्राण ।। ऐसा चित्तीं निश्चय करून ।। चक्रवर्ती आपण चालिला ।। ५८ ।। पुढें रामेश्वरासि जाणें असे ।। चक्रवर्ती सैन्यासह जातसे ।। चित्तीं उद्विग्न चिंता करीतसे ।। उपेक्षिले कैसें मज ईश्वरें ।। ५९ ।। सैन्यासहित वनी उतरला जाण ।। पश्चिमाब्धी दीडशे योजन ।। राजा राहे मुक्काम करून ।। चित्तीं उदास होऊन बैसे ।। ६० ।। एकांतीं अरण्यासी ।। मध्यान्हीं बैसे औदुंबरछायेसी।। समीप जळकर्दमेसी ।। राजा दृष्टीसी पाहतसे ।। ६१ ।। तेथें अरण्यातील शूकर[१] ।।उष्णी कर्दमीं[२] लोळे थोर ।। कांचनदेही झाला सत्वर ।। राजा दृष्टीसी पहातसे ।। ६२ ।। राजा मनीं आश्चर्यभरित

१. डुक्कर. २. चिखलांत.

शिवचिदम्बर

।। आपणही तेथें स्नान करित ।। तयां कर्दमीं असे लोळत ।। म्हणे भगवंत पावला मज ।। ६३ ।। सर्वांगाचा रोग जाऊन ।। काया जाहली शुद्ध कांचन[1] ।। सुवर्णचक्रवर्ती नाम जाण ।। तै पासोन जाहलें त्यासी ।। ६४ ।। रायासि चित्तीं आनंदे थोर ।। म्हणे हा काय चमत्कार ।। करुनियां अमृत मिश्र ।। कर्दम घडलासें वाटतें ।। ६५ ।। अहा काय माझें पुण्य थोर ।। मज पावला ईश्वर ।। ऐसें स्तवन करून सादर ।। पुण्य अपार करी तेथें ।। ६६ ।। मग महापुण्यक्षेत्रभूमिसी ।। राजा खणोनि पाहे त्या ठायासी ।। तेथें गुप्त देवालय निघे तीर्थासी ।। पाताल गंगा ऐसे नाम जाहले ।। ६७ ।। देवालयीं लिहिलें असे ।। चिदम्बरक्षेत्र नाम ऐसें ।। शिवालयीं मूर्ती नसे ।। आकाशलिंग असें नाम त्यासी ।। ६८ ।। तेथें असती पंचसभा ।। इंद्रब्रम्हाविष्णूसभा ।। शिवपार्वतीची रम्य सभा ।। तांडव नृत्यसभा पांचवी ।। ६९ ।। सर्व सुरवरांचें विश्रांतिस्थान ।। रम्य चिदम्बरक्षेत्र पाहून ।। राजा विचारी येथें मूर्तिस्थापन ।। करावें भक्तिवृद्धिस्तव ।। ७०।। तंव राजासी जाहलें स्वप्न ।। येथें सुवर्ण मूर्तीचें स्थापन ।। करी लोकोपकाराकारण ।। दर्शनमात्रें होय उद्धार ।। ७१ ।। तंव प्रबुद्ध होऊनि नृपती ।। रुक्म[2] कढवोनि ओती ।। इतक्यांत मूस फुटली मागुती ।। कढवी भूपती सुवर्ण ।। ७२ ।। सदृढ करवोन मूस सिद्ध ।। रस ओतितां पुनः होतसे विद्ध[3] ।। यांपरी जाहले अबद्ध।। एकोन शतवार ।। ७३ ।। राजा कंटाळोनि फार ।। म्हणे मागुती करीन एक वार ।। ही सेवा न करिता स्वीकार ।। देह निर्धारें समर्पितों ।। ७४ ।। ऐसें चिंतूनि राव मनीं ।। सुवर्ण कढवी तत्क्षणी ।। प्रगटला स्वप्नीं सदाशिव ।। ७५ ।। म्हणे राजा काय इच्छिसी ।। सुवर्ण रस घेवोनि काय करिसी ।। ऐसें बोलत तेजोराशी ।। नृपापुढें उभा ठेला ।। ७६ ।। राव पाहे जंव पुढें ।। तेज फांकले चोहोंकडे ।। मग उठोनि धडपडे ।। प्रेमानंदें पायी लोळे ।। ७७ ।। मग विनवी बद्धांजुळी ।। मज आज्ञापी चंद्रमौळी ।। भोगमूर्ती करोनि सोज्वळी ।। स्थापी या स्थळीं पूजनार्थ ।। ७८ ।। मूर्ती करावया यत्न ।। निरालस्यें करितों

१. सुवर्ण. २. सोने. ३. भंगणें.

शि व चि द म्ब र

रात्रंदिन ।। साधेना काही केलिया प्रयत्न ।। करुं इच्छितों प्राणत्याग ।। ७९ ।। तंव बोले सदाशिव ।। पुण्यशीला न सोडी धीरभाव ।। तुज सांगतो एक उपाव ।। तैसें आचरतां कार्य साधे ।। ८० ।। आज होतां मध्यरात्र ।। एक येईल द्विजकुमार ।। त्याचे वचनापरी क्रियामात्र ।। करितां मूर्ती साधेल ।। ८१ ।। ऐसें बोलोनि सुरवरिष्ठ ।। गुप्त जाहला नीलकंठ ।। प्रबुद्ध होऊनी नृपश्रेष्ठ ।। वाट पाहत द्विजकुमाराची ।। ८२ ।। जंव जाहली मध्यरात्री ।। तंव आला एक ब्रम्हचारी ।। देदीप्यमान सूर्यापरी ।। म्हणे राजा भिक्षा घाली ।। ८३ ।। क्षुधित जाहलों भारी ।। भिक्षा घाली या अवसरीं ।। मोहें मज न पाठवी माघारी ।। जे असेल करीं तेंचि देई ।। ८४ ।। राजा वंदोनी विनवित ।। तप्त सुवर्णरस आहे हातांत ।। आंत येतां उत्तमान्न पर्याप्त ।। देतों घेवोनि तृप्त होई ।। ८५ ।। कां राजा मोहें दाटलासी ।। भिक्षा न देतां माघारें पाठवीसी ।। सत्वर मुखीं ओती रसासी ।। मागें पुढें न पाहता ।। ८६ ।। तंव आठवलें शंकरवचन ।। राजा जाहला सावधान ।। मुख पसरोनि जो उभा ब्राम्हण ।। धीरें रस ओती त्याचे मुखीं ।। ८७ ।। रस मुखीं ओतितां क्षणीं ।। तोचि ब्राम्हण तत्क्षणीं ।। दिव्य मनोहर मूर्ति हावोनि ।। तेजःपुंज बैसला पुढें ।। ८८ ।। कोटिसूर्यचंद्रप्रभा पूर्ण ।। ऐसी मूर्ती साधली तत्क्षण ।। कीं ब्रम्हानंदरस मुरोन ।। दिव्य मूर्ती ओतिली ।।८९ ।। अनंत ब्रम्हांडें विचित्रें ।। जेणें रचिली इच्छामात्रें ।। ज्याकारणें भांडती वेदशास्त्रें ।। तोचि सगुण मूर्ती जाहला ।। ९० ।। त्याचें सौंदर्य वर्णूं किती ।। वर्णावया ब्रम्हादिक शिणती ।। ऐसी मूर्ती पाहोनि नृपती ।। आनंदें विसरला देहभान ।। ९१ ।। शिवानंदीं होउनी निमग्न ।। सद्भावें करीतसे नमन ।। मग विधियुक्त करोनि पूजन ।। करी स्थापन शिवासी ।। ९२ ।। मग देवालयीं चक्रवर्ती ।। गोपुरें बांधी नाना रीती ।। नाम ठेवी चिदम्बर सभापती ।। भोगमूर्तीसी तैं पासोनी ।। ९३ ।। भोगमूर्ती सभेसि बैसवित ।। नित्य आनंदें उत्सव करित ।। तेथें भक्तांसि साक्षात्कार दृष्टांत ।। बहुतांसि दावित चिदम्बर ।। ९४ ।। जैसी ज्यांची असे भक्ती ।। तयांसि देत तैसीच प्रतीती ।। प्रगट ब्रम्ह सगुणमूर्ती ।। भक्तांप्रती भेट देत ।। ९५ ।। ऐसिया

शि व चि द म्ब र

प्रसिद्धक्षेत्रासी ।। मार्तंडदीक्षित महातापसी ।। पातले तप करावयासी ।। मार्तंडआज्ञेवरुनी ।। ९६ ।। आतां पुढें दीक्षित तपासी ।। संतुष्ट होवोनि व्योमकेशी ।। पुत्रत्व घेईल त्याचे कुशीं[1] ।। ऐका म्हणे चिदंबरकिंकर ।। ९७ ।। स्वस्तिश्री चिदम्बरचरित्र ।। ऐकतां तुष्टे सद्‌गुरुनाथ ।। यास्तव ऐका श्रोते समस्त ।। द्वितीयोऽध्याय गोड हा ।। ९८ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे आकाशचिदम्बरमहिमवर्णनं नाम द्वितीयोऽध्यायः ।। २ ।। ओवीसंख्या ९८ ।।

शिवचिदम्बर

**।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।**

शिवचिदम्बर

१. पोटी

# चिदम्बरावतारवर्णनम्




तेज फाकत सूर्यापरी। सर्वालंकार ल्याइले सर्वगात्रीं। तैसेची शोभति दक्षिणश्रोत्री। बिल्वमंजरी शुभ्राक्षता॥

॥ श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ॥ आदिमूर्ती अनंतरूपा ॥ अजअव्यया निर्विकल्पा ॥ नित्योत्साहा अध्यात्मदीपा ॥ करी पूर्ण कृपा मजवरी ॥ १ ॥ द्विजांसि सांगे मुनिवर ॥ ऐका पुढील चरित्र सुंदर ॥ ऐसें परम पावन क्षेत्र ॥ पुराण प्रसिध्द महास्थान ॥ २ ॥ तेथें तप करावयासाठीं ॥ भार्येसहित येतां उठाउठी ॥ भक्त्युत्साह उपजे दीक्षित पोटीं ॥ चिदंबरक्षेत्र पाहतां ॥ ३ ॥ जवं पाहे महाक्षेत्र ॥ दिसे भोंवतीं मनोहर ॥ वृंक्ष गुल्म तीर्थे थोर थोर ॥ सुशोभित मृग पक्षिगणीं ॥ ४ ॥ क्षेत्राभोंवतें रम्य उपवन ॥ ठायीं ठायीं जलाशय विस्तीर्ण ॥ दटित[1] विटप[2] छायासघन[3] ॥ न प्रवेशे सूर्यकिरण ज्या ठायी ॥ ५ ॥ अशोक खर्जूर नारळी ॥ मलयागरु चंदन पोफळी ॥ आंबे जांभळी खिरणी केळी ॥ स्थळोस्थळी वृक्ष शोभती ॥ ६ ॥ अंजीर औदुंबर बिल्व डाळिंब ॥ शेंवरी वट कडवेनिंब ॥ पारिजात मंदार तुलसी कदंब ॥ शोभती नभ भेदिती ऐसे ॥ ७ ॥ प्रत्येक वृक्ष ठायी ठायीं ॥ वेष्टिले असती जाईजुई ॥ कुसुम गंध सर्वां ठायीं ॥ घमघमाटें व्यापिलें ॥ ८ ॥ चंपक बकुल मालती ॥ गुलाब शेवंती वृंक्ष अगस्ती ॥ विकसित पुष्पभरें शोभती ॥ कासाराभोंवतीं[4] त्या ठायी ॥ ९ ॥ प्रती एक सरोवरीं ॥ स्वादु सुशीतळ शोभे वारी ॥ कमल कल्हार शतपत्र भारी ॥ प्रतिकासारीं विराजती ॥ १० ॥ जलकुक्कुट कारंडव ॥ हंस मयूर चातक समुदाव ॥ कोकिल आलापिती मंजुलरव[5] ॥ अपूर्व वैभव क्षेत्राचें ॥ ११ ॥ चमरी रुरु[6] कस्तुरीमृग ॥ जवादि मार्जार गवय कुरंग ॥ ठायीं ठायीं शोभती संघ ॥ निर्भय तेथें विचरत ॥ १२ ॥ नगर शोभे रम्य परिघांतरें ॥ तळपती जेथें दिव्य मंदिरगोपुरें ॥ सिद्ध ऋषी मुनीश्वर अत्यादरें ॥ सेविती निरंतर ज्या ठायीं ॥ १३ ॥ सुवर्णरत्नखचित देवालय ॥ जेथें सेवार्थं येती देवसमुदाय ॥ उपमन्यु कण्वादि मुनिवर्यं ॥ जेथें दिव्य वर लाधले ॥ १४ ॥ ऐसिया पावन क्षेत्रासी ॥ पाहतां दीक्षित जाहला हर्षी ॥ आरंभिलें दुर्धर तपासी ॥ तीर्थविधी करोनि आधी ॥ १५ ॥ ब्राम्हमुहूर्ती उठोनि ॥ उदयापूर्वीं स्नान

१. दाट २. वृक्ष ३. दाट छाया ४. सरोवरासभोंवतीं ५. मंजुळध्वनि ६. हरिण




शिव चिदम्बर

करोनि ॥ संध्यादि नित्यकर्म सारोनी ॥ शिवपूजा करित एकोभावें ॥ १६ ॥ मग आसन मांडोनि मृदुल ॥ दर्भअजिन चित्रकंबल ॥ त्यावरी बैसोनी निश्चळ ॥ पुरश्चरण आरंभित ॥ १७ ॥ जप करी मध्यान्हपर्यंत ॥ मागुती स्नान करोनि शुचिर्भूत ॥ भावें पूजोनि शिवाकांत[1]॥ ध्यानस्थ बैसत तैसेंचि ॥ १८ ॥ प्रदोष समय येतां मागुती ॥ स्नान करोनि शिवतीर्थी ॥ प्रदोषपूजा अतिप्रीती ॥ एक भक्ती करीतसे ॥ १९ ॥ पूजा जाहलियानंतर ॥ गायत्रीजप यथासांग परिकर ॥ करीत चित्ती ध्यातसे शिवावर ॥ बारा घटीपर्यंत ॥ २० ॥ मग दीक्षित उठोनि ॥ अर्धशेर दूर्वांचा रस काढोनी ॥ शिवासी नैवेद्य दावोनी ॥ प्रसाद घेतसे तावन्मात्र ॥ २१ ॥ सप्रेमें शिवनाम गर्जत ॥ कृष्णाजिन आस्तरोनि तेथ ॥ विश्रांती घेतसे यत्किंचित ॥ चित्तीं न चिंतित शिवावीण ॥ २२ ॥ नीरक्षीर जैसें समरसे ॥ शिवचरणी दीक्षित चित्त तैसें ॥ समरसोनी सदा विलसे ॥ अन्य विषय न चिंतितां ॥ २३ ॥ यापरी लोटतां षण्मास ॥ शुक्लपक्षीचा जैसा ओषधीश[2] ॥ तैंसी प्रतिदिनीं दीक्षित तपास ॥ वृद्धी दशा चालिली ॥ २४ ॥ एके दिवशी मार्तंड दीक्षित ॥ आनंदें बैसले शिवासि ध्यात ॥ तव निशासमय[3] झाला संप्राप्त ॥ नसे किंचित देहभान ॥ २५ ॥ ऐसें दिक्षित करितां अनुष्ठान ॥ भाग्य उदयासी आले जाण ॥ पुरश्चरण होतां संपुर्ण ॥ झाला प्रसन्न चिदम्बर ॥ २६ ॥ त्यासमयीं प्रगटला महादेव ॥ सर्वे घेवोनि निज वैभव ॥ काय दीक्षिताचा सुदैव ॥ उभा राहोनि हांक मारी ॥ २७ ॥ ऊठ दीक्षितेंद्रा निष्पाप ॥ सिध्द जाहलें बा तुझें तप ॥ जें इच्छिसी अमूप ॥ माग देतों या समयीं ॥ २८ ॥ यापरी बोलत असतांही शिव ॥ ध्यानरंगीं गुंगोनि अपूर्व ॥ न जाणतां शिवाविर्भाव[4] ॥ बैसला तैसाचि ध्यानस्थ ॥ २९ ॥ तव सदाशिव कृपावंत ॥ त्याचें मस्तकी वरद हस्त ॥ ठेवोनि हालवी ऊठ म्हणत ॥ हाक फोडीत वारंवार ॥ ३० ॥ तंव दीक्षित येवोनि भानावर ॥ डोळे उघडोनि पाहे समोर ॥ शीततेज कोंदाटलें सर्वत्र ॥ भास्वर[5] जे कोटि सूर्यापरी

१. पार्वतीपति शंकर २. चंद्र ३. रात्रीची वेळ. ४. शिव प्रत्यक्ष झालेला. ५. तळपणारे.


शिवचिदम्बर

शि व चि द म्ब र

।। ३१ ।। तेज पाहतां नेत्र झांकले ।। विस्मित होवोनि स्तब्ध बैसले ।। मुहूर्तानंतर डोळे उघडले ।। तंव पुढें झळके कैलासनाथ ।। ३२ ।। पुन्हां सावध होवोनि दीक्षितेंद्र ।। नेत्र उघडोन पाहे सत्वर ।। तो पुराणपुरुष अपर्णावर ।। पुढें उभा देखिला ।। ३३ ।। शूभ्र जटा पंचवक्त्र ।। शुभ्रस्फटिकमालात्रिनेत्र ।। शुभ्रभस्मोद्‌धूलित कृपापात्र ।। तो पुढें उभा देखिला ।। ३४ ।। भवभयहारक भवानीपती ।। भक्तवत्सल भव्यमूर्ती ।। कंठी रुद्राक्ष रुंडमाला शोभती ।। तो शंकर पुढें देखिला ।। ३५ ।। गजाननजनक गंगाधर ।। गजचर्मप्रावरण गौरीहर ।। गजरे भोवतीं सेवितीं सुरवर ।। तो शंकर पुढें देखिला ।। ३६ ।। सर्वाभरणभूषित पार्वती ।। वामांकी बैसली महासती ।। कनकादि-मुक्ताहार-शोभती ।। दोन्ही करीं झळकती वज्रचुडे ।। ३७ ।। ऐशी त्रिभुवनसुंदर शिवमूर्ती ।। पाहतां दीक्षित आनंदला चित्तीं ।। सद्‌भावें शिर ठेवोनि पायावरती ।। करी प्रणती साष्टांगें ।। ३८ ।। आनंदजळे अंघ्रि क्षाळी ।। केशीं झाडित पायधूळी ।। प्रेमभक्तीनें लोळत पदकमळीं ।। तंव चंद्रमौळी उठवित ।। ३९ ।। सादरें देवोनि परिष्वंग[1] ।। वर माग म्हणे सर्वांतरंग ।। दुर्लभ जरी देतों अभंग ।। तुष्टलों तुझे तपासी ।। ४० ।। मग विनवी दीक्षित बद्धांजळीं ।। वर काय मागूं चंद्रमौळी ।। देशी तरी पदकमळीं ।। दृढ भक्ती देई एक ।। ४१ ।। दीक्षितवचन ऐकता म्हणे चिदम्बर ।। कां विसरलासी ब्राम्हणवर ।। काय इच्छूनि तप सुघोर ।। आरंभिलेसी सुतेच्छु ।। ४२ ।। मग आठवोनि निज कामना ।। शंकरासी करी विज्ञापना ।। मागतों देईं दयाघना ।। पुत्ररत्ना तुजसारिख्या ।। ४३ ।। गर्जोन बोले उमारमण ।। मज असे भूवरीं कारण ।। धर्मस्थापना करणें पूर्ण ।। तूंही अससी सुतेच्छु ।। ४४ ।। यास्तव अनुष्ठान करी पूर्ण ।। अवतरतों तुझा पुत्र होवोन ।। ऐसें ऐकतां चिदम्बरवचन ।। मागुती पुसे दीक्षित ।। ४५ ।। मनुष्यत्वें जन्म घेणार आपण ।। त्या वेळीं व्हावया तुमचें स्मरण ।। कांही तरी बोलावी प्रत्ययखूण ।। जेणें स्मरण होय ते वेळीं ।। ४६ ।। तंव बोले चिदम्बर ।। अवतारचिन्ह सांगतो

शि व चि द म्ब र

१. आलिंगन

निर्धार ।। जन्मतां पाहसी दक्षिणकर्णावर ।। कोमल बिल्वपत्र अक्षता ।। ४७ ।। ऐसें बोलोनि कैलासनाथ ।। तेथेंचि जाहला गुप्त ।। हा चमत्कार पाहोनि दीक्षित ।। नमन करीत त्या ठायीं ।। ४८ ।। अनुग्रह सांगोनि पत्नीसी ।। समाप्त करोनि अनुष्ठानासी ।। भार्येसहित निजपुरासी ।। पातला परमानंदें ।। ४९ ।। घरीं शिवाराधना करित ।। काळ कंठिता आनंदें क्वचित ।। शिवानुग्रहसमय संप्राप्त ।। जाहला एके समयीं ।। ५० ।। शंकर प्रवेशे पतिव्रता उदरीं ।। लक्ष्मी माता राहिली गरोदरी ।। पाहतां दीक्षितासी आनंद भारी ।। म्हणे थोर भाग्य माझें ।। ५१ ।। यज्ञदानतपे जो शंकर ।। न भेटे तो हा चिदम्बर ।। अक्षयीं खेळेल मजबरोबर ।। झालो तेणें मी कृतकृत्य ।। ५२ ।। शुक्लपक्षशशीपरी ।। गर्भ वाढत प्रतिवासरीं ।। दोहदचिन्ही लक्ष्मी सुंदरी ।। लोकोत्तर शोभतसे ।। ५३ ।। अंग होंऊ लागलें पुष्ट ।। ब्रम्हतेज सर्वोत्कृष्ट ।। मुखीं टवटवी दिसे उत्कट ।। चंद्रापरी आल्हाददायक ।। ५४ ।। सदानंद पतिव्रता चित्तीं ।। नेत्र झांकोनी अंतर्ज्योती ।। ध्यात बैसतां आंगी निघती ।। पुलकोद्गम[1] वारंवार ।। ५५ ।। अंतरी प्रवेशला चिदम्बर ।। मी तूंपणाचें भान गेलें दूर ।। चराचर भरोनि चिदम्बर ।। एकरूप पाहे लक्ष्मी माता ।। ५६ ।। दीप भास्कर एकत्र होता ।। ज्यापरी न दिसे दीपता ।। तैसी चिदम्बर ज्योतींत माता ।। गढूनि जाहली एकरूप ।। ५७ ।। चिदम्बरावीण न देखे ।। चिदम्बरावीण न ऐके ।। अवस्थात्रयीं निज सुखें ।। चिदम्बरी समरसली ।। ५८ ।। मनोविचारें चिदम्बर ।। ध्यानी ध्यातां एकवार ।। चिदम्बर दिसे चराचर ।। तो हा पूर्णत्वे शिरला उदरीं ।। ५९ ।। मग काय सांगूं मातेची स्थिती ।। सदोदित पूर्ण ब्रम्हीं वसति ।। पाहोनि दीक्षितें पत्नीवृत्ती ।। विस्मय चित्तीं पावला ।। ६० ।। अये दीर्घ ध्यानें काय ध्यासी ।। काय इच्छा वसे मानसीं ।। सांगता पुरवीन तव इच्छेसी ।। बोल म्हणोनी पुसतसे ।। ६१ ।। चिदम्बरानंदी होवोनि एक रुप ।। पावली होती निर्विकल्प ।। पतिवचन ऐकतां मौन्यरुप धरोनि उगी बैसली ।। ६२ ।। म्हणे काय झालें इजसी ।।

१. रोमांच



शिव चिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

मौन धरोनी बैसली कैसी ।। मागुती हांक मारोनि सतीसी ।। पुसे इच्छिसी काय सांग ।। ६३ ।। तंव पतिव्रता नेत्र उघडोन ।। बोले काय पुसतां मज कारण ।। निरिच्छासी काय इच्छा म्हणोन ।। सर्वत्र पूर्ण मीच एक ।। ६४ ।। सर्वांसी मूळ कारण ।। मीच एक स्वानंदपूर्ण ।। भक्तांसि देईन निजस्थान ।। धर्म स्थापीन महीवरी ।। ६५ ।। धर्मसंस्थापन करीन ।। कलीसी आकलोनि बांधीन ।। ब्रम्हकर्म वाढवीन ।। लोपवीन कलिधर्म ।। ६६ ।। धर्मज्ञानयुक्त सतींवचन ।। यापरी ऐकता दीक्षितराण ।। मागुतीं ऐकावया भगवद्वचन ।। पुनः पुनः प्रश्न करी ।। ६७ ।। सदा बोलत धर्मवचन ।। मज दुसरी इच्छा नसे जाण ।। किंतु धर्मपालन भक्तरक्षण ।। जगदुध्दारण इच्छितें ।। ६८।। कधी कधी बोले जगन्माता ।। कदा सुंदर बाळरूपें आयता ।। आलियासी पाहीन कैलासनाथा ।। इतुकेंचि सांप्रत इच्छितें ।। ६९ ।। यापरी दीक्षितराणी ।। अद्वैत बोलत प्रतिदिनीं ।। गर्भस्थ शिवाची भावी करणी ।। बोलोनि दीक्षिता तोषवी ।। ७० ।। आनंदसागरीं बुडोन ।। दीक्षितही सीमंत उन्नयन ।। आदिकरोनि गर्भसंस्कार पूर्ण ।। तत्काळीं संपादित ।। ७१ ।। नवमास झाले पूर्ती ।। दशम मासाची संप्राप्ती ।। कार्तिक कृष्ण षष्ठी तिथी ।। सोमवार दिवस पातला ।। ७२ ।। पंचशुभ-ग्रह स्वक्षेत्रीं ।। आले होते ते वासरी ।। मकर लग्नी द्वितीय प्रहरीं ।। भक्त कैवारी अवतरला ।। ७३ ।। अवतरतां श्रीजगन्नाथ ।। सुस्पर्श्य सुटला मारुत ।। दिशा जळे[1] साधुचित्त ।। निर्मलत्व पावली[2] ।। ७४ ।। देव दुंदुभी त्राहाटिती ।। गगनीं पुष्पर्षाव करिती ।। त्या समयीं दंपतीपुढें रम्य मूर्ती ।। एकाएकीं उभीठाके ।। ७५ ।। तेज फांकत सूर्यापरी ।। सर्वालंकार ल्याइले सर्व गात्रीं ।। तैसेचि शोभती दक्षिण श्रोत्रीं ।। बिल्बमंजरी शुभ्राक्षत ।। ७६ ।। मंदहास प्रसाद सुमुख ।। अष्टवर्षात्मक बालक ।। त्रिपुंड्र रेखिला असे सुरेख ।। रुद्राक्ष नागमुंड मंडित ।। ७७ ।। ऐसिया तेजस्वी बाळासी ।। पाहतां दीक्षित तुष्टला मानसीं ।। पायी मस्तक ठेवोनि तपोराशी ।। बद्धांजळी स्तोत्र करी ।। ७८ ।। वचन दिल्यापरी उमापती

..........................

१. पाणी २. उजळेल

शि
व
चि
द
म्ब
र

शि
व
चि
द
म्ब
र

|| सत्य केलेंसी सत्यकीर्ती || ओळखिली मी तूजी मूर्ती || कैलासपती तूंचि सत्य || ७९ || सांबा मृत्युंजया गिरिजारमणा || मनुष्यत्वें अवतरलासि ज्ञानपूर्णा || सत्य करावया निजवचना || अजन्मा तूं जन्म घेतलासी || ८० || जन्मादिषड्भावरहित तूं || धरोनि भक्तरक्षण हेतू || अवतार घेतलासी लौकिकार्थ || मायातीता ज्ञानमूर्ती || ८१ || ज्याचिया आज्ञें ब्रम्हा विष्णू || आदि करोनी सुरगणू || ज्यासी भिवोनि पाळिती स्वस्थानू || असो नमनू त्या तुजसी || ८२ || ज्याचे नांव घेता वदनी || अनंत जन्मींचीं पापें जातीं जळोनी || तो तूं आलासी माझा पुत्र होवोनि || काय वानूं भाग्य माझें || ८३ || धन्य धन्य झालों मी कृतकृत्य || माझें कुळ उद्धरिलें तुवा सत्य || हें अलौकिक रुप निर्मित || लौकिकीं प्रगट न दाविसी || ८४ || हे रुप करी उपसंहार || बाळ रुप परम सुंदर || दावोनि निववीं माझें अंतर[1] || दयासागरा याउपरी || ८५ || ऐसें करोनि भावें स्तोत्र || मस्तक ठेवोनि चरणांवर || न्याहाळी दिव्य रूप वारंवार || हृदयीं रेखोनी घेतलें || ८६ || दीक्षितें येणेपरी स्तवोनी || साष्टांग घातला चरणीं || तंव माता स्वरुप पाहोनी || घाली चरणी साष्टांग || ८७ || चित्तीं आनंदसिंधू हेलावला || हर्षांकुर फुटला सर्वांगाला || स्वर कुंठोनि कंठ सद्गदित झाला || प्रेमपाझर डोळां स्त्रवत || ८८ || म्हणे शंकर माउली दयाळे || माझे पुरविले डोहाळे || तुझ्यानें बेचाळीस कुळें || उद्धरलीं पुत्रराया || ८९ || महाराज हें रुप अलौकिक || योगी धूंडिती निष्कलंक || भवरोगरसायन सुरेख || माझे हृदयीं राहो सर्वकाळ || ९० || निर्गुण ही तूं दयाघना || पुरवावया भक्तकामना || सगुण अवतार घेशी नाना || आली करुणाकरा प्रचिती || ९१ || अभयदान दिधलेंसी || तें सत्य केलें ज्ञानराशी || आतां अलौकिक बाळलीलेसी || दावोनि आम्हांसी तोषवीं || ९२ || दयाळा तुझें लालनपालन || कोटि जन्म सुकृतेंही दुर्लभ जाण || ती सेवा घ्यावी मजकडून || इतुकी वासना पूर्ण करीं|| ९३ || प्रत्यक्ष तूं भेटलासि असतां ||

..............................

१. अतःकरण

शि
व
चि
द
म्ब
र

मज नसे मोक्षचिंता ।। दृढ भक्ती देवोनि समर्था ।। तंव माया दूर करी ।। ९४ ।। शंकरा वंदितो तव चरण ।। इतुकें मागणे देईं मजकारण ।। ऐसें बोलोनि साष्टांग नमन ।। लक्ष्मी माता करी तेधवा ।। ९५ ।। चिदम्बर उठवोनि मातेसी ।। म्हणे आई तूं जें जें मागसी ।। तैसेंचि होईल निश्चयेंसी ।। संशय मानसी न धरी आतां ।। ९६ ।। मी जगदीश सर्वकारण ।। अवतरलों तुमचा पुत्र होवोन ।। आपण जें केलें माझें स्तवन ।। तेणें सुप्रसन्न जाहलो ।। ९७ ।। कृष्णावतारीं जें सांगितलें होतें ।। तें आतां सत्य करावया माते ।। हें स्वरुप दाविले तुम्हांतें ।। कृष्णाद्भिन्न हरात्मक ।। ९८ ।। तुमचें स्तोत्र जे ऐकती पठती ।। त्यांचे सर्व मनोरथ पुरती ।। धनधान्यपुत्रसंतंती ।। निश्चयें लाधती इहामुत्र ।। ९९ ।। ऐसें बोलोनि चिदम्बर ।। तत्काळ झाला बाळ सुकुमार ।। पुढें निघेल रसाळ बाळचरित्र ।। ऐका म्हणे चिदम्बरकिंकर ।। १०० ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ ।। म्हणोनि ऐका श्रोते समस्त ।। तृतीयोऽध्यायस्वादु हा ।। १०१ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे चिदम्बरावतारवर्णनं नाम तृतीयोऽध्यायः ।। ३ ।। ओवीसंख्या ।। १०१ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

## बाललीलावर्णनम्



मातींत जे होते दगडगुंडे। ते जाहले मवाळ पेढे। जे जे होते लहान खडे। ते जाहले खडीसाखर॥

श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। जय जय लीलानाटका ।। जय ब्रम्हानंदा अनिर्वाच्यसुखा ।। सरस्वतीसावित्रीप्राणसखा ।। सद्‌गुरुनाथा चिदम्बरा ।। १ ।। आदिकर्ता अव्यक्त रूपा ।। अज्ञानविध्वंसका पूर्णप्रतापा ।। योगिहृन्मंडप ज्ञानदीपा ।। करिसी पूर्ण कृपा भक्तांवरी ।। २ ।। श्रीचिदम्बरा भक्तकैवारी ।। जय सर्वोत्तमा जगदुध्दारी ।। माझे मनोरथ पूर्ण करी ।। तव चरित्र वदवी रसाळ ।। ३ ।। बुद्धीसाक्षी ज्ञानपूर्णा ।। माझे हृदयीं बैसोनी कृपाघना ।। मतिप्रकाश करी सद्‌गुरुराणा ।। चरित्र जैसें होय रसभरित ।। ४ ।। मुनीश म्हणे ब्राम्हणांसी ।। अवधान धरा मानसीं ।। तंव लक्ष्मी पाहे सुंदर बाळासी ।। तेजोराशीं भानूपरी[1] ।। ५ ।। ज्याचें तेज सूतिकागृहीं ।। व्यापिलेंसें सर्वांठायीं ।। अयोनिसंभव बाळही ।। सुरेख रडूं लागलें ।। ६ ।। मायालाघवी जगदीश ।। बाळभाव दावोनि मातेस ।। दावित जसतां जन्मविलास ।। निर्व्यथ[2] मायेने हातीं घेतलें ।। ७ ।। ऐकोनि चिदम्बर जन्मोत्सव ।। मिळाला सुवासिनीसमुदाव ।। व्दिजांसी बोलावोनि दीक्षितराव ।। जातकर्म करीतसे ।। ८ ।। गोवस्त्रतिलहिरण्यदान ।। अपार देवोनी तोषवी ब्राम्हण ।। इतुक्यांत ज्योतिर्वेत्ते निपुण ।। पातले ऐकोन जन्मवृत्त ।। ९ ।। पाहोनि तत्काळ लग्नशुध्दी ।। जन्मफळ सांगती सुबुद्धी ।। ऐका दीक्षितेंद्रा त्रिशुद्धी ।। सांगूं यथाबुद्धी जातक ।। १० ।। या लग्नीं जन्मेल जें बाळ ।। लोकोद्धारक होय प्रबळ ।। शापानुग्रहसमर्थ केवळ ।। होईल अवतारी पुरुष ।। ११ ।। यावच्चंद्रार्क याची कीर्ती ।। स्थिर राहील त्रिजगतीं ।। लग्नबळ पाहतां वाटे चित्तीं ।। भूपती[3] अवतरला ।। १२ ।। आंगचिन्ह पाहोनि सामुद्रिक ।। म्हणती हा होतो जगत्पालक ।। जगद्‌गुरु विख्यात यशस्क ।। देवनायक वंदिती यांसी ।। १३ ।। आशीर्वादसहित सकौतुक ।। येणेंपरीं जातक सामुद्रिक ।। सांगोनि गेले ज्योतिषीलोक ।। स्वस्थानासी प्रेमभरित ।। १४ ।। मग शुभमूहूर्ती जनक ।। नामकरण करी प्रीतिपूर्वक ।। सर्वश्रुतिरत्नसिद्धिदायक[4] ।। नाम ठेविलें चतुरक्षर ।। १५ ।। चतुर्विधपुरुषार्थसाधक ।। हें चतुरक्षर नाम सुरेख

१. सूर्यासारखे २. वेदनारहित ३. शंकर ४. मोक्ष देणारे

।। कीं चतुर्विधमुक्तिप्रापक ।। चिदम्बर चतुरक्षर ।। १६ ।। जेथें वसती मुक्तिचतुष्टय ।। ज्यासी वर्णिती वेदचतुष्टय ।। ज्याचा स्मरणें उद्धरती वर्णचतुष्टय ।। ते चिदम्बर चतुरक्षर ।। १७ ।। जेणें साधती साधनचतुष्टय ।। जेणें उडती देहचतुष्टय ।। ज्यासी न शिवे अवस्थाचतुष्टय ।। तें चिदम्बर चतुरक्षर ।। १८ ।। सहा शास्त्रें जें वेद चार ।। ज्यासी वर्णिती निरंतर ।। चारीवाणी[1] खाणी[2] चार ।। जया समोर न येती[3] ।। १९ ।। ऐसें जें प्रकाशे सर्वोत्तम ।। जें सच्चिदानंदधाम ।। चतुरक्षर चिदम्बर नाम ।। ठेविलें त्या बाळासी ।। २० ।। मग शुक्लपक्ष चंद्रापरी ।। बाळ वाढे दीक्षिताघरीं ।। क्षणोक्षणीं लीला दावित परोपरी ।। मातापितरां तोषवित ।। २१ ।। अतिचपळ बाळ कनुवाळ ।। नानाविध करी खेळ ।। शस्त्र दीप विळा अनळ ।। वेळोवेळी धरुं धांवे ।। २२ ।। ते सोडवितां घेवोनि उडी ।। देव्हारीं देव खाली पाडी ।। तूप दूध दहीं लवंडी ।। मडकें फोडी नानापरी ।। २३ ।। धान्य पीठ एकीकडे ।। मिसळोनि धांवत धडपुडे ।। तांब्ये घागरी एकीकडे ।। लवंडीतसे चिदम्बर ।। २४ ।। चिदम्बराचे चपळतेनें ।। गृहकृत्य सोडिलें मातेनें ।। क्षणमात्र बैसता व्यग्रपणें ।। नाना गोडी करीतसें ।। २५ ।। आपण असोनि परिपूर्ण ।। लौकिका ऐसें करी स्तनपान ।। जननी जातां कार्यार्थ आपण ।। मागें रुदत रांगतसे ।। २६ ।। कार्यव्यग्र जननी जरी न घेत ।। आपण द्वारा पुढें लोळत ।। भक्तपरवश समर्थ ।। लीला अघटित दावितसे ।। २७ ।। माता संबोखोनि मागुती ।। आपणासि समर्पितां जनका हातीं ।। बोबडें बोलता पितृचित्तीं ।। हर्ष अपार होतसे ।। २८ ।। बापा क्षुधा बाधतसे निक्षून ।। करवीं मजसी स्तनपान ।। म्हणोनि दों हातीं पितृस्तन ।। धरोनि पिऊं इच्छित ।। २९ ।। तंव माता विस्तीर्ण पात्रीं ।। षड्रसान्नें वाढोनि ते अवसरीं ।। भोजनार्थ नेवोनि माजघरीं ।। कवळ वक्त्रीं घालित ।। ३० ।। एक दोन घेवोनि कवळ ।। सवेंचि पळतसे बाळ ।। मागुती माता आणोनि जवळ ।। आग्रहें कवळ घालितसे ।। ३१ ।। बाळक पळतां सत्वर ।। वेगें धरी माता कर ।।

...............................

१. परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी. २. उगम. ३. पलीकडचा.

शि व चि द म्ब र

म्हणे मज खेळाया अवसर ।। नसे शीघ्र जेविं बापा ।। ३२ ।। मुख दाबोनि बाळ बैसत ।। माता बळें मुख उघडवित ।। तंव बाळक मुख पसरित ।। दिसे अद्‌भुत पुत्रमुखीं ।। ३३ ।। सप्त स्वर्ग सप्त पाताळ ।। सप्त समुद्र ग्रहमंडळ ।। सुतवदनी सशैल भूतळ ।। पाहत जननी तेधवां ।। ३४ ।। भूमंडलांत भरतखंडी ।। भरतखंडी ग्राम उदंड ।। ग्रामांमाजी स्वग्राम उघड ।। देखतसे सुतवदनीं ।। ३५ ।। स्वग्रामीं पाहे निजसदन ।। सदनीं बैसलीसे आपण ।। आपुले मांडीवरी बाळ भुवन ।। देखत माता पुत्रमुखीं ।। ३६ ।। तेथें बाळें पसरिलें मुख ।। त्या मुखीं याचे परी सर्व लोक ।। पाहतां जननीसी भय कौतुक ।। होवोनि झांकत नेत्रांबुज ।। ३७ ।। विश्वरुप पाहतां जननीं ।। विस्मय पावोनि अंतःकरणीं ।। निवेदी वृत्त पतिचरणीं ।। पुत्रकरणी सांद्यत ।। ३८ ।। दीक्षित ऐकतां सतिवचन ।। म्हणे परमानंद पावोन ।। नर नोहे तुझा नंदन ।। कैलासरमण अवतरला ।। ३९ ।। ऐसें बोलोनि दीक्षित ।। पुत्रासि प्रार्थितसे बध्दहस्त ।। प्रगट न होई बाळवयांत ।। राहे गुप्त जगन्नाथा ।। ४० ।। ऐकतां पितृविज्ञप्ती ।। बाळक हंसत मागुती ।। मायाजाळ टाकोनि मातेवरती ।। म्हणे आई जेववीं वेगीं ।। ४१ ।। इत्यादि नाना गुप्तलीला ।। दावोनि तोषवी जनकजननीला ।। दुर्ज्ञेय जो ब्रम्हादिकांला ।। सहज त्या पाहती दंपती ।। ४२ ।। केधवां खेळे चालत ।। उड़त बसत धांवत ।। कधीं कधीं गात नाचत ।। खेळतसे भक्तवत्सल ।। ४३ ।। ज्याचें स्वरुप पहावयासी ।। अगोचर[1] म्हणती श्रुतिराशी ।। तें सुलभ गोचर नारीनरासी ।। बाळवेषें खेळतां अंगणीं ।। ४४ ।। ज्याचिये सत्तें इंद्रादिक वर्तती ।। ज्याचे अंगुष्ठापासुनी भागीरथी ।। जन्मली त्यासी माता मांडीवरती ।। नाहूं घाली घेवोनियां ।। ४५ ।। ज्याच्यां आधारें राहे मेरु स्थिर ।। तो चाले धरोनि भिंतीचा आधार ।। मायालाघवी चिदम्बर ।। भक्तपरवश जाहला ।। ४६ ।। प्राणिमात्रांसी जो अन्न पुरवित ।। तो मातेसी मागे दूधभात ।। पूर्ण करावया भक्तहेत ।। बालचरित दावितसे ।। ४७ ।। ऐसे असतां दीक्षितासी ।। दुसरा पुत्र ज्ञानराशी

शि व चि द म्ब र

.............................
१. न दिसणारें.

शि व चि द म्ब र

।। उपजला गुणाढ्य शेषांशी ।। प्रभाकर नाम त्याचें ।। ४८ ।। पुढें शेषा नामें एक कन्या ।। जाहली दीक्षितासी द्विजवर्या ।। तीघांसी खेळवीत त्या समया ।। दंपती हर्ष पावती ।। ४९ ।। चिदंबर प्रभाकर ।। कालयोगें उभय कुमर ।। पितृगृहीं वाढले परस्पर ।। रामकृष्णापरी प्रीतीयुक्त ।। ५० ।। पूर्वी जैशा यशोदेला ।। दाविल्या होत्या बाललीला ।। त्यापरी जनकजननीला ।। अपूर्व लीला दावितसे ।। ५२ ।। क्षणोक्षणीं स्वसत्ता प्रगटवित ।। सर्वेचि मायापदर टाकित ।। मायबापां हर्षगिरीवरी बैसवित ।। चिदंबर खेळतसे ।। ५२ ।। प्रतिदिनीं श्रीचिदंबर ।। सर्वे घेवोनि वयस्यकुमर[१] ।। लोकसिद्ध क्रीडा अपार ।। करीत खेळे अंगणी ।। ५३ ।। धन्य त्यांचे तप थोर ।। वयस्य केला श्रीचिदंबर ।। जो योगींद्रमानसविहार ।। न कळे पार वर्णितां ।। ५४ ।। जो आदिपुरुष मायालाघवी ।। बाळांसि नाना खेळ करोनि दावी ।। मध्यें राहोनि आपण टाळ वाजवी ।। नृत्य करवी बाळां हातें ।। ५५ ।। एकदां इटी दांडु चक्रे ।। हुतुतु हमरी खेळविली चिदम्बरें ।। तैसेंचि हमामा घालीत गजरें ।। खेळती बाळे स्वामीसवें ।। ५६ ।। एकदां वरी उडवित फळ गोळी ।। एकदां खेळती चेंडूफळी ।। नेत्र झांकोनि एके वेळीं ।। लपंडाव खेळती ।। ५७ ।। बळें झोंबी घेवोनि एक ।। खालीं पाडिती एकासि एक ।। खालीं पडतां हरिखें बाळक ।। टाळी पिटोनी हांसती ।। ५८ ।। एक सुरुवाती करोनि ।। म्हणती काढारे शोधोनी ।। जो शोधी त्यासी शिंवू म्हणोनी ।। धांवताती सपाटे ।। ५९ ।। इटी दांडू कंदुक क्रीडन ।। नेत्रमार्गण ।। वाह्य वाहक सेतुबंधन ।। क्रीडा करी बाळांसवे ।। ६० ।। असे एके दिवशीं श्रीचिदम्बर ।। सवें घेवोनि वयस्यकुमार ।। प्रस्तरें[२] बांधोनि एक शिवमंदिर ।। पूजा आरंभित निजांगणी ।। ६१ ।। एक्या प्रस्तरीं उमावर ।। आवाहन करोनि श्रीचिदम्बर ।। जळ फळ पत्र नीर ।। समर्पोनि पूजितसे ।। ६२ ।। मानसोपचारें नाना वस्तू ।। शिवासी समर्पित श्रीगुरुनाथू ।। जी जी कल्पित समर्पी वस्तू ।। ती बाळकीं प्रत्यक्ष देखिली ।। ६३ ।। बाळक विस्मय पावोनि थोर ।। म्हणती

१. मित्र २. दगडांनी

शि व चि द म्ब र

नर नोहे हा चिदम्बर ॥ होईल निःसंशयें शंकर ॥ कल्पित वस्तू प्रगटवित ॥ ६४ ॥ ऐशीं भोवतीं बाळकें ॥ पाहत असतां सकौतुकें ॥ तव नैवेद्यार्थ हरिखें ॥ मृत्तिका राशी मांडित ॥ ६५ ॥ प्रदक्षिणा नमस्कार स्तुती ॥ नानापरी करोनि आरती ॥ तीर्थ देवोनि बाळकांप्रती ॥ प्रसाद माती वांटित ॥ ६६ ॥ बाळकीं हातीं घेतां प्रसाद ॥ प्रगटे बाळमहिमा आगध ॥ माती झाली शर्करा शुद्ध ॥ लागत स्वाद मुखीं टाकितां ॥ ६७ ॥ मातींत जे होते दगड गुंडे ॥ ते झाले मवाळ पेढे ॥ जे जे होते लहान खडे ॥ ते जाहले खडीसाखर ॥ ६८ ॥ बाळकें भक्षिती आवडी ॥ मुखीं लागतां विलक्षण गोडी ॥ मागुतीं हात करोनि पुढती ॥ मागती तीं प्रसाद ॥ ६९ ॥ प्रसाद भक्षोनि बाळकें निजसदनासी जाती हरिखें[1] ॥ स्वजनापुढें सांगती कौतुकें ॥ श्रीचिदम्बरबाळलीला ॥ ७० ॥ मातीची साखर करोनी ॥ प्रसाद वांटिला म्हणोनि ॥ जन ऐकोनि चिदम्बरकरणी ॥ पूजास्थानी धाविन्नले ॥ ७१ ॥ मित्र बाळांसवें सुंदर ॥ खेळत असतां चिदम्बर ॥ सर्वही करिती नमस्कार ॥ जयजयकारें गर्जत ॥ ७२ ॥ लीलावलोकनें विस्मित ॥ जन करोनि प्रणिपात ॥ गृहासि नेती धरोनि हस्त ॥ सांगत पित्यासी बाळलीला ॥ ७३ ॥ हें वृत्त ऐकतां मार्तंडदीक्षित ॥ सविनयें पाठवोनी जन समस्त ॥ एकांती नेवोनी स्वसुत ॥ विनवीत चिदम्बरासी ॥ ७४ ॥ चिदंबरा तू बाळवयीं ॥ आतांचि बापा प्रगट न होईं ॥ प्रगट होतां यात्रिकसमुदायीं ॥ दुर्लभ होईल दर्शन तुझें ॥ ७५ ॥ पितृवचन ऐंकता लीलानाटकी ॥ तथास्तु म्हणोनि पितृपादुकी ॥ वंदोनि बाळांसवें आणखी ॥ खेळावया पळतसे ॥ ७६ ॥ येणें परी भक्तपराधीन ॥ निज बिरुद करी प्रख्यापन[2] ॥ बाळासवें करित क्रीडन ॥ दयाघन कैलासपति ॥ ७७ ॥ सिद्ध ऋषी योगींद्र ॥ ज्याचे दर्शनार्थ निरंतर ॥ तप करितांही सुघोर ॥ दुर्लभ ज्यांचे दर्शन ॥ ७८ ॥ त्या देवासी जनकजननी ॥ बलात्कारें ओढिती हात धरोनि ॥ जो न घे अवदान[1] यज्ञस्थानी ॥ तो म्हणे जननी भूक लागली ॥ ७९ ॥ ज्याची आज्ञा महाकाळ ॥ शिरीं

१. संतोषाने २. प्रकट




शिव चिदम्बर

वंदोनि काढितो वेळ ।। म्हणे शीघ्र ये जवळ ।। भय वाटते जननीये ।। ८० ।। जो होय ब्रम्हांडासी आवरण ।। तो म्हणे अंबे मज प्रावरण ।। देई सत्वर शीतनिवारण ।। व्हावया या वेळीं ।। ८१ ।। अनंत ब्रम्हांडें ज्याचे पोटीं ।। निवसती तो हा जगजेठी ।। निजोनि खेळे अंकतटीं[२] ।। जनक आणि जननीचे ।। ८२ ।। तिन्ही अवस्थांमाजी जो जागृत ।। तो म्हणे मज निद्रा बाधत ।। अंबे शय्या दे त्वरित ।। सुखे मी झोप घेतों ।। ८३ ।। ज्याचे तेजें सूर्य चंद्र ।। प्रकाशताती निरंतर ।। तो मागे दीप सत्वर ।। म्हणे अंधारी दिसेना ।। ८४ ।। ज्याणे रचिला क्षीरसिंधू ।। तो पिऊं इच्छित गोदुग्धू ।। ऐशा लीला अगाधू ।। दाखवी भक्तवत्सल ।। ८५ ।। पिता म्हणे ऐक ताता ।। फार खेळूं नये गुणवंता ।। विद्याभ्यासीं लक्ष दे आतां ।। तेणें पूज्यता असे जगीं ।। ८६ ।। तैं धीटपणे बोले बाळ ।। विद्याभ्यास न करीं मी केवळ ।। तरी चवदाहि विद्या सकळ ।। म्हणोनि ताता दाखवीन ।। ८७ ।। यापरी बालभाषण ।। ऐकतांचि जनकासी हर्ष पूर्ण ।। म्हणे हा असे अवतारिक नंदन ।। बोलोन दाखवी निजसत्ता ।। ८८ ।। जरी बाळ पंचवर्षात्मक ।। स्वकीर्तीनें आच्छादी भूलोक ।। यापरी बाळलीला सुरेख ।। कथीयेल्या यथामती ।। ८९ ।। पुढे ब्रम्हचर्यधर्म ।। वर्णिजेल सर्वोत्तम ।। धरोनि सावधान नेम ।। ऐका म्हणे चिदम्बरकिंकर ।। ९० ।। स्वस्ति श्रीचिदंम्बरचरित्र ऐकतां ।। तुष्टे सद्गुरुनाथ ।। यास्तव ऐका श्रोते समस्त चतुर्थोऽध्याय गोड हा ।। ९१ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे बाललीलावर्णनं नाम चतुर्थोऽध्यायः ।। ४ ।। ओवीसंख्या ९१ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

१. देणगी. (आहेर) २. मांडीवर.

# गजगौरीकथानिरूपणम्




हातीं अक्षता घेवोनि ब्रह्मचारी। प्राणप्रतिष्ठा आरम्भित ॥ जवळ आला गज म्हणोनि। स्त्रीजन धावति भिवोनि ॥

शि व चि द म्ब र

॥ श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ॥ ॐनमो सद्गुरुनाथा चिदम्बरेशा ॥ कैवल्यरुपा परमपुरुषा ॥ भक्तकामपूर्णा ज्ञानभूषा ॥ घनानंदा तुज नमो ॥ १ ॥ यमनियम प्राणायाम ॥ आसन प्रत्याहार धारणा उत्तम ॥ ध्यान समाधी ज्यासी सुगम ॥ असो नमन त्यासद्गुरुसी ॥ २ ॥ जय जय भक्तवत्सला चित्स्वरुपा ॥ जय अनाथनाथा निर्विकल्पा ॥ भक्तह्रन्मंदिरज्ञानदीपा ॥ आनंदरुपा तुज नमो ॥ ३ ॥ गुरु परमगुरु परमेष्ठीगुरु ॥ परात्परगुरु चिदम्बरु ॥ व्यापक तू सर्व चराचरु ॥ तूंचि निर्विकारु कैवल्यस्थान ॥ ४ ॥ ब्रम्हादिकां न कळे तुझी कळा ॥ सद्गुरुराया भक्तवत्सला ॥ भक्ति-ज्ञान-वैराग्य पुतळा ॥ वदवी दयाळा सुरस चरित्र ॥ ५ ॥ द्विजेंद्रासी म्हणे मुनीश्वर ॥ ऐका भवभयहारक सुंदर ॥ सुरस श्रीचिदम्बरचरित्र ॥ श्रवणमात्रें पाप नासे ॥ ६ ॥ यापरी बाळचरित्र ॥ वाढत असतां निरंतर ॥ उत्तरगती असतां भास्कर ॥ अक्षरारंभ करी पिता ॥ ७ ॥ गणेश विष्णु सरस्वतीसी ॥ पूजवोनि लक्ष्मी कुळदेवतेसी ॥ पित्रा आरंभवी लेखनासी ॥ ॐकारादि करोनि ॥ ८ ॥ बावन्न अक्षर बाराखडें ॥ त्याचदिवशी शिकोनि पुढें ॥ काय सांगा म्हणोनि पित्याकडे ॥ जाओनियां पुसतसे ॥ ९ ॥ तनयमती पाहोनि जनक ॥ अत्यंत पावला हरिख ॥ मग सांगत वेदांत सम्यक ॥ शिक्षा आदि करोनि ॥ १० ॥ सर्व षडंग एक्यामासीं ॥ सदाशिव बाळवेशी ॥ पाठ करोनि जनकासी ॥ आनंद बहुवशी देतसे ॥ ११ ॥ याची मेधा पाहोनि लोकोत्तर ॥ पिता होवोनि हर्षनिर्भर ॥ पांचवे वर्षी महोत्सव थोर ॥ करोनि मौजि बांधित ॥ १२ ॥ आधीच बाळ सुंदर मूर्ती ॥ मौजि शोभा येता त्यवरती ॥ मुखी शोभत लोकोत्तर कांती ॥ ब्रम्हसंप्राप्ती लाधतां ॥ १३ ॥ आधींच सुवर्ण मनोहर ॥ तेथें संभवता सुगंध थोर ॥ तंव चिदम्बरासी तावन्मात्र ॥ उपमा मनोहर साजेल ॥ १४ ॥ ना तरी भास्कर सौम्य कांती ॥ बाळ येतां भूवरती ॥ त्या उपमा चिदम्बरार्थी ॥ शोभती बहु सुरम्य ॥ १५ ॥ मेखला अजिन दंड कमंडलु ॥ कौपीन यज्ञोपवीत सोज्वळू ॥ धरोनि बटु शोभे दयाळू ॥ मूर्तिगंत कीं वेदपुरुष ॥ १६ ॥ स्नानसंध्या अग्निकार्य ॥ गुरुशुश्रूषणी निरालस्य ॥ सर्व सोडोनि बाल चांचल्य ॥ वेदाभ्यास आरंभित

शि व चि द म्ब र

शि
व
चि
द
म्ब
र

|| १७ || प्रभाकरासी येर्णेचि परी || पिता व्रतबंध करी || जगद्रक्षक दोघेही ब्रम्हचारी || वेदाभ्यास करिति ते || १८ || प्रत्यही नित्यानुष्ठान श्रेष्ठ || करुनी करिती वेदपाठ || ॐकारदि म्हणोनि स्पष्ट || शांतिपाठ ते म्हणती || १९ || मग पिता सांगे वेदमंत्र || पाठ करिती दोघे कुमर || एकवार सांगतां चिदम्बर || अस्खलित पाठ म्हणतसे || २० || चतुर्वेद मंत्र ब्राम्हण || पद क्रम जटा घन || सहा शास्त्रें अष्टादश पुराण || पिता सांगे चिदंबरासी || २१ || सूत्र भाष्य याज्ञिक पद्धती || बीज न्यास मंत्र रहस्यकृती || जनकें सांगतां पाठ करिति || चिदम्बर प्रभाकर || २२ || ज्याचा अभ्यास धारणाकौशल्य || पाहतां सर्व पंडित समुदाय || म्हणती काय हें आश्चर्य || लोकोत्तर दिसतसे || २३ || चौदा विद्या एक्या संवत्सरीं || कैसे शिकले दोघे ब्रम्हचारी || हे नर नव्हती निर्धारी || हे नर नारायण होतील || २४ || जैसें पूर्वी राम-कृष्ण || सांदीपनी घरीं अध्ययन || करित होतें तेंचि उपमान || यांकारणें शोभतसे || २५ || पाहतां चिदम्बराची पाठशक्ती || सर्वही पंडित माथा तुकविती || आश्चर्यसागरीं बुडी घेती || म्हणती हा असे कलानिधीश || २६ || अप्रमेयगुण रसाळ वक्ता || सौम्यास्य प्रतापी सर्व जाणता || यासी पाहतां मातापिता || आनंदसिंधूत समरसत || २७ || चिदम्बराचे सहाध्यायी बाळक || सर्व शास्त्रीं विशारद झाले देख || शांत दांत ब्रम्हनिष्ठ निजसुख || पावले चिदम्बरकृपें || २८ || दीक्षितें आरंभितां इष्टी || श्रौता अध्वर कृती गोमटी || आपण करुनी सुगम घाटी || दावी पंडितांसी चिदम्बर || २९ || ज्याचे पुढे बोलावया समस्त || मौनावती शास्त्रीपंडित || ज्याचे स्वर-वर्ण-हस्तलाघव पाहत || बैसती स्वस्थ अज्ञापरी || ३० || पूर्वीच श्रुतचित्रचरित्र || व्याधिग्रस्त बाळ नारी नर || चिदंबरांसी येतां शरणमात्र || आरोग्य सत्वर पावती || ३१ || चिदम्बराचें वचन || वज्रलेपापरी सुदृढ पूर्ण || मुखांतुनी निघतां क्षण || फ़ळ मिळत त्याच परी || ३२ || ज्यासी अनुग्रह मिळे उत्तम || तो होय सहस्त्राक्षासम[1] || निग्रह मात्रें करी

शि
व
चि
द
म्ब
र

१. इंद्राप्रमाणें.

भस्म ।। सुरेंद्रेंही पाठीं घालितां ।। ३३ ।। लोक म्हणंती बालवयीं ।। इतुके प्रताप दावितो पाहीं ।। पुढें किती प्रौढवयीं ।। चरित्र तो विस्तारील ।। ३४ ।। देवा आम्ही चिरायुषी होऊं ।। साद्यंत चरित्र दृष्टीं पाहूं ।। यासी सेवोनि सुख पाहूं ।। कैलासपदीं अंतीं वास ।। ३५ ।। चिदंबर लीलामोहितचित्त ।। ऐसें बोलती जन समस्त ।। त्याचें चित्रचरित्र ।। संक्षिप्त सांगतो तुम्हांसी ।। ३६ ।। विस्तार सांगावया समस्त ।। जगीं असे कोण समर्थ ।। वेडावती ब्रम्हादिक जेथ ।। पाड काय तेथें मानवाचा ।। ३७ ।। अल्प चरित्रही श्रवण करितां ।। भवबंध तुटे आयता ।। जेविं गंगाबिंदू मुखीं पडतां ।। पापवार्ता न उरे अंगीं ।। ३८ ।। सावध चित्तें चिदंबरचरित्र ।। जे पठतील भाविक नर ।। त्यांचें पाप जळोनि समग्र ।। सत्य होती इह पूर्णाषी ।। ३९ ।। ऐसें वर्तता एके दिवशीं ।। मार्तंडदीक्षितशिष्य विश्वासी ।। होसूर ग्रामीं होता गुणराशी ।। मार्तंडनामा एक भक्त ।। ४० ।। तो येवोनि सुस्वभावी ।। मार्तंड दीक्षितासी विनवीं ।। आज गजगौरीव्रत सांग करवी ।। घरीं येवोनि स्वामिराया ।। ४१ ।। ऐसें शिष्यवचन ऐकोनी ।। दीक्षित बोलता झाला ते क्षणीं ।। जावें चिदंबरासी घेवोनी ।। आज गज नसे अवसर ।। ४२ ।। ऐसे ऐकतां गुरुवाक्य ।। तवं तथास्तु म्हणोनि तो शिष्य ।। भावें वंदोनि गुरुपाय ।। चिदंबरासवे निघाला ।। ४३ ।। मंदिरीं नेवोनि चिदंबरासी ।। उत्तमासनीं बैसवोनी प्रीतीसी ।। अर्ध्यपाद्यादि देवोनि भावेंसी ।। निज सतीसी पाचारित ।। ४४ ।। म्हणे सत्वर करी पूजा ।। दैवयोग सबळ होता तुझा ।। म्हणोनि करावया व्रतराजा ।। गुरुराजतनय पातले ।। ४५ ।। ऐसें पतिवचन ऐकोनि ।। भोंवती सुवासनीगण घेवोनी ।। त्याची सती बैसली आसनीं ।। तेथें पातला गुरुपुत्र हा ।। ४६ ।। श्यामसुंदर परमचपल ।। वामनमूर्ती सुरसं वाचक ।। पाचसहावर्षात्मक बाळ पातला दयाळू चिदंबर ।। ४७ ।। स्वभावे चंचल कामिनीजन । दिव्य बालरुप मनमोहन ।। पाहता भुलोनी उपहासवचन ।। बाळ म्हणोनी आरम्भिती ।। ४८ ।। योषिता परस्पर हासंती ।। पहा पहा वामनमूर्ति ।। काय पढला पुसा म्हणती ।। हास्य करिती पाहोनि तया ।। ४९ ।। स्त्रियांचे उपहास वचन ऐकतां

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

|| हांसत बोले गर्वहर्ता || अहो काय आपण मज पुसतां || अध्ययन कांही न केलें || ५० || आज्ञा मानोनि जनकाची || येथ आलों सहजची || पूजा सांगोनि यथारुची || मिष्टान्न जेवूं म्हणे || ५१ || परिहास वचन ऐकतां ती अंगना || जावोनि पतीसी करी विज्ञापना || बाळ बटु दिसतो हा व्रतपूजना || सांग कैसेनी घडेल || ५२ || तंव तो मार्तंड बोलत || ऐक प्रिय तो असे गुरुसुत || त्याचे वचनें तुवां स्वस्थ || एकंचित्तें करी पूजा || ५३ || मग ती शांतचित्तें नितंबिनी || येवोनि बैसली आसनीं || मग चिदंबरे संकल्प करवोन || आधीं गणेश पूजविला || ५४ || मग स्वहस्तें पीठावरी || आणोनि बैसवी गजगौरीं || हातीं अक्षतां घेवोनि ब्रम्हचारी || प्राणप्रतिष्ठा आरंभी || ५५ || बीज न्यास उच्चारोनी निखिल || जीवकला योजिल्या सकळ || तंव सचेतन जाहला शुंडाल[1] || सर्वांगी जीव भरतां || ५६ || मग बाळके हस्तसंकेतें || स्वस्थ बैसवोनि गजातें || पूजा करवीत एकचित्तें || यथाविधि अनुसरोनी || ५७ || मग आरंभिता झाला कथा || ज्याचे मुखें अर्थ ऐकतां || विस्मय होवोनि स्त्रियांचे चित्ता || माथा तुकवीत ऐकती || ५८ || कथा संपलियावरी ब्रम्हचारी || तांबूल दक्षिणा घेवोनि करीं || सत्वर चढोनि वारुवरी[2] || आला निजपुरीं पित्यापाशी || ५९ || पित्यासी करोनि वंदन || म्हणे पूजवूनि आज्ञेप्रमाण || आलों यज्ञेशप्रसादा कारण || ऐसें बोलोन स्वस्थ बैसे || ६० || इकडे मृत्तिकेचा हस्ती || सजीव होवोनि पीठावरती || स्कंधीं गौर बसवोनि मंदगती || पुढें पाउल टाकित || ६१ || हळुच उतरोनि पीठाखाली || माजघरीं संचार करी ते वेळीं || तंव आतुनी ती सती आली || पाहे सचेतन गजासी || ६२ || इतुक्यांत पूजोपकरण भांड || पांडू लागला मृत्तिकावेतंड[3] || वरी करोनि सूक्ष्म सोंड || प्रचंडनादें किंकाटत || ६३ || मृतिकेचा गज चालतो म्हणून || वृत्तांत ऐकतां स्त्रीजन || विस्मय पावोनि चहूंकडोन || पाहूं म्हणोन धाविन्नले || ६४ || तंव चढला हत्तीसी ऊजू[4] || गर्जत पावलें टाकित गजू || सर्व स्त्रीजन होवोनि

शि
व
चि
द
म्ब
र

१. हत्ती २. घोड्यावर ३. मातीचा हत्ती ४. मस्ती ५. हत्तीची लीला

शिवचिदम्बर

बाजू ।। पाहती वारणलीला अगाध ।। ६५ ।। जेथे जेथ स्त्रीवृंद ।। तिकडे येतसे मंद मंद ।। स्कंधीं गौर वाहोनि स्वच्छंद ।। सोंड हालवित नाचतसे ।। ६६ ।। जवळ आला गज म्हणोनी ।। स्त्रीजन धावती भिवोनी ।। यापरी वारणलीला सदनीं ।। पाहोनि यजमान विचारित ।। ६७ ।। ही होय चिदम्बराची चमत्कृती ।। उपहास केला मूढ योषितीं[1] ।। तेणें चाले तो मृत्तिकाहत्ती ।। अगाध कृती त्याची असे ।। ६८ ।। चित्तीं ऐसा निश्चय करोनी ।। आला मुरगोडासी धांवोनी ।। सर्व निवेदी चिदम्बरकरणी ।। मार्तंडदीक्षितापाशीं ।। ६९ ।। यापुढें काय करावें ।। चिदम्बरासी आपण सांगावें ।। हत्तीसी पूर्व स्थिती आणवावें ।। तरीच होईल समाधान ।। ७० ।। दीक्षितें बोलावोनि चिदम्बरासी ।। पुसे काय तेथें करोनि आलासी ।। जीव कैसेनी मृद्गजासी ।। आला सांग पां यथार्थ ।। ७१ ।। तंव ब्रम्हचारी बोले भीत भीत ।। मीं कांही न केलें तेथ ।। आज्ञेप्रमाणें पूजवोनी यथार्थ ।। आलों समर्था येथवरी ।। ७२ ।। आपण सांगितल्याप्रमाण ।। केलें प्राणप्रतिष्ठाविधान ।। तेणें सजीव वारण ।। मंत्रबळें जाहला कीं ।। ७३ ।। मग पिता बोले हांसत ।। आम्ही जाणतों तुझें मनोगत ।। मागुती जावोनी पूर्ववत ।। उत्तर पूजा करवीं बा ।। ७४ ।। पितृवचन ऐकतां चिदम्बर ।। तथास्तु म्हणोनि मागुतीं सत्वर ।। पूववत उत्तरपूजामंत्र ।। म्हणोनि अक्षता टाकिल्या ।। ७५ ।। अक्षतां पडता चिदम्बरहस्तें ।। गज पावोनि पूर्वस्थितीतें ।। स्वस्थानी बैसला शांतचित्तें ।। प्राकृत बाहुलीपरी ।। ७६ ।। ही लोकोत्तर चिदम्बरसत्ता ।। पाहोनि सकल ग्रामजनता ।। हर्ष अंतरीं न मावतां ।। गर्जती जयजयकारें ।। ७७ ।। कित्येक पुढें आडवे पडती ।। नानापरी स्तोत्र करिती ।। तूंचि होशी सांबमूर्ती ।। बाळवेषें दिसतोसी।। ७८ ।। अज्ञांसी बाळापरी दिससी ।। तूंचि सृष्टी स्थिती लय करिशी ।। तुझी सत्ता पाहतां वाटे आम्हांसी ।। तूचि असी जीवनियंता ।। ७९ ।। जय जय श्री अद्भुता बाळा ।। जयजय श्री अघटितलीला ।। तारीं आम्हां अज्ञानांला ।। नमन दयाळा असो चरणीं

---

१. स्त्रियांनी

शिवचिदम्बर

|| ८० || येणेपरी सकळ जन || करित असतां स्तोत्र नमन || कृपादृष्टीनें सर्वांसी पाहून || त्यांचे मनोरथ पूर्ण करी || ८१ || भोजन करोनि सानंदें || यजमानासवें स्वच्छंदें || येवोनी स्वग्रामासी पूर्णानन्दें || पितृपदीं वंदितसे || ८२ || दीक्षित सांगे चिदम्बरासी || प्रगट न होई म्हणोनि बहुवसीं || सांगतांही त्वां बाळभावेंसी || खेळ खेळसी नानापरी || ८३ || तूं आहेस साक्षात् शंकर || मी हें जाणतों निर्धार || तुझी कीर्ति चंद्रभास्कर || असती तोंवर स्थिर होय || ८४ || तथापि माझें वचन || ऐकोनि आचरी त्याप्रमाण || त्रिभुवनीं तुझे यश पूर्ण || वाढे तेणें निःसंशय || ८५ || आतांच जरी प्रकट लीला करिसी || तरी यात्रिक दाटी होईल बहुवसी || मग तुझें दर्शन मजसी || दुर्लभ होईल पुत्रराया || ८६ || तुझा अवतार धर्मरक्षणार्थ || यास्तव तुज मी सांगतों हितार्थ || आधीं करावी लोकोपचारार्थ || शस्त्रोक्त पितृसेवा || ८७ || मातृपितृसेवा करीत || मी असेपर्यंत राहें गुप्त || मग यथेच्छ लीला प्रगटवीत || अवत्तारकृत्य विस्तारी बा || ८८ || भस्माच्छादित वन्हीपरी[1] || गुप्त राहें ताता स्वमंदिरीं || पितृवचन ऐकोनि यापरी || तथास्तु म्हणे चिदम्बर || ८९ || लोकोपचारार्थ पितृसेवन || परोपरी करीत जगज्जीवन || गुप्त असतांही समयानुसरून || लीला सहज दावितसे || ९० || गुप्त ठेवतांही कस्तुरी || वास न राहे अंतरी || अथवा भानूसी लपवितां अभ्रीं[2] || प्रकाश न लोपे कदांही || ९१ || संस्कृत शब्द न बोंलू म्हणोनी || प्रतिज्ञा करतांही शास्त्रज्ञानीं || सहज निघे मुखांतुनी || नकळत गीर्वाण भाषा[3] || ९२ || प्रापंचिकांमाजी अवतारक्रिया || नये कदापि गुप्त ठेवावया || जैसा कार्पासराशींत[4] लपावया || ठाव न मिळे वैश्वानरासी[5] || ९३ || पाहतां प्रापंचिकांची तळमळ || दयाळूंचें द्रवे हृदय कोमळ || तदनुग्रहार्थ कांही खेळ || करोनियां दावितसे || ९४ || एके दिवशीं जनकासहित || हळ्ळीहाळासी गेले संचारार्थ || तेथें एक दीक्षितभक्त || होता रामचंद्र नामक || ९५ || पाहतां तो मार्तंडदीक्षितासी || संतुष्ट होवोनि बहुवसी

१. विस्तवाप्रमाणें २. ढगामागें ३. संस्कृत ४. कापसाच्या राशींत ५. अग्नीला

शि व चि द म्ब र

।। आतिथ्य करोनि त्या दिवशीं ।। नियमित संभावना दीधली ।। ९६ ।। मग संतोषें मार्तंडदीक्षित ।। अनुष्ठान सारोनि समस्त ।। रात्रीं तेथेंचि वास करित ।। सुखे निद्रित जाहले ।। ९७ ।। चिदम्बर पितृपाद सेवित ।। बैसला होता जागृत ।। तंव अंतर्गृहीं सती बोलत ।। प्राणवल्लभासी तेधवां ।। ९८ ।। कष्टार्जित तुमचें धन ।। सर्व गेलें तस्कर घेउन ।। आता पुढें कैसे वर्तन ।। प्राणप्रिया सांग मजसीं ।। ९९ ।। काल रात्रीं चौर्य झालें ।। आज घरा सत्पुरुष आले ।। त्यांचे अनुग्रहे नष्ट द्रव्य मिळे ।। गोष्ट काढा त्यांपाशी ।। १०० ।। ऐकोनि सतीचें वचन ।। रामचंद्र बोले हांसून ।। कल्पवृक्षातळीं बैसोन ।। आंबिल मांगू इच्छिसी ।। १ ।। सज्जनांचे अनुग्रहें ।। असाध्य कार्यही लाहे[१] ।। अल्प प्राप्त्यर्थ मागूं नये ।। सज्जनासी वल्लभे ।। २ ।। उकरडींत रत्न टाकूं नये ।। नहींत पीयूष[२] ओतूं नये ।। विषयलाभ मागू नये ।। सज्जनापाशी ।। ३ ।। वेदविक्रय करूं नये ।। खरासी तूप पाजवूं नये ।। सज्जनासी विनवूं नये ।। विषयप्राप्ती साठी ।। ४ ।। सज्जनकृपा असे मोठी ।। तेणें अलभ्य लाभ पडे गांठीं ।। यास्तव द्रव्यचिंता सोडीं पोटीं ।। धीर धरीं तूं अंतरी ।। ५ ।। जो परवश असतांही पोटीं ।। सांभाळी तो विश्वंभर जगजेठी ।। तो कां आतां नसे धूर्जटी[३] ।। कासया पोटीं तळमळसी ।। ६ ।। लाभालाभ असती दैवतंत्र[४] ।। कर्म असे भोगपरतंत्र ।। भोगिल्याविण कर्ममात्र ।। न पवे क्षय निर्धारीं ।। ७ ।। तुजवरि शिवानुग्रह समय ।। आला असे निःसंशय ।। एतदर्थी एक भगवद्वाक्य ।। तुज सांगतों यावेळीं ।। ८ ।। श्लोक ।। "यस्यानुग्रहमिच्छामि तस्य वित्तं हराम्यहम्" इत्यस्ति भगवद्वाक्यं स्वस्थातो भव सुंदरि ।। १ ।। ज्यावरी अनुग्रह करीन ।। आधीं हरतो त्याचें धन ।। ऐसें असें भगवद्वचन ।। आलिया समयीं राखें हर्ष ।। ९ ।। ऐसा पतिबोध ऐकतां ।। निरुपायें स्वस्थ बैसली कांता ।। दंपतीवचन परिसता ।। चिदम्बरचित्त द्रवतसें ।। ११० ।। बाहेर बोलावोनि रामचंद्रासी ।। श्रीचिदम्बर सांगे त्यासी ।। मज जाणें असे बहिर्दिशेसी ।। दीप घेवोनि येई मजसवें

शि व चि द म्ब र

........................

१. लाभते  २. अमृत  ३. शिव  ४ दैवाधीन

॥ ११ ॥ गृहाबाहेर जावोन ॥ बैस म्हणतां तेथे गुरुराण ॥ ग्रामामध्यें मलविसर्जन ॥ सुज्ञजनीं करुं नये ॥ १२ ॥ मग जावोन गावांबाहेर ॥ बैसा म्हणतां रामचंद्र ॥ गांवाजवळीं कश्मल फार ॥ किंचित दूर ये म्हणत ॥ १३ ॥ मागुतीं किंचित दूर ॥ जावोनि म्हणे रामचंद्र ॥ यापुढें नच जावें दूर ॥ आतां एथेचि बैसावें ॥ १४ ॥ मध्यरात्र समय असे घोर ॥ गहन वन पुढे अघोर ॥ व्याघ्रादिश्वापदे फार ॥ भयानक येथे निवसती ॥ १५ ॥ ऐसे ऐकोनि भीत वचन ॥ स्वामी बोले तव हांसून ॥ मी असतां तुज सन्निधान ॥ महाकाळभीतीही न धरीं बा ॥ १६ ॥ यापरी संबोखीत त्यासी ॥ क्रोश्मात्र चालत ज्ञानराशी ॥ एका वृक्षातळीं बैसोनि रामासी ॥ बोलावी जवळी ये म्हणोनि ॥ १७ ॥ तंव किंचित क्रोधें रामचंद्र ॥ वचन बोलत स्वल्पनिष्ठुर ॥ मध्यरात्रीं आणिलासी क्रोशमात्र ॥ येथें मला किंकारण ॥ १८ ॥ निद्रा मज बाधतसे फार ॥ काय तें काम सांग सत्वर ॥ तंव म्हणे श्रीचिदम्बर ॥ एथ वरी येईं बा ॥ १९ ॥ एथें भूमी खोदितां स्वल्प ॥ तुज कल्याण असे अनल्प ॥ तंव तो खालीं ठेवोनि दीप ॥ माती हातें काढीत ॥ १२० ॥ वीतभर माती काढितां ॥ खालीं पेटी लागली हाता ॥ वरी काढोनि पाहतां ॥ ओळखिली ती निज पेटी ॥ २१ ॥ निज पेटी पाहतां क्षणीं ॥ संतोषें देहभान विसरोनी ॥ स्वस्थ बैसला मौन्य धरोनी ॥ मुहूर्तमात्र रामचंद्र ॥ २२ ॥ मग अंगावरी येतां शुद्धी ॥ आनंदी स्वामिपद वंदी ॥ प्रेमातिशयें वारंवार स्फुंदी ॥ हरिहरविधीं[1] तूंचि म्हणे ॥ २३ ॥ वारंवार दंडवत घालित ॥ नानापरी असतां स्तवित ॥ तंव म्हणे श्रीगुरुनाथ ॥ ऊठ त्वरित पेटी घेऊनि ॥ २४ ॥ सत्वर निघूं आतां गृहासी ॥ परी वृत्त न कळवीं पित्यासी ॥ तथास्तु म्हणोनी दीप पेटीसी ॥ घेवोनि गृहा पातला ॥ २५ ॥ चिदम्बर निजता शय्येवरी ॥ तो जावोनि अंतरागारी[2] ॥ जायेसी वृत्त सांगत सविस्तरीं ॥ दोघेंही हर्षनिर्भर होती ॥ २६ ॥ मार्तंडदीक्षित प्रातःकाळीं ॥ गांवा निघतां ते वेळीं ॥ सविनयें विनंती केली ॥ भोजनार्थ आनंदें ॥ २७

१. हरिहरब्रम्ह. २. माजघरांत. ३. आनंदित. ४. आनंदाचे कारण.

शिव चिदम्बर

|| दीक्षित राहतां नैवेद्यार्थ || संतोषें समाराधना करीत || पक्वान्नें, दक्षिणा देऊनि बहुत || ब्राम्हणा तोषवी ते दिनीं || २८ || भोजनोत्तर पुसे दीक्षित || आज हृष्ट[३] दिसतोसी किमर्थ || सांगपा कायसा हर्षहेत[४] || मुखचर्या दिसे असाधारण || २९ || ऐसें पुसतां दीक्षितेंद्र || पाहता श्रीचिदम्बरमुखचंद्र || उगी बैसतां रामचंद्र || मागुती दीक्षित पूसती तया || १३० || चिदम्बर बोलें रामचंद्रासी || स्वामी पुसतां कां मौनावलासी || सांग पां काय असे तव मानसीं || हर्षहेतू निर्भय || ३१ || मग संतोषोनि रामचंद्र || रात्रीचा वृत्तांत सांगेसविस्तर || ऐकोनिया तो नारीनर || आनंदोदग्‍ारे गर्जती || ३२ || मग दीक्षित सर्वांसी || शांतवन[१] करोनी बहुवसी || सवें घेवोनी चिदम्बरासी || निजपुरासी पातले || ३३ || येणेंपरी परमपवित्र || श्रीचिदम्बराचें चरित्र || अपार ऐकतांची मात्र || जोडे म्हणे चिदम्बरकिंकर || ३४ || स्वस्ति श्रीचिदम्बरचरित्र || ऐकतां तुष्टे सद्‌गुरुनाथ || यास्तव ऐका श्रोते समस्त || पंचमोऽध्याय गोड हा || १३५ || इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे गजगौरी-कथानिरुपणं नाम पञ्चमोध्यायः || ५ || ओवीसंख्या १३५ ||

|| श्रीचिदम्बरार्पणमस्तु ||

१. समाधान.

# मृतवृषभसञ्जीवनम्



हातिची पुढें करोनि झारी । शृंगादि पुच्छपर्यंत वृषावरी । वरदहस्तें प्रोक्षोनि वारी । थापटी पृष्ठावरी तीन वेळ ॥

[illegible] — अध्याय सहावा

शिवचिदम्बर

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। ॐकाररुपा पुरषोत्तमा ।। तारकनामा सर्वोत्तमा ।। पूर्णकामा आनंदधामा ।। श्रीचिदम्बरा तुज नमो ।। १ ।। द्विजहो सावधान करा चित्त ।। ऐका कल्याणप्रद श्रीचरित ।। श्रवणमात्रें मनोरथ पूर्त ।। गुरुकृपें होतसे ।। २ ।। बेडसूर गांवीं मल्ल नामक ।। होता दीक्षितशिष्य भाविक ।। शिवालय बांधोनि तो एक ।। शिवप्रतिष्ठापन करुं इच्छित ।। ३ ।। एके दिवशीं तो मुरगोडासी ।। येवोनि मुहूर्त विचारी श्रीगुरूसी ।। चैत्र शुक्ल पंचमी दिवशीं ।। स्थापनामुहूर्त दीधला ।। ४ ।। दीक्षितानुमतें श्रीचिदम्बरासीं ।। घेउनी मल्ल येंत घरासी ।। प्रातःस्नान करोनी पंचमी दिवशीं ।। स्थापनविधी आरंभित ।। ५ ।। तंव मिळाले ब्राम्हण बहुत ।। ते मल्लासि मुहूर्त सांगत ।। आज असे मृत्युयोग संप्राप्त ।। प्रतिष्ठापन न करीं बापा ।। ६ ।। अन्य मुहूर्त देऊ शोधूनि ।। प्रतिष्ठापन करीं ते दिनीं ।। यापरी ज्योतिषीवचन ऐकोनी ।। मल्ल मनीं विचारित ।। ७ ।। गुरुविश्वास सर्वांस तारक ।। गुरुदत्त मुहूर्तं असे हा सम्यक ।। उल्लंघितां तो नोहें सुख ।। म्हणोनि कर्म आरंभी ।। ८ ।। निजवचनीं अविश्वास पाहोनि ।। ज्योतिषीं बैसले मौन धरोनी ।। परी पुण्याहविधी समापोनी ।। निघतसे तो देवमंदिरी ।। ९ ।। तूर्यादि मंगलवाद्ये वाजती ।। ब्राम्हण वेदमंत्र पढती ।। पूर्ण कुंभ घेवोनि पुढती ।। सुवासिनीगण शोभती ।। १० ।। येणें परी प्रस्थान करोनी ।। मल्ल आला निजद्वारा उल्लंघोनी ।। काकतालन्यायें तत्क्षणीं ।। शिवस्थापनीं विघ्न ओढवलें ।। ११ ।। बहुमौल्याचा वृषभ होता एक ।। एकाएकीं निर्निमित्तक[१] ।। पडोनि तो तडफडत देख ।। प्राण सोडित तत्काळ ।। १२ ।। सेवकें सांगतां हे वृत्त ।। मल्ल राहिला भ्रांतवत ।। म्हणे मुहूर्त असतां गुरुशोधित ।। दुर्योग येथ घडला कैसा ।। १३ ।। ज्योतिषी बोलती धन्य धन्य ।। आम्ही मुहूर्त देऊं म्हणतां अन्य ।। गुरुवचन करोनि तुंवा मान्य ।। आम्हां सामान्य मानिलेंसी ।। १४ ।। दुर्योगफळें गांठलें पाहें ।। आतां तरी ठेवी कर्म हें ।। उत्तम मुहूर्त परवां आहे ।। करीं स्थापना ते दिनीं ।। १५ ।। इतुक्यांत आला

शिवचिदम्बर

१. कारण नसतांना

चिदम्बर ॥ ब्रम्हचारी श्यामसुंदर ॥ कौपीन मेखला गुंडीधर ॥ मूर्तिमंत भानूपरी ॥ १६ ॥ मूर्ती पाहतां सद्भक्तजना ॥ वाटे हा बलिदर्पहर्ता वामन ॥ अथवा भक्तवत्सल उमारमण ॥ बटुवेषें पातला ॥ १७ ॥ राजहंस देखोनि काक ॥ व्याघ्र देखोनि तळमळी जंबुक[1] ॥ कीं पाहोनि तेजोमय अर्क[2] ॥ दिवाभीत[3] दचकती ॥ १८ ॥ त्यापरी चिदम्बरासी ज्योतिषी जन ॥ उपहास करिती हांसोन ॥ पिता तुमचा उत्तम शोधोन ॥ स्थापनामुहूर्त काढितसे ॥ १९ ॥ हा मल्ल त्याचा शिष्य ॥ मान्य करोनि गुरुवाक्य ॥ आमुचें वचन मानुनी सामान्य ॥ प्रतिष्ठाकर्म आरंभित ॥ २० ॥ मृत्युयोग आहे म्हणोनी ॥ सांगतांही आम्हां धिक्कारोनी ॥ पुढें कर्म चालवितांक्षणीं ॥ योगफळें गांठिलें ॥ २१ ॥ यापरी कठोर दुर्भाषण ॥ बोलत असतां ज्योतिषीजन ॥ त्यांसी न देतां प्रतिवचन ॥ चिदम्बर म्हणे मल्लासी ॥ २२ ॥ कां गा राहिलासी स्वस्थ ॥ म्लानचर्या मुखावरीं दिसत ॥ कां झाली चिंता प्राप्त ॥ किमर्थ उगा राहिलासी ॥ २३ ॥ सुमुहूर्त असे अल्पकाळ ॥ आलस्यें शुभ समय टळेल ॥ कासया करिसी हळहळ ॥ चाल सत्वर देवालया ॥ २४ ॥ स्वामीवचन ऐकतां यजमान ॥ चिदम्बरासी बोले खिन्नवदन ॥ आज राहूंदे प्रतिष्ठापन ॥ अन्य मुहुर्ती करूं बाळा ॥ २५ ॥ आज असे मृत्युयोग ॥ तेणें दिसत विघ्नसंयोग ॥ यास्तव ठेविला कर्मभाग ॥ ऐक वत्सा ब्रम्हचारी ॥ २६ ॥ तव बोले सुमंदहसित ॥ मल्ला झालासि की त्वा भ्रमित ॥ म्हणोनि गुरुदत्त मुहूर्त ॥ उल्लंघू इच्छिसी ॥ २७ ॥ माझे जनकें मुहूर्त शोधिला ॥ तेथें कैसा मृत्युयोग घडला ॥ वृथा दुर्जनांच्या ऐकोनि बोला ॥ साशंक चित्ती न होईं ॥ २८ ॥ चाल सत्वर देवालयासी ॥ प्रतिष्ठा करुं शंकरासी ॥ ऐसे ऐकोनि श्रीचिदम्बरवचनासी ॥ मल्ल बोलत खिन्न वचन ॥ २९ ॥ जेवितां प्रथम कवळीं ॥ मक्षिकापातापरी येवेळीं ॥ प्रबळ विघ्न पाहोनि ठेविलीं ॥ पुढील कर्मे चिदम्बरा ॥ ३० ॥ काय तें ऐसें विघ्न थोर ॥ काय नसे त्यासी प्रतिकार ॥ वृथा चिंतातुर का होसी ॥ ३१

१. कोल्हा २. सूर्य ३. घुबड ४. मृत्यु




शिव चिदम्बर

|| मल्ल म्हणे चिदम्बरासी || प्रतिकार नसे दैवतंत्रासी || निर्निमित्तें वृषभ पंचत्वासी[१] || पावला योगबळें || ३२ || तंव हांसोनि श्रीचिदम्बर || म्हणे अयोग्य हा तुझा विचार || कायसें हें विघ्न थोर || म्हणोनी चिंतातुर दिससी || ३३ || अगा मल्ला सोडी अज्ञपण || हें काय करील तुजसी विघ्न || शिरीं नाचतां गुरुकृपा पूर्ण || चाल वेगें शिवालयासी || ३४ || शिवस्थापनसमय कल्याण || मुहूर्त असें दीक्षिताज्ञेवरुन || त्यांत गुरुभक्त तूं यजमान || कोठूनी आलें विघ्न येथें || ३५ || सोडी सोडी संशय गुरुभक्ता || योगशक्ती पाहूं ये आतां || जनके मुहूर्त शोधिला असतां || कैसा मृत्युयोग पातला || ३६ || नातरी असतां मंगल कर्म || वृषभ कैसा नेतो यमधर्म || पाहूं त्याचें बळगर्वधाम || येई म्हणोनि चालिला || ३७ || जेथें पडिला होता मृतवृषभ || तेथें पातला आवेशें स्वयंभ || अमृतदृष्टीते पाहुनि म्हणे सांब || हाचि ना वृषभ विघ्नकारक || ३८ || हातींची पुढे करोनि झारि || श्रृगांदि पुच्छापर्यंत वृषावरी[१]|| वरद हस्तें प्रोक्षोनि वारी || पृष्ठावरी थापटी तीन वेळ || ३९ || म्हणे वत्सा ऊठ सत्वर || तुझेकरितां सत्कर्म थोर || अडलेंसे वृषेंद्रा निर्धार || होई बा शीघ्र जागृत || ४० || ऐसे म्हणता चिदम्बर || हस्त फिरविता आंगावर || आंग मुरडीत वृषभ सत्वर || उठोनी उभा राहीला || ४१ || मृतवृषभ संजीवन || पाहतां तो यजमान || आनंदगिरीवरी बैसोन || उडी घेत चिदम्बरचरणीं || ४२ || साष्टांगे करोनि वंदन || प्रेमाश्रूनें पादप्रक्षालन || करोनि मग हस्त जोडोन || स्तोत्र आरंभीं सप्रेमें || ४३ || कालकाला कर्पूरधवला || जयजयाजी नेत्रभाला || ओळखिलें मी तुजला || बाळवेषें अवतरलासीं || ४४ || जय चिदम्बरा ब्रम्हचारी || जयजय भक्तसंकटहारी || दीनदासांचा कैवारी || तारि तारि दीनबंधू || ४५ || चिदम्बरा तूंच नारायण || सृष्टि स्थिती संहार पूर्ण || करुं शकसी म्हणोन || मृतवृषभ जीवविलासीं || ४६ || तूंचि बाळा होशी गजवदन || केलेंसि माझें संकट निवारण || अनन्य भावें तुज शरण || आलों चरणीं चिदम्बरा || ४७ || ऐसें नानापरी स्तोत्र || करीत वंदी वारंवार || त्यासी उठवोनि चिदम्बर || बोलत तंव मधुरवचन || ४८ || होशी गुरुभक्त तूं निः संशय || आतां सोडी गा सर्व भय || पुरवील तुझें मनोदय ||

१. बैलावर




शिव चिदम्बर

भक्तप्रिय सद्‌गुरुनाथ ।। ४९ ।। गुरुभक्तांमाजी तूं वरिष्ठ ।। तुज न होती कदापि कष्ट ।। भक्तवत्सल सुरश्रेष्ठ ।। सांभाळील तुज निश्चयें ।। ५० ।। आतां शिवप्रतिष्ठापन ।। वेगें करीं आनंदें करून ।। ऐसे मल्लासी बोधून ।। अनुष्ठानविधी करवित ।। ५१ ।। विध्युक्त करोनि शिवप्रतिष्ठा ।। संतोषवीत द्विजश्रेष्ठा ।। चिदम्बरप्रताप पाहोनि मोठा ।। सर्वही गर्जती जयजयकारें ।। ५२ ।। कित्येक स्तविती नमिती ।। कित्येक येवोनि पुसती ।। चिदम्बरा महत्व तुझें किती ।। वृषभ कैसा उठविलासी ।। ५३ ।। ज्योतिषी भिवोनि अंतरीं ।। शरण येती चिदम्बरांघ्री ।। त्यांसी म्हणे भक्त कैवारी ।। कां मजसी शरण येतां ।। ५४ ।। काय असें शक्ति मजपासी ।। कायसा प्रार्थितां मजसी ।। पितृदत्तमुहूर्तशक्ती ऐशी ।। मृतवृषभ उठविला ।। ५५ ।। मी असे बाळ ब्रम्हचारी ।। आपण श्रेष्ठ सर्व शास्त्रीं ।। अभय कर ठेवोनि माझे शिरीं ।। करा सत्वरी पूर्णानुग्रह ।। ५६ ।। धन्य धन्य आजिचा सुदिन ।। घडलें आपुलें अलभ्य दर्शन ।। आतां करोनी कृपा पूर्ण ।। निरोप द्यावा मजलागी ।। ५७ ।। ऐशिया परी ज्ञानराशी ।। संबोखोनि सर्व ब्राम्हणांसी ।। मग येवोनि मल्लापाशीं ।। निरोप घेत जावया ।। ५८ ।। यापरी मायानाटक ।। दावोनि तेथें अगाध कौतुक ।। पितृदर्शनार्थ बाळक ।। स्वग्रामासी पातला ।। ५९ ।। पित्यापुढें सविस्तारें ।। वृत्तांत सांगोनि चिदम्बरे ।। पूर्ववत् पितृसेवा निरंतरे ।। करीत सुखे राहिला ।। ६० ।। यापरी श्रीगुरुच्या बाळलीला ।। संक्षिप्त दाविल्या तुम्हांला ।। विस्तारूनी सांगावयाला ।। चतुर्मुखासी न ये शक्ती ।। ६१ ।। जे बाळक्रीडा श्रवण ।। अथवा भावें करिती पठण ।। त्यांचे सर्व दुरितनिवारण ।। होय म्हणे चिदम्बरकिंकर ।। ६२ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्‌गुरुनाथ ।। यास्तव ऐका श्रोते समस्त ।। षष्ठोऽध्याय गोड हा ।। ६३ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे मृतवृषभसंजीवनं नाम षष्ठोऽध्यायः ।। ६ ।। ओवीसंख्या ६३ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।



शिव चिदम्बर

# चिदम्बरविवाहमहोत्सववर्णनम्




ज्यापरी असे कैलासी। त्याचपरी भूलोकीं परियेसी। घेऊनिया दोघी स्त्रियांसी। शोभतसे चिदम्बर ॥



[ बाभूळगांव येथील मूर्ती ]

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। जय जय भक्तवत्सला चिदम्बरा ।। जय श्रीजगदुद्धारा सर्वेश्वरा ।। दीनपालका विश्वंभरा ।। परात्परा तुज नमो ।। १ ।। निजभक्तरक्षणासाठीं ।। दीक्षा घेतली तुंवा मोठी ।। स्मरणमात्रें उठाउठी ।। त्यांचे लळे पुरविशी ।। २ ।। भक्तेच्छितार्थ द्यावयासी ।। साम्य काय देऊं तुम्हांसी ।। कल्पूं जरी कामधेनूसी ।। साम्यतेसी उणें वाटे ।। ३ ।। सन्निध जाउनि मागतां ।। कामधेनू करी काम पुरता ।। स्मरतां तुज तत्त्वतां ।। इच्छा पुरविशी भक्तांची ।। ४ ।। कामधेनू वसे स्वर्गाचे ठायीं ।। तूं तों वससी भक्तहृदयीं ।। तुज कामधेनूची उपमा पाहीं ।। साजेल कैसे दयाळा ।। ५ ।। कमधेनू कल्पतरू ।। चिंतामणी तूंचि सर्वेश्वरू ।। तुज सेविता अपारू ।। इहपरू सुख लाधे ।। ६ ।। वरदमूर्ती चिदम्बरा ।। व्यापोनिया चराचरा ।। अलिप्त एकटा सर्वेश्वरा ।। शेखीं दातारा उरशीं तूं ।। ७ ।। नमन करोनी मी तुजसी ।। आरंभितों ग्रंथासी ।। वक्ता वदविता तूंचि होशी ।। जगच्चालका दीननाथा ।। ८ ।। मी म्हणतां अंहकार घडे ।। अंहतेंसी विचारितां पुढें ।। ती न दिसतां मागें पुढें ।। सर्वांकडे तूंचि भरशी ।। ९ ।। तुजविणें ठाव रिता ।। अणुमात्र न दिसे पाहतां ।। तूंचि एक भाससी विचारितां ।। सर्वगत सच्चिद्रूपें ।। १० ।। तुज स्तवितां मति प्रकाशे ।। चिदम्बरकथा आठवतसे ।। शांति सुख ही विलसे ।। माझ्या हृदयमंदिरीं ।। ११ ।। मुनीश्वर म्हणे ब्राम्हणांसी ।। ऐका हो आतां सावधानेसी ।। सुरस चिदम्बरकथेसी ।। तुम्हांसी मी सांगतों ।। १२ ।। बारा वर्षे ब्रम्हचर्या ।। विध्युक्त आचरलेसी पुत्रराया ।। आतां स्वीकारावें गार्हस्थ्या ।। ऐसें जनकें बोधिलें ।। १३ ।। इतुक्यांत माढळ्ळी उपनामक ।। लिंगोपंत आला वरार्थी देख ।। मल्हार दीक्षितासी सम्यक ।। पुसता झाला परियेसा ।। १४ ।। आमुची कन्या चिदम्बरासीं ।। द्यावी ऐशी इच्छा मानसीं ।। आहे ती पूर्ण करणेसी ।। आपण समर्थ आहां कीं ।। १५ ।। अंगीकारितां दीक्षित ।। लिंगोपंत करोनि लग्न निश्चित ।। मग पुसोनि सुमुहूर्त ।। लग्नार्थ पै तेथें आला ।। १६ ।। कुटुंब स्वजन आप्त ।। सर्व संपत्ती समवेत ।। महोत्सवें लग्नाप्रत ।। आरंभिलें तेधवां ।। १७ ।। महोत्सवाप्रत जे ब्राम्हण ।। आले

शिवचिदम्बर

होते विद्वज्जन ।। मंगलस्वरें मंगलाष्टक पठण ।। आरंभिती तेधवां ।। १८ ।। जेणें अति प्रीतीपूर्वक ।। गिरिजाकर धरिला देख ।। तो भवानी प्राणनायक ।। वधूवरांसी रक्षूं दे ।। १९ ।। जो भक्तांची विघ्नें संहारी ।। ऋद्धिबुद्धीचा सहकारी ।। गणनायक विघ्नहारी ।। वधूवरांसी रक्षूं दे ।। २० ।। ब्रम्हादि सुरवर जयासी ।। अखंड ध्याती निजमानसीं ।। तो भक्तवत्सल हृषीकेशी ।। वधूवरांसी रक्षूं दे ।। २१ ।। जयाचे प्रकाशे निखिल जन ।। प्रत्यहीं करितीं स्वकर्माचरण ।। तो हा सूर्यनारायण ।। वधूवरांसी रक्षूं दे ।। २३ ।। ऐसें मंगलाष्टक म्हणोन ।। अक्षता समर्पिती ब्राम्हण ।। मग लिंगोपंतें कन्यादान ।। विध्युक्त आरंभिलें ।। २४ ।। कन्या सरस्वती नामक ।। चिदम्बरासी प्रीतिपूर्वक ।। अर्पण करितां कौतुक ।। घडलें तें परियेसा ।। २५ ।। उमामहेश्वर पूजेच्या वेळीं ।। पंचवदन रुंडमाळी ।। आनंदभरित कन्येजवळीं ।। शिव बैसला ऐसा दिसे ।। २६ ।। हें पाहुनी सुबुद्धें ।। लिंगोपंते परमानंदें ।। सर्वस्व आपुलें आंदणछंदें ।। समर्पिलें चिदम्बरासी ।। २७ ।। महोत्सव केला चार दिन ।। संतुष्टविले अपार ब्राम्हण ।। देऊनि शिष्टा दक्षिणादान ।। लिंगप्पानें ते वेळी ।। २८ ।। महोत्सवें बोळवण ।। करुनि वऱ्हाड आपण ।। हर्षे निजस्थाना लागून ।। सपरीवारें जाय तेव्हां ।। २९ ।। यापरी गृहस्थाश्रम ।। अंगिकारोनि मेघश्याम ।। पितृसेवा नित्यनेम ।। भक्तीभावें करितसे ।। ३० ।। येणें परी मार्तंडदीक्षित ।। प्रभाकराचेंही प्रीतियुक्त ।। लग्नकार्य संपादित ।। कुलीन कन्या योजूनि ।। ३१ ।। जेव्हां हा कैलासनाथ ।। या भूमीवरी अवतरला निश्चित।। त्याचे गणही समस्त ।। सेवार्थ अवतरले ।। ३२ ।। कोणी झाले भक्त ।। वर्तती कित्येक दास्य करित ।। सुत विद्यार्थी आप्त ।। जाहले असती कित्येक ।। ३३ ।। त्यांत पार्वती भागीरथी ।। आल्या दोघी भूमीवरती ।। सरस्वती सावित्री ख्याती ।। नामें असती तयांची ।। ३४ ।। मनीं म्हणें चिदम्बर ।। त्यांत एकीचा अंगिकार ।। जाहलासे साचार ।। दुजी वाट पाहतसे ।। ३५ ।। आतां गंगेचा स्वीकार ।। केला पाहिजे म्यां सत्वर ।। पित्याची आज्ञा वेगवत्तर ।। संपादिली पाहिजे ।। ३६ ।। मग पितृसन्निध तत्त्वता ।। येवोन म्हणे सरस्वतीभर्ता ।। गुरुजी

अभिनव[1] मज आतां ।। एकाएकीं वाटतसे ।। ३७ ।। आज एक ज्योतिषी ।। माझा हस्त पाहोनि परियेसी ।। सामुद्रिक कथियलें मजसी ।। त्याचें लक्षण ऐसें असे ।। ३८ ।। द्विभार्यायोग तुजला ।। सांच जण ऐसें वदला ।। याचा अभिप्रायचि मजला ।। काय असे कळेना ।। ३९ ।। ऐसें विचारितां तनयें ।। जनक बोले सुहास्यें ।। तूं कोण आहेस पाहें ।। मी हें सत्य जाणतसें ।। ४० ।। तुझे इच्छेनुरूप ।। कार्य होऊं दे अमूप ।। ऐसें म्हणतां चिदम्बरा तात ।। विचित्र पै वर्तलें ।। ४१ ।। तंव आला ब्राम्हण एक ।। चिदम्बरासी महा हरिख ।। होवोनि भक्तिपूर्वक ।। द्विजवरातें वंदितसे ।। ४२ ।। पुसे मग भूदेवासी ।। आलां आपण कासयासी ।। कोण कोठें जातां मजसी ।। सांगा ऐसें बोलिला ।। ४३ ।। आपण असतां सर्वज्ञ ।। अज्ञासारिखे करितां प्रश्न ।। लोकरीती अनुसरून ।। मीही सांगतों ऐकावें ।। ४४ ।। माझे अंतर तूं जाणसी ।। तरी माझे मुखें वदविसी ।। येथून पूर्व दिशेसी ।। शेल्लीकेरी गांव असे ।। ४५ ।। तेथें होता मणिगिरी नामक ।। विप्र सदाचारी धार्मिक ।। त्याची जाया कृष्णा ऐक ।। होती महासती साध्वी ।। ४६ ।। तीसी पुत्र जाहला एक ।। कीर्तीमंत शिवपूजक ।। अंगना त्यांची तुंगा देख ।। पतिव्रता ती असे ।। ४७ ।। तिचा कुक्षिसिंधूचंद्रमा ।। असे पुत्र बिष्टनामा ।। त्याची प्रख्यात महिमा ।। तुम्हां श्रुत असेल पै ।। ४८ ।। त्याचें अमानुष चरित्र ।। सर्वज्ञ जाणता आपण थोर ।। मी काय असें पामर ।। वर्णूं न शकें सर्वथा ।। ४९ ।। तयाची असे सहचरी ।। सखरा तीचे नाम निर्धारी ।। तियेची कुशीं सुंदरी ।। कन्या एक उपजली ।। ५० ।। जिचें पाहुनी सौंदर्य ।। देवही प्राप्तीसाठीं करिती उपाय ।। कैशी होईल आम्हां साध्य ।। ऐसें मनीं चिंतिती ।। ५१ ।। एके दिवशीं दंपती ।। परस्पर विचार करिती।। कन्येसी अनुरूप पती ।। या भूमंडलावरी कोण असे ।। ५२ ।। ऐसें असतां विचारित ।। आला भूसुर अवचित ।। साद्यंत तुमचें चरित ।। सांगतां झाला अवधारा ।। ५३ ।। ऐकूनि आपुली कीर्ती ।। अंतःकरणी संतुष्ट दंपती ।। सर्वेश कसे अंगिकारिती

१. नवीन




शिव चिदम्बर

।। ऐसें म्हणती मनांत ।। ५४ ।। तुझे चिंतन दिनरात्रीं ।। एकोभावें कन्या सावित्री ।। करितां अत्यंत कृशगात्री ।। झाली असें दातारा ।। ५५ ।। होवोनि बिष्टेश चिंतातुर ।। मज पाठविलें सत्वर ।। आपण आतां यानंतर ।। कांहीं निर्धार सांगाजि ।। ५६ ।। यापरी ब्राम्हणकथन ।। ऐकोनि पितृसन्निधान ।। जावोनि द्विजाचें वचन ।। निवेदन पै केलें ।। ५७ ।। जनकही संतोषोनि ।। आज्ञा देत पुनः संधानीं ।। चिदम्बरही तत्क्षणीं ।। लग्ना जावया सिद्ध झाला ।। ५८ ।। सर्वे घेऊनि आप्त स्वजन ।। सपरिवार सेवकगण ।। शेल्लीकेरीसी येऊन ।। राहिला ग्रामाजवळीं ।। ५९ ।। बिष्टेश चिदम्बरासी ।। महोत्सवें निजसदनासी ।। नेऊन यथाविधीसी ।। कन्यादान पै केलें ।। ६० ।। गीतवादनादि महोत्सवें ।। लग्न करोनि बहुवैभवें ।। द्विजसंतर्पण एकोभावें ।। दिनचतुष्टय करीतसे ।। ६१ ।। आबालवृद्धपुरंध्रीवर्ग[1] ।। विवाहोत्सव पाहोनी अभंग ।। स्वकर्माचा केला त्याग ।। लग्नानंदें भरोनिया ।। ६२ ।। येणें परी चिदम्बर ।। गंगांशभूत सावित्री कर ।। ग्रहण करोनि अपार ।। महदानंद पावला ।। ६३ ।। ब्राम्हण संतुष्ट होत जेणें ।। विविधान्न दान दक्षिणें ।। समाराधोनि तोषवित तेणें ।। निघण्या मग सिद्ध जाहला ।। ६४ ।। श्वशुराज्ञा घेउनि सत्वरें ।। अमोलिक आंदणभारें ।। वाजताति मंगल तुरे ।। चिदम्बर निघता झाला ।। ६५ ।। निखिल निजपरीवारेसीं ।। सर्वे घेऊनि नवोढेसी ।। मार्ग क्रमितां मुरगोडासी ।। आनंदेंसी पातला ।। ६६ ।। दंपती दोघेजण ।। मार्तंड दिक्षीताचे चरण ।। भावे करोनिया वंदन ।। सेवानिपुण जाहले ।। ६७ ।। ज्यापरी असे कैलासीं ।। त्याचपरी भूलोकीं परियेसी ।। घेऊनिया दोघी स्त्रियांसी ।। शोभतसे चिदम्बर ।। ६८ ।। या जगीं पितृशुश्रूषणा[2] ।। पुरवितसे सर्व कामना ।। हें कळवावया सर्वजनां ।। करितसे आपण पितृसेवा ।। ६९ ।। उत्पत्ती स्थीती लय ज्या आधीन ।। ज्याचे आज्ञेविण न हाले पर्ण[3] ।। तो सर्वेश्वर दीक्षितगृहीं जाण ।। पुत्रापरी वर्ततसे ।। ७० ।। अहो जगदीशचरित ।। वर्णावया श्रुति[4] कुंठित ।। होवोनि जहाली लज्जित ।।

१. लहान थोर व नारीवर्ग. २. वडिलांची सेवा. ३. पान. ४. वेद.




शिव चिदम्बर

शिवचिदम्बर

तेथें समर्थ आन कोण ।। ७१ ।। जगीं लोकोपचारार्थ ।। नानाकर्मे आचरोनि दावित ।। श्रुति स्मृति जयांतें स्तवित ।। वेदाध्ययन तो करी ।। ७२ ।। अष्टही सिद्धी जयासी ।। सेविताती अहर्निशीं ।। तो पितृशुश्रूषणासी ।। सादरें उभा असे ।। ७३ ।।ब्रम्हादिक हरिहर ।। ज्याचे पूजेसी तत्पर ।। तो पूजासामग्री सत्वर ।। आणोनियां देतसे ।। ७४ ।। जो असे जीवनाचें जीवन ।। तो स्कंधी[1] घट वाहे जलपूर्ण ।। जनकागृहीं मानापमान ।। नाणितसे कधी मनीं ।। ७५ ।। बद्धांजळी होऊनि ।। काय असे आज्ञा म्हणोनी ।। वेळोवेळी येऊनि ।। पुसतसे तातासी ।। ७६ ।। जेव्हां बोलावी जनक ।। सवें धांवत येउनी देख ।। उभा राहे सन्मुख ।। पित्राज्ञा शिरीं वंदी ।। ७७ ।। जनकें आज्ञपितां चिदम्बर ।। मागें पुढें न करी विचार ।। कार्य करोनि सत्वर ।। मागुता पुढें उभा राहे ।। ७८ ।। ब्राम्हमुहूर्ती पित्यापूर्वी ।। उठोनि आपण प्रत्यहीं ।। सेवाकर्म सारोनि सर्वही ।। उठवितसे पित्यासी ।। ७९ ।। पिता शेजे गेलियावरी ।। मग आपण निद्रा करी ।। गुरुसेवा याची परोपरी ।। कवण वर्णूं शकेल ।। ८० ।। गुरुसेवा केवळ सुधा ।। गुरुसेवें लाधे विद्या ।। गुरुसेवका जनीं शोभा ।। अष्ट सिद्धी त्या वश होती ।। ८१ ।। गुरुसेवा कामधेनू ।। पुरवितसे मनकामनू ।। अज्ञानांधकारभानू[2] ।। गुरुसेवा साच पैं ।। ८२ ।। गुरुसेवें आयुष्यवर्धन ।। लोकत्रयीं कीर्तीमंडन ।। मोक्षलक्ष्मी पादसंवाहन ।। भावें गुरुभक्तांचे करीं ।। ८३ ।। गुरु म्हणजे दोन अक्षरें ।। संसार चिंता ताप हरे ।। अपार सुख उच्चारमात्रें ।। सत्वर हातीं येतसे ।। ८४ ।। यापरी सद्गुरुनाथ ।। मुरगोडीं राहूनिया चरित ।। लोकोद्धारक निश्चित ।। दावितसे अपार ।। ८५ ।। अनाथनाथ चिदम्बर ।। त्याचें चरित्र अपार ।। सर्व वर्णावया भूमिवर ।। समर्थं कोण झालासे ।। ८६ ।। आतां श्रोतीं द्यावें अवधान ।। पुढीले अध्यायी रसाळ कथन ।। ऐकतां पुरुषार्थ जाण ।। जोडे आपण अनायासें ।। ८७ ।। गुरुसेवा ऐकोनि कानीं ।। चिदम्बरकिंकर जोडोनि पाणी[3] ।। विनवितसे सर्वांलागोनी ।। चिदम्बरकथामृत पान करा ।। ८८ ।। स्वस्ति

शिवचिदम्बर

१. खांद्यावर २. अज्ञानरुपी काळोख दूर करणारा सूर्य ३. हात

श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टें सद्गुरुनाथ ।। यास्तव ऐका श्रोते समस्त ।। सप्तमोऽध्याय स्वादुतर हा ।। ८९ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे श्रीचिदम्बरविवाहमहोत्सववर्णनमं नाम सप्तमोऽध्यायः ।। ७ ।। ओवीसंख्या ८९ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

## टिपूमदभङ्गः



हातिची पुढें करोनि झारी। शृंगादि पुच्छापर्यंत वृषावरी। वरदहस्तें प्रोक्षोनि वारी। थापटी पृष्ठावरी तीन वेळ॥

शिवचिदम्बर

॥श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ॥ ॐनमो चिदम्बर मंगलमूर्ती ॥ त्रिभुवनामाजीं तुझी कीर्ती ॥ पसरली असे निश्चिती ॥ सुरस मंगल चरित्रें ॥ १ ॥ तुजसी जे स्मरती ॥ त्यांचीं विघ्नें सर्व पळतीं ॥ सकळ अभीष्ट साधती ॥ चिदम्बरा गुरुराया ॥ २ ॥ चिदम्बरा तुझा दंत ॥ एकचि परी भासे अद्‌भुत ॥ असे चराचर खात ॥ अनुक्रमें करूनी ॥ ३ ॥ विवेक वैराग्य शूर्पकर्ण ॥ दोन्ही हालवितां जो का प्रभंजन[1] ॥ उठे तो टाकी मूळ खणून ॥ संसारतरूचें निश्चयें ॥ ४ ॥ श्रुतिस्मृति दोन्ही नेत्र ॥ उघडिसी जंव किंचिन्मात्र ॥ तंव सारासार विचार ॥ भक्तांसी लाधे ॥ ५ ॥ साधनचतुष्टय चारी हात ॥ तुवां करोनि पुढें सतत ॥ जे नित्य तुजसी स्मरत ॥ त्यांतें सांभाळिसीं सर्वदा ॥ ६ ॥ सप्रेमे भोजनीं मोदक ॥ भक्तें वाढितां तुवां देख ॥ न पाहतां आपुली भूक ॥ आवडीनें भक्षिलेसी ॥ ७ ॥ तेणें वाढलें तुझें पोट ॥ देखणारास दिसे अचाट ॥ लंबोदर नाम सुभट ॥ तैंपासूनि तुज आलें ॥ ८ ॥ अज्ञानवारण[2] माजतां ॥ त्याची करावया शांतता ॥ ज्ञानांकुश तत्त्वतां ॥ हातीं तुवा घेतलासी ॥ ९ ॥ मृत्यूनें पाश भक्तांसी ॥ अवचित घालिता वेगेंसी ॥ तूं हिरोनी मृत्युपाशासी ॥ घेतला भक्त रक्षावया ॥ १० ॥ जीं जीं विघ्नें तुझे चिंतनीं ॥ येती मजला प्रतिक्षणीं ॥ विघ्नहरा तीं त्वां निवारुनी ॥ माझें संरक्षण करीं बा ॥ ११ ॥ ध्यान ज्याचें अज्ञानहारीं ॥ अंतरी ब्रम्हप्रकाश करी ॥ त्या चिदम्बरचरणीं सत्वरीं ॥ नमन असो साष्टांगे ॥ १२ ॥ म्हणे ब्राम्हणांसी मुनीश्वर ॥ चित्त असो द्या सादर ॥ चिदंबरकथा असे रुचिर ॥ सांगेन मी तुम्हासीं ॥ १३ ॥ आलीं सरस्वतीचिया पोटीं ॥ चिंदम्बरासी बालकें गोमटीं ॥ दिवाकर शंकर नामें मोठीं ॥ पितामह पोटी आनंदला ॥ १४ ॥ ऐसें वर्ततां एके दिवशीं ॥ पिता बोले चिदंबरासी ॥ नवनीत[3] पाहिजे आज मजसी ॥ इष्टिकर्मासी सत्वर ॥ १५ ॥ ग्रामांतरा जाऊनि ॥ सत्वर देईं बा आणोनी ॥ मी ऋत्विजांसी घेवोनी ॥ इष्टिसाधनी प्रवर्ततों ॥ १६ ॥ तंव सविनयें पित्यासी ॥ वंदन करोनी चरणांसी

शिवचिदम्बर

१. वारा २. अज्ञानरुपी हत्ती ३. लोणी

|| विनवितसे आज मजसी || जाऊं नये ऐसें गमे[1] || १७ || परी आपुलिया आज्ञेपुढें || माझा संकल्प केंवि घडे || लोणी घेवोनिया थोडें || म्हणे स्वामी सत्वर येतों || १८ || मग वंदूनि पितृचरण || आला मातृसन्निधान || नमस्कारोनी अंबेलागुन विनवितसे अवधार || १९ || आज कोणीही तुम्हासी || आणोनि दिधलिया वस्तूसि || स्पर्श अथवा अंगिकारासि || निश्चयें तुम्ही करुं नये || २० || ऐसें बोलूनि मातेसी || आपण निघाला ग्रामांतरासी || शेजारीण बाई परियेसी || त्या ठायासी पैं आली || २१ || मनीं धरोनी वासना कुढी[2] || मधुर बोलत आली तातडी || पुढें तिसी नरकजोडी || होती तैसी बुद्धी झाली || २२ || हातीं घेऊनीं पडवळ || घेई माते उत्तम फळ || भाजी करीं आज सोज्वळ || म्हंणोनि हातीं दीधलें || २३ || कालकर्म संयोगेंकरुन || पुत्रवाणी दुर्लक्षून || फळ उत्तम असे म्हणून || हाती घेतले मातेनें || २४ || त्या फळा स्पर्शतांक्षणी || चिदंबराची जननी || विव्हळ अति होवोनि || अवनीवरी पडियेली || २५ || मुहूर्तमात्र धडपडत || प्राण सोडुनि निश्चेष्टित || होवोनि पडली इतुक्यांत || आला धावंत चिदम्बर || २६ || पाहोनि जननीची अवस्था || लोकाचारा करित चिंता || पावोनि चित्तीं विषादता[3] || आला तातासन्निध || २७ || मग सविनयें पित्यासी || सांगे मातृवृत्तासी || आज्ञा द्याल जरी मजसी || तरी मातेसी जीववीन || २८ || ऐकोनि पुत्राची वाणी || विस्मित होवोनि अंतःकरणीं || पिता म्हणे जाणतों तुझी करणी || तरी माझी वाणी ऐक पां || २९ || आज इचा जीव वांचविशी || पुढें लोक तुझे दारासी || आणूनि ठेवितील प्रेतराशी || अनवस्था ओढवेल || ३० || त्या सर्वांचे संजीवनीं || तूं असमर्थ ऐंसें मी न मानी || तरी तूं आतांचि प्रगट जनीं || होऊं नये मज वाटे || ३१ || कालानुरूपें होणार || जाहलें मज वृद्धासमोर || पुढील कर्म शास्त्रानुसार || निश्चिंतपणें करीं बा || ३२ || ऐकोनि जनकवचन || तथास्तु ऐसें म्हणून || और्ध्वदेहिक विधी अनुसरून || मातृकर्म संपादिलें || ३३ || अपार देऊनि महादान

१. वाटते २. दृष्ट ३. दुःख

शिवचिदम्बर

।। घालूनि ब्राम्हणभोजन ।। चौदा दिवस आराधना ।। येणेंविधी आचरे स्वामी ।। ३४ ।। मग पितृसेवा करीत ।। चिदम्बर राहिला स्वस्थचित्त ।। एके दिवशी मार्तंडदीक्षित ।। विचार चित्तीं करी ऐसां ।। ३५ ।। जन्मापासून आजवर ।। मी सुख भोगिलें अपार ।। कीं माझें भाग्य थोर ।। उभय पौत्रमुख देखिलें ।। ३६ ।। माझी आज्ञा प्रतिपालन ।। प्रत्यक्ष शंकर ही जाण ।। करितसे नित्य आपण ।। अवतारक्रिया झांकूनि ।। ३७ ।। चिदम्बर प्रत्यक्ष शिव ।। जनीं दावित मानवभाव ।। अहर्निशी माझें दास्यत्व ।। भक्तिभावें करितसे ।। ३८ ।। मज वर्षे जाहली नव्वद ।। दृष्टी आणि श्रोत्र मंद ।। आजपासुनि महिमा विशद ।। प्रगट करो चिदम्बर ।। ३९ ।। ऐसें करोनि आलोचन ।। चिदम्बरासी बोलावून ।। दीक्षित वदे स्पष्ट वचन ।। सुहास्यमुखें करोनी ।। ४० ।। आजपासुनी तुवां व्यक्त ।। करी बा अवतारचरित ।। तुझे निजपदीं मी सांप्रत ।। प्रवेश करितों आनंदें ।। ४१ ।। ऐसें सांगूनि पुत्रासि ।। सारूनि नित्यानुष्ठानासि ।। मांडूनि वज्रासन परियेसि ।। प्राणायाम आरंभिलें ।। ४२ ।। श्वास कोंडूनि ब्रम्हांडीं ।। योगबळें ब्रम्हरंध्र फोडी ।। त्यामार्गें निरंजनपरडी ।। चढोनि ब्रम्हजोडी पावला ।। ४३ ।। शके सत्राशे दहा ।। ज्येष्ठ शुद्ध नवमी पहा ।। प्रभातीं योगिराज महा ।। निजानंदी बैसला ।। ४४ ।। पुत्रधर्में चिदम्बर ।। करी पित्याचे संस्कार ।। केंगेरी स्थळीं चमत्कार ।। तिसरे दिवशी घडतसे ।। ४५ ।। चिताभस्म करितां दूर ।। तेथें सहा औदुंबरांकुर ।। टवटवित पाहोनि हर्ष थोर ।। चिदम्बरा जाहला ।। ४६ ।। त्या दिवसापासोनि ।। औदुंबरपूजनीं ।। प्रेम धरोनिया मनीं ।। नेमोनि ठेवी ब्राम्हणासी ।। ४७ ।। अद्यापि तेचि औदुंबरे ।। असतीं तेथे परिकर ।। भजतां भक्तांचे काम पूर ।। होती सत्वर त्या ठायीं ।। ४८ ।। यथाशास्त्र पितृनिवाप ।। उरकोनि चौदावे दिनिं अमूप ।। चरित्र दावी चिदम्बर सकृप ।। जें स्मरतां त्रिताप दुरावती ।। ४९ ।। त्या दिवशीं चार शत ।। ब्राम्हण जाहले आमंत्रित ।। सूर्य येतां मध्यान्हाप्रत ।। मिळाले समस्त द्विजवृन्द ।। ५० ।। काशिराज नामक ।। मार्तंडदीक्षिताचा शिष्य देख ।। येऊनि चिदम्बरा निक ।। विचार हरिखें करितसे ।। ५१ ।। असे पाक सिद्ध

शिवचिदम्बर

सांप्रत ।। ब्राम्हण ही अतिक्षुधित ।। पात्रें मांडावया मजप्रत ।। आज्ञा द्यावी म्हणतसे ।। ५२ ।। आज नको करूं गडबडा ।। विलंब करावा थोडा ।। जंव सांगेन पात्र मांडा ।। बैसें पां ऊगा तंववरी ।। ५३ ।। आणखी मुहूर्तानंतर ।। पुसे येउनी सत्वर ।। पुनरपि तेंचि उत्तर ।। चिदंबर सांगतसे ।। ५४ ।। यापरी वारंवार ।। विचारितां तेंचि उत्तर ।। दिवस आला तीन प्रहर ।। मग सांगे पात्रें मांडावया ।। ५५ ।। काशिराज तये वेळीं ।। सत्वर मांडोनि पत्रावळी ।। शाकादि घृतान्ती संकळी ।। पदार्थ ते वेळीं वाढवी ।। ५६ ।। इतुक्यांत पूर्व देशस्थ ।। ब्राम्हण आले चार शत ।। तेही चिदंबरें आमंत्रित ।। भोजनार्थ बैसले ।। ५७ ।। मग काशिराज परियेसी ।। विनवितसे चिदंबरासी ।। ब्राम्हण मिळाले बहुवसी ।। आतांचि जळ न सोडावें ।। ५८ ।। किंचित् विलंब करितां ।। करवितो पाकसिद्धता ।। पुनः जी श्रीगुरुनाथा ।। नातरी होईल अपकीर्ती ।। ५९ ।। हांसूनी चिदम्बर बोलत ।। पाकचिंता न करीं तूं निश्चित ।। भोजनांती तुज कळेल वृत्त ।। वृथा शंकित होऊं नको ।। ६० ।। काशिराज होऊनि भयातुर ।। बोले द्विगुणित आले द्विजवर ।। कैसें मिळेल पोटभर ।। अन्न तयां ब्राम्हणांसी ।। ६१ ।। बोले मग सुमंदहसित ।। पिता माझा कृपावंत ।। मज अन्नपूर्णेसी निश्चित । जातां स्वाधीन पै केलें ।। ६२ ।। ती आतां पाकशाळेंत ।। बैसली असे निश्चित ।। दावितों येईं तूं त्वरित ।। म्हणत शंकर निघाला ।। ६३ ।। तंव त्या पाकशाळे आंत ।। कुंकुमादि सौभाग्यचर्चित ।। बैसलीसे अन्नपूर्णा सुशोभित ।। प्रत्यक्ष देखिली तयांनी ।। ६४ ।। काशिराज पाहे जंव ।। वृद्ध सुवासिनी दिसे तंव ।। हात जोडितांचि उभय ।। उभी राहे अन्नपूर्णा ।। ६५ ।। पाहोनि अन्नपूर्णेसीं ।। समाधान वाटले चित्तासी ।। पात्रें वाढिलीं सोपस्कारेंसी ।। काशिराजें तेधवां ।। ६६ ।। त्या दिवशीं आठ शत ।। ब्राम्हण जेविले अद्भुत ।। तथापि पाक[१] पूर्ववत ।। तैसाची उरला असे ।। ६७ ।। हें पाहोनि सर्वांसी ।। आश्चर्य वाटले मानसीं ।। नमस्कार करिती चिदंबरासी ।। हाचि शंकर म्हणोनियां ।। ६८ ।। त्या दिवसापासूनि

..........................

१. अन्न

शिवचिदम्बर

|| चिदंबरचरित्र प्रतिदिनीं || वाढत चालले जनीं || म्हणोनि यात्रा भरुं लागली || ६९ || मांडलीक जन सर्वही || मन समर्पोनि चिदंबरपायीं || मानापमान दूर सारोनि पाहीं || सेवेंसि जाहले तत्पर || सर्व देशवासी जन || पहावया चिदम्बरचरण || येतांचि मनोरथपूर्ण || तत्क्षणेंचि पावती || ७१ || एके दिवशीं चिदम्बर || शूद्रा एकां पाहोनि करुणाकर || तुझें दारिद्र्य व्हावया दूर || ऐक म्हणें गोष्ट माझी || ७२ || तुझे देव्हाऱ्याचे ईशान्य दिशेसी || भूतळीं असे द्रव्यराशी || तुझ्या पितामहें निक्षेपाशी || केलें असें जाण पां || ७३|| तेथें दोन हातांखालीं पाहीं || भूमी खणोनि द्रव्य घेईं || म्हणतां शूद्रें लवलाहीं || भूमी पाहिली खाणोनि || ७४ || मग तेणें येऊनि सांगितलें || द्रव्य न दिसे बा मज वहिलें || पुनरपि त्यासवें बोले || गुरुराज परियेसा || ७५ || आतां जें खोदलेंसी || वीतभर त्याचे उत्तरेसी || खाली बाहुमात्रेंसी || खणितां तुजसी लाधेल || ७६ || तैसें करितां शूद्रासी || अमूप द्रव्य परियेसी || लाधलें तंव तो मानसीं || म्हणे पावला मज शंकर || ७७ || आनंदभरें स्फुदंत|| द्रव्य घेवोनि धावत || चिदम्बरापुढें घट निश्चित || ठेविता जाहला तो शूद्र || ७८ || चिदम्बर म्हणे द्रव्य तुवां || घेवोनि घरासी जाई बा || आज पासोनि सेवा || देवद्विजांची चालविं || ७९ || ऐकोनि शूद्रे तत्क्षणीं || अर्ध द्रव्य काढोनि || देवद्विजांकारणीं || वाटोनिही दीधलें || ८० || प्रत्यहीं दानधर्म || करोनि नित्य नेम || चालवित आजन्म || राहिला सध्दर्मे गुरुसंमतें || ८१ || ऐसें वाढतां चरित || श्वशुर लिंगप्पा अवचित || येवोनि विनवी जामाताप्रत || सुता पाठवीं माहेरासी || चिदम्बरे पाठविता सरस्वतीस || पिता नेतसे स्वगृहास || आनंदे लोटता कित्येक दिवस || एके दिवशीं चोज[1] झाले || ८३ || तेथें आला टिपु नामक || दक्षिणदेशींचा राजा देख || महा बलाढ्य बहुसैनिक || म्लेंच्छ जातीचा उन्मत्त || ८४ || जिकडे जाय तिकडे तो खळ || देवद्विजां देत उपद्रव प्रबळ || पुण्यपापाकडे केवळ || लक्ष तिळभरही नसे || ८५ || तो येऊनि

१. नवल २. लिंगप्पाचे घर.




शिव चिदम्बर

शिवचिदम्बर

लिंगालय[२] ।। वेढोनी तेथिंचे सर्व द्रव्य ।। हरोनि बहुत अन्याय ।। करित निर्भयें राहिला ।। ८६ ।। इतुक्यांत सरस्वती माय ।। देखुनि त्याचे अन्याय ।। मुसळ हाती घेऊनि दिव्य ।। मारावया पै गेली ।। ८७ ।। तंव देखोनियां टिपू ।। पोटीं उपजे तयाच्या कोपू ।। सेवकांसी सांगे तो पापरूपू ।। धरा इसी ओपू[१] बंदिमाजि ।। ८८ ।। तंव ते दुष्ट सेवक ।। सरस्वतीसी धरिती देख ।। स्पर्शतांक्षणीं सैनिक ।। अपूर्व कौतुक वर्तलें ।। ८९ ।। पतंगें भक्ष्य म्हणोनि अग्निसि ।। स्पर्श करितां वेगेंसी ।। जैसा परिणाम होय त्यासी ।। तैसें सैनिका जांहलें ।। ९० ।। नातरी मांसगोळी ।। भक्ष्य म्हणोनि मीन जळीं ।। गिळितांचि टोंचोनि कांटा गळीं ।। प्राण ते वेळीं सोडित ।। ९१ ।। त्यापरी टिपूचे सैनिकजन ।। सरस्वतीसी शिवतां जाण ।। विव्हळ होवोनि सोडिती प्राण ।। सेनेंत हाहाकार प्रर्वतला ।। ९२ ।। हत्ती घोडे पायदळ ।। गेले यमलोका तत्काळ ।। टिपूचे दोनी बुबुळ ।। अवचित पडले मेदिनीवरी[२] ।। ९३ ।। टिपू विचारी निजमानसीं ।। कोणाचें क्षोभे करूनि मजसी ।। ही दशा प्राप्त झाली ऐशीं ।। म्हणोनि मनीं चिंतितसे ।। ९४ ।। म्यां फोडिली देवसदनें ।। ब्राम्हण मारिले अविचारपणें ।। इतुके कष्ट मज तेणें ।। प्राप्त झालेसें वाटतें ।। ९५ ।। आतां उपाय काय करूं ।। कोण करील माझा उद्धारू ।। म्हणोनि तेधवां तो क्रूरू ।। बहु चिंता करू लागला ।। ९६ ।। इतुक्यांत तेथें एक ब्राम्हण ।। येतां जाहला सुहास्यवदन ।। ब्राम्हण आला हें समजून ।। टिपूनें वंदन पै केलें ।। ९७ ।। मग पुसे ब्राम्हणासी ।। महाराज माझी दशा ऐशी ।। कवण अपराधें मजसी ।। जाहली असे सांगा जी ।। ९८ ।। मग विप्र होऊनि कृपावंत ।। सांगे टिपूसी सत्यमात ।। भीती न धरीता किंचित ।। प्रगटवित गुरुमहिमा ।। ९९ ।। चिदम्बरमहिमा असे अपार ।। ऐक यवनेशा परिकर[३] ।। अरे नेणतपणें त्याचिया कांतेवर ।। दृष्टी तुंवा ठेविलीसे ।। १०० ।। तीस जरी बंदी घालिशी ।। मग अपरधा काय पुसशी ।। मुहूर्तमात्रें यमपुरासी ।। सहकुटुंबेंसी जाशील ।। १ ।। ज्याचे भयें

शिवचिदम्बर

१. घालूं २. भूमिवर ३. संपूर्ण.

देवगण ॥ भिऊनि वर्तती आपण जाण ॥ नित्य नेमें ज्याचे चरण ॥ वंदिती येऊनि त्रिकाळीं ॥ २ ॥ ज्याचिया भयें वायू वाहतो ॥ ज्याचे भयें सूर्य तपतो ॥ ज्याचे धाकें पर्जन्य वर्षतो ॥ यथाकाली जाण पां ॥ ३ ॥ ज्याचे भयेंकरून मृत्यु ॥ आज्ञेवीण जीवा न शिबे सत्यु ॥ मायेसवें जो रमे नित्यु ॥ क्रीडतसे नित्यानंदीं ॥ ४ ॥ तो हा सच्चिदानंद सर्वेश्वर ॥ नाम तयाचें चिदम्बर ॥ त्याचें तुवां कलत्र[1] ॥ नेतां कल्याण कैसें होय ॥ ५ ॥ जरी इच्छिसी कल्याण ॥ तरी संशय सोडूनियां जाण ॥ चिदम्बरासी रिघें शरण ॥ जगदंबेसी समर्पण करी ॥ ६ ॥ ऐसें ब्राम्हणवचन ऐकतां ॥ टिपू पावोनि उद्वेगता ॥ सेवकांच्या धरोनि हाता ॥ चरणचाली निघतसे ॥ ७ ॥ ग्रामी येतां चिदम्बरसदन ॥ भावें घालितसे लोटांगण ॥ म्हणें मी अपराधी जाण ॥ आलों शरण चिदम्बरा ॥ ८ ॥ अपराध घालूनि पोटीं ॥ मजवरी करी कृपादृष्टी ॥ तूं अससी निष्कपटी ॥ जहालों कष्टी निजपापें ॥ ९ ॥ या कष्टांपासूनि सर्वेश्वरा ॥ कृपासागरा चिदम्बरा ॥ मज सोडवी दातारा ॥ लवकरी शरणागतासी ॥ ११० ॥ यापरी स्तवूनि दंडवत ॥ वारंवार असे घालित ॥ करुणा भाकितसे अत्यंत ॥ तंव कृपा उपजली श्रीगुरूसी ॥ ११ ॥ मग येऊनि बाहेर ॥ पुसतसे श्रीचिदम्बर ॥ का आलासी येथवर ॥ देवद्विजसंहार सोडूनिया ॥ १२ ॥ ऐसें गुरुवचन ऐकोनी ॥ दंडवत घाली अवनी[2] ॥ थरथरां कापे अंगणीं ॥ म्हणे मजवरी करीं कृपा ॥ १३ ॥ तंव विचारी चिदम्बर ॥ काय असे तुज चिंता थोर ॥ उपाय करू बा निर्धार ॥ सांग सत्वर मजलागीं ॥ १४ ॥ मग जोडूनिया दोन्ही कर ॥ अंध बोले परिकर ॥ तव जायेसी मी निष्ठुर ॥ बंदींत ओपूं म्हणितले ॥ १५ ॥ माझे सेवक मजपरीं ॥ दुर्जन असती भारी ॥ तेणे सरस्वती मेण्यामाझारी ॥ घातली श्रीहरी नेणतपणें ॥ १६ ॥ तेणें चतुरंग दळ ॥ पंचत्व पावलें निखिल ॥ मी होवोनी अंध दुर्बळ ॥ दयाळा आलों येथवरी ॥ १७ ॥ मग गेली माता सरस्वती ॥ स्वयें निजसदना प्रती ॥ माझी अवस्था श्रीपती ॥ जाहली

१. पत्नी. २. भूमीवर.

निश्चित यापरी ।। १८ ।। हें ऐकुनी जन समस्त।। होवोनिया तटस्थ ।। झालें तें बरें झालें म्हणत ।। कार्य साधलें उपायाविण ।। १९ ।। प्राणहारक दुष्ट सर्प ।। वन्ही[1] प्रवेशतां आपोआप ।। त्यावरी कोण होई सकृप ।। तैसें अमूप[2] हें जाहलें ।। १२० ।। म्हणती मरों दे हा दुष्ट ।। मग देवब्रम्हणांचे कष्ट ।। सहज चुकती विस्पष्ट ।। असे हा उद्धट निष्करुण ।। २१ ।। सर्पासी दूध पाजिता ।। तो मागुती करी घाता ।। त्यापरी या यवनासी रक्षितां ।। नाश आपुला असे जाणा ।। २२ ।। ऐसें जन म्हणत असतां ।। कृपानिधीचिया चित्ता ।। कृपा उपजली तत्त्वतां ।। स्वामीची दयालुता यापरीं ।। २३ ।। ज्याची दृष्टी असे सम ।। तो कदां न मानी कोणासी विषम ।। दुष्टाचें कार्यही उत्तम ।। करी विषाद न मानितां ।। २४ ।। खद्योत खवळतां भारी ।। गिळील काय तमारी[3] ।। कृष्ण सर्प माजला जरी ।। स्वारी गरुडावरी करील काय ।। २५ ।। नातरी मशक[4] उद्धट ।। करितां कोप अचाट ।। समुद्रपान अवचट[5] ।। करील नीट काय तें ।। २६ ।। त्यापरी तो जगदीश टिपूभय न मानितां लेश ।। कृपा करोनि म्हणे त्यास ।। दावी नेत्रास काय झालें ।। २७ ।। ऐसें बोलतां सर्वेश ।। तीच वाणी झाली सुधारस ।। यवन झाला डोळस ।। सेनाही सजीव होत तिकडे ।। २८ ।। ही पाहूनि अद्‌भुत कृती ।। यवन आनंदला चित्तीं ।। करोनि बहुतांपरी स्तुतीं ।। विनवी मागुतीं स्वामीसी ।। २९ ।। शांती वसो मम चित्तीं ।। प्रभो मजला यावरती ।। ऐशी तमोगुण स्थिती ।। कदापि येवों नेदीं ।। १३० ।। मग चिदम्बर तयासी ।। सांगतसे कृपेसी ।। या उपरी देवद्विजांसी ।। उपद्रव स्वप्नींही न करीं पैं ।। ३१ ।। देवद्विजां उपद्रवा ।। करण्या इच्छिसील जेधवां ।। हानी असें तुझिया जीवा ।। सुस्वभावा धरीं आतां।। ३२ ।। ऐसें शिकवूनि टिपूसी ।। पाठविला निजसदनासी ।। तो घेऊनि सर्व सेनेसी ।। गेला स्वग्रामासी संतोषें ।। ३३ ।। यापरी चिदम्बरचरित्रसंभ्रम ।। वर्णितां असे अनुपम ।। स्मरतांचि नासे भवभ्रम ।। विश्रामधाम साधूंचें ।। ३४ ।। अनुग्रह

१. अग्नीत २. उत्तम ३. सूर्यासी ४. माशी ५. अवघड ६ दरिद्रास.

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

करितां रंकासी[६] ।। तत्काळ बैसवी इंद्रपदासी ।। कोप येतां लवलेशीं ।। ब्रम्हांण्डही भस्म होय ।। ३५ ।। ज्यासी सुखाची असे चाड ।। कथा ही लागे त्यासी गोड ।। स्मरा हो श्रोते अखंड ।। यमदंड चुकावया ।। ।। ३६ ।। पुढीले अध्यायीं रसाळ ।। निरूपण असे सोज्वळ ।। चिदम्बरकिंकर विनवी वेळोवेळ ।। अवधान द्यावें श्रोती सकळां ।। ३७ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्‌गुरुनाथ ।। यास्तव ऐका श्रोते समस्त ।। अष्टमोऽध्याय स्वादुतर हा ।। १३८ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे टिपूमदभङ्गोनाम अष्टमोऽध्यायः ।। ८ ।। ओवीसंख्या १३८ ।।

**।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।**

# तैलिकाख्यानम्




तेथें उखळ काढोनि घट घेईं। आधीं नासाभरण तूं लेईं। मग द्रव्य सर्वही। पुत्रासि देईं विभागोनि॥

श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। ॐनमोजी आनंदघना ।। सोडूनि मानापमाना ।। जे भजतीं तुझे चरणा ।। त्यांसि आल्हादवनां[1] दाविसीं ।। १ ।। सर्वाधिष्ठान भूमीमाजी ।। करूनि सदालवालराजी[2] ।। सोऽहंबीज त्यामाजी ।। सद्‌गुरुजी पेरिलेंसे ।। २ ।। चित्पुष्करणीनीर ।। देतां तुवां निजनिर्धार ।। काढितां कल्पनाकेर ।। आनंदांकुर फुटले तै ।। ३ ।। सर्वांपरिस बाहेर ।। सोज्वळ दिसताती अंकुर ।। गगन व्यापूनि अपार ।। वाढले केर काढितां क्षणीं ।। ४ ।। असे साउली दाटित ।। अहंसूर्याचा किंचित ।। प्रकाशही न प्रवेशत ।। महिमा अद्‌भुत तरूची ।। ५ ।। त्यासी असती सप्तस्कंध ।। मुळीं वसती तीन स्कंध ।। चार शोभती वरी अमंद ।। दाविती स्वानंद सेवकांसी ।। ६ ।। शुभेच्छा विचारणा वैराग्य ।। तीहीमुळें येत वृक्षासी दार्ढ्य ।। मग वरच्या स्कंधासी निश्चय ।। वृद्धी होय प्रत्यहीं ।। ७ ।। या तरुवरती शोभे एक फळ ।। अनिर्वाच्य पक्व रसाळ ।। त्याच्या सेवनार्थ हंसजाळ[3] ।। सर्वस्व त्यागिती आदरें ।। ८ ।। हें फळ घेवोनियां हंसे ।। गर्जिन्नले निर्मानसवासें ।। सेवितां जन्मजरा नासे ।। अनायासें साधकां ।। ९ ।। साधकांसी कष्ट न देतां ।। फळ सेववूनि तत्त्वतां ।। मुक्त करोनि श्रीगुरुनाथा ।। निबांत बैसवीसि कृपाबळें ।। १० ।। चिदम्बरासी अनन्य शरण ।। होऊनि जे अर्पिती तनुमनधन ।। त्याचें जन्म आणि मरण ।। चुके क्षण न लागतां ।। ११ ।। जो कैलास सोडूनि जगन्नाथ ।। भूवरी आला भक्तांसमेत ।। भक्तिमार्गें धर्मस्थापनार्थ ।। त्या चिदम्बराप्रत वंदूं आता ।। १२ ।। ऐका हो श्रोते जन ।। मुनीश्वर आनंदे गर्जून ।। चिदम्बरकथेसि अवधान ।। देता झाला तेधवां ।। १३ ।। अंगीकारोनि श्रौताग्नीसी ।। धर्मे पाळित दोघी स्त्रियांसी ।। गृहस्थाश्रम धर्म दावावयासी ।। नित्य कर्मासी आचरित ।। १४ ।। कण्वशाखां अनुसरून ।। सकल श्रौतविधान ।। कर्मातीत असोनि आपण ।। जनीं आचरोनि दावितसे ।। १५ ।। ब्राम्हमुहुर्ती उठोन ।। करोनि ब्रम्हचिंतन ।। तदनंतर प्रातःस्मरण ।। यथाविधीतें करितसे ।। १६ ।। शौचविधी सारोनी ।। मग आदौ स्नान

१. मोक्ष २. वाफे ३. हंसाचा समूह (जीव).

करोनी ।। शुक्लांबर युग्म[1] लेऊनि ।। सर्वांगीं भस्म लावितसे ।। १७ ।। त्यावरी त्रिपुंड्रधारण ।। करोनि मग अग्न्युद्धरण ।। संध्याक्रियादि सारून ।। अनुदित होम करीतसे ।। १८ ।। करोनि देवद्विजगोपूजन ।। त्यावरी पाठशाळेसि जाण ।। शिष्यांसि अनुग्रहाकारण ।। देवराज जातसे ।। १९ ।। अमृतदृष्टिनें पाहूनि विद्यार्थीयांसी ।। दर्शनव्याजें[2] मेधारस त्यांसी ।। हृदयीं ओतूनि यात्राजनासी ।। दर्शन देणेसी निघतसे ।। २० ।। चिदंबराची सभा विलसे ।। सद्धर्मजीवनीं नामें साजतसे ।। जेथ अणुमात्र जागा नसे ।। भरलीसे प्रेक्षकजनें ।। २१ ।। गुरु येतां सभेसी मंदमंद ।। पाहोनि जन परमानंद ।। पावोनि नमस्कारितां आनंदकंद ।। उठवित भवबंध छेदितसे ।। २२ ।। ज्याचे मनीं जैसें वसें ।। दर्शनमात्रे पुरवीतसे ।। सर्व जनां सांगतसे ।। बोध ऐसा प्रत्यहीं[3] ।। २३ ।। वाचे मंगलची बोलावें ।। शिवनाम मुखीं जपावें ।। वेदमार्गी विश्वासावें ।। सध्दर्म रक्षावा सदोदित ।। २४ ।। करुं नये संसारचिंतन ।। सत्य बोलावे नेम धरोन ।। ऐसे सर्व जनांसी कृपाघन ।। बोधितसे प्रतिदिनीं ।। २५ ।। जनकें केले देह कष्टवून ।। गायत्रीचें पुरश्चरण ।। तत्सांगतार्थ लक्ष ब्राम्हण ।। समाराधना आरंभिली ।। २६ ।। प्रत्यहीं पक्वान्नभोजन ।। तैसाचि आदर सन्मान ।। करी राव रंक सारिखे मानोन ।। अधिक न्यून न मानित ।। २७ ।। पाहोनि ज्याचे आतिथ्य ।। भूपाळही झाले विस्मित ।। काय आहे न कळे मात ।। अगाध सर्व दिसतसे ।। २८ ।। पूर्वी जमदग्नि वसिष्ठादिक ।। कामधेनूप्रसादें आतिथ्य ।। करित होते सम्यक ।। त्यासी मावळवी श्रीदिक्षित ।। २९ ।। ऐसें म्हणोनि नृपाळ ।। सेवेसि राहिले तत्काळ ।। कित्येक सकुटुंब दुर्बळ ।। योगक्षेम व्हावया ।। ३० ।। आपण असोनि भिक्षुक ।। कर्म करितसे अद्‌भुत देख ।। जें जें इच्छिती कामिक लोक ।। तें तें सम्यक देतसे ।। ३१ ।। कामधेनू कल्पतरू ।। अष्ट महासिद्धी परिकरू ।। चिंतामणी ही होवोनि तत्परू ।। पादसरोरुह[4] सेविती ।। ३२ ।। एके दिवशीं दरिद्री ब्राम्हण ।। चिदम्बरकीर्ती ऐकून ।। व्हावया

शिवचिदम्बर.

शिवचिदम्बर

१. जोडी २. दर्शननिमित्तानें ३. दररोज ४. चरणकमल

दारिद्र्यनिवारण ।। गुरुचा शोध करीत आला ।। ३३ ।। त्या दिवशीं होता पर्वकाळ ।। मलापहस्नान सोज्वळ ।। करावाया नाभिमात्र जळ ।। प्रवेशोनि स्वामी उभा असे ।। ३४ ।। तंव वंदूनि द्विजवर ।। प्रार्थितसे वारंवार ।। तुझी कीर्ति ऐकूनी थोर ।। आलो दूर देशाहूनि ।। ३५ ।। निःसीम तापत्रय घरीं ।। असे स्वामी संततीही भारी ।। नित्य भोजन पोटभरी ।। दुर्लभ आम्हांसी जाहलें ।। ३६ ।। दयाळा तूं कृपा जरी करिशी ।। पुत्रांचे मुंजी विवाह परियेसी ।। होऊनि अन्न पोटभरेसी ।। मिळेल आम्हां देवराया ।। ३७ ।। हें ऐकोनि चिदंबर ।। बोले तंव मधुरोत्तर।। काय ऐकोनि येथवर ।। आगमन आपुलें जाहलें ।। ३८ ।। मी असें गरीब, धडपडे ।। अयाचक तो मज आवडे ।। याचकासी काय देऊं पुढें ।। पुण्य मोडे नास्ति वाक्यें ।। ३९ ।। आपण पूज्या सत्पात्र जाण ।। मी यापरी दरिद्री ब्राम्हण ।। आतां वंदूनि विनवितों तव चरण ।। आपणचि आम्हां प्रतिपाळावें ।। ४० ।। पत्रपुष्पफळ जल काहीं ।। जे समर्पीन तुमचे पायीं ।। तेणे द्विजेंद्रा संतुष्ट होई ।। दुजा भाव न धरितां ।। ४१ ।। परिसोनि ऐसें गुरुवचन ।। ब्राम्हण साष्टांगे नमून ।। म्हणे आपुलें वचन ।। सत्य मज कमधेनू ।। ४२ ।। ब्राम्हणाचा भाव ओळखोनि ।। चिदंबरमनीं कृपा उपजोनि ।। प्रेमभावे हातीं पात्र भरोनी ।। ब्राम्हणातें पाचारी ।। ४३ ।। ब्राम्हण येतां निकट ।। पात्रीं देखत जल स्पष्ट ।। त्याचे पदरी ओतितां सुभट ।। अद्‌भुत महिमा प्रगटली ।। ४४ ।। पात्रांतील ओतितां जल ।। त्याचे पदरीं जाहले तत्काळ ।। बावन्नकशी सुवर्णसोज्वळ ।। द्विज हर्षला पाहोनीं ।। ४५ ।। आनंदें विसरोनी देहभाव ।। नाचूं लागला भूदेव ।। सुवर्णभार ठेवूनि तव ।। स्तोत्र अपार करितसे ।। ४६ ।। प्रणाम करुनि साष्टांगें ।। चरणावरी लोळे निजांगें ।। मग उठवोनि त्यासी यज्ञांगें[1] ।। म्हटलें चला निजमंदिरा ।। ४७ ।। हें कृत्य प्रगट न करावें ।। अखंड वैभव आपण भोगावें ।। ज्या दिनी प्रगटविसी स्वभावें ।। लक्ष्मी जाईल निश्चयें ।। ४८ ।। ऐसें संबोधूनि त्या ब्राम्हणा ।। देऊनि अनुग्रह आशीर्वचना

१. चिदंबराने




शिव चिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

।। पाठवूनि निजसदना ।। आपण स्वस्थाना पातले ।। ४९ ।। सरस्वतीकुशीं मागुती ।। पुत्रयुग्म जाहले निश्चिती ।। त्यांसी नामें ठेवी सावित्रीपती ।। मृत्युंजय वररुची ऐशीं ।। ५० ।। सावित्रीसी दोघे तनय ।। जाहले असती गुणालय ।। नामें ठेवी जनकराय ।। काशीनाथ, भास्कर, ऐसें ।। ५१ ।। सहापुत्र ही गुणवंत ।। सत्कर्माचरणें वय घालवित ।। त्यांचे चरित्र पुढें विख्यात ।। सांगेन तत्त्वतां तुम्हांसी ।। ५२ ।। सहाही पुत्र विद्यावंत ।। पित्राज्ञापालनीं समर्थ ।। चिदम्बराचे सद्गुण विख्यात ।। तयांपरी वर्तती ।। ५३ ।। बीजानुरूपी गुण ।। असती सर्वां ठायीं जाण ।। त्यांत सामान्य विशेषण ।। निजविभागानुरूप दाविती ।। ५४ ।। चिदम्बराची दक्षता ।। कार्यकौशल्य आणि निर्भयता ।। हे विशेष गुण तत्त्वतां ।। दिवाकरें घेतले ।। ५५ ।। सर्व शास्त्रीं प्रवीणता ।। वेदशास्त्रीं पाठप्रवचनता ।। आणि जनवशीकरणता ।। इत्यादि शंकरे घेतलें ।। ५६ ।। तपोदक्ष आणि मंत्रसन्निधान ।। व्यवहारकौशल्य आणि बीजार्थ ज्ञान ।। प्रेमभावें नित्य अग्निसेवन ।। मृत्युंजय स्वीकारी ।। ५७ ।। शापानुग्रह आणि वाक्सिद्धता ।। द्विजदेव भक्ति अन्नदातृता ।। अविच्छेदें उपासनता ।। हे गुण वररुची स्वीकरी ।। ५८ ।। सत्कर्मशीलत्व अंतर्ज्ञता ।। सर्वज्ञत्व प्रियवचनता ।। दुष्प्रतिग्रहनिर्बंधता ।। कालज्ञता स्वीकरी काशीनाथ ।। ५९ ।। ज्येष्ठसेवा दक्षता ।। नित्यानुष्ठानीं दृढप्रियता ।। समयानुरूप चमत्कर्तृता ।। भास्करसुत अंगीकारि ।। ६० ।। यापरी श्रीचिदम्बर ।। गृहस्थाश्रम धर्म अपार ।। दावित असतां निरंतर ।। यात्रा अपार भरूं लागे ।। ६१ ।। विप्र एक होता विजयपुरीं ।। रामकृष्ण नामा सदाचारी ।। पतिव्रता त्याची नारी ।। प्रेमभावें करी पतिसेवा ।। ६२ ।। घरीं असे बहु संपत्ती ।। परी तया नसतां संतती ।। प्रत्यही चिंतातुर दंपती ।। सर्व संपत्ती मानिती वृथा ।। ६३ ।। ऐसे कंठितां कित्येक दिवस ।। ब्राम्हण एक दिसे स्वप्नीं त्यांस ।। बोधिता झाला तयास ।। ऐका सांगतों तुम्हांतें ।। ६४ ।। सुकृतफळ मागती प्राणी निरंतर ।। पुण्य आचरावया कंटाळा थोर ।। पापफळ न मागती तिळभर ।। परि पापाचार करितात‍ि ।। ६५ ।। संतान हें असें पुण्यबीज ।। पुण्यावांचुनी न मिळे सहज

शि
व
चि
द
म्ब
र

|| पूर्वपापें संतती तुज || न होय ऐसें मज वाटे || ६६ || ज़री माते तूं पूत्र इच्छिसी || तरी भेटी चिदम्बरासी || तो पुरवील वासना तुमची || सत्य जाणा त्रिवाचा || ६७ || ऐसे देखोनियां स्वप्न || प्रबुद्ध झाले दोघेजण || उभयतांचे स्वप्न जाण || एकार्थ पाहोनि आनंदले || ६८ || मग उठोनि प्रातःकाळीं || स्नान करोनि मन निर्मळीं || प्रस्थान[1] केलें तेचि वेळीं || गुरुपदकमळीं धरोनि भाव || ६९ || प्रयाण करितां कांही दिवसीं || पातले ते गुरुपट्टणासी || तेथें पाहूनि गुरुचरणासी || प्रेमे वंदन करिते झाले || ७० || दंपती विनविती करूनि वंदना || पुत्रार्थी आम्ही तुझे चरणां || आलों शरण दयाघना || गुरुराया इच्छा पुरवीं || ७१ || वचन ऐकोनी दयासागरा || दंपतीसी संतोष अपार || होय ऐसें मधुरोत्तर || बोलिला चिदंबर ते वेळीं || ७२ || अंबे तुझिया पूर्वकर्मयोगें || संतती राहिलीसे मागें || स्वपूर्वाचरितकर्म निजांगें || भोगिल्यावीण क्षया न पवे || ७३ || कर्मक्षयार्थ परियेसी || उपाय जरी इच्छिसी || माझे वचनापरी राहटसी || तरी तुजसी सांगेन || ७४ || येथूनि चार कोसांवरी || ग्राम असे नांवें सत्तीगेरी || तेथें मारुतीदेवासमोरी || गृह एक असे जाण माते || ७५ || त्या गृहीं एक तैलिक || पूर्वी होता महा धनिक || तो आपुलें सर्व धन देख || गृहिणीहातीं देत मोहें || ७६ || तिणें द्रव्य भरोनि घटीं || वरी ठेवी नथ गोमटी || त्यावरती करोनि शरावसंपुटीं[2] || भूमीत तो निक्षेपिला || ७७ || कालयोगें ती वृद्ध झाली || उखळ मोठे त्यावरी घाली || चुलीजवळी ठेविती झाली || पतिपुत्रासही न कथितां || ७८ || मग ती पंचत्व पावली || पांच ही पुत्रीं घर भूमी खणिली || वंचक मातेसी वेळोवळीं || शापिती तळमळत अंतरीं || ७९ || पुत्रांसी न मिळतां निजधन|| बहुं कष्ट सोशिती जाण || ऐसा असतां पुत्रशाप दारुण || तुज संतान होय कैसें || ८० || तो जन्म सोडोनी तेथें || ब्राम्हणजाया झालीस माते || पुत्रशाप असे तुजसांगातें || संतानातें वाढू नेदी || ८१ || यानंतर तूं येथूनि || सत्तीगेरीसी जाऊनि || मारुतीपूजा

१. प्रयाण २. परळ.

एकोमनीं करोनी ।। निजगृहासी मग जाई ।। ८२ ।। तेथें उखळ काढोनि घट घेई ।। आधीं नासाभरण[1] तूं लेईं ।। मग द्रव्य सर्वही ।। पुत्रांसि देई विभागोनि ।। ८३ ।। त्यांस होतां प्रमोद ।। तुझा दुरावेल प्रतिबंध ।। मग पावशी पुत्रानंद ।। तुझें पूर्वकर्म ऐसें असें ।। ८४ ।। ऐकोनि पूर्वकर्म ऐसें ।। वंदन करोनि निघतसे ।। कौतुक पहावया सरिसें ।। जन निघाले अपरिमित ।। ८५ ।। चिदम्बराचे वाक्यापरी ।। ती नारी जाऊनि सत्वरी ।। मारुतीपूजाराधना करी ।। ब्राम्हण सुवासिनी आराधित ।। ८६ ।। मग पूर्वपुत्रांसी भोजन ।। मिष्टान्न घालोनि आपण ।। भोजनानंतर पूर्वसदन ।। प्रवेशली परियेसा ।। ८७ ।। तैलाभ्यंग करोनि त्या दिवशीं ।। पीतांबर नेसलीसे भर्जरीसी ।। सुवर्ण मुक्ताहार सर्वांगासी ।। लेऊनि इंदिरे ऐशी शोभत ।। ८८ ।। मुखचंद्र दिसे निष्कलंक ।। वरी शोभे निशाकुंकुमांक[2] ।। कस्तूरीपत्र भंग[3] सुरेख ।। पाहोनि पुत्र हरिखती[4] ।। ८९ ।। ऐशापरी सुंदर वनिता ।। गृह सर्व अवलोकिता ।। स्वयंपाकमंदिरीं प्रवेशतां ।। उखळ मोठे देखती झाली ।। ९० ।। मग बोलावूनि पूर्वतनयांसी ।। वरी काढवी उखळासी ।। त्या खालती पाहतां घटासी ।। नवल सकळांसी वाटले ।। ९१ ।। तंव तो घट काढोनि वरती ।। शरावाशी दूर करिती ।। आधींच नासाभरण मोतीं ।। झळकूं लागती सुशोभित ।। ९२ ।। मग ती सुरम्य अंगना ।। निजहातीं नासालंकरणा ।। घेऊनी घट ओतिला जाणा ।। अपरिमित द्रव्य निघालें ।। ९३ ।। पांचासही पाचारोनी ।। पांच पुत्रांसी विभागोनी ।। समभागें भामिनी देत ।। ९४ ।। त्यावरी निज पूर्ववृतांत ।। सांगे पुत्रासी यथार्थ ।। मी तुमची माता पूर्वजन्मींची निश्चित ।। वाक्य सत्य माना माझें ।। ९५ ।। भ्रतारें द्रव्य समस्त ।। केलें होतें माझे हस्तगत ।। मी तुम्हांसी न देतां त्वरित ।। पंचत्व पावलें निर्धार ।। ९६ ।। पुत्रवंचनपाप मज घडलें ।। मग तुम्हासी दैन्य जोडलें ।। तुम्ही मजसी शापिलें ।। दारिद्र्यें पीडिलें म्हणोनी ।। ९७ ।। आतां चिदम्बर पावला ।। अर्थ तुमचा तुम्हा लाधला ।। शाप मुक्त करोनि मजला ।। आशीर्वाद

1. नथ. २. हळदकुंकू ३. भांग ४. आनंदतात.




शिवचिदम्बर

पै द्यावे ।। ९८ ।। मी पुत्रवती होईन ऐसे ।। अनुग्रह करा विशेषें ।। म्हणतां अश्रूधारा वाहतसे ।। प्रेम चित्ती दाटत ।। ९९ ।। हें सर्व देखूनि पुत्रांसी ।। मोह दाटला असमसहसी[1] ।। पाझर फुटले डोळियांसी ।। पूर्वमातेसी वंदिती ।। १०० ।। म्हणती पुत्रवती होई ।। तुझा वंश भूवरी आई ।। यावच्चंद्रार्क राहो अक्षयीं ।। आमुचें दैन्य जेणें दुरावले ।। १ ।। म्हणोनि मागुती पायां पडत ।। पूर्वजननी तयांसी उठवित ।। त्यांसि संबोखुनियां बहुत ।। निरोप मागत जावया ।। २ ।। सर्वा पुत्रां समाधान होतां ।। निघाली ती पूर्वमाता ।। आशीर्वचन देऊनि समस्तां ।। आली मागुती चिदम्बरचरणीं ।। ३ ।। वंदितां श्रीजगद्‌गुरुसी ।। कृपानिधी मग तिसी ।। देऊनि नारिकेळ दोन परियेसी ।। पुत्रवती होई म्हणती ।। ४ ।। हे वचन ऐकूनी नारी ।। स्तोत्र करितसे परोपरी ।। सर्वज्ञा दयानिधी महीवरी ।। कोण तुजपरी मायबापा ।। ५ ।। आनंदकंदा नमूं ।। चिदंरा नमूं ।। सर्वांतरा नमूं ।। एकोभावे ।। ६ ।। विज्ञानस्वंरुपा ।। दीनां मायबापा ।। चिदम्बरा कृपा ।। करीं आतां ।। ७ ।। तुजऐसा दाता ।। पूर्वार्जिता जाणता ।। कोण कृपावंता ।। आहे आतां ।। ८ ।। अनाथ दीनांचा ।। पिता होशी साचा ।। सदा मधुर वाचा ।। बोलतोसी ।। ९ ।। तुझिया मायामोहें ।। वृथा भार वाहे ।। न चुके तेणें पाहे ।। जन्ममरण ।। ११० ।। मनो वैरी साचा ।। वृथा पुत्र इच्छा ।। करितसे आमुचा ।। कळों आलें ।। ११ ।। जन्मोजन्मीं पुत्र ।। व्यालें किती तर ।। इच्छा अनावर ।। पुरली नाहीं ।। १२ ।। ताता आतां करीं ।। इतुकें नरहरी ।। माझी पूर्ण करीं ।। विषयेच्छा ।। १३ ।। आमुची पुरवीं इच्छा ।। परिस दीन वाचा ।। नाथा संसाराचा ।। ताप वारीं ।। १४ ।। येणें रीति स्तोत्र करुनि ।। मागुती नमस्कारूनी ।। लक्ष चरणीं ठेऊनि ।। जोडोनि राहिली दोनी कर ।। १५ ।। तंव बोले चिदम्बर ।। इच्छिसी तो माग वर ।। दुर्लभ जरी असे फार ।। शिवापासि मागूनि देतों ।। १६ ।। मग बोले पतिव्रता ।। वर देशी जरी मज आतां ।। तव चरणसेवा गुरुनाथा ।। देई सदोदित हेंचि मागें ।।

१. अतिशय.




शिवचिदम्बर

१७ ।। माझी असत् पुत्रवासना ।। निवारण केली दयाघना ।। कंटाळलें मी संसारभ्रमणा ।। करी उद्धरणा यांतुनी ।। १८ ।। मग चिदम्बर झाला वदत ।। आपण दोघे मम भक्त ।। इह विषयसुख भोगा समस्त ।। अंती शाश्वत पद असे तुम्हा ।। १९ ।। मग दंपती चिदंबरप्रसाद ।। स्वींकारोनि पावले परमानंद ।। मग निजसदनासी स्वच्छंद ।। निघते झाले तेधवां ।। १२० ।। दोघे पुत्र सुलक्षण ।। पावले असती दंपती जाण ।। चित्ती झाले आनंदघन ।। चिदम्बरानुग्रहें ।। २१ ।। ज्यासी जाहला अनुग्रह पूर्ण ।। झालें त्याचें दैन्यनिवारण ।। इहलोकी सुख भोगून ।। अंती वसति कैलासी ।। २२ ।। यास्तव चिदंम्बरी विश्वास धरा ।। अखंड त्याचे भजन करा ।। तुम्हा शाश्वत सुख निर्धारा ।। होईल अंगीकारा वचन माझें ।। २३ ।। पुढिले अध्यायी कथामृत ।। सर्वोत्तम असे ऐका समस्त ।। सेवितां लाधे अमरत्व निश्चित ।। सत्य म्हणे चिदम्बरकिंकर ।। २४ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ ।। श्रवण करा हो श्रोते समस्त ।। नवमोऽध्याय स्वादुतर हा ।। १२५ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे तैलिकाख्यानं नाम नवमोऽध्यायः ।। ९ ।। ओवीसंख्या १२५ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

## शुष्कवाप्यां निर्झरोत्पत्तिः




हात जोडोनि चिदम्बर। गंगा स्तविता झाला चमत्कार। तेथें निघत एक निर्झर। जानुमात्र जल आले॥

॥ श्रीचिदम्बरमहागुरवे नम : ॥ जय जया आदिपुरुषा ॥ अगोचरा अविनाशा ॥ जय श्रीकैलासाधीशा ॥ चिदम्बरेशा तुज नमो ॥ १ ॥ नमो सर्वरूपा सर्वांतरंगा ॥ त्रिमूर्तिरूपा सतीभूतवामांगा ॥ सर्वज्ञा त्रिगुणातीता अभंगा ॥ चूडामणीकृतगंगा तुज नमो ॥ २ ॥ दयाघना अनाथपालना ॥ विभूतिभूषणा भक्तजीवना ॥ पुराणपुरुषा पुण्यापघना[१] ॥ गोद्विजरक्षणां तुज नमो ॥ ३ ॥ पंकजास्या पंकजनयना ॥ पद्मपूजिता पंकजचरणा ॥ पंचवदना पंचास्यकृत्तिवसना[२] ॥ पालितदीनजना तुज नमो ॥ ४ ॥ आतां मजवरी कृपा करीं ॥ तुझी कथास्फूर्ती देईं पापहारी ॥ तुज नमितां अंतरीं ॥ आनंद भारी होतसे ॥ ५ ॥ चिदंबर असे करुणासिंधू ॥ त्याचे चरणरज जरी होती लब्धू ॥ जीवा मिळे अगाध बोधू ॥ संसारसिंधू तरुनि जाती ॥ ६ ॥ त्या चिदंबरासी नमूनि ॥ मुनी बैसला चिदंबरध्यानीं ॥ ब्राम्हण मुनीसी वंदोनी ॥ आदरोनी प्रश्न करी ॥ ७ ॥ सिद्धराजा तुझे मुखांबुजगलित ॥ पिवोनि चिदम्बरकथामृत ॥ संसारदुःखापासोनि मुक्त ॥ जाहलों सांप्रत तंव कृपें ॥ ८ ॥ तवानुग्रहें करून ॥ कृतकृत्य झालों जाण ॥ परी कथामृतपान ॥ करण्या मन धांव घेई ॥ ९ ॥ ऐकोनि ब्राम्हणवचन ॥ मुनीश बोले सुहास्यवदन ॥ कृतयुगोद्भव आपण ॥ चिदम्बरभक्त जाण खरे ॥ १० ॥ चिदंबरीं तुमची भक्ती ॥ पाहोनि हर्ष न समाये चित्तीं ॥ तुमचे भक्तिबळें गुरुमूर्ती ॥ भेटतसे वारंवार ॥ ११ ॥ हृदयीं बैसूनि चिदंबर ॥ निजकथा प्रेरितो सुंदर ॥ त्याचे प्रेरणेनुसार ॥ गुरुकथा रुचिर सांगतसे ॥ १२ ॥ आतां मन असावें कथेकडे ॥ तेणें सद्गुरु फेडी संसारसांकडें ॥ संसारसागर पैलथडे ॥ तोंचि पाववी श्रवण करितां ॥ १३ ॥ श्रौतमार्गाचार दावित ॥ मुरगोड ग्रामीं वसत ॥ तेथील देसाई दुश्चित्त ॥ निजामात्यघात[३] करूं पाहे ॥ १४ ॥ देसायाचा कारभारी ॥ लिंगप्पा नामें निर्धारी ॥ होता निर्भय अंतरीं ॥ गुरुनिकट वसतसे ॥ १५ ॥ एके दिवशीं देशनाथ ॥ लिंगोपंता बोलावूं पाठवित ॥ चिदंबर त्यासी सांगत ॥ आज निश्चिंत राही येथें ॥ १६ ॥ तंव बोले लिंगोपंत ॥

१. पुण्य शरीरा २. व्याघ्रचर्मधारी ३. आपल्या कारभाऱ्याचा घात

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

शि व चि द म्ब र

बोलावित असतां निजनाथ ।। कैसा राहूं येथें स्वस्थ ।। राजाज्ञा उल्लंघन करुनियां ।। १७ ।। जरी होय तो तुझा धनी ।। तथापि नच जावे येथूनि ।। आज्ञोल्लंघन शंका मनीं ।। किंचिन्मात्र आणूं नये ।। १८ ।। लिंगोपंत मधुरोत्तर ।। बोले मग गुरुप्रती निर्धार ।। आतांचि जाऊनि सत्वर ।। येतों निरोप देईं जगदीशा ।। १९ ।। बोलवित असतां अन्नदाता ।। कैसें राहावें तत्त्वतां ।। आज्ञा द्यावी जी समर्था ।। शीघ्र परतोनि येतों मी ।। २० ।। मग सांगे समर्थ ।। त्रिवाचा सांगतो तुज हितार्थ ।। आज न जाई बा तेथ ।। राहे येथ सुखरुपें ।। २१ ।। कालकर्मसंयोगें ।। गुरुवचन न मानितां अंतरंगें ।। लिंगोपंत उठोनि वेगें ।। दर्शना निघे रायाच्या ।। २२ ।। रायास वंदन करोनी ।। लिंगोपंत बैसतांक्षणीं ।। राव संकेत दावी नयनीं ।। दूतांलागोनि तेधवां ।। २३ ।। मग तत्काळ ते दूत ।। लिंगोपंताचा करिती घात ।। ही मात ऐकूनि दीक्षित ।। शिव शिव म्हणत उठियले ।। २४ ।। जेथें होय ब्रम्हघात ।। त्या गांवीं राहूं नये निश्चित ।। म्हणोनि निघूनि स्वजनांसहित ।। बारा वर्षें देश त्यागति ।। २५ ।। आधीं जाऊनी देवलपुरीं[1] ।। राहिले तेथे एक संवत्सरी ।। चरित्र केलें बहु विस्तारी ।। ऐका साचार सांगतों ।। २६ ।। कोंकण देशींचे ब्राम्हण ।। दोघे बंधु आले भेटीकारण ।। माध्यान्हीं करावया भोजन ।। पंक्तीमाजी बैसले ।। २७ ।। पात्रीं वाढिल्या कण्याभाकरी ।। शाक तिखट सांभारीं ।। देखोनि एक खवळला अंतरीं ।। उठोनि बोले बंधूसी ।। २८ ।। म्हणे हें असें श्वानखाद्य[2] ।। मनुष्यासी कैसें हें मेध्य[3] ।। जेवूं उत्तमान्न सद्य ।। करुनियां याच वेळीं ।। २९ ।। ब्राम्हण उठिला पाहूनि ।। चिदम्बर आले धांवूनि ।। सांगती त्या समजावूनि ।। अन्नब्रम्ह म्हणोनि श्रुती बोले ।। ३० ।। कैसेंतरी असो अन्न ।। त्याचें करू नये निंदन ।। स्वीकारावें वंदन करून ।। त्यजितां कल्याण सर्वथा नोहे ।।३१ ।। स्वामी बोधितांही तेथें ।। सोडोनी निघाला अन्नातें ।। जाऊनि मारुती देवळातें ।। सुख शयनातें पै केलें ।। ३२ ।। इकडे सर्व ब्राम्हण ।। त्याच्या ज्येष्ठ बंधूसहित जाण ।। महाप्रसाद म्हणून

१. देवलापुरास २. कुत्र्याचे खाणें ३. पवित्र

शि व चि द म्ब र

शिवचिदम्बर

।। आनंदे भोजन पै केलें ।। ३३ ।। महाप्रसाद त्यागफळें ।। उन्मादे तत्काळ गांठिलें ।। विप्र भ्रमिष्ट त्यामुळें ।। विपरीत बरळूं लागला ।। ३४ ।। कर्दमे धूळी लावूनि अंगासी ।। नाच गाणें करीं परियेसी ।। जे येती जन जवळी त्यांसी ।। दुरुत्तरें बोलून ताडण करी ।। ३५ ।। हें पाहुनी ज्येष्ठ बंधू ।। मनी अत्यंत करी खेदू ।। म्हणे अनाथनाथा दीनबंधू ।। माझा भ्राता भ्रांत झाला ।। ३६ ।। आतां यासी उपाया ।। सांग वेगीं स्वामिराया ।। अनाथ मी तुझे पायां ।। भक्तसखया शरण आलों ।। ३७ ।। ऐकोनि त्याची विनवणी ।। कृपा ऊपजे अंतःकरणीं ।। सांगे चिदम्बर त्या लागोनि ।। प्रसाद जेवितां बरे होय ।। ३८ ।। यापरी ऐकोनि गुरुवचन ।। प्रसाद आणोनि तत्क्षण ।। जेववितां बंधूसी जाण ।। जागृतपण आलें अंगी ।। ३९ ।। येणेंपरी अगाध महिमा ।। करीत असतां पूर्णकामा ।। तेथें आला नारायण नामा ।। यतीश परम तपस्वी ।। ४० ।। ब्राम्हण पुसती यतीश्वरासी ।। कोण ऐसा थोर तपस्वी परियेसी ।। त्यांचे पूर्वचरित्र आम्हांसी ।। सविस्तर सागं पा ।। ४१ ।। मग बोले मुनीश्वर ।। त्याच्वे पूर्वाख्यान असे थोर ।। सांगतों ऐकावें सादर ।। पाप होय दूर श्रवणमात्रें ।। ४२ ।। पुण्यपत्तनीं[1] वास त्याचा ।। आचार असे गृहस्थाचा ।। महातपस्वी होता साचा ।। सर्व वेदांचा अर्थ जाणे ।। ४३ ।। ऐसे असतां वर्तमानीं ।। संसारा कंटाळला तो मनीं ।। दारिद्र्यहि येतां झणीं ।।श्रीदत्तक्षेत्रा पातला ।। ४४ ।। तेथें आचरी तप दुष्कर ।। तेणें तुष्टला अत्रिकुमर[2] ।। प्रसन्न होवोनि त्यासी वर ।। देता झाला परियेसा ।। ४५ ।। त्याचिया कृपें सर्व सिद्धी ।। पूर्ववत लाधल्या त्या संन्याशा आधीं ।। त्या बळें परोपकारामधीं ।। अंतर कधी येऊ नेदी ।। ४६ ।। परोपकारविस्तारें ।। त्यासी सन्मानिती जन सारे ।। एकदां भेट दिली चिदम्बरें ।। अमरपुर क्षेत्रासी ।। ४७ ।। शरण येतां मुनीश्वर ।। पाहूनि त्याचा अधिकार ।। ब्रम्होपदेश चिदम्बर ।। करुणाकर देता झाला ।। ४८ ।। योगाग्नीनें स्वयंपाक ।। करोनि मुनीश्वरें सुरेख ।। चिदम्बराचें भोजन सम्यक ।। सकौतुकें करविलें

शिवचिदम्बर

१. पुण्यांत २. दत्त

।। ४९ ।। लोकांसि सांगे चिदम्बराचा ।। मी शिष्य असें साचा ।। चिदम्बरनामें ज्यांची पुनीत वाचा ।। जन्म त्यांचा सफळ असे ।। ५० ।। चिदम्बराचे महाभक्त ।। होते सहा विख्यात ।। ब्रम्हनिष्ठ हा पहिला त्यांत ।। ज्ञान प्रफुल्लित तयाचें ।। ५१ ।। मग घेऊनि विद्वत्संन्यास ।। केला नृसिंहक्षेत्रवास ।। निर्विकल्प समाधीस ।। स्वाधीन सहसा पै केली ।। ५२ ।। ज्याचे बोधें बहुत जन ।। ब्रम्हज्ञान पावोनि तरले जाण ।। भवसिंधू गोपदजलप्रमाण[१] ।। करोनियां मुक्त झाले ।। ५३ ।। काशीकराभिध शिष्य एक ।। होतां ज्ञाननिष्ठ सम्यक ।। त्यासवें तीर्थयात्रा अनेक ।। केल्या यतीशें महीवरी ।। ५४ ।। कलियुगीं ज्याच्या अनुग्रहें ।। स्वाभीष्ट मिळालें बहुतांसि पाहें ।। दयाळु हा दीनांचा लवलाहे ।। रोगसमूह दूर करी ।। ५५ ।। एकदां निर्जन वनीं पाहीं ।। गुरु शिष्यासहित देवालयीं ।। रात्री वस्तीसि असतां त्या ठायीं ।। व्याघ्र आले गर्जत ।। ५६ ।। शिष्य दोघे शिरले भिऊनि ।। देवालयांत द्वार बांधूनि ।। बाहेर यतीश्वर बैसले ध्यानीं ।। अंतरी भय न धरितां ।। ५७ ।। बाहेर व्याघ्र नाचती ।। कर्कश नादें गर्जती ।। द्वाररंध्रे शिष्य पाहती ।। तरी समाधिस्थिती न मोडे ।। ५८ ।। त्यांत व्यथित व्याघ्र एक ।। जया पायीं रुतलासे कटंक ।। तें पाहोनि सकृप मुनी देख ।। व्याघ्रा बोलावी निजनिकटी[२] ।। ५९ ।। जवळी घेऊनि वाघासी ।। पायींच्या कांढूनी कंटकासी ।। आंत भरिलें औषधिरसासि वर चिंधी गुंडाळिली ।। ६० ।। त्याचे पाठीवरी वेळ तीन ।। हस्त फिरवूनि पाठविला जाण ।। हे पाहोनि शिष्यजन ।। बाहेर निर्भय पातले ।। ६१ ।। नमस्कारोनि निजगुरुसी ।। स्तोत्र करती अपारेसी ।। तूं साक्षात् शंकर होशी ।। आजि आम्हासी कळों आलें ।। ६२ ।। मग शिष्यांसी संबोखुनी ।। बैसले घेऊनि सन्निधानीं ।। गोष्टी बोलतां सरली रजनी[३] ।। वासरमणी[४] उगवला ।। ६३ ।। पुढें शिष्यांसमवेत ।। निघाला तीर्थयात्रा करित ।। दुम्बळ द्विजाचे घरीं अकस्मात ।। वस्तीसी रात्रीं उतरला ।। ६४ ।। त्या ब्राम्हणाचें रोगी बाळक ।। मध्यरात्र होतां देख ।। पंचत्व पावलें निःशंक

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

१. गाईच्या पावलाच्या खळग्यातील पाण्याइतकें अल्प २. आपुलेजवळ ३. रात्र ४. सूर्य.

शि
व
चि
द
म्ब
र

|| करिती शोक आप्त सर्व || ६५ || हें देखूनि यतीश्वर || ऊच्चारोनि चिदम्बरनाम सत्वर || भस्म लावितां तो कुमर || सजीव झाला परियेसी || ६६ || राजापुरकुंडी भागीरथी || आली हे वृत्त ऐकूनि यती || जाता झाला तों भागीरथी || गुप्त झाली तत्काळ || ६७ || रिते कुंडावरी ऊभा राहोनी || श्रींचिदम्बरनाम गर्जोनी || यतीनें स्नान संकल्पितां क्षणीं || तीन्हीं कुंडांतुनी गंगा वाहे || ६८ || करूनि स्नानादि कृत्य || पुढें निघाला मुनिवर्य || येऊनि वेगें जगन्नाथालय || निर्जल ठायी जल आणिलें || ६९ || तंव स्मरले श्रीगुरुचरण || वेगें निघाला तपोधन || आला देवलपुरसन्निधान || इकडे स्वजनां सांगे दीक्षित || ७० || आज येथें येतो यतिवर्य || ज्ञानी असे तो ब्रम्हविद्वर्य[1] || त्याची भेट घ्यावया हो सभ्य || त्याच ठाया जाऊं म्हणे || ७१ || ऐसें ऐकोनि सर्व जन || वेगें निघतां दीक्षितराण || बरोबरी निघती आपण || दर्शनघेण्या यतिवराचे || ७२ || मार्गी एक कोसावरती || जाहली दोघांची भेटी निश्चिती || परस्परें नमस्कारिती || आनंदें घेती परिष्वंग[2] || ७३ || परस्पर स्तोत्र करोनि बहुवसी || मग चिदम्बरे यतिरायासी || हात धरोनी सन्मानेंसी || निजस्थानासी आणिला || ७४ || प्रेमभक्तीनें यतिपूजा || करोनियां सद्गुरुराजा || नाना पक्वान्नें करोनिया यतिकाजा || भिक्षाव्याजें[3] द्विज आराधिले || ७५ || तीन मास यतीश तेथें || राहिला चिदम्बरसांगातें || नित्य वेदान्तचर्चा वृद्धीतें || पावती जाहली उभयतांची || ७६ || एकाने सांगता वेदान्तनिरूपण || दुजा आनंदे डोलवी मान || ऐकतां होतसे उन्मन || त्या निरुपणा काय वानूं || ७७ || ज्याचें नामचि सप्रेमें || गातां तत्काळ चित्त विरमे || कामादि वैरी पळती संभ्रमें || तोचि निरूपी स्वमाहात्म्य || ७८ || मग आनंदसोहळा || कवण वानूं शके भूतळां || गंगास्मरणें होय पापधुरळा[4] || ती प्रत्यक्ष मिळतां काय सांगू || ७९ || राजसत्ता ऐकतां क्षणीं || लोक नम्र होती धाक मानोनी || स्वयें येता नृप घरालागोनी || मग नम्रपणा काय उणें || ८० || काशीयात्रार्थ संकल्प

शि
व
चि
द
म्ब
र

१. श्रेष्ठ ब्रम्हज्ञानी. २. आलिंगन ३. भिक्षेनिमित्त ४. पापनाश

शि व चि द म्ब र

।। करितांचि नर होय निष्पाप ।। कशीवासचि घडतां अमूप ।। कवण करी माप पुण्यातें ।। ८१ ।। स्मरतांचि धन्वंतरी ।। रोगनाश सत्वर करी ।। अवचित लाधतां त्याची मैत्री ।। कवण करी रोगचिंता ।। ८२ ।। असोत आळशी विकल्पी तामसी ।। तेही ऐकतां ज्याचे बोधासी ।। तत्काळ सोडूनि निजदुर्गुणांसी ।। शुद्ध सत्त्वतेसि पावती ।। ८३ ।। चहाड खादाड गडबडे ।। कित्येक होती वेडेवांकुडें ।। ती चर्चा ऐकतां निज निवाडें ।। खोड मोडोनि जडे शुद्धसत्त्व ।। ८४ ।। सभासद झाले एकाग्र ।। कोणासी न दिसे आपपर ।। सर्वांभूतीं निरंतर ।। चिदम्बर दिसूं लागे ।। ८५ ।। जगदुद्धाराकारणें ।। अवतार घेतला गिरिजारमणें ।। ऐसा निश्चय सभाजनें ।। केला निर्धार त्या दिनीं ।। ८६ ।। ऐसें असतां एके दिनीं ।। आली अर्धोदयपर्वणी ।। नदीस्नान करावया मनीं ।। इच्छा धरोनी गुरु निघाले ।। ८७ ।। त्या वेळी नारायण यती ।। बोले चिदम्बराप्रती ।। सर्व तीर्थे ज्याचे पद सेविती ।। त्यासी तीर्थी काय काज ।। ८८ ।। हेमंतऋतू शीत अपार ।। रात्रीं जाणें असे दूर ।। जनांसी होतील श्रम फार ।। चिदम्बरा आपण निघतां ।। ८९ ।। मग चिदम्बरेश्वर बोले ।। यतीशा तव चित्त ओळखिलें ।। ओखट[1] कर्में कली खेळे ।। त्या वेळीं गुप्त असावें ।। ९० ।। यानंतर इच्छिसी जरी ।। तरी पूर्वी त्वां आचरीं ।। तुजयोगें मी निर्धारीं ।। स्नान करीन निजपरिवारें ।। ९१ ।। दयानिधी यतिराज तेव्हां ।। निर्जल विहीर बाहेर गांवां ।। हाती तेथें ब्रम्हनिष्ठ पहा ।। स्नान करावें म्हणोनि आला ।। ९२ ।। त्या मार्गे श्रीदीक्षित ।। आले यात्राजनांसमवेत ।। संन्यासी प्रवेशला विहिरींत ।। पाहूनि दीक्षित स्तवी गंगें ।। ९३ ।। हात जोडूनि चिदम्बर ।। गंगा स्तवितां झाला चमत्कार ।। तेथें एक निघत निर्झर[2] ।। क्षणांत जानुमात्र[3] जल आलें ।। ९४ ।। हें पाहूनि संन्यासी ।। वर आला करुनि स्नानासी ।। नेसूनि काषाय वस्त्रासी ।। बैसला विभूती चर्चोनियां ।। ९५ ।। मग चिदम्बरें केले स्नान ।। सपरिवार जनां घेऊन ।। इतुक्यांत शुभ्रजलें पूर्ण ।। विहिरतत्क्षणीं भरियेली ।। ९६ ।। तेव्हां ब्रम्हनिष्ठ

शि व चि द म्ब र

१. खोटें २. पाण्याचा झरा ३. गुडघाभर

शि
व
चि
द
म्ब
र

यतीसी ।। जन वंदित असतां त्यासी ।। यति सांगे ही भागीरथी परियेसी ।। स्नानमात्रें ज्ञान होय ।। ९७ ।। येथें स्नान दान पिंडपातन ।। करितां अक्षय स्वर्ग जाण ।। सत्य माना माझें वचन ।। पितृगणासी लाधतसे ।। ९८ ।। यापरी सांगोनि ।। आला चिदम्बरसन्निधानी ।। गावां आले उभयतां मिळोनी ।। सवें घेऊनि सर्व जनां ।। ९९।। मग दुसरे दिवशीं ।। भिक्षेनंतर संन्यासी ।। निघाला श्रीदत्तक्षेत्रासी ।। गुरु बोळवित सर्वे चाले ।। १०० ।। चिदम्बर सांगे यतीसी ।। जातां आपण मार्गासी ।। सांगली गांवी कारागृहवासी ।। मद्भक्त त्र्यंबकात्मजा संबोखी ।। १ ।। मग नमस्कार करोनि ।। संन्याशासी बोळवूनि ।। चिदम्बर आला निजगृहा लागूनि ।। अगाध करणी दावितसे ।। २ ।। संन्यासी जाऊनि सांगलीसी ।। मार्गें सोडूनि राजसन्मानासी ।। आपण जाऊनि कारागृहासी ।। नानासी संबोखितसे ।। ३ ।। अगा नाना सोडीं भीतीसी ।। चिदम्बरपदरीं पडलासी ।। आजपासूनि सोळावे दिवशीं ।। मुक्ती पावशी बंदींतुनी ।। ४ ।। ज्या दिवशी होशी मुक्त ।। चिदम्बरभेटीं जाई त्वरित ।। उत्तमोत्तम चिदम्बरचरित ।। बुद्धीमंता वर्णन करीं ।। ५ ।। येणेंपरी संन्यासी ।। संबोखूनि चिदम्बरभक्तासी ।। करित चिदम्बरध्यान परियेसी ।। नृसिंहक्षेत्रा पातला ।। ६ ।। पुढे पंधरावे दिनीं ।। सांगली राजाचे स्वप्नीं सांगे चिदम्बर येऊनी ।। भक्तमोचन करावयां ।। ७ ।। अगा चिंतामणि आमरणांत ।। नानासि असे शिक्षा शाश्वत ।। तथापि माजी आज्ञा तुजप्रत ।। सोडावा निश्चित ऐशी असे ।। ८ ।। जरी माजे वचनासी ।। राज्यमदें अव्हेरिसी ।। तरी तुझिया जीवासी ।। हानी असे निश्च्यर्ये ।। ९ ।। तंव जागृत होवोनि चिंतामणी ।। चिदम्बराज्ञा शिरसा वंदोनी ।। प्रातःकाळी नानासी आणवूनी ।। बेडी तत्क्षणी तोडीली ।। ११० ।। शुद्ध करोनि प्रायश्चित्तें ।। निजपंक्तीत करवूनि भोजनातें ।। देऊनि वस्त्रालंकारातें ।। निरोप देत ते वेळी ।। ११ ।। तूं असशी चिदम्बरभक्त ।। तेणेचि झालासी बंदिमुक्त ।। जाई आतां चिदम्बराप्रत ।। गुरुसेवा करावया ।। १२ ।। राजासी नाना प्रार्थूनि ।। मागुती चार दिन कारासदनीं ।। राहणेसी निरोप घेऊनि ।। निजकार्य साधोनी घेतसे ।। १३ ।। करुनी गोमयाची शाई

शि
व
चि
द
म्ब
र

शिवचिदम्बर

|| चिदम्बरस्तवन पाहीं || भिंतीवरी लिहिलें तें सर्वही || लिहोनि लवलाही घेतेलें || १४ || मग राजाज्ञा घेऊनि || आला चिदम्बरसन्निधानीं || भक्तीने त्यांसी वंदोनी || बहुवशी स्तवन करीतसे || १५ || त्या दिवसापासोनि नानाराव || चिदम्बराचें दास्यत्व || अंगिकारोनि नानापरी स्तव || गुरुरायाचे करूं लागला || १६ || गद्यपद्ययमकसहित || श्रीचिदंबराचें स्तवन बहुत || करोनी श्रीस्वामीचरित || दृष्ट श्रुत वर्णिलें || १७ || याप्रमाणें चिदंबरयशोधाम || वाढत चाललें निःसीम || श्रवण करितां पापस्तोम[1] || होतसे भस्म क्षणमात्रे || १८ || चिदम्बरचरित्र रसाळ || हेंचि जाणावें अमृतफळ || सेवन करतांचि तत्काळ || अमरत्व प्राप्त होय || १९ || सुधापान करोनि निर्जर[2] || पतनभयें कांपती थरथर || तेही होऊनि श्रवणातुर || चिदंबर कथासागर ऐकती || १२० || म्हणोनि तुम्हा करितो विनंती || अवधान द्यावें श्रोते पुढती || श्रवणमात्रें दुःखे दुखंडती || म्हणे चिदंबरकिंकर || २१ || स्वस्ति श्रीचिदम्बरचरित || ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ || म्हणोनि ऐका चिदम्बरभक्त || दशमोऽध्याय स्वादुतर हा || १२२ || इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे नारायणयतिसमागमें शुष्कवाप्यां निर्झरोत्पत्तिर्नाम दशमोऽध्यायः || १० || ओवीसंख्या १२२ ||

|| श्रीचिदम्बरार्पणमस्तु ||

शिवचिदम्बर

१. पापसमुदाय २. देव

## मृतकन्यासञ्जीवनम्



देवालयीं प्रकट होवोनि। भस्म घालोनि कन्यावदनीं। कमंडलूंतील उदक सिंपोनि। कन्येसि तत्क्षणीं उठविली॥

चिदम्बरचरित्र

अध्याय अकरावा

शि
व
चि
द
म्ब
र

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। ॐनमो जगद्‌गुरु ।। करोनि आदिशक्तीचा अंगिकारू ।। करिशी सृष्टि-स्थिती-संहारू ।। परात्परू तुज नमो ।। १ ।। तुझें स्वरूप पाहतां ।। बुद्धि वृत्तीसी पडे मौनता ।। तूं असोनि सर्वगत तत्त्वतां ।। न होशी गोचर मनबुद्धीसी ।। २ ।। ज्यावरी तूं अनुग्रह करिशी ।। त्याची अहंता आधीं नाशिसी ।। मग सर्वांठायी तूंचि दिसशीं ।। रिता ठाव तुजविण न दिसे ।। ३ ।। तुज पाहावया जे इच्छिती ।। त्यांहीं करावी साधुसंगती ।। तेणें वाढे तुझी भक्ती ।। भक्तीनें पै वस्ती तुझे ठायी ।। ४ ।। म्हणूनि मजसी चिदम्बरा ।। भक्ती एक देई सर्वांतरा ।। तुझ्या पायीं नमस्कारा ।। करितों वारंवार गुरुवर्या ।। ५ ।। महामृत्यू ही ज्याचा आज्ञाधर ।। करितो भिऊनि जगी संचार ।। नेल्या जीवा सोडवी सत्वर ।। त्या चिदम्बरा नमन माझें ।। ६।। मुनीश्वर सांगे ब्राम्हणांसी ।। ज्याची कथा स्मरणमात्रेंसीं ।। सद्‌गदित कंठ होतसे बहुवशी ।। हृदय भरुनि येतसे ।। ७ ।। आनंद आंगी न मावत ।। रोमरंध्रीं बाहेर निघत ।। तेणें सर्वांग पुलकांकित[1] ।। होतसे वारंवार ।। ८ ।। अगा हे भ्रांत चित्ता ।। तूं कां जाशी विषयवनीं आतां ।। सोडी सोडी चंचलता ।। तेणे सुख लाधे तुज ।। ९ ।। किंचित् घेई समाधानता ।। चिदम्बर असे सर्वसौख्यदाता ।। आतां तुवां विषयचिंता ।। त्यजूनि गुरुनाथा आळवीं ।। १० ।। आतां ऐका हो ब्राम्हण करा चिदम्बरकथारसपान ।। श्रवणमात्रें मृत्युनाशन ।। होत असे क्षणमात्रें ।। ११ ।। गोदातीरवासी एक ब्राम्हण ।। त्याचे नांव असे बाळकृष्ण ।। कुटुंबासहित चिदम्बरचरण ।। पाहावया जाण निघाला ।। १२ ।। मुरगोड असतां पांच योजन ।। वाटेंत झाला अस्तमान ।। वस्ती तेथें करितां जाण ।। बिकट प्रसंग तया आला ।। १३ ।। त्याचें जे होतें तान्हें बाळ ।। त्यासी देवी[2] उठोनि तळमळ ।। करूं लागलें केवळ ।। होतसे आंगी बहु व्यथा ।। १४ ।। तीन दिवस येणेंपरी ।। कष्टतसे अहोरात्री ।। चौथे दिवशी पंचत्वाप्रतीं ।। बाळ निश्चिती पावले ।। १५ ।। दंपती शोक करोनि बहुत ।। बाळासी निक्षेपूनि भूमींत ।। तीन

........................

१. रोमांच उभेराहिलेले. २. अंगावर उठणारा देवीरोग.

शि
व
चि
द
म्ब
र

रात्री राहूनि तेथ ॥ सुस्नात जाहले चौथे दिनीं ॥ १६ ॥ मग चिदम्बराची घ्यावया भेटी ॥ आले होऊनि बहुत कष्टी ॥ त्यासी पाहोनि चिदम्बराचे पोटीं ॥ कृपा मोठी उपजली ॥ १७ ॥ सर्व यात्रिकांसि सारुनि मागें ॥ दंपतिचें क्षेम विचारी निजांगें ॥ तेव्हां दंपती आक्रंदत दोघे ॥ राहिले उगे अधोवदनें ॥ १८ ॥ चिदम्बर पुसे मागुती ॥ कां रुदन करता दंपती ॥ तुमच्या शोकाचें बीज मजप्रती ॥ सांगा निश्चिती प्रतिकार करूं ॥ १९ ॥ मग बोले ती गद्गदस्वर ॥ दुःखें व्यापिलें आमुचें अंतर ॥ तंव भेटीस येतां तान्हें कुमर ॥ पंचत्व पावलें परियेसा ॥ २० ॥ हें वचन ऐकोनि कृपानिधी ॥ मजसींच कां हो करितां अपराधी ॥ तुम्हीं सोडिलें शेतामधीं ॥ बाळासि व्याधी येतांचि ॥ २१ ॥ मागुती सांगे बाळकृष्ण ॥ मृत बाळासी शेतीं पुरोन ॥ आलों मी तुमचे सन्निधान ॥ अपराध जाण काय माझा ॥ २२ ॥ तंव सांगे चिदम्बर ॥ बाळ मेला नाहीं साचार ॥ सजीव झाला सत्वर ॥ वेगें कुमारासी घेऊनी येईं ॥ २३ ॥ ऐशी गुरुमुखें अमृतवाणी ॥ निघतां ब्राम्हण आनंदला मनीं ॥ म्हणे देवा तुझी करणी ॥ ब्रम्हादिकांसी झणी[1] न कळे ॥ २४ ॥ नमन करोनी चिदम्बरासी ॥ बाळकृष्ण निघाला वेगेंसी ॥ यात्राजन पाहावया चमत्कारासी ॥ निघाले बहुवसी बरोबर ॥ २५ ॥ सत्तिगेरीसी जंव द्विजेंद्र ॥ येउनि पाहे शेतीं सुंदर ॥ रांगत खेळतसे निजकुमर ॥ पाहूनि अपार आनंदला ॥ २६ ॥ घेऊनि बाळासी स्कंधीं ॥ प्रेमभरें वारंवार स्फुंदी ॥ म्हणे देवा तूंच हरि-हर-विधी ॥ तुजी सिध्दि जाणें कवण ॥ २७ ॥ स्तोत्र करित यापरी ॥ आला श्रीचिदम्बरपुरीं ॥ बाळा ठेवून पायांवरी ॥ लोटांगण घालितसे ॥ २८ ॥ म्हणे देवाधिदेवा कृपानिधी ॥ मीच असे बापा अपराधी ॥ मज ऐशी देईं बुद्धी ॥ तुझे पाय कधीं सोडूं नये ॥ २९ ॥ दिसतोसी मानववेषधारी ॥ कळा पाहता तुझी तरी ॥ ब्रम्हांड न दिसे तुजसरी ॥ भक्तकैवारी तुज नमो ॥ ३० ॥ निमिषोन्मेषें ब्रम्हांडकोटी ॥ सृजिसी[2] रक्षिसी शेवटीं ॥ सर्व घालोनियां पोटीं ॥ उरशी अंती एकला ॥ ३१ ॥ ऐसें स्तोत्र

१. केव्हांही २. उत्पन्न करतोस

करितां ब्राम्हण ।। जयजयकारें यात्राजन ।। गर्जती आनंदभरोन ।। प्रेमपाझर नेत्रीं वाहती ।। ३२ ।। चमत्कार पाहोनि जे भजती ।। त्यांसी म्हणावे मंदमती ।। अनंतरुपें असतां गिरिजापती ।। चमत्कार किती पहाल नयनीं ।। ३३ ।। सूर्यचंद्रनक्षत्रादिक अंतराळें ।। भूगोलादिक सप्तपाताळें ।। ज्याने रचिलीं इच्छाबळें ।। तो चिदम्बर चरित्र दावी ।। ३४ ।। अहो रेतबिंदू योनी प्रवेशवी ।। त्यासि शिरपादादिगात्र संभवी ।। त्यासि देहरूपें कोण उपजवी ।। आश्चर्य पहा केवढें ।। ३५ ।। आहे तें क्षणांत न दिसे ।। नसे तें क्षण एकीं प्रगट दिसे ।। मायालाघवी चिदम्बर खेळतसे ।। कोण जाणे त्याची कळा ।। ३६ ।। असो ऐशी सांगितली मात ।। चिदम्बर आम्हां तारक मंत्र ।। ऐसा निश्चय करोनि चित्त ।। भजे गुरुनाथा तोचि धन्य ।। ३७ ।। ज्यांसी इहपराची चाड ।। त्यांही संपादावी चिदम्बरजोड ।। प्रापंचिकाचा संग अवघड ।। पुढें यमदंड न चुके तेणें ।। ३८ ।। चिदम्बरमहिमा आठवितां चित्तीं ।। कथेसी पडली विसंगती ।। श्रोती करावी क्षमा चित्तीं ।। माजे बोबडे बोल परिसावें ।। ३९ ।। जो असे आनंदमूर्ती ।। त्याचे सन्निध जे संचरती ।। त्याचें चित्तीं आनंदभरती ।। सांगू केउती म्हणोनिया ।। ४० ।। ऐसा होता सर्वांसी आनंद ।। ब्राम्हणासी वर देऊनि स्वच्छंद ।। जनाचे छेदावया भवबंध ।। आनंदकंद चरित्र दावि ।। ४१ ।। वर लाधोनि बाळकृष्ण ।। चिदम्बराची आज्ञा घेऊन ।। निघोनि पातला निजस्थान ।। चिदम्बरकीर्ती प्रकट करीत ।। ४२ ।। ब्राम्हणासी म्हणे मुनीश्वर ।। चिदम्बरचरित असे थोर ।। जे ऐकती होऊनि तत्पर ।। त्यांचें पाप दुरावेल ।। ४३ ।। आणिक एक महिमान ।। तुम्हां सांगावया कारण ।। हेंचि मुख्य असे जाण ।। दृढ विश्वासें कार्य साधे ।। ४४ ।। मग चिदम्बर तेथूनि निघत ।। यात्रांजनासमवेत ।। आले कुंदगोळपुरप्रत ।। तेथील चरित तें ऐका ।। ४५ ।। भेंडिवाड नगरपिता ।। होता एक देसाई जाणता ।। आला चिदम्बरभेटीकरितां ।। पदीं वंदूनि विनवितसे ।। ४६ ।। श्रीचिदम्बरा गुरुनाथा ।। मज वंशाभिवृद्धीकरितां ।। पुत्र एक देई जगन्नाथा ।। तुझा आज्ञांकित मी असे ।। ४७ ।। मग हासत बोले श्रीनटेश ।। माझ्या वचनीं जरी विश्वास ।। तरी करी




शिवचिदस्वर

सांगितल्यापरीस ।। तुझे वंशास वृद्धी असे ।। ४८ ।। मग देसाई करी प्रतिज्ञा शिरसामान्य तुझी आज्ञा ।। तुझे वचनापरी चालतों प्राज्ञा ।। मग सर्वज्ञ बोलतसे ।। ४९ ।। आधीं होईल कन्या रत्न ।। तिचा विवाह मम आज्ञेप्रमाण ।। जरी करूनि देशील तूं जाण ।। पावसि मग पुत्ररत्ना ।। ५० ।। तथास्तु म्हणोनि देसाई ।। गेला निजग्रामा पाहीं ।। एक संवत्सरांत कन्याही ।। रुपवती उपजली ।। ५१ ।। इकडे चिदम्बर अनवरत[1] ।। भक्तांची इच्छा पुरवित ।। असतां एक रामनामांकित ।। गुरुदर्शनार्थ विप्र आला ।। ५२ ।। तो येऊनि नमस्कारित ।। चिदंबर पुसे तया हंसत ।। विवाह करूं घ्यावया इच्छित ।। होउनि येथ आलासि कीं ।। ५३ ।। मग बोले रामनामा ।। नसतां द्रव्य आप्त धाम आम्हां ।। कन्या कोण देईल आनंदधामा ।। शक्त आपण दीनरक्षणीं ।। ५४ ।। हें वचन ऐकोनि गुरुनाथ ।। सांगे रामासी स्वहित ।। भेंडिवाड[2] देसायाप्रात ।। जाईं त्वरित तुवां आतां ।। ५५ ।। माझें नांव सांगोनि ।। कन्या माग जाईं येथूनि ।। राम मग गुरुचरणीं ।। विनवणी करितसे ।। ५६ ।। शिरोमान्य तुझी आज्ञा ।। जातो मागावया कन्या ।। कार्यसिद्धी नेईं धन्या ।। गुरुराया चिदंबरा ।। ५७ ।। राम वंदूनि श्रीगुरुसी ।। जैसी चिदम्बराची आज्ञा तैसी ।। जाऊनि सांगे देसायासी ।। ऐकोनि देसाई क्रोधावला ।। ५८ ।। रामासि बहू निर्भर्त्सूनि ।। गुरुवचनासी धिक्कारुनि ।। बाहेर घालितां परतोनि ।। गुरुसन्निधानीं पातला ।। ५९ ।। रामें सांगतां वृत्तांत ।। वदतसे तया जगन्नाथ ।। रामा तुंवा स्वहितार्थ ।। जाऊनि तेथेंचि वसावे ।। ६० ।। देसाई तुज निश्चियें ।। कन्या देईल बा पाहे ।। तुझा विवाह होतो निःसंशयें ।। बाळा राहें तुवां तेथें ।। ६१ ।। गुरुवचनीं धरोनि विश्वास ।। जाऊनि राहे भेंडिवाडास ।। मधुकरीनें उदरपूर्तीस ।। आपणातें करीतसे ।। ६२ ।। देसाई मतीं चिंतन करी ।। माजे वैभवा न मानितां चिदंबरीं ।। जांवई पाठविला दरिद्री ।। तयाजवळी कां जावें ।। ६३ ।। गुरुवचनी जों अविश्वासी ।। त्रिभुवनीं सुख नसे त्यासी ।। मग स्वमतें विचारी वरासी ।।

१. सर्वकाळ २. भंडिवाड (हुबळीजवळचे एक खेडे)

शि
व
चि
द
म्ब
र

स्ववैभवेंसी जो सम ।। ६४ ।। वरनिश्चय करोनि विवाहाचा ।। समारंभ आरंभिला साचा ।। नेम करुनि पुण्याहाचा ।। घातलासे मंडप ।। ६५ ।। लग्नासि आले वऱ्हाडी ।। जनांची झाली बहुत गर्दी ।। सीमांतपूजा करावया रोकडी ।। निघाला वाद्ये वाजवित ।। ६६ ।। करूनि सीमांतपूजन ।। येऊनि निजसदना आपण ।। दुसरे दिवशीं देवकस्थापन ।। करितां नवल वर्तलें ।। ६७ ।। एकाएकीं कन्येसी ।। ज्वर आला असमसहसी[1] ।। बरळुं लागली बहुवशी ।। झाली निश्चेष्टित क्षणामाजी ।। ६८ ।। औषधोपाय मंत्रतंत्र ।। देसायानें केले स्वतंत्र ।। सर्वही झाले व्यर्थ ।। कन्या परतंत्र पै पडली ।। ६९ ।। मग पाचारोनि ज्योतिषीजन ।। देसाई विचारितसे प्रश्न ।। तंव ते सांगती पाहोनि लग्न ।। ऐक नाथा सावधपणें ।। ७० ।। नसे कन्येसी रोगबंध ।। नसे ग्रह भूत समंध ।। एक दिसतसे अगाध ।। क्षोभ विशद महापुरुषाचा ।। ७१ ।। ऐसा प्रश्न ऐकोनि पाहीं ।। मनीं दचकला देसाई ।। मग पडोनि ब्राम्हणांचे पायीं ।। वृतांत सर्वही सांगतसे ।। ७२ ।। ऐकोनि ज्योतिषी बोलती ।। देसायाचें भय न धरितां चित्तीं ।। ऐसे तरी तुजप्रती ।। पुढें गती बरी न दिसे ।। ७३ ।। होईल तमोमय वासरमणी[2] ।। घटामाजी मावेल धरणी ।। शीतळ होईल अग्नी ।। परी गुरुवाणी मिथ्या नोहे ।। ७४ ।। तळहातीं लागेल वृक्ष ।। रजोगुणियां लाधेल मोक्ष ।। मनुष्यांसी उपजतील पक्ष[3] ।। मिथ्या नोहे दीक्षितवाणी ।। ७५ ।। आतां तुवां इतुकें करी ।। मनीं शंका काहीं न धरीं ।। यानंतर गुर्वाज्ञा ज्यापरी ।। तैसें वर्तावें देशनाथा ।। ७६ ।। यापरी परिसोनि ज्योतिषीवाणी ।। देसाई भिवोनि अंतःकरणीं ।। रामासि कन्या देतों म्हणोनी ।। सोडित पाणी द्विजांपुढें ।। ७७ ।। संकल्प ऐकोनि वऱ्हाडी ।। गेले निजस्थाना लवडसंवडी[4] ।। तुटली देसायाची साकडी ।। कन्या सावध झाली पै ।। ७८ ।। लग्न आरंभितां देसाईपत्नी ।। निश्चय करीतसे निजमनीं ।। कन्या असे अशक्तपणी ।। पुढिल्या संवत्सरीं लग्न करुं ।। ७९ ।। ऐसे सांगूनि निजवल्लभासी ।। लग्न मोडिलें तत्काळेसी ।। काहीं मास लोटतां एकांतेसी

१. अतिशय २. सूर्य ३. पंख ४. दुर्मुखलेले.

शि
व
चि
द
म्ब
र

शिवचिदम्बर

।। निजपुरुषासी बोधितसे ।। ८० ।। एक कन्या तुमचे कुशीं ।। तिसी देतां दरिद्यासी ।। यापरिस लोटा विहिरीसी ।। सुख मजसीं तेणें होय ।। ८१ ।। दैवें कन्येसी आला ज्वर ।। ज्योतिषी सांगती स्वहितानुसार ।। त्यांसी दीक्षिताचा आश्रय थोर ।। तैसेंचि निर्धार तुम्हां वाटे ।। ८२ ।। काय करील दीक्षित ।। त्याचे नव्हे आपण आज्ञांकित ।। लग्न आरंभावें निश्चित ।। श्रीमंत वर योजून ।। ८३ ।। देसाई सांगे कांतेसी ।। बहुतांपरी स्वहितासी ।। काही केलिया तिचे मानसीं ।। नये रामासी कन्यादान ।। ८४ ।। देसाई राखे स्त्रीची भीड ।। तेणें न लागे गुरुवचन गोड ।। तत्काळ दुजे योजिलें वऱ्हाड ।। वैभवें स्वसमान पाहूनि ।। ८५ ।। स्त्रीवचन अयशस्कर ।। तेणें चुकतसे इहपर ।। ते न ऐकती जाणते नर ।। तारक सर्वत्र गुरुवचन ।। ८६ ।। गुरुवचनें इहपर जोडे ।। भावी अनर्थही मोडे ।। भक्ति ज्ञान-वैराग्य घडे ।। गुर्वचनीं सुख असे ।। ८७ ।। असो देसाई निजवैभवें ।। समारंभें लग्न मांडी पाहे ।। वऱ्हाडी आले बहु वैभवें ।। मंगल वाद्यें वाजवित ।। ८८ ।। दोन्ही पक्ष वेचिती द्रव्य फार ।। देवकप्रतिष्ठा केली साचार ।। अन्नदान दक्षिणा अपार ।। देऊनि विप्र तोषविले ।। ८९ ।। वर आणिला निजगृहासी ।। ब्राम्हण मिळाले बहुवसी ।। कन्या पूजोनि गौरीहरासी ।। लग्नमंडपासी पैं आली ।। ९० ।। ब्राम्हण धरोनि अंतःपट ।। मंगलाष्टकें म्हणती स्पष्ट ।। मंत्राक्षता टाकितां नीट ।। लग्नघटिका निकट आली ।। ९१ ।। सावधान शब्द ऐकोनी ।। राम दचकला मनीं ।। चिदंबरा तुझी करणी ।। येथें झणी[1] खुंटली ।। ९२ ।। स्मर्तृगामी चिदंबर ।। इतुक्यांत दावितसे चमत्कार ।। अक्षतां पडतां शिरावर ।। कन्या थरथर कांपतसे ।। ९३ ।। तत्काळ पडली धरणीं ।। हस्त-पाय-धड बडवोनी ।। निश्चेष्ट झाली तेचि क्षणीं ।। ऊर्ध्वश्वास लागला ।। ९४ ।। लोक करिती हाहाकार ।। कन्येसी भरला प्रज्वर ।। सावध करिती अपार ।। मातापिता गडबडोनी ।। ९५ ।। कांही केलिया शुद्धीवर ।। कन्या नयेचि निर्धार ।। शोक करिती नारीनर ।। उभय कुळे अपरिमित ।। ९६ ।। तीन मुहूर्त गेले या रीती

शिवचिदम्बर

........................

१. सर्वतोंपरी.

शि व चि द म्ब र

|| बहुत उपाय लोक करिती || गुरु कृपा नव्हतां निश्चिती || सर्व होती निरर्थक || ९७ || मग देसाई पुसे ब्राम्हणांसी || काय झालें मम कन्येसी || प्रश्न सांगावा निश्चयेसी || म्हणोनी बहुवसी विनवितसे || ९८ || मग सांगती ब्राम्हण || अगा अविश्वासिया जाण || आपुलें नासिक छेदून || दुजिया अपशकुन करिसी तूं || ९९ || विश्वास असतां गुरुवचनी || कल्याण होईल तुजलागोनी || विश्वास नसे ज्याचे मनीं || त्यासी कवण काय करी || १०० || चिदम्बरस्वामीची वाणी || काय म्हणोनि समजलासी मनीं || सूर्य होईल शीतल झणी || गुरुवाणी मिथ्या नोहे || १ || मग प्रतिज्ञा करी देशनाथ || कन्या व्हावी जी जागृत || रामासीच देतों निश्चित || शपथ जाण सर्व देवांची || २ || याच मंडपीं कन्यादान || रामासी करूनि देतों जाण || म्हणोनि आठवी चिदम्बर चरण || कन्या सावधान व्हावया || ३ || संकल्पानंतर गेला एक याम[1] || तथापि कन्येसि नसे विश्राम || तंव म्हणे रामासी विनवून || कन्या मम स्वीकारीं || ४ || तंव राम कन्येसी पाहत || ऊर्ध्व श्वास लागला बहुत || स्वीकार करुं नये ऐसे मनांत || येतां गुरुनाथ बोधितसे || ५ || कन्या स्वींकारोनि बाळा || जाई बा तव निजस्थळा || माजें वचन बा तुजला || अमृतफळासम होईल || ६ || रामासीच होउनी प्रत्यक्ष || कोणासी न दिसतां समक्ष || तत्काळ पावला अंतर्धान साक्ष || भक्तरक्षक स्वामिराज || ७ || हा पाहुनी चमत्कार || कन्येचा करूनी स्वीकार || राम निघाला सत्वर || मारुतिमंदिरा त्या वेळीं || ८ || तेथें कन्येसी निजवुनी || आपण बैसला चिदंबरध्यानीं || मध्यरात्र होतांक्षणी || कन्या पंचत्व पावली || ९ || पाहतां शोक दाटला बहुत || कंठ झाला सद्‌गदित || अश्रुधारा नेत्रीं वाहत || धावा करीं गुरुचा || ११० || हरा मृत्युंजया शंकरा || दयासागरा चिदंबरा || या समयीं मज कोण नसे पामरा || धांव सत्वरा दयानिधे || ११ || सत्यव्रता तुझी कीर्ती || जाउनी भरली त्रिजगतीं || मृत्युंजया मज दीनाप्रती || कठिणमती कां झालासी || १२ || माझे कल्याणाकरितां || किती दाविलीसी स्वसत्ता || आतां

.........................

१. तीन तास

शि व चि द म्ब र

शि
व
चि
द
म्ब
र

काहो कृपावंता ।। कठिणचित्तता स्विकारिसी ।। १३ ।। तुजवरी ठेवुनी विश्वास ।। सर्वेशा येथें केला वास ।। काय माझ्या अपराधास ।। पाहोनि मला मोकलिसी ।। १४ ।। जैसे कन्येचे प्राण नेसी ।। तैसाच नेई तव पदा मजसी ।। येथ राहुनी तव अपकीर्तीसी ।। ऐकावयासी भय वाटे ।। १५ ।। अघटितघटना चंद्रशेखरा ।। जगदुद्धारा श्रीचिदम्बरा ।। येऊं दे तुज करुणा परात्परा ।। धांव सत्वर कृपानिधे ।। १६ ।। येर्णेपरी धांवा करित ।। चिदम्बरा ऐसे गर्जत ।। बैसला उच्चस्वरें रुदत ।। पावला इतुक्यांत कृपानिधी ।। १७ ।। देवालयीं प्रगट होवोनी ।। भस्म घालोनि कन्यावदनीं ।। कमंडलूतींल उदक प्रोक्षोनी ।। कन्येसि तत्काळीं उठविली ।। १८ ।। तंव कन्या बैसली उठोनी ।। राम पाहे जंव नेत्र उघडोनी ।। उभा असे कलशपाणी ।। आनंदें चरणीं वंदितसे ।। १९ ।। आनंदजळें अंघ्रि क्षाळी ।। हात जोडोनि विनवी वेळोवेळीं ।। मस्तकीं स्वीकारी पायधुळी ।। दीनासी सांभाळी दयाळा ।। १२० ।। दीक्षित मग रामासी ।। सांत्वन करोनि बोले हर्षी ।। प्रातःकाळीं घेउनी कन्येसी ।। कुंदगोळासी येईं वेगीं ।। २१ ।। महोत्सवें तव विवाहा ।। करवीन निश्चयें पहा ।। ऐसे स्वामीनें सांगुनी तेव्हां ।। पावले अंतर्धानं ।। २२ ।। चिदम्बराज्ञेप्रमाणें ।। कुदंगोळीं पातला कन्या घेऊन ।। तंव तया स्वामी म्हणे ।। विवाह करणें उद्या तुझा ।। २३ ।। मग बोलावुनी देसायासी ।। लग्न आरंभवी वैभवेंसी ।। गुरु स्वीकारी वरपक्षासी ।। राजवैभवासी समवेत ।। २४ ।। चिदम्बराचे थोर परिवार ।। देसाई पाहुनी साचार ।। एक दिनही करावया सत्कार ।। असमर्थ असे जाहला ।। २५ ।। तंव बोले श्रीगुरुनाथ ।। ऐक देशनाथा माझी मात ।। माझे भिडेस्तव जामात ।। तुजसी समान न मिळे ।। २६ ।। माझें वाक्याचे सत्यतेसाठीं ।। पडली दीन जामाताची गांठी ।। म्हणूनि होतोसी कां कष्टी ।। सांग गुजगोष्टी काय तुझी ।। २७ ।। हें वचन ऐकोनि देशनाथ ।। चित्तीं होउन अत्यंत लज्जित ।। अपराधाची क्षमा मागत ।। राहिला दंडवत करोनियां ।। २८ ।। स्वामींनीं अभय वचन ।। देशनाथासी देऊन ।। उभय पक्षांचा समारंभ आपण ।। करितसे जाण महोत्सवें ।। २९ ।। यापरी लग्नसोहळा ।। स्वामीनें करुनी

शि
व
चि
द
म्ब
र

देशनाथाला ।। देतसें नारीकेळ फळा ।। आशीर्वचन बोलोनिया ।। १३० ।। मग आज्ञा घेउनी देशनाथ ।। गेला निजपरिवारासहित ।। पुढें तयासी झाला एक सुत ।। गुणवंत उपजला ।। ३१ ।। यापरि चिदम्बरचरित ।। स्मरणमात्रें भय संहारित ।। ज्यांसी करणे असे स्वहित ।। त्यांनीं चिदम्बर भजावा ।। ३२ ।। अद्यापि चिदम्बर दीक्षित ।। सर्वां ठायीं असे जागृत ।। चिदम्बरकिंकर सर्वां विनवित ।। विश्वास धरा चिदम्बरीं ।। ३३ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्‌गुरुनाथ ।। श्रवण करा हो भाविक समस्त ।। एकादशोऽध्याय गोड हा ।। १३४ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे मृतकन्यासञ्जीवनं नाम एकादशोऽध्यायः ।। ११ ।। ओवीसंख्या ।। १३४ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

शिव चिदम्बर

शिव चिदम्बर

# खलानिग्रहपूर्वकसदनुग्रहः




हतशेष रत्नाकरदळभार । दशदिशा सत्वर पळाला ॥ धोंडोपंते भाला घेवोनि त्वरित । वेगे शत्रुहृदयी मारिला ॥

चिदम्बरचरित्र

अध्याय बारावा

|| श्रीचिदम्बरमहागुरवे नमः || ॐनमोजी भयमोचना || चिदंबरा करुणाघना || भवभयें भिउनी गुरुराणा || आलों शरण तुजलागीं || १ || कर्मबळें तुज सोडोनी || एकाएकी शिरलों प्रपंचवनीं || दारासुतादि श्वापदप्राणी || मज आडरानीं पळविती || २ || भिऊनि पळतां सैरावैरा || मोहखळगा लागला पुरा || त्यांत पडोनि जाहलों वेडा || वेगीं काढीं गुरुराया || ३ || त्यांतुनीं उठोनी हळूहळू || पुढें जातां जी दयाळु || मदगज उचलोनि सोंड सबळू || मजला वेगें गिंळू पाहे || ४ || त्यांतुनी चुकतां अवचित || धनपिशाचें गांठोनि अद्‌भुत || भ्रमवी सोडवीं माते कनुवाळा || ५ || अहर्गण[1] हे तस्कर मोठे || पूर्वपुण्याचे जे असे साठे || आयुर्धन नेती उदयास्तवाटे || तरी विषयीं न विटे मन माझें || ६ || काळसर्प तोंड पसरोनि पुढें || मज गिळावया येतसे पडिपाडें || रोगफूत्कार धडपुडें || सोडी रोकडा अंधाशीं || ७ || मार्ग न दिसे मागें पुढें || भिऊनि पळतां झालों वेडें || माझे कर्म न दिसे कुडे || चिदम्बरा कडेपार करीं || ८ || तुजविण मज नसे गती || तुजसी करितों मी विनंती || दूर करीं माझी भय खंती || मागणें तुजप्रती इतुकेंची || ९ || कामभय सर्वविध्वंसक || चिदंबरस्मरणमात्रें देख || सर्वभय दूर करोनि हरिख || अंतरी निष्टंक[2] दीधला || १० || जो शंकर कैलासाहुनी || निजभक्तांसी सर्वे घेउनी || खेळे भूवरी अवतरोनी || त्या चिदम्बरचरणीं नमन असो || ११ || मुनीश्वर म्हणे ब्राम्हणांसी || चिदंबरकथा परियेसी || ऐकतां आनंद मानसी || अहर्निशीं वाढतसे || १२ || यानंतर भूमिदेवा[3] || करोनि एकाग्र भावा || चिदंबरमहिमा ऐकावा || तेणें सर्व दुःख दूर होय || १३ || एकदां तीनही मठांचे यतीश्वर || करित असतां देशसंचार || हुब्बळ्ळीपुरासी सहपरिवार || येउनीयां राहिले || १४ || तेथुनी बाहेर जावया || बरोबर असतां सर्व सैन्य || मनीं वाटे तयां चोरभर || गुरुपाय आठवित बैसले || १५ || मुनीसी द्विज पुसती || चोर कोण ते यतिधनार्थी || तें चरित्र आम्हांप्रती || सांगोनि शंका निवारीं || १६ || मुनी म्हणे ऐकाहो

........................

१. दिवसरात्र २. समाधान ३. ब्राम्हणा.

शिवचिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

ब्राम्हण ।। करवीरनृपाचा अमात्य जाण ।। त्याचें रत्नाकर नामाभिधान ।। समागमें सैन्य घेउनी आला ।। १७ ।। तों स्वामींचें ऐश्वर्य पाहोनी ।। सर्वस्वातें हरूं म्हणोनी ।। अत्यंत उतावळा होवोनि ।। चमूनें[1] शहर वेढिलें ।। १८ ।। हे पाहोनि यतित्रय ।। चित्तीं पावोनि महाभय ।। प्रतिकारार्थ होवोनि निरुपाय ।। स्वामिपाय स्मरत बैसले ।। १९ ।। स्मरद्‌भयसंहारक ।। चिदम्बर यतीसन्मुख ।। तत्काळ प्रगट झाला देख ।। पाहोनि यतीश्वर तुष्टले ।। २० ।। सत्कार करोनि चिदम्बरासी ।। निजव्यसन सांगती विनयेसी ।। चिदम्बर सांगे अभय वचनासी ।। यतित्रयासी ते वेळीं ।। २१ ।। शंकर असे समर्थ ।। स्मरणमात्रें भय जात ।। निवारण करील भय निश्चित ।। सोडावी चिंता आपण ।। २२ ।। इतुक्यांत रत्नाकराची सेना ।। मठांत आली गर्जत जाणा ।। तंव चिदम्बर पाहोनि त्यांना ।। राहिला उठोन त्यां सन्मुख ।। २३ ।। चिदम्बरासी पाहतां क्षणीं ।। भय उपजलें सैनिकांचे मनी ।। तत्काळ माघारे परतुनी ।। बोलती भिवोनि निजनाथा ।। २४ ।। तेथें असे चिदम्बर ।। त्यासी पाहतां भय थोर ।। उपजलें आम्हांसी निर्धार ।। माघारे आलों आम्ही पै ।। २५ ।। ऐसें ऐकुनी रत्नाकर ।। भिऊनि सोपायनकर[2] ।। भेटीसि आला सत्वर ।। त्यासी पाहोनि चिदम्बर बोले ।। २६ ।। अगा रत्नाकरा तूं जाईं ।। यतीश्वरांसी भेटुनी येईं ।। तयांचा समाचार सोडूनी पाहीं ।। का आलासी मज जवळीं ।। २७ ।। गुरुवाणी व्याजस्तुतियुक्त[3] ।। ऐकतांचि होवोनि लज्जित ।। उभा राहोनि नमस्कारित ।। म्हणे क्षमा करीं बापा ।। २८ ।। कृपानिधी त्यासी म्हणे ।। जरी अपराध क्षमा करणें ।। तरी यतीश्वरांना बोलविणें ।। निर्भयपणें स्वस्थानीं ।। २९ ।। ऐकुनी असे गुरुवचन । तत्क्षणी तथास्तु म्हणोन ।। यतीश्वरांचे करीत रक्षण । बोलविता झाला स्वस्थानी ।। ३० ।। निरोप घेउनी स्वामीचा ।। ज्या ठायी नसे वास श्रीगुरुचा ।। त्या देशस्थ जनांचा ।। सर्व वैभव हरुं लागे ।। ३१ ।। इकडे गोखले धोंडू नामक ।। गृहस्थ आला दर्शना देख ।। त्यासी पाहुनी देवनायक ।। बोले

शि
व
चि
द
म्ब
र

१. सैन्यानें २. हातांत भेट घेऊन ३. निंदागर्भित

शि व चि द म्ब र

कौतुके परियेसा ॥ ३२ ॥ येईं गा सत्वर कुंभसुता ॥ रत्नाकरा पान करी बलवंता ॥ बाजिराजाचे भेटीसि तत्त्वतां ॥ जाई आतां निरोपू तुज ॥ ३३ ॥ महाप्रसाद म्हणोनि निघाला ॥ जाउनी चक्रवर्तीसि भेटला ॥ तेणे तत्काळ तयासि दीधला ॥ संतोषें आपुला सेनाधिकार ॥ ३४ ॥ इकडे चिदम्बर रत्नाकरासी ॥ सांगुनी धाडी हितोपदेशीं ॥ स्वहितार्थ सोडीं दुर्गुणासी ॥ नातरी पावशी यमपंथ[१] ॥ ३५ ॥ ऐकुनी चिदम्बराची मात ॥ बोले होउनी उन्मत्त ॥ मजशीं भिडावया समर्थ ॥ भूतळांत कोण असे ॥ ३६ ॥ हा असे भिक्षुक सत्य ॥ माझा घात करावया असमर्थ ॥ ऐसे म्हणतां धोंडोपंत ॥ सैन्यासहित पातला ॥ ३७ ॥ सर्वे घेऊनी बहुशूर ॥ हत्ती घोडे पायदळ अपार ॥ रत्नाकर शिक्षेसी निर्धार ॥ पातला करवीरपुराजवळी[२] ॥ ३८ ॥ रत्नाकर घेउनी स्वसैन्यासी ॥ गांवाबाहेर राहिला परियेसी ॥ शत्रुसैन्य पाहोनि खवळला मानसीं ॥ मग युद्धा आरंभ करी ॥ ३९ ॥ क्षणामाजी रणांगण ॥ दिसूं लागलें भयंकर जाण ॥ हत झाले उभय सेनाजन ॥ ऐसे तुंबळ युद्ध झाले ॥ ४० ॥ तंव रत्नाकर खड्ग घेउनी हातीं ॥ सत्राणें[३] मारी धोंडोपंतासी ॥ तों तो घात चुकवोनि मागुती ॥ स्वकौशल्यें मारी रत्नाकर ॥ ४१ ॥ रत्नाकरे मंडलाकारें ॥ धोंडूचीं खंडिली सर्व शस्त्रें ॥ सर्वेचि नादे गर्जती वीर ॥ धोंडू हतवीर्य जाहला ॥ ४२ ॥ तंव धोंडू हस्तलाघव दावित ॥ चर्म[४] निस्त्रिंश[५] हाती घेत ॥ रत्नाकराचा एक भुज क्षणांत ॥ तोंडोनि टाकी अवेनीवरी ॥ ४३ ॥ तंव अंगी वाहे रक्तप्रवाह ॥ तेणें तो शूर न पावतां मोह ॥ वाम करें भल्ल घेऊनी अहह ॥ मत्त करीऐसा[६] धाविन्नला ॥ ४४ ॥ इतुक्यांत धोडोंपंत ॥ आपणही भाला घेउनी त्वरित ॥ चित्ती चिदम्बर आठवित ॥ वेगें शत्रुहृदयी मारिला ॥ ४५ ॥ हृदय फुटोनि रत्नाकर ॥ तत्काळ पडला अवनीवर ॥ हतशेष रत्नाकर दळभार ॥ दश दिशा सत्वर पळाला ॥ ४६ ॥ धोंडूनें त्याचें सर्व द्रव्य ॥ स्वीकारोनि पहावया गुरुपाय ॥ आला सर्वे घेउनी निजसैन्य ॥ वंदुनी निर्भय वृत सांगे ॥ ४७ ॥

१. मरण २. कोल्हापूर ३. खूप जोरानें ४. ढाल ५. खड्ग ६. हत्ती.

शि व चि द म्ब र

शत्रू-कंटकहारीसीं ।। चिदम्बर बोले करुणेसी ।। स्वस्थानी राहुनी धर्मासी ।। गोविप्रांसी सांभाळीं ।। ४८ ।। ऐसें सांगुनी नारीकेळ ।। हातीं घेउनी तत्काळ ।। हा प्रसाद घेउनी दुर्मिळ ।। जाईं स्वस्थाना ऐसें वदें ।। ४९ ।। यापरी परिसोनि गुरुवचन ।। धोंडू बोले सुहास्यवदन ।। स्वामी मी जेथें जाईन ।। तेथें व्हावा मज विजय ।। ५० ।। तरीच प्रसाद स्वीकार ।। करीन मी निर्धार ।। ऐसें वचन ऐकतां चिदम्बर ।। निजनिर्धार सांगतसे ।। ५१ ।। फळस्वीकार आधीं करीं ।। जरी तुजवरी स्वयें येईल वैरी ।। तरी विजय होईल निर्धारी ।। सत्य अंतरीं जाण पां ।। ५२ ।। स्वामी तैसी मज इच्छा नाहीं ।। माझें मनोगत ओळखोन पाहीं ।। व्हावा अनुग्रह या समयीं ।। दुजें कांही मागणें नसे ।। ५३ ।। ऐसी करोनि विनंती ।। धोंडू मनोराज्य करीत चित्तीं ।। उगा राहतां स्वामीपुढती ।। पाचारित तद्वंधु गोपाळासी ।। ५४ ।। धोंडूपंताचें प्रसादफळ ।। तुजसी देतों सोज्वळ ।। तो म्हणे जवळीं असतां वडील ।। ने घें मी फळ स्वामिराया।। ५५ ।। मग धोंडूपुत्र बापूसी ।। बोलावूनी सांगे विश्वासेसी ।। प्रसादफळ देतों तुजसी ।। आनंदे स्वीकार करीं ।। ५६ ।। घे म्हणतां उठोनि सत्वर ।। केला गुर्वनुग्रहाचा स्वीकार ।। बलगर्वित दोघे नमस्कार ।। करोनि निजपुरा पैं गेले ।। ५७ ।। महा बलाढ्यधोडोपंत ।। अविचारें धरिला आड पंथ ।। त्यानें पीडित लोक समस्त ।। येऊनी दीक्षिता कळविती ।। ५८ ।। जनांची दैन्य वाणी ।। परिसोनि बोले आजानुपाणी ।। भयकृद्भयनाशन शूलपाणी ।। तुम्हां रक्षील भिऊं नका ।। ५९ ।। यापरी सर्व जनांसी ।। समाधान करुनी मंदिरासी ।। पाठवी तंव दक्षिण देशवासी ।। आला स्वामिपाशीं शूद्र एक ।। ६० ।। धोंडी असे त्याचे अभिधान ।। महाद्वारी करोनि नमन ।। एक पदीं उभा राहिला जाण ।। चिदम्बरनाम गर्जत ।। ६१ ।। अहोरात्र दिवस तीन ।। शीतोष्ण सहन करून ।। उपवास सोसूनि जाण ।। उभा राहिला एकोभावें ।। ६२ ।। त्याची निष्ठा पाहुनी भक्तलोक ।। सांगताती गुरुसी कौतुक ।। हिरण्यकश्यपू ऐसे देख ।। शूद्रें उग्र तप आरंभिलें ।। ६३ ।। त्यासी सांगें चिदम्बर ।। त्याची निष्ठा असे दुर्धर ।। सर्पांसी जरी दीधलें क्षीर ।। विष निर्धार होतसे ।। ६४ ।। कडुलिंब



शिव चिदम्बर

पंचामृतें वाढविला ।। तरी न धरी गोड फळाला ।। त्यापरी अनुग्रह करणें याला ।। परपीडेला कारण होय ।। ६५ ।। ऐसें म्हणोनि गुरुनाथ ।। बाहेर आले मंदहसित ।। तेंव्हा धोंडी गुरुसि दंडवत ।। घाली निश्चित सप्रेमें ।। ६६ ।। त्यासी उठवोनि बोले जगदंतरंग ।। मी जाणतो तुझें अंतरंग ।। अनुग्रह फळ घेईंगा अभंग ।। धर्म चांग आचरीं बा ।। ६७ ।। करावें दीनांचे रक्षण ।। त्याच परी गोविप्रांचे पालन ।। जरी करिसी ब्राम्हणांचा अपमान ।। होईल तुझी प्राणहानी ।। ६८ ।। यापरी अनुग्रह धोंडीसी ।। करूनि पाठवी स्वदेशासी ।। सन्मार्ग दावित जनांसी ।। क्रीडतसे सर्वेश ।। ६९ ।। चिदम्बरानुग्रहें धोंडीसी ।। टिपूचे सेनापत्य मिळालें परियेसी ।। मग तो हूणासह[1] युद्धासी ।। आरंभिता झाला पराक्रमें ।। ७० ।। धोंडीचे भये हूणजन ।। गेले पलायन करून ।। धोंडीने त्यांचा पाठलाग करून ।। मारहाण चालविली ।। ७१ ।। इतुक्यांत गोखले धोंडोपंत।। निजसेनेसमवेत ।। निरोधोनी धोंडीचे पंथ ।। युद्धा सन्नद्धजाहला ।। ७२ ।। धोंडी म्हणे हा आंग्लपक्षीय ।। याचा करावा पराजय ।। म्हणोनि तेणें निर्भयें शौर्य ।। दावित निजसैन्य धाडिलें ।। ७३ ।। उभयतांचें युद्धभयंकर ।। झाले रोमहर्षण घोर ।। हत्ती घोडे पायदळ अपार ।। यमपुरा जाती तत्काळ ।। ७४ ।। क्षणांत वाहे रक्तनदी ।। कंबध[2] नाचती रणामधीं ।। कित्येक अर्धच्छिन्न पदोपदीं ।। चडफडती आक्रोशत ।। ७५ ।। रक्तनदी वाहे धडधडां ।। शूर पराक्रम करिती उघडा ।। पंतसेना पडती फडफडां ।। लोळती गडबडां महीवरी ।। ७६ ।। निजसेनेचा पाहोनि नाश ।। धोंडोंपंताचें संतापे मानस ।। म्हणे धोंडूसि आतांचि छेदून सहज ।। अवनीवरी टाकीन ।। ७७ ।। म्हणोनि झाला तुरगारूढ[3] ।। धाविन्नला न पाहतां मागें पुढें ।। धोंडीचा अश्व दुखंडे ।। ऐसे शस्त्र हाणिलें ।। ७८ ।। तंव धोंडी परम शूर ।। उडी घालोनि खाली सत्वर ।। धोंडोपंतासि पाडोनि महीवर ।। बैसला उरावर वैऱ्याच्या ।। ७९ ।। व्याघ्र जैसा मारी हरिणासी ।। तैसा दातें फोडोनि कंठासी ।। रक्तपान करी आवेशेंसी ।। वाघ नामासी पावला

१. फिरंगी लोक २. धड ३. अश्व


शिवचिदम्बर

तै ।। ८० ।। इतुक्यांत हूणजन ।। सैन्य मिळवोनी अपार जाण ।। पंतसुत बापूसि वर्तमान ।। कळवूनी युद्धासी आणविलें ।। ८१ ।। बापू पाहोनि पितृवध ।। प्रतिज्ञा केली अगाध ।। पितृघ्नाचा करोनि वध ।। करीन निर्वेध पितृक्रिया ।। ८२ ।। हूणबळसहाय घेऊनी ।। निघाला वीरश्रीयुक्त होवोनी ।। बापूचें सैन्य पाहोनि नयनीं ।। धोंडी मनी दचकला ।। ८३ ।। पळूं लागला पूर्व दिशेकडे ।। सैनिक पळाले जिकडे तिकडे ।। रात्रंदिवस पळतां श्रीपर्वत जोडे ।। वाट पुढें दिसेना ।। ८४ ।। कृष्णा वाहे महापूर ।। भोंवती असे पर्वत थोर ।। मागें आले गर्जत महावीर ।। अति घाबरा झाला धोंडी ।। ८५ ।। मग चिदम्बरांचे करोनि स्मरण ।। कृष्णाप्रवाहीं प्रवेशला जाण ।। चिदम्बरकृपें नदीपार होवून ।। परतीरा पातला ।। ८६ ।। तेथें अल्प सेनेसहित ।। निर्भयें अन्नपानें करित ।। निवांतपणे बैसला इतुक्यातं ।। अवचित बापू परत पातला ।। ८७ ।। पाहें जंव तो शत्रूसी ।। दिसूं लागला परतीरासी ।। कृष्णा उल्लंघावयासी ।। उपाय बहुवसी करितसे ।। ८८ ।। तंव ऐकिलें निज शत्रुमुखीं ।। चिदम्बरनामोच्चार हरिखीं ।। त्या नामें परतीर शेखीं ।। साधियलें शत्रूनें ।। ८९ ।। बापू म्हणे मजसी चिदम्बर ।। का न पवे समर्थ सर्वेश्वर ।। म्हणोनि करीत जयजयकार ।। नदींत अश्व सोडिला ।। ९० ।। ज्या नामें भवसागरू ।। तरूनि गेले अपारु ।। तें नाम करितां उच्चारू ।। नदीपूराचा पाड काय ।। ९१ ।। एकटा बापूसी पाहोनी ।। धोंडी निजसैन्येसी उठोनी ।। भिडला शस्त्रास्त्रें करोनी ।। तरी निर्भय मनीं बापू ।। ९२ ।। मुखीं जपत गुरुनाम ।। बापू युद्धकरी अविश्रम ।। अरिसैन्य पाठवी परधाम[1] ।। निजनेमसाधनी झटतसे ।। ९३ ।। तंव सांपडला निजवैरी ।। चिदम्बर स्मरोनि अंतरीं ।। पाडोनि शत्रूसी महीवरी ।। पशुपरी शिर कापिलें ।। ९४ ।। तो चिदम्बरनाम उच्चारित ।। देह सोडोनि कैलासाप्रत ।। गेला चिदम्बरकृपें निश्चित ।। मग बापू निजपुरा पातला ।। ९५ ।। पितृक्रिया पूर्ण करोनी ।। चिदम्बराचें दर्शन घेवोनि ।। गुरुकृपें मंडलाधिपत्य पावोनी ।। निजसदनीं सुखें

१. अन्य लोक

शिवचिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

राहें ।। ९६ ।। अहोरात्रं गुरुनागस्मरण ।। करीत देवद्विजार्चन ।। राहे श्रीनिकटीं आपण ।। चिदम्बरभजन करीत ।। ९७ ।। येणेंपरी करुणासमुद्र ।। नानावतारचरितविस्तार ।। भक्तरक्षण खलनिग्रह साचार ।। करीत भूभार दूर करी ।। ९८ ।। ज्यासी इहपरत्राची असे चाड ।। त्यासी ही कथां असे गोड ।। तेणें पावे सौख्य अखंड ।। ।। गोड बहु चिदम्बरकथा ।। ९९ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ ।। ऐका श्रोते हो समस्त ।। द्वादशोऽध्याय गोड हा ।। १०० ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे खलनिग्रहपूर्वकसदनुग्रहो नाम द्वादशोऽध्यायः ।। १२ ।। ओवीसंख्या १०० ।।

।। श्रीचिंदम्बरार्पणमस्तु ।।

शि
व
चि
द
म्ब
र

# व्यङ्कटेशकामपूरणम्




मग आणोनि पांचवर । देवापुढें ठेवोनि चिदम्बर । सांगे बावासि निर्धार । गिरीवरचि हे पहा ॥

शि व चि द म्ब र

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। ॐनमोजी देवाधिदेवा ।। सर्वांभूतीं तुझा ठाव ।। तुझे चरणीं माझा भाव ।। अखंड राहो ऐसें करी ।। १ ।। त्रिभुवनीं तूंचि दाता ।। म्हणोनि झालों मी मागता ।। माझे मनोरथ आतां ।। सद्‌गुरुनाथा पूर्ण करीं ।। २ ।। तूंचि माता तूंचि पिता ।। तूंचि माझी कुलदेवता ।। कृपा करीं अनाथनाथा ।। इतुकेंचि आतां मागणें ।। ३ ।। लोक भजती अनेक देवांसी ।। ते देव पुरविती त्यांचे मनोरथांसी ।। त्या देवांच्या मनोरथा तूं पुरविशी ।। म्हणोनी तुजशीं शरण आलों ।। ४ ।। मुनीश्वर म्हणे आनंदभरित ।। ऐकाहो श्रोते समस्त ।। श्रवणमात्रें पुरुषार्थ ।। साधे निश्चित चिदम्बरकृपें ।। ५ ।। श्रीगुरु असतां कुंदगोळपुरीं ।। श्रीव्यंकटेश क्रीडा करी ।। प्रगट करावया महीवरी ।। चिदम्बर कीर्तीतें ।। ६ ।।एके दिवशी श्रीहरी ।। बाबाचे स्वप्नामाझारी ।। येऊनी तयाचे करीं ।। पत्र निर्धारी दीधलें ।। ७ ।। मग सांगे निजमुखें ।। कुबेराचे वार्षिक देखें ।। व्याज करणें असे पारिखे[1] ।। सव्वा लक्ष रुपये पाहिजे ।। ८ ।। त्यासी करीं ऐसें तुवा ।। सर्व घेवोनि माझे वैभवा ।। माझी उत्सवमूर्ति देवा ।। वेगें बैसवीं शिबिकेंत ।। ९ ।। नृत्यगीतादिसहित ।। मार्गीं आनंदे भजन करित ।। जावें कुंदगोळासी त्वरित ।। निरोपूं आतां तुम्हांसी ।। १० ।। तेथें असे चिदम्बर ।। जावोनि देईं तूं हें पत्र ।। जितुकें देईल द्रव्यमात्र ।। तेवढें खजिन्यांत घालीं बा ।। ११ ।। ऐसें सांगोनि व्यंकटेश ।। पावला अंतर्धानास ।। जागृत होतां बाबास ।। पत्र दिसे प्रत्यक्ष ।। १२ ।। तत्काल सर्व सेवकजन ।। बोलावोनि केलें प्रस्थान ।। शिबिकेंत रमानायक जाण ।। बैसवोनि देख निघाला ।। १३ ।। कहाळ टाळ झांज मृदंग ।। वाद्ये वाजविती सेवक चांग ।। छत्रचामरादि राजभोग ।। धरिती निजांगें झडकरी ।। १४ ।। वेत्रधारी गाती बिरुद ।। नृत्य करिती वारांगना विशद ।। ब्राम्हण पठती वेद ।। भक्त गर्जताती गोविंदनामें ।। १५ ।। येणेंपरी ऐश्वर्ययुक्त ।। निघाला भक्तांसवें रमाकांत ।। प्रयाणावरी प्रयाण करित ।। आला पूजा घेत मार्गीं ।। १६ ।। पूजासामग्री घेऊनी कितेक

शि व चि द म्ब र

..........................

१. चुकतें.

।। हरिदर्शना येती धावंत देख ।। सुवासिनीगण विशेष ।। आरती कौतुकें करिताती ।। १७ ।। ऐसा महोत्सवें व्यंकटेश ।। आला चिदम्बरनगरास ।। इकडे सांगे सर्व श्रोत्यांस ।। चिदम्बरेश भविष्यवचन ।। १८ ।। आज येथें येतो रमापती ।। स्नान करुनी यावें शीघ्रगती ।। सत्वरें भेटिसि जाऊं निश्चिती ।। म्हणोनि सावित्रीपती उठतसे ।। १९ ।। गुरुवचन ऐकोनि भक्तजन ।। सत्वर आले स्नान करोन ।। हातीं घेऊनी फळपूजाभाजन ।। निघाले जाण गुरुसमागमें ।। २० ।। गांवाबाहेर येतां चिदम्बर ।। इतुक्यांत आला रमावर ।। बरोबरी ऐश्वर्य थोर ।। भक्तमेळा आला असे ।। २१ ।। चिदम्बर पुढें सरसावोनी ।। फळपंचक समर्पोनी ।। आधीं साष्टांगे वंदोनी ।। राजोपचारें पूजा करी ।। २२ ।। मग वंदिती सर्व लोक ।। फलाघर्पिती भक्तिपूर्वक ।। त्यावरी निजसदना सम्यक ।। वैकुंठनायका नेतसे ।। २३ ।। जनांसी जाहला आनंद ।। काय सांगू मी मतिमंद ।। आबालवृद्ध विसरोनि निजछंद ।। येवोनि साष्टांगें नमिती ।। २४ ।। श्रीकृष्ण येतां इंद्रप्रस्थासी ।। जसा होय हर्ष पांडवांसी ।। तैसें झाले जनांसीं ।। पाहतां व्यंकटेशाशी तत्काळ ।। २५ ।। ऐसा महोत्सवें चिदम्बर ।। आणोनि निजमंदिरा रमावर ।। बैसवोनि उंच्चासनावर ।। पूजा अपार पै केली ।। २६ ।। मग बैसतां दीक्षितेंद्र ।। बावानें काढोनि सुंदर ।। चिदम्बरापुढें ठेवोनि पत्र ।। वृत्तांत सविस्तर सांगितला ।। २७ ।। पत्र घेवोनियां हातीं ।। पाहुनी हंसतसे सावित्रीपती ।। म्हणे यांत काय लिहिलें असे श्रीपती ।। हे पाहोनि मज सांगा ।। २८ ।। जन पाहोनि आश्चर्य पावले ।। कोरें पत्र कैसे धाडिलें ।। याचा अभिप्राय आम्हां न कळे ।। हरिकळा जाणते आपण ।। २९ ।। मग दीक्षितें घेवोनि पत्रक ।। वाचतां जाहलें कौतुक ।। सुवर्णाक्षर सम्यक ।। स्पष्ट देख दिसताती ।। ३० ।। ऐका हो श्रोते जन ।। पत्राभिप्राय विशद करोन ।। श्रीचिदम्बरें वाचितां जाण ।। सर्व जन ऐकती ।। ३१ ।। श्रीमद्देवदंदितपदा ।। जगत्प्रर्वतका सच्चिदानंदा ।। ब्रम्हादिकांच्या उत्पत्तिकंदा ।। परमानंदा तुज नमो ।। ३२ ।। तव चरणस्मरण करित चित्तीं ।। तुझी आज्ञा मानोनि गिरिवरती ।। तुझें रूप आठविता हृदयप्रांती ।। उमापती सुखें वसतो ।। ३३ ।।

जगाचा दुःख संहार ।। मीच करितों निर्धार ।। मज येता दुःख थोर ।। तूंचि दूर करिशी ताता ।। ३४ ।। तुजपासोनि जन्म माझें ।। तुज ठायीं क्रीडितो गौजें ।। अंती लीन होतों स्वरुपीं तुझे ।। मी असें अनन्यगतिक ।। ३५ ।। तूंचि मायायोगें जनिता ।। तूंचि शिव हरी विधाता ।। सर्वांचें अंतर्बाह्य व्याप्ता ।। गगनवत पूर्णत्वें ।। ३६ ।। तुजिया सत्तालेशें ।। मी जगीं पूजा घेतसें ।। म्हणोनि तुजसन्निधान आलोंसें ।। विश्वेशा स्वहित साधावया ।। ३७ ।। कारणास्तव कुबेरापासुनी ।। ऋण घेतलें असें व्याजाकारणीं ।। व्याज द्यावया मज सन्निधानीं ।। द्रव्य नसे परियेसा ।। ३८ ।। आतां सव्वालक्ष रुपयांसी ।। जगन्नायका देईं मजसी ।। प्राणसख्या न होईं उदासी ।। या समयीं त्राता माझा तूं ।। ३९ ।। ऐसें वाचोनि पत्र सुरेख ।। गुरुराज बोलिला देख ।। ऐका जन हो समस्त ।। लक्ष्मीनायक याचक जाहला ।। ४० ।। तरी मी नारायणास ।। काय देऊं शकें द्रव्यास ।। सत्कर्म हेंचि माझें धनविशेष ।। सांगा याचकास काय देऊं ।। ४१ ।। चंद्रासि जरी होय उबारा ।। त्यासी कोण घाली शीतल वारा ।। सूर्य जरी बैसे अंधारा ।। त्यासी प्रकाश दावी कोण ।। ४२ ।। नातरी यज्ञेश्वर ।। शीतें कांपतां थरथर ।। त्यासी शेकावया उपचार ।। अन्य कोण योजील ।। ४३ ।। ऐसें बोलतां दीक्षितराज ।। सर्व जन पावले चोज ।। स्तब्ध जाहले सर्व द्विज ।। कोणी कांही न बोलती ।। ४४ ।। लक्ष्मीपती घरासि आला ।। चिदम्बरासी आनंद झाला ।। मिळवुनी ब्राम्हणमेळा ।। समाराधना आरंभिली ।। ४५ ।। सर्व ब्राम्हण तृप्त जाहले ।। आपण मग जेविले ।। बावासी बोलावूनि बोले ।। जें देईन तेणें तृप्त व्हावें ।। ४६ ।। मग आणोनि पांच वर ।। देवाखालीं ठेवोनि चिदम्बर ।। सांगे बावासी निर्धार ।। गिरिवरचि हे पहा ।। ४७ ।। ऐसें सांगोनि सेवकांसी ।। देवोनि दक्षिणा वस्त्रविशेषीं ।। बोळवण करूनी संतोषीं ।। आला स्वसदनासी भक्तांसवें ।। ४८ ।। बावा जावोनि गिरिसी ।। पाहतां चिदम्बरवरासी ।। दिसूं लागले पंच परियेसी ।। घेतले काढोनि तयानें ।। ४९ ।। पांच घेतां आणीक तेथ ।। पांच वर दिसत ।। तरीही घेतां पुन्हा पांच दिसूं लागले ।। ५० ।। एवं सव्वालक्ष होईपर्यंत ।। निघाले

पंचक शिबिर्केत ।। सव्वालक्ष होतां पूर्त ।। सर्वांचे चित्ती आनंद वाटला ।। ५१ ।। आज्ञेप्रमाणें बावा ।। करी खजिन्यांत द्रव्यठेवा ।। त्याच समयीं दुजा महिमा ऐकावा ।। चिदम्बरवैभवा कोण जाणे ।। ५२ ।। होता एक आंग्ल व्यापारी ।। जावोनि तेर्णे द्वीपांतरीं ।। व्यापार करोनि बहुतापरी ।। निजघरा जावया निघाला ।। ५३ ।। जहाजांत घालोनि सर्व पदार्थ ।। आपण बैसला परिवारासहित ।। जहाज आलें मध्य सिंधूंत ।। मग कांय झालें परियेसा ।। ५४ ।। अवचित तुफान मारुत ।। सुटला चहूंकडोनि अद्‌भुत ।। जहाज बुडूं लागलें निश्चित ।। सर्व जन गडबडले ।। ५५ ।। तेव्हां भिवोनि सावकार ।। जवळीं होता ब्राम्हण शिरस्तेदार ।। त्यासवें करी विचार ।। सावकार परियेसा ।। ५६ ।। तुमचे हिंदूजन ।। फार करिताती देवभजन ।। संकटीं करणार संरक्षण ।। ऐसा देव कोण सांग ।। ५७ ।। तंव तो सांगे सप्रेम ।। चिदम्बराचा महिमा अत्युत्तम ।। तो या समयी तारक तुम्हां नेम ।। असे विश्रामधाम दीनांचें ।। ५८ ।। ऐसें ऐकतां श्रवणीं ।। संकल्प केला त्याच क्षणीं ।। मज जरी पार करील यांतुनी ।। समर्पीन लाभचतुर्थांश ।। ५९ ।। ऐसें बोलोनि दंडवत ।। घाली चिदम्बरां ऐसें उच्चारित ।। इतुक्यांत झालें कौतुक अद्‌भुत ।। असे समर्थ श्रीचिदम्बर ।। ६० ।। जहाज सोडोनि वाट ।। पळतसे वायू अचाट ।। लोक करीत होतें अनर्थ ।। तंव मोठें लागलें द्वीप दुर्जे ।। ६१ ।। द्वीप पाहोनि सर्व जन ।। पावले तेव्हां समाधान ।। कांही दिवस तेर्थे राहून ।। मागुती जाण निघाले ।। ६२ ।। जावोनि निजपट्टणासी ।। विक्रय करितां सर्व वस्तूंसी ।। लाभांत आले रुपये त्यासी ।। सावकारासी पंच लक्ष ।। ६३ ।। रुपये पाठविले दीक्षितासी ।। सव्वालक्ष होवोनि हर्षी ।। दीक्षित सांगे सावकारासी ।। रुपये व्यंकटेशासी पाठवावे ।। ६४ ।। चिदम्बराज्ञेवरून ।। व्यंकटेशासी सर्व धन ।। पाठविलें आंग्लें विश्वासोन ।। ऐसें महिमान चिदम्बराचें ।। ६५ ।। एवं चिदम्बरचरित्र ।। पाहोनि तेथील नारीनर ।। चिदम्बर असे सर्वेश्वर ।। ऐसा निर्धार केला पै ।। ६६ ।। मागतां एक फळ ।। द्विगुण देतो स्वामी केवळ ।। ज्यासी दवडणें असे तळमळ ।। तेणें धरावे गुरुचरण




शिव चिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

।। ६७ ।। चिदम्बरासी शरण जातां ।। अणुगात्र न राहे दुःख चिंता ।। तत्काळ लागे स्वहित हाता ।। दीक्षित असे कामधेनू ।। ६८ ।। आपत्काली परम धैर्य।। धरूनि जो आठवी गुरुपाय ।। त्याचे सर्व निवारोनि अपाय ।। देतो विजय चिदम्बर ।। ६९ ।। चिदम्बरा ऐसा हितकर्ता ।। दुजा न मिळे त्रिभुवनी पाहतां ।। म्हणोनि सांगतो ऐका समस्ता ।। गुरुपद तत्त्वता सोडूं नका ।। ७० ।। हे द्विज हो चिदम्बरमहिमा ।। सांगतां मम हृदयीं प्रेमा ।। वाढतो अतिक्रमोनि सीमा ।। म्हणोनि रोमहर्ष सर्वांगीं ।। ७१ ।। आणिक बहुत असे चरित्र ।। तें सर्व सांगतों संक्षिप्त ।। विस्तार सांगावया त्रिभुवनांत ।। कोण समर्थ होईल ।। ७२ ।। सर्वेशाचा महिमावर्णन ।। करण्या अशक्त चतुर्वदन[1] ।। मर्त्य पामरामध्यें कोण ।। वर्णूं शके सर्वथा ।। ७३ ।। आकाशींचीं नक्षत्रे पाहें ।। गणूं येतील उपायें ।। भूपांसूंची[2] संख्या होय ।। मोजतां कुशल मतीसी ।। ७४ ।। परी चिदम्बरमहिमेचा अंत ।। नलगे कोणासी निश्चित ।। सांगू चरित संकलित ।। स्वस्थ चित्तें ऐका तुम्ही ।। ७५ ।। चिदम्बर जातां छब्बीपुरीं ।। उदकाविषयीं जनांचा ताप भारी ।। पाहोनि निर्जल महीवरी ।। उदक सत्वरें आणविलें ।। ७६ ।। मग आले पार्श्ववाडीसि शंकर ।। तेथें नैवेद्य करितां चिदम्बर ।। आली एक नारी सत्वर ।। घृत सगर[3] घेवोनियां ।। ७७ ।। ती नारी अत्यादरानें ।। चिदम्बरासी प्रार्थूनि म्हणे ।। माझें घृत इतुकें स्वीकारणें ।। तुम्हांकारणें आणिलें असें ।। ७८ ।। सर्वज्ञ घेवोनियां घृत ।। पारखावया शिष्या सांगत ।। पारखोनि अति त्वरित ।। शुद्धऐसें शिष्य वदे ।। ७९ ।। मागुता सांगे पाहुनि येईं ।। शिष्य वदे दोष नसे कांहीं ।। स्वामी म्हणे गडबड कांहीं ।। न करितां पाहीं समाधानें ।। ८० ।। तंव तो शिष्य सक्रोध ।। म्हणे मी असें काय अंध ।। मज उपहासूं नका बहुविध ।। आपण घृत परीक्षावें ।। ८१ ।। मग नैवेद्य वैश्वदेव करोनी ।। आपण सर्व घृत घेउनी ।। भोजना बैसले त्याच क्षणीं ।। तंव त्या नारीची स्नुपा पातली ।। ८२ ।। तिजसी विदित झाला वृतांत ।। परोपरी विनवी स्वामीप्रत

शि
व
चि
द
म्ब
र

१. ब्रम्हदेव २. धूलिकंणांची ३. विषयुक्त

|| घृत सोडावें निश्चित || विषयुक्त असे ऐसें वदे || ८३ || स्वामी म्हणे एक नारी || देवें आणि यज्ञेश्वरी || घृत सेविलें निर्धारी || तेथें नरा पाड काय || ८४ || विष बाधलें तिच्या पुत्राला || क्षणांत त्यासी मरणसमय आला || त्याची सती विनवी दीक्षिताला || आपुला पती वांचवावया || ८५ || मग स्वामी कृपानिर्धी || चित्तीं नाणितां तिची दुर्बुद्धी || भस्म देवोनियां आधीं || तिचा पती वांचविला || ८६ || ऐसें अद्‌भुत चरित्र || दावित असतां नित्य अपार || एके दिवशीं मार्गी चोर || येउनी चिदम्बरा गांठिलें || ८७ || पितृपितामह आदि करोन || सांगोनि तयांचें नामाभिधान || चौर्यकर्मांतुनी सोडवून || सन्मार्गाप्रती लाविला || ८८ || कितीएक चोर जन || धैर्यें पुढें येतां जाण || स्वामी सन्मुख राहोन || चोरांसि म्हणे यापरी || ८९ || द्रव्य घेणें असले चित्तीं || सत्वर टाका पाऊलें पुढतीं || ऐसें म्हणतां चोरांची गती || झाली कुंठित स्थाणूपरी[1] || ९० || मग चिदम्बरपायी || विनवितां सर्वही || चोरकर्मांतुनी सोडवोनि सर्वांसही || गमनशक्ति दिली मग || ९१ || बाजीरायें काशिरायाचें राज्य घेतां || काशिराय आला शरण तत्त्वतां || चिदम्बरभयें राजा मागुता || राज्य देता झाला काशिराया || ९२ || दीक्षितें कुसुगल्लपुरीं || आठ ब्रम्हराक्षसां निर्धारी || बोध करोनि परोपरी || त्यांसी सद्‌गती दीधली || ९३ || पडगानूर म्हणोनि गांव || तेथींचा होता वैष्णव || निज पुरासी येतां दीक्षितराव || सांगे सर्व निजजनांसी || ९४ || हा असे शैव देख || याचें पाहों नये मुख || त्याचे भेटीसी आमुचे लोक || जातील तयां शिक्षीन || ९५ || तयाचें घेतां दर्शन || सचैल स्नान करावें जाण || दुर्वृत्तें ऐसे म्हणतां आपण || ग्रामदेवता रडूं लागल्या || ९६ || शालिग्रामादि सर्व || त्यांचे गृह सोडिती देव || जाहलें तेव्हां चरित अपूर्व || सांगतो भूदेवा तें ऐका || ९७ || तयाचें आंगवस्त्र || जळूं लागलें प्रखर || नम्र होवोनि दुसरें वस्त्र || घेतां तेंही जळतसें || ९८ || मग सर्व जन तयास || सांगताती हितोपदेश || अरे खळा चिदम्बरा निंदिलेस|| तेणें दशा ऐसी

१. खुंटाप्रमाणें

जाहली ।। ९९ ।। ज्यासी गोड वाटला नरक ।। तोचि जगदीशाचा निंदक ।। सर्वेशाची निंदा सुख ।। कवणाही न देई ।। १०० ।। अरे ऐक तुवां पामरा ।। सोडोनि चित्तीं शैववैरा ।। जाईं शरण चिदम्बरा ।। तरीच आंगी राहे वस्त्र ।। १ ।। हरिहर असतां एकरूपें ।। पाखंड मतें निंदिती पापें ।। हरिहर निंदकांसी सोपें ।। पुढें असे यमशासन ।। २ ।। ऐसें ऐकतां तो निंदक ।। शरण आला चिदम्बरासि देख ।। मग चिदंबर निजमुख ।। वस्त्रें झाकोनि बोलत ।। ३ ।। अगा ब्राम्हणा ऐक गोष्ट ।। मी असे शैव स्पष्ट ।। माझे दर्शनें होवोनि भ्रष्ट ।। नको कष्टूं सचैल स्नाने ।। ४ ।। ऐसें ऐकोनि गुरुवचन ।। करूनि दंडवत नमन ।। प्रार्थना करितसे भक्तीकरून ।। मी पापी जाण दीक्षितेंद्रा ।। ५ ।। माझा अपराध दयासमुद्रा ।। क्षमा करी विश्वंभरा ।। तुझा महिमा नेणतां सर्वेश्वरा ।। निंदा अपार पै केली ।। ६ ।। ऐशी प्रार्थना करी अपार ।। वंदितसे वारंवार ।। तंव मुख उघडोनि दयासागर ।। देतसे वस्त्र निजहस्तें ।। ७ ।। तें वस्त्र नेसोनि अधिकारी ।। गुरुस्तुती करी परोपरी ।। सर्व परिवार आणोनि ।। त्या अवसरीं ।। पायांवरी घाली भावें ।। ८ ।। त्या दिवसापासोनि शैवनिंदा ।। सोडोनि गुरुपदारविंदा ।। वंदोनि पावला परमानंदा ।। गेला निजसदना सपरिवारें ।। ९ ।। अनुग्रहनिग्रहाकारण ।। चिदंबर समर्थ असे जाण ।। तयापरी दयाळू कोण ।। भुवनत्रयीं मिळूं शके ।। ११० ।। रंकासी राज्य देऊं शके ।। राजासी करील तृणासारखें ।। ज्यासी सेविती ब्रम्हादिकें ।। त्याचा महिमा काय वानूं ।। ११ ।। यादगिरिचा देसाई ।। प्रार्थना करितां गुरुपायीं ।। त्यासी दोन गोष्टी सांगोनि त्या समयीं ।। पाठविला पाहीं निजसदना ।। १२ ।। वीस सहस्त्र ब्राम्हण ।। भोजन करवितां क्षण ।। विहिरींत आलें जीवन ।। झालें संतान परस्त्रीत्यागें ।। १३ ।। पुढें गुरुवचन विसरोनी ।। करितां पंक्तिभेद भोजनीं ।। विहिरींतील आटलें पाणी ।। काय वानूं करणी गुरुची ।। १४ ।। करितां परांगनासंग ।। व्रणयुक्त झालें सर्वांग ।। कृमी पडतां दुःख अभंग ।। भोगित स्मरे दीक्षितवचन ।। १५ ।। शिबिकेंत बसोनि शरण आला ।। परोपरी प्रार्थूनी चिदंबराला ।। मागुती दोन गोष्टींचा संकल्प केला




शिव चिदम्बर

|| आरोग्य पावला तत्क्षणीं || १६ || मग बोले सर्व्वेश्वर || पंक्तिभेदें दोष अपार || कोटि जन्मींचें पुण्य निर्धार || भंगुनी जाय निश्चयें || १७ || त्याच परि परांगनासंग || पुढें देतसे नरकभोग || आजपासोनि दोन्हींचा त्याग || करावा जाण सर्वदा || १८ || जधीं दोन्ही गोप्टी विसरसी || त्याच दिवशीं देहा मुकशी || अंती नरक भोगिसी || जाण निश्चयेंसी अंतरीं || १९ || ऐसें ऐकोनि गुरुवचन || करोनि साष्टांग नमन || निजसदनीं पाळित वचन || सुखें राहिला परियेसा || १२० || ऐसें अपार कौतुक || दावितसे जगन्नायक|| जे इच्छिती इहपर सुख || त्यांनी गुरुनायक सेवावा || २१ || चिदम्बर असे सर्वेश्वर || कौतुक दावितसे अपार || त्यासी भजोनि पावा पैलपार || चिदम्बरकिंकर सांगे हित || २२ || स्वस्ति श्रीचिदम्बरचरित || ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ || ऐका श्रोते हो समस्त || त्रयोदशोऽध्याय गोड हा || १२३ || इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे व्यंकटेशकामपूरणादिमहामहिमोद्घाटनं नाम त्रयोदशोऽध्यायः || १३ || ओवी संख्या १२३ ||

|| श्रीचिदम्बरार्पणमस्तु ||



शिव चिदम्बर

## विप्रदुर्मतिहरणम्




तंव जाहला चमत्कार । कलशांतुनी पडले प्रखर । दीर्घ पुच्छ वृश्चिक अपार । सहस्त्रावधी परियेसा ॥

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। जयजया परात्परा ।। जगद्गुरु अगोचरा ।। विश्ववंद्या सर्वेश्वरा ।। चिदंवरा तुज नमो ।। १ ।। आदिमूर्ती गुरुराया ।। तुज जे भजती स्वामिराया ।। त्यांच्या निवारोनि सर्व अपायां ।। सदयहृदया पाळिसी तूं ।। २ ।। तुझा महिमा वर्णितां ।। शेषें शिणोनि धरिली मौनता ।। श्रुतीसी अंत न लागतां ।। नेति म्हणोनि मौनावल्या ।। ३ ।। तेथें मी काय पामर ।। वर्णूं शकें तुझे चरित्र ।। तूंचि करोनि मति पवित्र ।। कृपासागरा बोलविशी ।। ४ ।। तूं ज्यावरी कृपा करिसी ।। तो होय चतुर्मुख परियेसी ।। म्हणोनि तव पदारविंदासी ।। मागावयासी मी आलों ।। ५ ।। माझे हृदयीं बैसोनी ।। तव चरित्र सरस करोनी ।। वदवीं सद्गुरुजी म्हणोनी ।। मागणें चरणी इतुकेंची ।। ६ ।। ऐका हो ब्राम्हण समस्त ।। स्वहिताकडे देवोनि चित्त ।। सांगतो चिदंबरचरित ।। करणी अद्भूत गुरुची ।। ७ ।। एके दिवशीं स्वामिराज ।। रेणुकादर्शन घ्यावया काज ।। निघतां समागमें बहुत द्विज ।। निघाले भुभूज[1] सैन्यासहित ।। ८ ।। जावोनी रेणुकाक्षेत्रासी ।। पूजा करोनि यथाविधीसी ।। ब्राम्हणभोजन बहुवसी ।। करोनि स्वस्थाना निघाले ।। ९ ।। मार्गी येतां मलापहातटीं ।। मारुती देवालय पाहोनि दिठीं ।। चिदंबर बोले मंजुळ गोष्टी ।। ही जागा गोमटी वासा योग्य ।। १० ।। ऐसें गुरुमुखें निघतां वचन ।। नृजपन सर्व मिळोन ।। दिवाकर दीक्षितासी पुढें करोन ।। ग्रामरचना आरंभिली ।। ११ ।। इकडे श्रीगुरुनाथ ।। निजानुष्ठान सारोनि विध्युक्त ।। सहपरिवारें मुरगोडाप्रत ।। येऊनीयां राहिले ।। १२ ।। मग मंडलेश एके दिवशीं ।। विनविती चिदंबरासी ।। स्वामीवचन सुधारसी ।। ग्राम परियेसी सिद्ध जाहला ।। १३ ।। पुढें आज्ञा असे काय ।। सांगाजी तुम्ही स्वामीराय ।। तंव स्वामी बोले सुहास्य ।। त्याचें नांव काय ठेविलें ।। १४ ।। सर्वही विनविती सर्वेशासी ।। सांगावें ग्रामनाम आम्हांसी ।। मंडलेश विनवितां परियेसी ।। परिसोन बोले दीक्षित ।। १५ ।। नगरनाम निघतें सुंदर ।। शास्त्रोक्त गुरुनवपुर ।। सत्कर्मार्हस्थान पवित्र ।। म्हणोनि सर्वेश्वर निघाला

१. राजे



शिवचिदम्बर

॥ १६ ॥ विचारोनि उत्तम मुहूर्त ॥ प्रवेश केला पै ग्रामांत ॥ पाहोनि ग्रामसमस्त ॥ आनंदित स्वामी झाला ॥ १७ ॥ मध्यें शोभे देववाडा मोठा ॥ पूर्व दिशी सुंदर पेठा ॥ दक्षिण पश्चिमेसी द्विजालय थाटा ॥ राजगृह श्रेष्ठ उत्तरेसी ॥ १८ ॥ अठरा पगड याती ॥ ईशान्य दिशीं वास करिती ॥ तेथें राहोनि सावित्रीपती ॥ भूवरी निजकीर्ती पसरित ॥ १९ ॥ तेथील महिमा अनुक्रमें ॥ सांगतो ऐका सप्रेमें ॥ सदाचार श्रौत नेगें ॥ पुरुषोत्तग दावी जनांसी ॥ २० ॥ स्वयें श्रौताग्नी सेवा करित ॥ सद्धर्म आचरोनि दावित ॥ वेधाध्ययन सांगत ॥ शिष्यजनां परियेसा ॥ २२ ॥ शिष्यांसि सांगे अध्ययन स्वमुखें ॥ कित्येकांसि ऋग्वेद हरिखें ॥ यजुर्वेद पठणार निकें ॥ सप्तशतकें शिष्य होते ॥ २३ ॥ अठ्ठावन्न होते सामपाठी ॥ होते त्रिशत शास्त्रपाठी ॥ सर्वांसी सांगे जगजेठी ॥ सर्व विद्या आपणची ॥ २४ ॥ कोणी पठती श्रौत स्मार्त ॥ याज्ञिकपद्धती हर्षयुक्त ॥ कित्येक न्याय व्याकरण निष्णात ॥ जाहले पारंगत कर्मकांडीं ॥ २५ ॥ किती एक उपासनाकांडीं ॥ किती विचारिती ज्ञानकांडीं ॥ कोणासी ज्योतिःशास्त्रीं गोडी ॥ अध्ययनपरवडी[1] माजली ॥ २६ ॥ मंत्र ब्राम्हण पदक्रम ॥ सांगे कित्येकांसी जटा सप्रेम ॥ कित्येक अष्टविकृती अविश्रम ॥ अभ्यसती गुरुमुखें ॥ २७ ॥ इतुक्यांत शुक्ल यजुर्वेद ॥ पाठकांचा सुनाद ॥ करोनि दशदिशा विभेद ॥ कोंदला गगनकटाहीं[2] ॥ २८ ॥ वेदाध्ययन सोहळा ॥ पहावया इंद्रादिक देवमेळा ॥ धरुनि एकाग्र कळा ॥ ऐकती रसाळ वेदघोष ॥ २९ ॥ देवही पाहोनि पाठशाळा ॥ विस्मय पावलें त्यावेळां ॥ पाहतां चिदंबर महिमेला ॥ केवळ स्तब्ध राहिले ॥ ३० ॥ श्रुत्युत्तेजन पाहोनि चित्तीं ॥ म्हणती कां आलों सत्यलोकाप्रती ॥ कीं ऋषिगण वेद पठती ॥ ब्रम्हा निश्चिती सांगतो ॥ ३१ ॥ कीं मूर्तिमंत आम्नाय संघे[3] ॥ वेगळे करोनि स्वविभागें ॥ कैलासनाथा तोषविण्या जोगे ॥ स्तविती अभंगे शंकरा ॥ ३२ ॥ या कलीचें दुर्वृत्तपण ॥ सोडवावया नारायण ॥ सहपरिवारें आगमन ॥ केलें असे भूवरी ॥ ३३ ॥ येणेंपरी चिदंबरकीर्ती

१. परंपरा २. आकाशभर ३. वेदसमूह.




शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

।। पसरली त्रिलोकावरती ।। एके दिवशी श्रीशंकरभारती ।। आला निश्चिती श्रृंगेरीहूनी ।। ३४ ।। प्रातःकाळीं पाठशाळेंत ।। तेजस्वी यती सुमंद हसित ।। दंड कमंडलु काषाय शोभित ।। आला मूर्तिमंत कीं बालसूर्य ।। ३५ ।। सभेंत येतां यतीश्वर ।। शिष्य उठोनि सत्वर ।। करिती साष्टांग नमस्कार ।। भुलले पाहतां यतीसी ।। ३६ ।। आजानुबाहू सुहास्यमुख ।। हातीं दंडकमंडलू सुरेख ।। पायीं शोभे सुवर्णपादुका देख ।। शिष्यासी पुसतसे ।। ३७ ।। कोठें असे आपुला गुरु ।। मी आलेला वृत्तांत सत्वरू ।। कळवा चिदंबरा निर्धारू ।। यतीश्वरु बोलिले ।। ३८ ।। वचन ऐकोनि यतिरायाचे ।। आसन देवोनिया रुप्याचे ।। शिष्य बोलती मृदुवाचे ।। होमशाळेमाजी गुरुवास ।। ३९ ।। क्षणमात्र बैसावे स्वस्थचित्त ।। गुरूसि सांगू वृत्तांत ।। म्हणोनि गेले बटु धावत ।। निवेदिले आगमन यतीशाचे ।। ४० ।। शिष्यवचन ऐकोनि चिदंबर ।। घेवोनि पूजा सोपस्कार ।। आला सभेसी सत्वर ।। आधीं वंदन पै केलें ।। ४१ ।। मग बैसवोनि पीठावरी ।। पाय धुवोनि स्वकरीं ।। तीर्थ घेवोनि मस्तकांवरी ।। भक्तीनें अंघ्री पूजित ।। ४२ ।। अभाग्यामी कामधेनूपरी जाण ।। मज दीनासी आपुलें दर्शन ।। लाधले तेणें झालों पावन ।। असोनही संसारी ।। ४३ ।। आजि झालों मी कृतकृत्य ।। फळलें माझें पूर्व पुण्य ।। म्हणोनि देखिले तव पाय ।। निरोप व्हाय सांगा स्वामी ।। ४४ ।। मग बोले हंसत शंकर ।। पाठशाळेंतुनी वेदगजर ।। पहावया आलो सत्वर ।। पाहतां निघालों हर्षे चित्तीं ।। ४५ ।। शुक्लयजःसुनाद ।। करोनि गगनकटाहभेद ।। ब्रम्हसदनापर्यंत विशद ।। पावला निर्द्वंद्व दीक्षितेंद्रा ।। ४६ ।। याउपरि अवतारक्रिया ।। बहुत असे पुढें सखया ।। लोकोद्धार व्हावया ।। आलों सांगावया तुजलागीं ।। ४७ ।। पूर्वीं खंडोनि अन्य मत ।। स्थापिलें मार्ग म्यां अद्वैत ।। तें कलिकालें होत लुप्त ।। तोचि मार्ग आतां वाढवीं ।। ४८ ।। कर्म उपासना ज्ञान ।। स्थापना करीं वेदानुसरून ।। इतुकें स्मरण द्यावया जाण ।। आगमन झालें असें माझें ।। ४९ ।। तंव चरण धरोनि चिदम्बरें ।। म्हणें ऐका जगद्गुरु वाक्य सारें ।। पूर्वी याज्ञवल्क्यादि ऋषीश्वरें ।। वाजिशाखा स्थापिली ।। ५० ।। ती कलिदोषें झाली लीन ।।

शिवचिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

अयातयाम[1] वेदासि दुर्जन ।। बहुत ठेविती दूषण ।। तदर्थ यत्न प्रथम माझा ।। ५१ ।। अनिंद्य वाजिशाखास्थापना ।। आधीं करोनि जगद्गुरुराणा ।। मग तव आज्ञापालन ।। करितों स्वामिराया निश्चयें ।। ५२ ।। ऐशी परस्परांची मात निश्चिती ।। ऐकोनि जन नमस्कारिती ।। म्हणती हा असे श्रीशंकरभारती ।। गर्जताती जयजयकारें ।। ५३ ।। धन्य धन्य आजिचा सुदिन ।। जाहलें जगद्गुरुचें दर्शन ।। दीक्षित शंकर एकरूप जाण ।। चित्तीं बाणली खूण निश्चयें ।। ५४ ।। जन ऐसेपरी असतां स्तवित ।। भिक्षावंदन करोनि दीक्षित ।। यतिनिमित्तें ब्राम्हण बहुत ।। संतर्पिले बहुतांपरी ।। ५५ ।। मग चिदम्बराची आज्ञा घेउनी ।। अंतर्धान पावले शंकरमुनि ।। चिदम्बरकीर्ती त्रिभुवनी ।। प्रतिदिनीं पसरली ।। ५६ ।। आणिक एक चरित ।। ऐका हो असे अद्भुत ।। विप्र एक उन्मत्त ।। होता दुर्बुद्धी परियेसां ।। ५७ ।। प्रत्यहीं एकैक नूतन ।। ऐकोनि चिदम्बर महिमान ।। दुर्जन मनीं रात्रंदिन ।। चिंता करीं परियेसा ।। ५८ ।। म्हणे चिदम्बर कलशांत ।। असे निधी शाश्वत ।। तो घेतां माझें निश्चित।। दारिद्र्य जाईल क्षणार्धें ।। ५९ ।। कलशहरणकामुक ।। राहिला होवोनि सेवक ।। त्याचें चित्त गुरुनायक ।। ओळखीत परियेसा ।। ६० ।। सोडवावया त्याची दुर्बुध्दी ।। भक्ति द्यावया त्रिशुध्दि ।। एके दिनीं देवालया मधीं ।। ठेविता झाला तो कलश ।। ६१ ।। स्वामी गेले स्नान करावया ।। तंव तो आला कलश हरावया ।। प्रवेशोनि देवालया ।। उचलिता झाला कलशातें ।। ६२ ।। वस्त्र पसरोनि देवापुढें ।। टकमक पाहतसे चहूंकडे ।। ओतोनि घेतसे गडवडें ।। निधी तया कलशांतुनी ।। ६३ ।। तव जाहला चमत्कार ।। कलशातुनी पडले प्रखर ।। दीर्घपुच्छ वृश्चिक अपार । सहस्त्रावधी परियेसा ।। ६४ ।। क्षणांत व्यापिलें देवघर ।। आपादमस्तक ही सत्वर ।। पाहतां विप्र कांपे थरथर ।। अपार आक्रोश करीतसे ।। ६५ ।। म्हणे सोडवा कोणी तरी ।। मरणसमय आला निर्धारी ।। शंखध्वनी परोपरी ।। करुं लागला तो विप्र ।। ६६ ।। श्रवण करोनि दीर्घरव[2] ।। स्नान सांडोनि श्रीगुरुराव

शि
व
चि
द
म्ब
र

.......................

१. नवीन. २. किंचाळणे.

शि
व
चि
द
म्ब
र

|| आले देवघरासी जंव || तव द्वार झाकिलेंसे || ६७ || तंव म्हणे सर्वेश्वर || आंत कोण अससी वद सत्वर || कां आक्रोश करिसी उघडी द्वार || तंव तो बोले दुर्मती || ६८ || मी अपराधी असें निश्चित || द्वार उघडावें जी त्वरित || वृश्चिक पूर्ण गृहांत || असमर्थ मी चालण्या || ६९ || मग सत्वरें श्रीगुरु || उघडोनि देवालय द्वारू || आंत पाहे चिदम्बरु || तंव वृश्चिकवृंद निघाले || ७० || वृश्चिक पाहतां ऐसे वाटे || जगींचे विंचू झाले कीं एकवटें || कीं वृश्चिकमय झाली सृष्टी || कीं प्रगटे चिदम्बरसत्ता || ७१ || शिव शिव म्हणे चिदम्बर || काय केलेंसी बा कर्म अघोर || येणें लाभ तुजसी थोर || काय सत्वर सांग मजसी || ७२ || मागतां तुज काय होतें दुर्लभ || ऐसें म्हणत दीक्षित स्वयंभ[1] || करोनि वृश्चिकगतिस्तंभ || कलशीं पुन्हा भरू लागे || ७३ || रत्न म्हणोनि वन्हिखंड || घेतां जे फळ मिळे प्रचंड || देउनी तैसा मज दंड || दुर्वासना खंड केलीसे || ७७ || कल्पवृक्षातळीं बैसोनी || अनिष्ट चिंतोनि दुर्मनीं || निजहित विनाशनीं || कलशपाणी प्रवर्तलों || ७८ || क्षमा करीं हे सवेश्वर || दारिद्र्य व्हावया दूर || कर्म केलें म्या अघोर || करावा उद्धार दीनाचा || ७९ || परिसोनि त्याची दैन्य वाणी || कृपा उपजली अंतःकरणीं || आजपासोनि दुष्कर्म झणीं || चिंतितां मनी नाश पावसी || ८० || ऐसें सांगोनि त्या अवसरीं || कलशांत हात घाली सत्वरी || दोन मुष्टी त्या पदरीं || जगदुद्धारी घालितसे || ८१ || म्हणे इतुकें घेवोनि भूसूरा || जावें आता निजघरा || येणें तुज दारिद्र्यवारा || नलगे निर्धार जाणपां || ८२ || ऐसें सांगुनी विप्रासी || पाठवोनि गेले स्नानासी || पाहतांही त्रिभुवनासी || ऐसा कृपानिधी दुजा न मिळे || ८३ || ज्यासी पाहिजे इहपर सुख || तेणें आश्रयावे गुरुपादुका || भयमोचक भक्तरक्षक || सदोदित देख सप्रेमें || ८४ || चिदम्बर निजभक्तांसि सुख || अखंड देतो सावित्रीनायक || कळिकाळाचें भय देख || बाधेना सम्यक कदाकाळीं || ८५ || ऐकोनि चिदम्बरनामध्वनी || यमदूत पळती रानोरानीं

शि
व
चि
द
म्ब
र

.......................

१. स्वतः

|| काळ मृत्यू कापतो निजमनीं || म्हणोनि गुरुचरणीं भाव ठेवा || ८६ || ज्यासि मिळे चिदम्बराश्रय || तो होय त्रिभुवनीं पूज्य || चिदम्बरकिंकर सांगे सोय || चिदम्बर भजा ऐसें सर्वां || ८७ || स्वस्ति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे गुरुनवपुरनिर्माणं विप्रदुर्मतिदारिद्र्यहरणंच नाम चर्तुदशोऽधयायः || १४ || ओवीसंख्या ८८ ||

|| श्रीचिदम्बरार्पणमस्तु ||





शिव चिदम्बर

## पठाणरूपेण व्यङ्कटेशसमागमः




आकर्णनेत्र सुहास्यवदन । स्वामीसी देखतां दुरून । झडकरी येतसे धावोन । देती आलिंगन स्वामी त्यासी ॥

चिदम्बरचरित्र

अध्याय पंधरावा

शि व चि द म्ब र

॥ श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ॥ जयजया आदिमूर्ती ॥ सच्चिदानंदा ब्रम्हस्फूर्ती ॥ तुझे चरणीं माझी मती ॥ राहो गुरुमूर्ती सदोदित ॥ १ ॥ चिदम्बरा तुझे नामीं ॥ प्रीती धरील जो निष्कामी ॥ त्यासी ठाव देशी आनंदधामीं ॥ जगत्स्वामी कृपासागरा ॥ २ ॥ कामक्रोधादिक वैरी ॥ मज गांजिती नानापरी ॥ म्हणोनि भक्तकाजकैवारी ॥ तंव चरणीं शरण आलों ॥ ३ ॥ मज दीन दासाविशीं ॥ कृपा उपजो बा तव मानसीं ॥ शांती देईं माझे चित्तासी ॥ इतुकेंचि पायीं मागणें ॥ ४ ॥ चित्त ठेवीं बा निवांत ॥ नामस्मरण चालूं दे सतत ॥ कृपानिधी राहे हृदयमंदिरात ॥ चिदम्बरा देईं इतुकें ॥ ५ ॥ उठतां निजतां बैसतां ॥ ग्रास घेतां आणि वदतां ॥ अवघड समयही येतां ॥ तव नामीं सतत प्रेम देईं ॥ ६ ॥ सत्य ज्ञान अनंत ॥ सर्वत्र जो पूर्ण आकाशवत ॥ मृषा[1] दिसतें जया ठायीं द्वैत ॥ त्या चिदम्बराप्रत आतां नमूं ॥ ७ ॥ मुनि म्हणे ब्राम्हणांसीं ॥ जो होय चिदम्बरीं विश्वासी ॥ नित्य रक्षिती देव त्यासी ॥ तयासी काळ ही भीतसे ॥ ८ ॥ ऐका हो चिदम्बरकथा सुरस ॥ ओळखोनि भक्तांचें मानस ॥ तयांच्या हितार्थ चिदम्बरेश ॥ कामें कित्येकास सांगतसे ॥ ९ ॥ एके दिवशीं चिदम्बर ॥ पात्रीं राहिलेला उच्छिष्ट खर्जुर ॥ शिष्या हातीं देवोनि मधुर ॥ बोले जगदीश्वर हासंत ॥ १० ॥ हा प्रसाद दिवाकरपत्नीसी ॥ देवोनि येईं त्वरितेंसी ॥ संतान इच्छा तिच्या मानसीं ॥ या प्रसादें पूर्ण होय ॥ ११ ॥ तथास्तु म्हणोनि शिष्य तंव ॥ मनीं धरोनि दुःस्वभाव ॥ म्हणे गुरूच्छिष्ट दुर्लभ जंव ॥ मज तें स्वयमेव हातीं आलें ॥ १२ ॥ रोगयासी लाधतां अमृत ॥ तो का दुजिया देईल किंचित ॥ कीं लक्ष्मी दरिद्रिया घराप्रत ॥ येतां सुखें बोळवील[2] ॥ १३ ॥ कीं वंध्येसि होतां पुत्ररत्न ॥ देईल काय दत्तक करून ॥ नातरी रंकास मिळतां सिंहासन ॥ वैराग्य कठीण घेईल काय ॥ १४ ॥ कीं कामातुराचे शय्येसी ॥ एकांतीं प्राप्त झाली उर्वशी ॥ कां तो परस्त्री म्हणोनि तिसी ॥ सोडील उदासी होवोनियां ॥ १५ ॥ ऐसें विचारोनि

शि व चि द म्ब र

१. खोटे २. सोडेल

तो मनीं ।। एकांती जावोनि तत्क्षणी ।। भक्षण करोनि आनंद मनीं ।। गुरुसन्निधानी उभा ठेला ।। १६ ।। चिदम्बर त्याचें मुख पाहोन ।। मग तया करी प्रश्न ।। आलासि की प्रसाद देऊन ।। शिष्य लज्जित जाहला ।। १७ ।। मग बोले सर्वेश्वर ।। ऐकती सभाजन अपार ।। उच्छिष्टभक्षण हा अविचार ।। कां केलासि पापसंग्रह ।। १८ ।। उच्छिष्टसेवनें होय गतिनाश ।। उच्छिष्टें लाधे पापविशेष ।। म्हणोनि शुभेच्छु पुरुषें ।। उच्छिष्टभक्षण करुं नये ।। १९ ।। ऐसें वदतां श्रीगुरुनाथ ।। लोक बोलती त्यासि बहुत ।। गुर्वाज्ञा उल्लंघन काय हित ।। उच्छिष्ट किमर्थ सेविलेंसी ।। २० ।। अरे मूढा ऐक गोष्टी ।। गुरुची आज्ञा असे मोठी ।। ती उल्लंघितां कष्टी ।। सहस्त्रदिठी[1] ही क्षणांत ।। २१ ।। गुरुवचन मोडितां बळी[2] ।। राज्यभ्रष्ट होवोनि तत्काळीं ।। गेला क्षण न लागतां पाताळीं ।। तरी तूं अनर्थ कां केलास ।। २२ ।। येणें परी निंदावचन ।। ऐकोनिया तो ब्राम्हण ।। करूनी लज्जेनें अधोवदन ।। राहे क्षण एक स्तब्ध ।। २३ ।। मग अज्ञानें मनीं विचार ।। करूं लागला तो प्रखर ।। आज्ञोल्लंघन गुरुचें तर ।। झालें दुर्धर काय करूं ।। २४ ।। यासी प्रायश्चित हेंची ।। जीभ इच्छि खर्जुररुची ।। तेणें मज करिती लोक छी छी ।। करावी इसी शिक्षा आधीं ।। २५ ।। ऐसा मनीं निश्चय करोनी ।। शस्त्र घेवोनी एकांत सदनीं ।। आपली जिव्हा छेदोनि तत्क्षणीं ।। चिदंबरचरणी समर्पिली ।। २६ ।। भयंकर पाहोनि ही कृती ।। म्हणे द्विजासी सभापती ।। काय केलीस ही अघोर कृति ।। काय गती सांग पुढे ।। २७ ।। ऐसे बोलोनी सुद्‌गुरु । त्याचे मुखी भस्म परि । धालोनि शिरी अभय करू ।। ठेवितां द्विजवरू सावध झाला ।। २८ ।। जिव्हा आली तत्काळ ।। ज्ञान लाधलें तया विगळ ।। ब्राम्हण होवोनि सावध केवळ ।। नगोनि सोज्वळ स्तोत्र करी ।। २९ ।। जयजय शंकरा त्रिलोकनाथा ।। नीळकंठा विधींद्रपूजिता ।। श्रीमच्चिंदम्बरा सद्‌गुरुनाथा ।। प्रसन्न होईं मृत्युजंया ।। ३० ।। ऐसें स्तवित असतां ब्राम्हण ।। चिदंबर होवानि सुप्रसन्न ।। वर देतसे इच्छा जाणून ।। तेणें हर्षसंपन्न झाला

१. हजार डोळे असणारा इंद्र २. बलिराजा

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

द्विज ।। ३१ ।। ऐसें अगाध चरित्र ।। दावितसे निरंतर ।। त्यासीं चाड असे इहपर ।। त्यानें चिदंबर आश्रयावा ।। ३२ ।। एके दिनीं श्रीनिवास नामा ।। आला एक पंडित निःसीमा ।। दीक्षितगुणपरीक्षूकामा ।। आला शिष्यांसमवेत ।। ३३ ।। देवत्व काय असे चिदंबरीं ।। हें पाहीन मी निर्धारी ।। आला शिष्यसंग घेउनी भारी ।। सभेमाझारी श्रीगुरूच्या ।। ३४ ।। परिक्षा घेऊं म्हणती पामर ।। चिदंबर असे सर्वांतर ।। ब्रम्हादिक शिणती अपार ।। तरी जयाचा पार नलगे ।। ३५ ।। ऐशिया जगन्नाथाची ।। परिक्षा घेंऊ म्हणे हतभाग्य साची ।। जो करी वाचे निंदा गुरूची ।। तोचि यमाचा परम मित्र ।। ३६ ।। पंडित येतां जगदीश्वर ।। ओळखोनि त्याचें अंतर ।। त्याची दुर्वासना करावया दूर ।। चिदंबर ऐसें करी ।।३७ ।। व्यावहारिक जनांसी ।। मेळवोनिया बहुवसी ।। करित व्यवहार गोष्ट विशेषी ।। प्रेम कलह त्यांसवें मांडिला ।। ३८ ।। दोन मुहूर्त पाहतां वैष्णव ।। न कळे चिदंबराचें वैभव ।। ज्यासी पुढें असे अहंभाव ।। कदा न दिसे देव त्या मूढा ।। ३९ ।। काक जरी झाला पुष्ट ।। का लावील गगंनाचा अंत स्पष्ट ।। खद्योत[1] जरी झाला सुभट[2] ।। भानुतेज अचाट न लोपवी ।। ४० ।। मक्षिका जरी वेगें उडे ।। पाहील कां सिंधु परतीराकडे ।। मेष बहुतापरी वाढे ।। का झगडे ऐरावतासी ।। ४१ ।। ग्रामसिंह[3] जरी मातला ।। मारील का पंचानननाला[4] ।। ना तरी पतंग खवळला ।। वैश्वानरा[5] गिळील काय ।। ४२ ।। मग तो श्रीनिवासाचार्य ।। बिऱ्हाडासी जाउनी सशिष्य ।। निंदा करूं लागला अवाच्य ।। पोटीं असूया धरोनी ।। ४३ ।। गुरुनिंदकां न होय सुख ।। तत्काळ पावला परम दुःख।। महापुरुषाचा धिक्कार सम्यक ।। आपणासि देख बाधतसे ।। ४४ ।। दीपतेजा पाहतां दिठी ।। असूया उपजोनियां पोटीं ।। पतंग जरी झडप घेई मोठी ।। प्राणांतिक कष्टी स्वयें होतो ।। ४५ ।। फणिराजा भद्रकाळीसी ।। बली द्यावया भरतासी ।। आणितां भद्रकाळीपाशी ।। आपण झाला बळिरूप ।। ४६ ।। श्रीकृष्णासी निंदतां शिशुपाळ ।। नाश पावला तत्काळ ।। त्यापरी आचार्यासि निंदाफळ

शिवचिदम्बर

१. काजवा २. मोठा ३. श्वान ४. सिंहाला ५. अग्नि.

|| लाधलें क्षण न लगतां || ४७ || झाली जिव्हा कुंठित || बोलणें नयेचि किंचित || सर्वेंद्रियें शक्तिविरहित || जाहली क्षणांत गुरुनिंदें || ४८ || शिष्य पाहोनि गुरुची स्थिती || विचार करुं लागले चित्तीं || आली चिदंबर निंदेची प्रतीती || पुढें याची गती बरी न दिसे || ४९ || चिदंबरासी जावें शरण || तरीच होईल बरवें जाण || ऐसा शिष्य निश्चय करोन || आले घेवोनि दीक्षिताजवळी || ५० || नमन करोनि चिदम्बरासी || विनविती सविनयेंसी || स्वामी नेणतां तुजसी || निंदिले बहुवसी आचार्यें || ५१ || तेणें जिव्हा झाली कुंठिता || अपराध क्षमा करीं जगन्नाथा || कृपा करीं यावरी आतां || शरण तत्त्वतां आलासे || ५२ || ऐकोनि शिष्यवचन || चिदम्बर बोले हांसोन || स्तुती निंदा कोणाची कोण || करूं नये जाण स्वहितार्थीं || ५३ || ऐसें असे भगवद्वाक्य || याचपरी आम्नाय[1] || नमोनि धरावे ब्राम्हणपाय || निंदावाक्य बोलों नये || ५४ || सर्व भूतांचे हृदयीं || ईश्वर वसतो सर्वांठायीं || निंदा स्तुती जो करील कांहीं || स्वयें होय फळभोक्ता || ५५ || लोकांचा स्वभावकर्म || बोलूं नये हा साधूचा नेम || गीतेमाजी मेघश्याम || अर्जुना वर्म हेंचि कथी || ५६ || स्वजिव्हेनें लोकांचे दोष || चाटूनि घेतो निंदक विशेष || म्हणोनि कोणाचे गुणदोष || शुभेच्छूनें सहसा बोलूं नयें || ५७ || आणिक एक गीतावचन || सर्वांभूतीं नारायण || एकांशें वसतो म्हणोन || श्रीकृष्णभगवान बोधितसे || ५८ || इत्यादि सर्व अर्थ जाणते || न करिती कोणाच्या निंदेतें || करितां ती पावे भगवंतातें || तेणें निजहित बुडतसे || ५९ || याकरितां कोणाचीही निंदा || करूं नये आल्याही आपदा || तैसीच करूं नये हरण संपदा || एकरूप असे श्रीहरी || ६० || देहादिबुद्धीपर्यंत || जड असे तत्त्वजात || सर्वांचा चालक निश्चित || रमाकांत एक अंतर्यामी || ६१ || याकरितां प्रयत्नें || बोलू नये निंदावचनें || सर्वांभूतीं हरिभावना करणें || चिदम्बर म्हणे हाचि तारक || ६२ || यापरी चिदम्बरबोध || ऐकोनि आचार्य विशद || पश्चात्तापें सोडोनि निंदाशब्द || चिदम्बरपदारविंद

[1]. वेद




शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

वंदिलें ।। ६३ ।। वारंवार दंडवत ।। करीत विनवी बहुत ।। नेत्रीं गहिंवर दाटित ।। कंठ सद्गदित रडतसे ।। ६४ ।। कृपा उपजोनियां पोटीं ।। दीक्षित पाहे सुधादृष्टीं ।। तंव आचार्य सावध परिपाठीं ।। पावोनि गोमटी स्तुती करी ।। ६५ ।। तव महिमा नेणें हा जड ।। स्वामी मी अज्ञ असें मूढ ।। अपराध माझा सुदृढ ।। पोटीं घाली बा तारका ।। ६६ ।। परनिंदा नित्य करून ।। बुद्धी माझी गेली नासून ।। भेदगती एवढें ज्ञान ।। मज कोठून होईल ।। ६७ ।। समर्थ आपण बोध केला ।। आजपासुनी परनिंदेला ।। सोडिली हा संकल्प याचि वेळा ।। केला दयाळा तारीं मला ।। ६८ ।। मग आचार्यावरी करी कृपा ।। भक्तकैवारी मायबाप ।। वस्त्रालंकार देऊन अमूप ।। सन्मान करी प्रीतीनें ।। ६९ ।। आचार्य घेऊनी मग निरोप ।। गेला निजघरा त्यजोनि कोप ।। सर्वांसि सांगे निजपाप ।। चिदम्बर बाप निंदूं नका ।। ७० ।। ऐसें चिदम्बरमहिमाधाम ।। सांगतां असे अनुपम ।। सर्व सांगावया क्षम ।। होय कवण महीवरी ।। ७१ ।। ज्यावरी होय चिदम्बरकृपा ।। तोचि वर्णन करील सोपा ।। शुष्कपोफळी[1] अंकुरोनि निष्पाप ।। वृक्ष अमूप जाहला ।। ७२ ।। अद्यापि तेथें तया वृक्षा ।। पूजितसे भक्त देखा ।। अनन्य भक्तांचा प्राणसखा ।। चिदम्बर सत्य जाण ।। ७३ ।। यास्तव चिदम्बर ।। चित्तीं आठवावा निरंतर ।। ध्यान पूजा नाम उच्चार ।। तेणें उद्धार होय संसारी ।। ७४ ।। चिदम्बर असतां महीवरी ।। कलियुग ही कृतापरी ।। झाले जन परोपकारी ।। सदाचारीं वर्तती ।। ७५ ।। ब्राम्हमुहूर्तीं उठोन ।। प्रातःस्नानध्यानपूजन ।। करिती चिदम्बराज्ञेवरून ।। आबालवृद्ध संतोषें ।। ७६ ।। ब्राम्हण करिती वेदपाठ ।। गुरु आज्ञापालनीं श्रेष्ठ ।। सदाचरणीं सर्व सुभट ।। करिती प्रगट शिवभक्ती ।। ७७ ।। चिदम्बरमुखें धर्मश्रवण ।। ऐकल्यापरी चित्तीं धरून ।। करितां तैसें आचरण ।। कलियुग ही कृतसम दिसे ।। ७८ ।। ऐसें असतां एके दिनीं ।। चिदम्बर प्रातर्विधी सारोनी ।। राजे द्विजांसी सर्वें घेउनी ।। सभास्थानीं पातला ।। ७९ ।। शांतमूर्ती चिदम्बर ।। सुहास्य

शिवचिदम्बर

१. सुकीसुपारी.

आम्रेडित[1] उच्चार ।। भस्म रुद्राक्ष शुभ्र वस्त्रालंकार ।। त्रिभुवन सुंदर. शोभतसे ।। ८० ।। ज्या सभेपुढें इंद्रसभा ।। पाहणारां दिसे निष्प्रभा ।। दीक्षिताचा पाहतां गाभा ।। कोटि सूर्यप्रभा ओंवाळावी ।। ८१ ।। दीक्षितेंद्र येतां सभेसी ।। सभाजन उठोनि परियेसी ।। नमन करिती साष्टांगेसी ।। विनविती हात जोडोनियां ।। ८२ । चिदम्बर बैसतां कुशासनीं ।। जन बैसती निजस्थानीं ।। चिदम्बराची अमृतवाणी ।। ऐकती प्रेमभावें ।। ८३ ।। तंव सुमंदहसित बोले दीक्षित ।। स्वधर्माचारा ऐसें सुकृत ।। नाहीं जगतीवरी किंचित ।। सर्वथा जन हो परियेसा ।। ८४ ।। एका स्थानीं बैसोनि स्वधर्म ।। आचरणारासि सर्व सुगम ।। त्यासि स्वयें मेघश्याम ।। भेटतो सप्रेम निश्चयें ।। ८५ ।। तुम्हासी तयाचा प्रत्यय ।। येथेंचि येईल निश्चय ।। व्यंकटेश सदयहृदय ।। भेटेल अवश्य येवोनियां ।। ८६ ।। तेव्हां पुसती ब्राम्हण ।। कधीं कवण रुप धरोन ।। भेट देईल नारायण ।। ही आम्हां खूण सांगा जी ।। ८७ ।। चिदम्बर सांगे खूण सर्वांस ।। अनंतरुपी जगदीश ।। पंधरावे दिवशी तुम्हांस ।। भेटेल निश्चयें ।। ८८ ।। दीक्षितवाणी परिसतां अद्‌भुत ।। जन पावोनि हर्ष बहुत ।। राहिले दिवस गणना करित ।। इष्टांसि बोलावित कितीएक ।। ८९ ।। पंधरावे दिवशी प्रातःकाळी ।। सर्व मिळाले श्रीगुरूजवळीं ।। प्रातर्विधी सारूनि भक्तमेळीं ।। बैसले सभातळीं दीक्षितेंद्र ।। ९० ।। मनोरंजक सुगोष्टी ।। सांगत असतां जगजेठी ।। व्यंकटेश आला महाद्वारानिकटीं ।। दावित परिपाठी यवनाची ।। ९१ ।। चढोनि सुंदर वाजीवरती ।। खड्ग ढाल धरोनियां हातीं ।। मस्तकीं रुगाल शोभती ।। तेज फांकत चहूंकडे ।। ९२ ।। पठाणाचें धरोनि रूप ।। दावित आपुला प्रताप ।। अश्वावरी बैसला धरोनि दिव्यरुप ।। स्वामीसि निरोप पाठविला ।। ९३ ।। उभा असे महाद्वारीं ।। स्वामीसि सांगा म्हणे झडकरीं ।। भेटीसि आलों यावें लवकरी ।। सांगा सत्वरी गुरूसी ।। ९४ ।। धावोनि येती द्वारींचे ब्राम्हण ।। विनंती करिती कर जोडून ।। महाद्वारीं एक पठाण ।। द्यावें दर्शन म्हणतसे ।। ९५ ।। आश्चर्य करिती

१. (स्पष्ट) मधुर.

पंडित ब्राम्हण ।। अविंधासि कैसें होईल दर्शन ।। स्वामी म्हणती एक कीं दोन ।। यावें पठाणा पाहोनि वेगीं ।। ९६ ।। ब्राम्हण पाहों जाती त्वरेसी ।। तों दोघे पठाण दिसती त्यांसी ।। येऊन सांगती स्वामीसी ।। उभे द्वारासी दोघे जण ।। ९७ ।। आधीं सांगती दोघे म्हणून ।। बरें पाहोनि यावें म्हणती जाण ।। दिसे पठाण एकचि ।। ९८ ।। आणिक सांगती येऊन ।। एकचि दिसतसे पठाण ।। ऐकोनि हांसती पंडित जन ।। नकळे खूण कोणासी ।। ९९ ।। स्वामी हांसोनि उठतां झडकरी ।। विप्रमंडळी येती बरोबरी ।। यात्राजनदाटी बाहेरी ।। महाद्वारीं पठाण तो ।। १०० ।। पायी चढवोनि पायमोजे ।। अंगी दुशाल मंदिल साजे ।। तिरकस कमान कंठीं शस्त्र गाजे ।। पठाण साजे दिव्यरूप ।। १ ।। रत्नखचित शोभे शिरपेंच शिरीं ।। मोतियांचा तुरा खोविला वरी ।। गळां रत्नकंठी पदक हृदयावरी ।। दिव्यांबरी शोभायमान ।। २ ।। आकर्णनेत्र सुहास्यवदन ।। स्वामीसि देखतां दुरून ।। झडकरी येतसे धांवोन ।। देती आलिंगन स्वामी त्यासि ।। ३ ।। उभयतां भेटती स्वानंदेंकरून ।। निवांत एक क्षण जाण ।। भेटी जाहलिया नसे वेगळेपण ।। अनुभव खूण बोलती ।। ४ ।। व्यंकटेश बोले कर जोडून ।। बहुतां दिवसांची भेट जाण ।। बोले फारशी भाषा आपण ।। नुमजे कोणासही ती ।। ५ ।। चमत्कार बहुत विप्रांसी ।। पडे भ्रांती तयां सर्वांसी ।। म्हणती स्वामी भेटती अविंधासी[2] ।। आश्चर्य चित्तासी वाटे तयां ।। ६ ।। उभयतां आनंदेकरून ।। चिदंबर व्यंकटेश मिळोन ।। घराशीं येता जाण ।। पाहती भक्तजन परमानंदें ।। ७ ।। कीं आले नरनारायण ।। किंवा मिळाले श्रीकृष्णार्जुन ।। नातरी सूर्यहुताशन[3] ।। येती हात धरोन म्हणतसे ।। ८ ।। कीं आले असती महीवर ।। करावया जगदुद्धार ।। लक्ष्मीश कर्पूरगौर ।। तैसे दोघे शोभती ।। ९ ।। आसनावरी बैसवोनि ब्राम्हणांसी ।। उभयतां जावोनि देवालयासी ।। भाषण करिती आनंदेंसी ।। न कळे कोणासि वृत्तांत तो ।। ११० ।। बैसले असती दोन प्रहर ।। व्यंकटेश गुप्त होती सत्वर ।। स्वामी एकलेचि आले बाहेर ।। नवल थोर सर्वांसि तें ।।

१. यवनाला २. यवनाला. ३. सूर्य व अग्नि




शिवचिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

११ ।। विप्र पुसती विनंती करून ।। कोठे गेला न दिसे तो यवन ।। स्वामी म्हणती हांसोन ।। तो व्यंकटेश जाण भ्रमूं नका ।। १२ ।। अन्यथा यवनालिंगन ।। मज कैसें घडेल जाण ।। याकरितां तुम्हांसि खूण ।। आधींच पण सुचविली ।। १३ ।। अश्वासहित गुप्त जाहले ।। तेव्हां आश्चर्य सर्वांसि वाटलें ।। ईश्वरी कौतुक देखिलें ।। अनुभवासि आलें सर्वांसि तें ।। १४ ।। ऐसे नानापरी चमत्कार ।। दृष्टी देखती लहानथोर ।। देवाधिदेव चिदम्बर अवतार ।। लीला अपार दावितसे ।। १५ ।। उघड पाहोनि सकळ जन ।। परी भ्रांतीमाजी बुडे मन ।। ईश्वरीमाया दुर्घट जाण ।। न कळे कृपेवीण ओळख ईश्वराची ।। १६ ।। जरी तो दावील आपणासि ।। तरीच कळे माया मानवासी ।। ईश्वराची विचित्र कळा ऐसी ।। म्हणोनि सांगे किंकर ।। १७ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टेल सद्‌गुरुनाथ ।। श्रवण करा भक्त समस्त ।। पंचदशोऽध्याय गोड हा ।। ११८

।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे निन्दकमदभङ्ग पठाणरुपेण व्यंकटेशसमागमःश्च नाम पञ्चदशोऽध्यायः ।। १५ ।। ओवीसंख्या ११८ ।।

।।श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

शि
व
चि
द
म्ब
र

# शिवशास्त्रिणे शिवरूपप्रदर्शनम्




जरी असे हा सदाशिव । म्यां केला असेल शिवस्तव । कर्पूरांगि शीतलत्व । येवोनिया राहो ॥

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। भक्तरक्षणार्थ जो शंकर ।। धर्मसंस्थापना महीवर ।। करावया धरितो नानावतार ।। त्या चिदम्बरा नमूं भावें ।। १ ।। मुनीश्वर म्हणे ब्राम्हणांसी ।। कर्णपुटीं पिबा हो एकोभावेंसी ।। चिदम्बरकथामृत सुरसी ।। कलिकालासी लाथ मारा ।। २ ।। चिदम्बर लीला दावितां भूतळीं ।। कीर्ति पसरली स्वर्गपाताळी ।। देवर्षि सिद्धनर नृपावळीं ।। ज्याचे पदकमळीं रमताती ।। ३ ।। मंद स्तब्ध जड मूक ।। रोगार्त पंगू आळशी देख ।। ज्याचे दर्शनमात्रे हरिख ।। ऐच्छिक सिध्दि पावती ।। ४ ।। किती एक सकाम ।। कोणी एक निष्काम ।। कोणी एक परीक्षुकाम ।। स्वकामसिद्ध्यर्थ भेट घेती ।। ५ ।। जें जें नवीन चरित्र ।। दावितसे निरंतर ।। त्याचें करावया वर्णन मात्र ।। नसे शक्त चतुर्वदन[1] ।। ६ ।। ऐसें वर्ततां एके समयीं ।। द्रविड देशीं होता महाकवी ।। शिव नामा शिवभक्त सुस्वभावी ।। शिवपूजा त्रिसमयीं करितसे ।। ७ ।। दिगंतविस्तीर्ण दीक्षितकीर्ती ।। ऐकोनि विचारीतसे चित्तीं ।। कलिकाल वर्ततां पापमूर्ती ।। कैसा गिरिजापती अवतरेल ।। ८ ।। सर्वेचि स्मरूनि गीतावचन ।। करावया धर्मसंस्थापन ।। कां अवतरों नये उमारमण ।। भक्तोद्धारण करावया ।। ९ ।। ऐसा अंतरी धरोनि संशय ।। अवतार मिथ्या किंवा सत्य ।। निघाला पहावया प्रत्यय ।। सवें बहुत शिष्य घेवोनी ।। त्याच दिवशीं सर्वांतर ।। आला स्वप्नीं चिदम्बर ।। शुभ्र वस्त्र भस्म रुद्राक्षालंकार ।। कलश धरोनि तेजोमूर्ती ।। ११ ।। स्वप्नीं विचारित तयासी ।। कोठे निघालां सांगा आम्हांसीं ।। शास्त्री म्हणे चिदम्बरदर्शनासी ।। गुरुपुरासी निघालों ।। १२ ।। मग बोले सुमंदहसित ।। पापमूर्ती असतां कलि जागत ।। कैसा अवतरेल गिरिजानाथ ।। धर्मस्थापनार्थ कीं आला ।। १३ ।। संदेह धरोनि चित्तीं ।। कां निघालासि दर्शनाप्रती ।। संशयात्म्यासी सुगती ।। होईल केउती सांगपां ।। १४ ।। ऐसे परिसोनि गुरुवचन ।। म्हणे ही माझी मनोगत खूण ।। जंव सांगतो हा ब्राम्हण ।। असे उमारमण निश्र्चयें ।। १५ ।। मनुष्यासी हृद्‌गत ज्ञान ।। कलियुगीं होईल

१. ब्रम्हदेव

कोठून ॥ मग एकोभावें गुरुचरण ॥ धरोनियां वंदितसे ॥ १६ ॥ हर्षगद्गद वाक्यें स्तोत्र करित ॥ आनंदजळें चरण क्षालित ॥ असतां शास्त्री प्रेमळ भक्त ॥ आलिंगी त्यासी उठवोनी ॥ १७ ॥ मग सप्रेमें बोलिला दीक्षित ॥ मीच जाण शंकर निश्चित ॥ कलीमाजी जन झाले पापाक्रांत ॥ धर्मस्थापनार्थ अवतरलों ॥ १८ ॥ इतुक्यांत द्विज होवोनि जागरुक ॥ विचारितां स्वप्न सम्यक ॥ शिवालिंगन स्मरोनि देख ॥ सुखसागरीं बुडाला ॥ १९ ॥ चिदम्बरीं विश्वास ठेवून ॥ करितसे स्वप्नरूप ध्यान ॥ आनंदें पातला देवपट्टण ॥ प्रेमें भजन करीत ॥ २० ॥ तेथेंही पाहतां चिदंबर ॥ दिसे स्वप्नमूर्तीच साचार ॥ दूरूनि पाहतां सर्वांगें नमस्कार ॥ करीत जवळीं पातला ॥ २१ ॥ हात जोडोनि सद्गुरूकडे ॥ जंव पाहे शास्त्री पुढें ॥ तेज फांके चहूंकडे ॥ वामांगी गिरिजा शोभत ॥ २२ ॥ भुजंगभूषण पंचवदन ॥ गजचर्म उत्तरीय जाण ॥ व्याघ्रचर्माचें परिधान ॥ साजे त्रिलोचन नीलकंठ ॥ २३ ॥ जटाधारी भस्मभूषित ॥ रुद्राक्षमाला कंठी शोभत ॥ नंदिवाहन शोभे शांत ॥ शिरि वाहत गंगामाता ॥ २४ ॥ ऐसें पाहोनि शिवरूप ॥ शास्त्र्यासि हर्षें सुटला कंप ॥ म्हणे तारीं तारीं मायबाप ॥ नमूनि अमूप स्तवितसे ॥ २५ ॥ आनंदगद्गदवाचें ॥ शोभतसे अंगी रोमांचे ॥ म्हणे जन्म सफळ आमुचें ॥ कोटि जन्मांचें सुकृत फळलें ॥ २६ ॥ योगियांसी जो दुर्लभ ॥ तो साक्षात् भेटला स्वयंभ ॥ धन्य धन्य होवोनि मी अदंभ ॥ नमितो सांबा पदकमळीं ॥ २७ ॥ दयासमुद्रा पापहारका ॥ दुस्तरभवतापसंहारका ॥ भक्तांसी होशीं भवतारका ॥ दीनांचा प्राणसखा होईं ॥ २८ ॥ लोकोद्धारार्थ धरूनि अवतार ॥ शरणागतांचें करिशी दुःख दूर ॥ दयाळा करीं माझी चिंता दूर ॥ चिदंबरा प्रसन्न होईं ॥ २९ ॥ अगा महात्म्या साधुरक्षका ॥ निजभक्तांसी वृक्षकल्पका ॥ दयाळू बा पाळिसी नामचिंतकां ॥ जगन्नायका प्रसन्न होईं ॥ ३० ॥ प्रसन्न होवोनि स्वप्नीं सर्वेशा ॥ आतां कां धरिशी आळसा ॥ प्रसाद देवोनि माझी आशा ॥ भक्तवत्सला पुरवीं वेगीं ॥ ३१ ॥ अपराधी मी कुटिल ॥ गर्विष्ठ पापी प्रांजळ ॥ तरी भक्त म्हणोनि दयाळा ॥ पाहें कनुवाळा कृपाकटाक्षें ॥ ३२ ॥ उष्णें

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

पीडितासी मेघ जैसे ।। बुडतां समुद्रीं जहाज जैसें ।। आडरानीं जाणारा मार्ग मिळे तैसें ।। मज अनाथामिषें पावलासी ।। ३३ ।। मजकडे पाहत पद्मनयनें ।। आदरें भाषसी ज्या कारणें ।। अभय वचन देईं तेणें ।। जगदुद्धरणा स्वामिराया ।। ३४ ।। स्वप्नीं माझा संशय हरावया ।। वांच्छापूरक सांब मीच सखया ।। माग वर जो इच्छिसी या समया ।। तो देतों ऐसें बोलिलासी ।। ३५ ।। जैसी वाणी तैसी क्रिया ।। करूनि दावीं स्वामिराया ।। दूर करीं मोहमाया ।। शरण तव पाया आलों ।। ३६ ।। ऐशी ऐकुनी कविस्तुती ।। स्वामी हर्ष पावोनि चित्तीं ।। सर्वेचि मनुष्यरूप धरोनि प्रीती ।। म्हणे शिव पंडितासी ।। ३७ ।। स्थान आपुलें असें कोठें ।। येथुनी पुढें जातां कवण्या वाटे ।। माझे सुकृत होते म्हणूनि मोठे ।। स्वयें दर्शन दीधले ।। ३८ ।। ऐकुनी चिदंबरवाणी ।। कवीश बोले गर्जोनी ।। आपण सर्वज्ञ असोनी ।। कां मज वंचोनि पुससी बा ।। ३९ ।। लोकनिमित्तें मज पुससी ।। सांगतो ऐक तूं विश्वेशी ।। मी असें पूर्वदेशनिवासी ।। चरणसेवेसी आलों येथें ।। ४० ।। क्षुधातुरासी पक्वान्न मिळतां ।। कां सोडील अवचिता ।। मुमुक्षूसी मोक्ष लाधतां ।। कां तत्त्वतां सांडील ।। ४१ ।। नातरी परम व्याधिष्ठ । पावोनी भिषग्वरिष्ठ ।। आव्हेरोनी सोशील का कष्ट ।। सांग विष्पष्ट स्वामीराया ।। ४२ ।। रंकासी सिंहासन ।। मग करील काय भिक्षाटण ।। तैसे मज मिळतां गुरुचरण ।। कोठें येथूनि जाऊं देवा ।। ४३ ।। चरणांबुज सोडोनि अन्यत्र ', कोठेंही याउपर ।। गमन न करीं बा साचार ।। भ्रमर होवोनि राहीन ।। ४४ ।। मोहकल्लोलें दुस्तरीं ।। बुडालों संसारसागरी ।। सुतदारादि जळचर भारी ।। परोपरी गांजताती ।। ४५ ।। मी असें पतित सद्गुरुनाथा ।। मज उद्धरी अनाथनाथा ।। पतितपावना कृपावंता ।। माता तूं मज दीनाची ।। ४६ ।। कवीचें प्रेमयुक्त भाषण ।। परिसोनि चिदंबर संतोषला जाण ।। मग अमृतवाचें करून ।। बोलता झाला परियेसा ।। ४७ ।। ज्यापरी माझें स्तवन करिशी ।। तैसा प्रार्थी महेशांसी ।। तो तुझिया मनोरथासी ।। पूर्ण निश्चयेंसी करील ।। ४८ ।। मी कोण मानव पामर ।। देऊं शकें तुजला वर ।। सभेमाजी ऐसा सर्वेश्वर ।। बोलिला निर्धार कवींसी ।। ४९

शिवचिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

।। एकांतीं बोलावोनि शास्त्र्यासी ।। माझें स्तोत्र करीं बहुवसीं ।। मी असें शंकर निःसंशयेंसी ।। तूं भक्त अससी प्रेमळ माझा ।। ५० ।। ऐसें सांगोनि चिदंबर ।। पातला अनुष्ठानासि होममंदिर ।। शास्त्री आरंभी प्रौढार्थ स्तोत्र ।। रसभरित नानावृत्तें ।। ५१ ।। गीतकवच नामसहस्त्र ।। हृदयभक्तानंदाभिद स्तोत्र ।। पंचरत्न चिदंबरपर ।। रचिलें शिव पंडितें ।। ५२ ।। ऐसें स्तोत्र रचोनी ।। आला सभेसी दुसरे दिनीं ।। पाहतां चिदंबरासी दुरूनी ।। दिसे सूर्यापरी तेजस्वी ।। ५३ ।। सभोंवतीं विद्वज्जन ।। दिसती शोभायमान ।। मध्यें घालोनि सुखासन ।। बैसलासे चिदंबर ।। ५४ ।। तारागणांमाजी[1] कीं चंद्रमा ।। कीं देवगणांमाजी पुरुषोत्तम ।। सिद्धांमाजी शैवधाम ।। तैसा नरोत्तम दीक्षित शोभे ।। ५५ ।। वंदोनि चिदंबरपदारविंद ।। चित्तीं आठवोनि आनंदकंद ।। हात जोडोनि प्रेमानंद ।। स्तोत्र विशद आरंभिलें ।। ५६ ।। सभाजन आनंदे असतां ऐकत ।। चिदंबर बोलतसे हंसत ।। शिवस्तुतीसी आज्ञप्त ।। अश्राव्य नृस्तुती[2] केलीसे ।। ५८ ।। मग म्हणे हंसत भक्त प्रेमळ ।। गुरुजी हें शिवस्तोत्र रसाळ ।। केलें असें स्मरूनि पदकमळ ।। यासि नृस्तुती न म्हणावी ।। ५९ ।। एतद्विषयीं सभासद हो ।। प्रत्यय दावितों पहा हो ।। सांबस्तुती जरी ही असेल शिवा ।। पूर्ण करो प्रतिज्ञा माझी ।। ६० ।। एक करितों प्रतिज्ञा ।। ऐका जन हो सुज्ञा ।। तळहातीं ठेवूनी कर्पूर सर्वज्ञा ।। आरती मी आरंभितों ।। ६१ ।। जरी असे हा सदाशिव ।। म्यां केला असेल शिवस्तव ।। कर्पूराग्नि शीतलत्व ।। होवोनियां राहो ।। ६२ ।। ऐसें म्हणोनि कर्पूरखंड ।। हाती घेवोनिया उदंड ।। पेटवोनि दीप प्रचंड ।। शिवस्तव आरंभिला ।। ६३ ।। मुखें म्हणे भक्तानंदलहरी ।। नेत्री वाहतसे आनंदवारी ।। करुणा भाकितसे परोपरी ।। एवं मुहूर्तपर्यंत ।। कर्पूराग्नी हातीं जळत ।। व्यथा न लागतां किंचित ।। झाला शांत कृशानू[3] ।। ६५ ।। सभाजन होती तटस्थ ।। आंगी रोमांच निघती अद्‌भुत ।। काय आश्चर्य वर्तलें म्हणत ।। तुकविती माथा आदरें ।। ६६ ।। चिदम्बर असे सदाशिव ।। हाचि होय भक्त शैव

शि
व
चि
द
म्ब
र

१. नक्षत्रसमूहामध्ये. २. नरस्तुति. ३. अग्नि.

शि
व
चि
द
म्ब
र

|| आज प्रगटला चिदम्बरवैभव || अभूतपूर्व म्हणोनि स्तविती || ६७ || कितीएक नमस्कारिती || कितीएक भावें स्तविती || जयजयकारे गर्जती नाचती आनंदे कितीएक || ६८ || प्रत्यक्ष पाहणारासी चरित्र || त्या दिवशी आनंदपूर || वाहीले ते सर्व सविस्तर || कोण चतुर वर्णू शके || ६९ || ज्यासी प्रसन्न सदाशिव || त्याचें कवण वर्णी दैव || नित्य सेविती आनंदमेव || चिदम्बरसेवाफळ ऐसें || ७० || अति वात्सल्यें उठाउठी || शास्त्रियासी धरोनि पोटीं || मस्तक आघ्राण करोनि जग्‌जेठी || पाठी थोपटी वरद हस्तें || ७१ || पुरे पुरे वत्सा साहस || किती करिसी अशक्य पाहवयास || मीच असे सत्य महेश || शिवस्तवचि केलेसी || ७२ || कर्पूर शांत करोनि हातींचा || चिदम्बर बोलितसे मधुर वाचा || वर माग जो मनीं साचा || होशी शिवाचा प्रेमळ भक्त || ७३ || तुझिया भक्तीसी झालों प्रसन्न || वर माग गा परिपूर्ण || दुर्लभ जरी मागसी जाण || शिवासी मागोनि देतों सत्य || ७४ || ऐशी परिसोनि सद्‌गुरुवाणी || शास्त्री हर्षे उठोनी || प्रेमभक्तीनें वंदोनी || हात जोडोनि प्रार्थितसे || ७५ || अगा भवतारका चिदम्बरा || नेघें मी वैषयिक वरा || विषयसंगें मद्यपीपरी सर्वेश्वरा || तुझा विसर पडतसे || ७६ || वर देशी जरी मजला || तव पदीं भक्ति देईं प्रेमला || कैशी असे तुझी भक्तिलीला || ती मजला निरोपावी || ७७ || प्रसन्न होई मज शंकरा || संसारभय निवारीं अघोरा || भक्ती कैसी असे दातारा || मज तारका निरोपीं बा || ७८ || मग बोले चिदम्बर || भक्तिमार्ग तुज सांगतों निर्धार || श्रवणमात्रें पापीही नर || मुकतो संसारसागरा || ७९ || आधीं वेदोक्त कर्माचरण || करूनि करावें मदर्पण || सर्वदा मन्नाम संकीर्तन || करावे पूजन माझें प्रेमें || ८० || प्रत्यहीं करावे मत्कथाश्रवण || एकाग्रभावें माझे ध्यान || सर्वांभूतीं एकचि देव म्हणोन || लीन असावें सर्वांभूती || ८१ || भक्तिवृद्धी व्हावया || चोवीस गुण शिष्यराया || आहेत तुज या समया || ऐक सांगतों एकचित्तें || ८२ || दुसऱ्याकडूनि मान || कदापि इच्छूं नये जाण || दुजियासी द्यावा सन्मान || कालानुरूप अवश्य || ८३ || कर्माचरण प्रतिष्ठार्थ || करुं नये बा दंभार्थ || कृत कर्म

शि
व
चि
द
म्ब
र

लौकिकार्थ ।। सांगूं नये देवभक्तें ।। ८४ ।। क्रोध नसावा कवणे काळीं ।। आर्जव असावें सर्वांजवळी ।। दक्षता राखावी क्रियावेळीं ।। मनीं निर्मळीं स्थिरता धरीं ।। ८५ ।। शिवभावना सर्वांभूतीं ।। कृपालुता असावी त्यावरती ।। अंतर्बाह्य शुची सत्यव्रती ।। करीं मती इंद्रियनिग्रहीं ।। ८६ ।। हनन करूं नये प्राणिमात्रांचें ।। सहन करावें परापराधाचें ।। कल्याण चिंतावें निंदकांचें ।। शांती अंतरींची ढळूं नेदीं ।। ८७ ।। स्त्रियांचा संग सोडावा ।। आदरें साधुसंग धरावा ।। सदा एकांतवास असावा ।। सदा ध्यावें माझें रूप ।। ८८ ।। देह समर्पावा दास्यभावें ।। गुरुभक्तीसी सादर असावें ।। आलस्य देशोधडी दवडावें ।। मत्सेवार्थ इंद्रिये हालवावीं ।। ८९ ।। यापरी चोवीस गुण ।। अमानित्वादि[1] नेम धरून ।। जो अभ्यासी त्याचे हृदयीं मी पूर्ण ।। गृह करोनि वसतों सत्य ।। ९० ।। बहुत काळ योगी शिणती ।। नाना मार्गीं मज धुंडिती ।। मी नातुडें[2] त्यांचे दृष्टिपथीं ।। मत्प्राप्तीची रीति सांगतों ।। ९१ ।। निरपेक्ष म्हणजे अपेक्षारहित ।। मजवांचूनि सर्व विषयजात ।। ज्यासी दिसे वमनवत ।। स्वरूप माझें मिळे त्यासी ।। ९२ ।। सोडोनि सर्व तळमळ ।। सदा माझा विचार केवळ ।। ऐसा जो मननशील ।। तो मत्प्राप्तीसी समर्थ ।। ९३ ।। तिजा गुण शांति संज्ञक ।। शांती म्हणजे समाधान ऐक ।। दुर्धर समय आला तरी देख ।। देहदुःख नाठवी चित्तीं ।। ९४ ।। चौथा असे गुण निर्वैर ।। दुसऱ्याचे गुणदोषविचार ।। करूं नये तावन्मात्र ।। सर्वात्मभावें असावें ।। ९५ ।। पांचवा असे थोर गुण ।। ज्यासी म्हणती समदर्शन ।। ब्रम्हसमत्वें प्राणिमात्रीं परिपूर्ण ।। भेदभान[3] नाही ज्याचे ठायीं ।। ९६ ।। या पंचगुणात्मक जो पुरुष ।। त्याचें आलिंगन घ्यावयास ।। धुंडाळितसे मी त्यास ।। सर्वांठायी जाण पां ।। ९७ ।। सर्व असे मज सुलभ ।। पंचगुणात्मक भक्तलाभ ।। मज ही मिळवाया दुर्लभ ।। भक्तांसाठी मी जन्म घेतों ।। ९८ ।। धर्महानी होतां युगयुगीं ।। उंच नीच न विचारितां जगीं ।। नाना अवतार घेवोनि राजयोगी ।। धर्मस्थापना करितों मी ।। ९९ ।। स्वानंदरूपें मी संतुष्ट ।। तेजोरूप असंग अद्वयनिष्ठ[4]

१. अहंकारादि. २. सापडत नाही. ३. भेदबुध्दि. ४. अव्दैतरूप.

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

॥ निर्गुणसुख भोगावया स्पष्ट ॥ द्विधा झालों देवभक्तरूपें ॥ १०० ॥ म्हणोनि निष्काम भक्ती ॥ मजला देतसे प्रीती ॥ ब्रम्हाविष्णवादि देव नावडती ॥ निष्काम भक्त आवडे जैसा ॥ १ ॥ माझें हृद्‌गत जाणोनि ॥ जे तत्पर माझे भजनीं ॥ त्यासी मी वश दिनरजनी ॥ सांगतों ऐक एकाग्रचित्तें ॥ २ ॥ विषयांतुनि सोडवोनि चित्त ॥ स्मरोनि रूप माझें सर्वगत ॥ अहंकारासि नातळत ॥ मजला सतत स्मरण करी ॥ ३ ॥ एकाकी जात असतां रानीं ॥ व्याघ्र पाहतां दुरोनी ॥ आक्रंदतसे भिवोनी ॥ निर्लज्ज होवोनि ज्यापरी ॥ ४ ॥ तैसी सांडोनि लोकलज्जा ॥ मृत्युव्याघ्रभयहरकाजा[1] ॥ करुणास्वरें आळवी प्रताप माझा ॥ त्यासी मी सदा रक्षितों ॥ ५ ॥ त्याची सर्व विपत्ती ॥ दूर करितो जाण निश्चिती ॥ त्याचा पाठिराखा मी उमापती ॥ तुझी आण सांगतों सत्य ॥ ६ ॥ सर्व भार सहन करितों ॥ करुणास्वर ऐकतां गडबडतों ॥ जेथें भक्त तेथें धांवत येतों ॥ भक्तांचे पुरवितों मनोरथ ॥ ७ ॥ भक्तांचा ऐकतां करुणास्वर ॥ माझाही मला पडतो विसर ॥ शिरीं घेवोनि त्याचा भार ॥ नाचतों निर्धार प्रेमानंदे ॥ ८ ॥ अगा कविराया ऐक याचा हेतु ॥ नृजन्म दुर्लभ चौऱ्याऐशींत तूं ॥ सर्व भोग भोगावया निश्चितू ॥ कवीशा जाण हेंचि मुख्य ॥ ९ ॥ दुर्लभ लाधोनिही नरदेह ॥ सोडोनि सर्व संगमोह ॥ यदर्थ तुच्छ करोनि देह ॥ मज भजतो पहा रात्रंदिन ॥ ११० ॥ त्याला मी तैसाच होवोन ॥ सांभाळितों रात्रंदिन ॥ त्रिवाचा सांगतों सत्य जाण ॥ त्यावीण नेघें मी आन सुख ॥ ११ ॥ बहुत बोलणें कशासाठीं ॥ हीच असे माझी गुह्य गोष्टी ॥ भक्तांविण मज काळ न कंठी ॥ तयांविणें शून्य वाटे ॥ १२ ॥ मी असें भक्ताधीन ॥ नाना अवतार घेतों भक्तांकारण ॥ भक्तेच्छा करावया पूर्ण ॥ लहानपण स्वीकारितों ॥ १३ ॥ अर्जुनाचे घोडे धुतले ॥ द्रौपदीचे जोडे राखिले ॥ जनीसंगें दळण दळिलें ॥ उच्छिष्ट खादलें नामयाचें ॥ १४ ॥ एकनाथाचे घरीं ॥ राबलों सेवकापरी ॥ त्याचपरी बहु भक्तांघरीं ॥ नानापरी काम केलें ॥ १५ ॥ याकरितां माझें वचन ॥ अंतरीं

शिवचिदम्बर

१. मृत्युरुपी वाघाचे भय दूर होण्याकरितां.

दृढ धरून ।। भक्तिमार्गाचें आचरण ।। स्वयें आचरून लोकां बोधीं १६ ।। तूं असशी माझा भक्त वरिष्ठ ।। तुझे वचनीं जो राहील एकनिष्ठ ।। त्याचे दूर करितों मी कष्ट ।। भक्तवर्या गोष्ट सत्य सत्य ।। १७ ।। त्वां जें रचिलें माझें स्तोत्र ।। तें पढतील जे नर ।। त्यांची कामना जरी दुष्कर ।। पुरवितों निर्धार जाण पां ।। १८ ।। प्रतिदिनीं भक्तानंदलहरीपठण ।। करणारास देतों निजानंद पूर्ण ।। कलिबळें भक्तिमार्ग झाले लीन ।। तदर्थ जाण अवतार माझा ।। १९ ।। ऐसें सांगुनी भक्तासी ।। निरोप देउनी परियेसी ।। चिदंबर गेले अनुष्ठानासी ।। गुरूपदेशें सिध्दझाला ।। १२० ।। सुलभ असे चिदंबरकृपा ।। स्मरणमात्रें जाळितो पापा ।। भजणारासी मार्ग सोपा ।। सांगतों जपा चिदंबरनाम ।। २१ ।। ज्यासी असे इहपर चाड ।। त्याणें करावी चिदंबरजोड ।। तेणें होय प्रपंच गोड ।। म्हणे चिदंबरकिंकर ।। २२ ।। स्वस्ति श्रीचिदबरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्‌गुरुनाथ ।। म्हणूनी ऐका श्रोते समस्त ।। षोडशोऽध्याय गोड हा ।। १२३ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे शिवशास्त्रिणे शिवरूपप्रदर्शनपूर्वकवरप्रदानं नाम षोडशोऽध्यायः ।। १६ ।। ओवीसंख्या १२३ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।



शिवचिदम्बर

## व्याघ्ररूपेण चोरमारणम्




ऐसी विप्र करिता प्रार्थना । कृपाळू आला दीक्षितराणा । व्याघ्ररूपें दुष्टसंहरणा । करितसे गर्जना भैरनादें ॥

शि व चि द म्ब र

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। नमो चिदबंरा भक्तकैवारी ।। बुद्धिप्रकाशा शुभ्रवस्त्रधारी ।। अमृतपूर्णकलश धरोनि करीं ।। जगदुद्धारी वर्तसी जगीं ।। १ ।। सर्वांचे अंतरीं तुझा वास ।। सर्वत्र पूर्ण अससी चित्प्रकाश ।। माझे हृदयीं करोनि वास ।। ग्रंथसुरस वदवीं बा ।। २ ।। मी अत्यंत असे जड ।। तू नाचविसी जड मूढ ।। ग्रंथकर्ता तूंचि दृढ ।। भक्तांचे लळे पुरविशी तूं ।। ३ ।। स्मरणमात्रें सर्व सिद्धि।। देशी दयाळा त्रिशुद्धी ।। भजकांसि देऊनि सद्बुद्धि ।। बैसविशी आधीं निजपदीं ।। ४ ।। सर्वेच्छापूरका तुजसी ।। हिंडतां ब्रम्हांड गोल विशेषीं ।। उपमा न मिळे हृषिकेशी ।। तुज साम्य कोंणासी देऊं आतां ।। ५ ।। ज्ञान औदार्य दातृत्व ।। कौशल्य धैर्य प्रियवक्तृत्व ।। हे तुझे ठायीं जैसें पूर्णत्व ।। तैसें त्रिभुवनींही न दिसे ।। ६ ।। अगा पूर्णब्रम्हा चिदंबरा ।। सर्वदेवमया सर्वेश्वरा ।। तुज वर्णावयां श्रुतीसि थारा ।। नसतां निर्धार मौनावल्या ।। ७ ।। शक्त होईल कोण मानव ।। जेथं वेद धरिती मूकभाव ।। तथापि धरूनि भक्तिभाव ।। किंचिद्वर्णिता तुष्ट होशी ।। ८ ।। जरी पंडित होय जनक ।। बाळाचें अबद्धकलभाषण निक ।। ऐकतां जैसा पावे हरिखं ।। तैसा तूं देख हर्ष पावशी ।। ९ ।। नातरी गुणनिधी तूं कोठें ।। आणि मी मंद मूढ कोठें ।। सिंधूल्लंघनी मशक[1] जैसा झटे ।। तैसें असें खोटें साहस माझें ।। १० ।। पूर्ण करीं माझे साहस ।। क्षमा करीं अपराधास ।। चिंतितार्थप्रद तूं असतां आम्हास ।। भय कायसें चिदंबरा ।। ११ ।।मुनि म्हणे ब्राम्हण हो ऐका ।। गुरुचरित्र विचित्र देखा ।। श्रवणमात्रें सावित्रीसखा ।। निजभजकां देतो आनंद ।। १२ ।। प्रत्यहीं याचक प्रेमळ ।। येती चिदंबराजवळ ।। दर्शनमात्रें मनोगत सफल ।। पावोनि सकळ जाती स्वमंदिरा ।। १३ ।। ऐके दिवशीं अकिंचन ।। आला गुरुजवळी ब्राम्हण ।। त्यासी पाहोनि दीक्षितराण ।। करी प्रश्न सुमंद हासें ।। १४ ।। इच्छा काय धरोनि मनीं ।। आलासि विप्रशिरोमणी ।। सांग मजलागीं याच क्षणीं काय ।। मनीं वसे मागणें ।। १५ ।। विप्र ऐकोनि गुरूवचन ।। पावला मनीं

शि व चि द म्ब र

........................

१. चिलट

समाधान ।। वंदन करी भाव धरून ।। सविनयें जाण प्रार्थितसे ।। १६ ।। स्वामिराया ऐक माझी गोष्ट ।। दारिद्र्ये पावलो बहुत कष्ट ।। घरीं असे कुटुंब अचाट ।। पोसावया करंट[1] थकलों मी ।। १७ ।। प्रतिदिनीं पोटभरी अन्न ।। बालकांसि दुर्लभ असें जाण ।। ऐसें माझें भाग्य हीन ।। विवाहादि कारण पुढें कैसें ।। १८ ।। ऐसा तळमळत असतां मनीं ।। कल्पवृक्षा ऐसा तूं अवनीं ।। दीनदयाघन अससी म्हणोनी ।। ऐकिलें श्रवणीं यश तुझें ।। १९ ।। शरण आलों तव पदकमळा ।। सर्वज्ञा जाणसी तूं दयाळा ।। तारि मज दीनासी कनुवाळा ।। माझी हळहळ सोडवीं बा ।। २० ।। ऐशी ब्राम्हणाची दीन वाणी ।। ऐकूनी तुष्टला कैलासधनी ।। म्हणे चिंता सोडी आजपासुनी ।। हर्षे येथें प्रसांद घेईं ।। २१ ।। ऐसें चिदम्बरवाक्य परिसतां ।। विप्र विसरला सर्व चिंता ।। आला स्नान करोनि तत्त्वतां ।। बैसला पंक्तींत भोजनार्थ ।। २२ ।। प्रसादान्न जेविला यथेच्छ ।। ज्या अन्नाची रूची पाहतां स्वच्छ ।। देव म्हणती यापुढें सुधा तुच्छ ।। सेवितां निरिच्छ होतो मनुज ।। २३ ।। यापरी जेवुनी ब्राम्हण ।। आला चिदम्बरासन्निधान ।। स्वामी त्यासी बोलावून ।। एकांतस्थाना पातले ।। २४ ।। ऐका भूसुरा माझें वृत्त ।। मी असें गरीब द्विज निश्चित ।। जें का देईन तव हितार्थ ।। तें स्वगृहाप्रत भावें नेई ।। २५ ।। ऐसें सांगोनि त्याचे पदरीं ।। मृत्तिकाराशी घालोनि झडकरी ।। गांठ मारोनि सदृढ त्यावरी ।। म्हणे निजघरीं गांठ सोडीं ।। २६ ।। विश्वास ठेवीं माझे वचनीं ।। पाहें ठेउनी निज सदनी ।। ऐशी पाळिशी जरी माझी वाणी ।। कल्याण झाली पावशी ।। २७ ।। ऐसे सांगोनी ब्राम्हणासी ।। पाठविला निज सदनासी ।। जातां मार्गी तो अविश्वासी ।। दुर्दैवे मानसीं चिंतितसे ।। २८ ।। जन म्हणती दीक्षित दानशौड ।। काय मज दिधलें मृत्खंड ।। येणें मज मिळेल संपत्ती उदंड ।। दारिद्य प्रचंड निवारेल ।। २९ ।। येणें एक मज मिळेल फळ ।। भार वाहे शिरोदुःख केवळ ।। या वेगळें दुसरें फळ ।। काय तिळभर मिळेल ।। ३० ।। ऐसे दुर्विचार करोनि मनीं ।। अर्धमार्गी ग्रंथी उकलोनी

१. दरिद्री.




शिवचिदम्बर

शिव चिदम्बर

|| पाहतां प्रगटे गुरुची करणी || तों अर्ध सुवर्ण अर्ध माती || ३१ || पाहतां विप्र मनीं दचकला || रोमांच भरलें सर्वांगाला || स्वामीनें पूर्ण अनुग्रह केला || मध्यें अडविलें दुर्दैवें माझे || ३२ || मज झाला नाहीं विश्वास || स्वामीनें सांगितलें मज विशेष || बळाचार असतां माझे दुर्दैवास || होईल कैसें सुख मजला || ३३ || गुरूनें माझें दारिद्र्यवन || अनुग्रहकुठारें छेदिलें पूर्ण || दुर्विचारवृष्टि बळें आणवून || मागुती वन वाढविलें मीं || ३४ || दयाघन धन्वंतरी || मात्रा देतां सर्वामयहरी[1] || अपथ्यें मरे मूढ ज्यापरी || त्याचपरी मज घडलें || ३५ || घरीं कामधेनू येतां || ओढाळ गाय म्हणोनि न पुसतां || बाहेर दवडिली हाणोनि लाथा || त्यापरी मज घडलें || ३६ || कल्पवृक्षांकुर निघतां अंगणीं || कीं उपटिला हिंगण म्हणोनी || चिंतामणी लाधतां कांच म्हणोनी || कीं टाकोनि दिधला उकिरडीं || ३७ || दयासागरा चिदम्बरा || दीननाथा करुणासागरा || माझी दुष्कृती क्षमा करा || मी अपराधी खरा स्वामिराया || ३८ || मागुती बांधोनि गांठोडी || शिरी घेवोनि धडपुडी || गुरुपद पहावया तांतडी || मार्गे चालिला धांवत || ३९ || शंकरा म्हणोनि श्वास सोडित || शिव शिव ऐसें उच्चारित || सुंदरांघ्री दावीं सत्वर म्हणत || गुरुपुराप्रत पातला || ४० || सत्वर येवोनि गुरुचरणीं || साष्टांगें वंदन करोनी || विप्र विनवी उभा राहोनी || दयाळा तारीं म्हणतसे || ४१ || तंव पुसे चिदंबर || क्षेम कीं द्विजा सर्वत्र || हर्षे जावोनि मागुती सत्वर || कां आलासी सांग पां || ४२ || ऐसें ऐकतां गुरुवचन || रोमांच भरलें सर्वांगीं जाण || बाष्पें भरले दोन्ही नयन || अर्धाक्षरें बोलतसे || ४३ || सर्वज्ञा शंकरा करुणाकरा || असें मी अविश्वासी दुष्ट खरा || तारीं तारीं मज सर्वेश्वरा || निघालो यमपुरा स्वकर्मे || ४४ || दूर्दैवें करूनि दुष्ट कल्पना || आपुले नासिका छेदुनी जाणा || दुज्या करावया अपशकुना || प्रवर्ते त्यापरी झालों मी || ४५ || स्वहस्तें दगड पायावरी || घालोनि अगा भक्तकैवारी || अपराध दुसऱ्यावरी || ठेवणारापरी मी झालों ||

१. सर्वरोग हरण करणारी

शिव चिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

४६ ॥ मज्ञवरी अनुग्रह करोनी ॥ दिलीसी मृत्तिका बांधोनी ॥ मध्यें मोहें मज आडवोनी ॥ अर्धमार्गी ग्रंथी मोचिली ॥ ४७ ॥ तंव पाहिली अर्ध माती देख ॥ अर्ध झालें होतें कनक[१] ॥ तें पाहतां पावलों हरिख ॥ तव पादुका पहावया आलों ॥ ४८ ॥ उल्लंघन केली तव आज्ञा ॥ हाचि अपराध माझा सुज्ञा ॥ क्षमोनि मजवरी सर्वज्ञा ॥ करीं कृपा दयासिंधू ॥ ४९ ॥ दीक्षित ऐकोनि विप्रभारती[२] ॥ तूं मोठा भाग्यवान म्हणती ॥ दिली असतां ही माती ॥ बावन्नकशी झालें कनक ॥ ५० ॥ यत्नें सांभाळी कनक ॥ कोणासी कळू नेदीं कौतुक ॥ घेवोनि जाई सम्यक ॥ विवाहादिक कार्य साधी ॥ ५१ ॥ निघतां विप्र विनवितसे ॥ सुवर्ण दिलेंसी जैसें ॥ मार्गी सांभाळा मज तैसें ॥ भय असे द्रव्यप्पाशीं ॥ ५२ ॥ स्वामी म्हणे विप्रालागुन ॥ शंकर असे भयकृद्भयनाशन ॥ जाईं द्विजेंद्रा निर्भयेंकरुन ॥ म्हणोन तया बोळवितसे ॥ ५३ ॥ ब्राम्हण प्रयाण करितां पुढें ॥ अर्ध मृत्तिकेचें सुवर्ण रोकडें ॥ जाहले ऐसी चहूंकडे ॥ वार्ता प्रचंड फांकली ॥ ५४ ॥ दोघे चोर ऐकुनी हे वृत्त ॥ ब्राम्हणाचें संगी होवोनि वाटेंत ॥ चालले चिदंबरमहिमा वर्णित ॥ तुष्टला संगती मिळतां द्विज ॥ ५५ ॥ बकध्यान जैसें मीन खावया ॥ व्याधा गायन मृग मारावया ॥ मार्जार बैसे उंदीर धरावया ॥ तैसा तयांचा कपट संग ॥ ५६ ॥ या कलियुगीं कपटी जन ॥ करावया शिष्यवित्तापहरण ॥ वाचें बोलती वेदांतवचन ॥ त्यापरी संग दारुण द्विजाते ॥ ५७ ॥ पुढें जातां अरण्य घोर ॥ लागतां दोघेही तस्कर[३] ॥ प्राण घ्यावया आले सत्वर ॥ नग्नशस्त्र धरोनियां ॥ ५८ ॥ आतां कोठें जाशी पळोन ॥ थांब म्हणती द्विजाकारण ॥ दोघेही त्याचे हात धरोन ॥ घेतला सुवर्णभार वेगें ॥ ५९ ॥ मग उचलोनियां शस्त्र ॥ हालविती वारंवार ॥ शस्त्र पाहोनि थरथर ॥ कांपतसे विप्र मृत्युभयें ॥ ६० ॥ विप्र आक्रंदोनि बहुत ॥ चोरांचे पाय वेगें धरित ॥ विनवितसे जोडोनि हात ॥ सोनें घ्या निश्चित मज सोडा ॥ ६१ ॥ विप्र विनवी बहुवसी ॥ जीवदान द्यावें मजसी ॥ ते म्हणती कळेल स्वामीसी

शि
व
चि
द
म्ब
र

१. सुवर्ण २. विप्रवाणी ३. चोर

|| जीवें तुजसी मारितां बरें || ६२ || स्वामीस कळतां हे वृत्त || त्यासी वश असे महीनाथ || मग होईल आमुचा घात || वधचि उचित यास्तव तुझा || ६३ || ऐसें ऐकुनी तस्करवचन || विप्र भ्याला फार जाण || म्हणे कोणासही हें वर्तमान || कळूं न देईन जाण सत्य || ६४ || जीवदान द्यावें आम्हांसी || येऊं दे करुणा चित्तीं तुम्हांसी || म्हणोनि पाय धरोनि त्यांसी || सर्व देवांची शपथ वाहे || ६५ || तरी त्यांस न ये करुणा || निर्बंधें झटताती द्विजहनना || एकानें धरोनी राहतां ब्राम्हणा || दुजा शस्त्र तीक्ष्ण उचलितसे || ६६ | विप्र आक्रंदोनि बहुत || म्हणे मी झालो तृषाक्रांत || पाणी पाजवोनि करावा घात || जोडोनि हात विनवितसे || ६७ || तै तस्कर करिती विचार || एक बैसे वृक्षावर || एकानें धरोनियां कर || नेतसे दूर जलापाशीं || ६८ || म्हणे विप्र जल घे त्वरा करून || तस्कर उभा नग्न शस्त्र घेवोन || विप्र पाणी प्राशितां जाण || करी स्मरण चिदम्बराचें || ६९ || चिदम्बरराया कृपासिंधू || वंदितों तुला मी दीनबंधू || तोडिसी म्हणोनि दारिद्र्यसंबंधू || आलों द्विजविधू[1] तुझे दर्शना || ७० || केलें तुवां माझें क्षेम || पावलों मी विश्रामधाम || वाढूं दे तुझें यश परम || जातों परंधाम तव कृपें || ७१ || आपदा दूर करावया || सुवर्ण भार दिधलासि स्वामिराया || परी तोच माझे प्राण हरावया || शिंवासखया कारण झाला || ७२ || चिदम्बरराया कृपा करून || केलेंसी मृत्तिकेचें सुर्वण || माझे वांचवावया प्राण || तुजसी कठिण कायसें || ७३ || पांडव सांपडतां लाक्षासदनीं || त्यांसी वांचविलेसी धांवोनी || मज अनाथाचे रक्षणीं || कां न ये करुणा तुज || ७४ || कीं प्रल्हादा टाकितां अग्नींत || धांवुनी केलासि अग्नि शांत || द्रौपदी स्मरतां सभेंत || तीसी त्वरित रक्षिलेंसि || ७५ || नक्रभयें सरोवरीं || गज ही स्मरतां श्रीहरी || धाविन्नलासी भक्तकैवारी || आतां मज कां उपेक्षिशी || ७६ || विश्वव्यापका चिदम्बरा || आनंदकंदा करुणाकरा || आतां एक नमस्कारा || करितो निर्धार शेवटचा || ७७ || माझा करावा

.........................

१. द्विजेंद्र.

सांभाळ ।। निघालों यमसदना केवळ ।। तुझे पाहोनि पदकमळ ।। दुःख तळमळ राहिली ।। ७८ ।। ऐसी विप्र करितां प्रार्थना ।। कृपाळू आला दीक्षितराणा ।। व्याघ्ररुपें दुष्ट संहरणा ।। करितसे गर्जना भैरनादें[1] ।। ७९ ।। ऐकुनी व्याघ्रध्वनी भीषण ।। तस्कर मार्गे पाहे गडबडोन ।। तंव व्याघ्र दिसे निजनिकटीं जाण ।। भयानक वदन पसरोनी ।। ८० ।। सत्वर घेतलें शस्त्र ।। व्याघ्र मारावयाला परतला चोर ।। पंचाननें धरोनि तस्कर ।। कंठनाळ फोडी तत्काळ ।। ८१ ।। ज्या वृक्षावरी होता दुजा चोर ।। तेथें धांवोनि जातसे व्याघ्र ।। धाकें कांपे तोही चोर ।। पडला त्यासही व्याघ्र मारी ।। ८२ ।। ऐसा व्याघ्ररूपें चिदम्बर ।। विप्रासी दावुनी चमत्कार ।। अंतर्धान पावला सत्वर ।। चित्तीं आश्चर्य विप्र मानी ।। ८३ ।। विप्र निघे आनंदेंकरून ।। करितसे चिदंबर नामस्मरण ।। म्हणे ईश्वरा तूं अवतार पूर्ण ।। वांचविला प्राण अनाथाचा ।। ८४ ।। ऐसा लीलाधारी सर्वेश्वर ।। कलियुगीं स्वामी चिदंम्बर ।। नित्य नूतन चमत्कार ।। दावी अपार यात्रेमाजी ।। ८५ ।। ज्यासी चाड इहपर सुख ।। अमुत्र[2] कैवल्यपद[3] सुरेख ।। त्यांनी धरावें चिदम्बरपादुक ।। सांगे सर्वांसी चिदम्बरकिंकर ।। ८६ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ ।। श्रवण करा हो भाविक समस्त ।। सप्तदशोऽध्याय स्वादुतर हा ।। ८७ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे मृत्सुवर्णकरणं व्याघ्ररूपेण चोरमारणं च नाम सप्तदशोऽध्यायः ।। १७ ।। ओवीसंख्या ८७ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

१. भयंकर आवाजाने. २. स्वर्गलोक. ३. मोक्ष

# बालमुखेन पण्डितगर्वहरणम्




काशीक्षेत्रीचे थोर ब्राह्मण । परीक्षा घ्यावयासि आले जाण । त्यासी परीक्षा द्यावी आपण । वेद म्हणोन दाविजे ॥

चिदम्बरचरित्र

अध्याय अठरावा

शि व चि द म्ब र

॥ श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ॥ जो विलसे हृदयाकाशीं ॥ मनामागें स्वप्रकाशी ॥ साक्षित्वें पाहे व्यवस्थेसी ॥ त्या सद्गुरूसी असो नमन ॥ १ ॥ मुनीश्वर म्हणे ऐका ब्राम्हण ॥ चिदम्बराख्यान करी कल्याण ॥ जें प्रवेशतां श्रवणसदन ॥ पापौघ जळूनी जातसे ॥ २ ॥ एवं दिगंतविस्तीर्ण[1] ॥ ऐकुनी चिदम्बरयश पूर्ण ॥ काशीक्षेत्रस्थ चौघे ब्राम्हण ॥ स्वामीकडे निघाले ॥ ३ ॥ स्पर्धा असूया धरोनियां पोटीं ॥ करूं लागले वटोवटी ॥ कलियुगीं लीला असे खोटी ॥ ऐसें वदू लागले ॥ ४ ॥ जैसे भानूसि देखोनि नयनीं ॥ खद्योत[2] उगेचि जल्पती मनीं ॥ कीं तुळसी पूजितां उद्यानीं ॥ संतापे देखोनि भांग जैसी ॥ ५ ॥ कीं गंगेचा खळाळ ऐकुनी ॥ संतापे जेंवि रजकसा दणी[3] ॥ नातरी कल्पवृक्षप्रताप देखुनी ॥ सिंदीसी मनीं कष्ट होय ॥ ६ ॥ असो सर्व क्षेत्रजननी ॥ काशीच म्हणोनि पुराणीं ॥ तैसेचि वानिती ज्ञानी ॥ विश्वेश ये स्थानीं सर्वोत्तम ॥ ७ ॥ सर्व तीर्थां आदि माउली ॥ गंगा जागत भूमंडलीं ॥ तिघेही वसती येथें त्रिकाळीं ॥ दर्शनें सकळ मुक्त होती ॥ ८ ॥ ऐसें महाक्षेत्र असतां काशी ॥ कोणी यात्रिक न येती दर्शनासी ॥ मनुष्य असतां दीक्षित त्यापाशी ॥ यात्रा बहुवसी जातसे ॥ ९ ॥ कलिसत्ता वाढली ॥ असत्यीं सत्यदृष्टी झाली ॥ पुण्याविषयीं मती परतली ॥ पापजाळीं पडती जन ॥ १० ॥ वेदाध्ययन अनादरती ॥ कोकशास्त्र बहुधा पढती ॥ हरिहर पूजा अव्हेरिती ॥ झोटिंग पूजिती प्रीतिभावें ॥ ११ ॥ गायत्री मंत्र सांडिती ॥ शाबरी मंत्र जपती ॥ झाली ऐसी लोकरीती ॥ कलिकाळगती विचित्र ॥ १२ ॥ कलियुगीं अवतार म्हणती जन ॥ नाना चमत्कार दावितसे जाण ॥ यात्रादाटी बहुतकरून ॥ देवतासाधन असेल कांहीं ॥ १३ ॥ यात्रा जातसे दूर देशाहुन ॥ ऐसें बोलती क्षेत्रस्थ जन ॥ चिदम्बराची यात्रा भरिती जाण ॥ तीर्थ क्षेत्र पावन नच जाती ॥ १४ ॥ तीर्थ क्षेत्रीं देवासि यात्रा जाती ॥ हें सोडुनि मनुष्ययात्रा भरिती ॥ हें नाहीं ऐकिलें क्षितीं ॥ नवल किती सांगावें ॥ १५ ॥ काशीक्षेत्रींचे चौघे ब्राम्हण ॥ म्हणती परीक्षा पाहावी

शि व चि द म्ब र

........................

१. सर्वदिशेकडे पसरलेले २. काजवा ३. लहानसा ओहोळ

शि व चि द म्ब र

आपण ।। स्वाधीन करोनि दीक्षित जाण ।। यात्रिकांसह काशीसी आणूं ।। १६ ।। चौवेदी चौघे पंडित ।। निघाले अभिमानें भरित ।। चिदंबर कैसा पहावा म्हणत ।। मार्गी चालती तांतडीनें ।। १७ ।। वाद करूं चिदंबरासरिसे ।। परीक्षूं गुण त्याचे कायसे ।। आम्हा पुढें वक्ता कोण विलसे ।। जगीं न दिसे वादकर्ता ।। १८ ।। पंडित निंदित असतां जाण ।। सर्व गर्वहर्ता उमारमण ।। भस्म रुद्राक्ष कलश धरोन ।। आला त्यांचे स्वप्नीं दीक्षित ।। १९ ।। मधुर वाचे झाला बोलता ।। ऐका पंडित हो माझी वार्ता ।। मी अनाथ गरीब द्विज तत्त्वता ।। गुरुपुरी वसतों सांभाळा मज ।। २० ।। आपण इतका श्रम न घेतां ।। स्वस्थानीं राहोनी तत्त्वतां ।। गरीब ब्राम्हणाचें हित चिंता ।। हेंचि आतां सांगणें तुम्हां ।। २१ ।। जागृत होतां एकमेकांसी ।। सांगती स्वप्नींची मात ऐसी ।। अंगवस्त्र भस्म सर्वांगासी ।। कलश हातीं धरोनियां ।। २२ ।। तेजोमूर्ती सुमंद हास्यवदन ।। दृष्टी देखता निवे मन ।। म्हणे मी गरीब ब्राम्हण ।। चिदम्बर जाणा नाम माझें ।। २३ ।। स्वस्थानीं राहोनि रक्षण ।। स्पष्ट सांगे करा म्हणोन ।। बहुधाही विचार करून ।। स्वप्नार्थ गौरव नेणती ते ।। २४ ।। ऐसें स्वप्न चौघांसी ।। नित्य दृष्टांतीं भेटी त्यांसी ।। आश्चर्य करिती चौघेही मानसीं ।। येती वाटेसी त्वरा करोनी ।। २५ ।। इकडे दीक्षित म्हणती लोकांसी ।। थोर पंडित येती परीक्षेसी ।। योग्य स्थळ रहावयासी ।। त्यांसी नेमूनि ठेवावे ।। २६ ।। गांवाजवळीं येती ब्राम्हण ।। कोसावरती बागेंत उतरून ।। म्हणती येथें भोजन करून ।। सायंकाळीं जाऊं भेटी ।। २७ ।। स्नान सारोनि देवपूजा करित ।। ब्राम्हण बैसले ध्यानस्थ ।। तेथें प्रगटे अकस्मात ।। कोणी नोळखती चिदम्बरासी ।। २८ ।। नमस्कारोनि सर्वांसी ।। स्वामी उभे तयांपाशीं ।। चमत्कारोनि पाहती दृष्टीसी ।। हातीं शोभे रम्य कलश ।। २९ ।। शुभ्रवस्त्रद्वय परिधान ।। अंगीं भस्मरुद्राक्षभूषण ।। तेज पाहतां सहस्त्रकिरण ।। कीं होय उडुराण[1] शांत तेज ।। ३० ।। सुमंदहसित श्यामसुंदर ।। सर्वांग पाहतां दिसे सुकुमार ।। अपूर्व दर्शन हा कीं रमावर ।।

शि व चि द म्ब र

१. चंद्र

शि व चि द म्ब र

आला येथवर म्हणताती ।। ३१ ।। कामजनक कीं कामहर ।। आम्हांसि भेटला विश्वेश्वर ।। कीं असेल हा चिदंम्बर ।। शिवावतार म्हणती लोक ।। ३२ ।। हाची नित्य येतो स्वप्नीं ।। अनाथ गरीब सांभाळा म्हणोनी ।। विचारूं नामभिधानीं ।। कोण म्हणोनि पुसती तेधवां ।। ३३ ।। तों बोले चिदम्बर वचन ।। दाक्षिणात्य मी असें ब्राम्हण ।। चिदम्बर म्हणती नामाभिधान ।। असें निष्किंचन[1] दर्शनां आलों ।। ३४ ।। मधुरोत्तरें बोले वचन ।। तुम्ही समर्थ आलां दुरून ।। मी असें गरीब ब्राम्हण ।। भेटीलागीं जाण आलों तुमचे ।। ३५ ।। निरभिमानें विश्वभंर ।। सांगता निजनाम सार ।। विप्र ऐकोनि उत्तर ।। येती सत्वर धांवोनि पुढें ।। ३६ ।। स्वामी आदरें बैसविती ।। आपणं थोर त्यांसी म्हणती ।। विप्रांसी थोर अभिमान चित्तीं ।। गर्वे बोलती स्वामीसी ।। ३७ ।। जरी असाल आपण चिदम्बर ।। फळला आमुचा मनोरथ थोर ।। ऐसें म्हणोनि पूर्वपक्ष प्रखर ।। गीर्वाणभाषें करूं लागले ।। ३८ ।। ऐकुनी पंडितवाणी ।। समर्थ जो सर्व गर्वहरणीं ।। तो सविनयें म्हणे देववचनीं ।। अपरिचित अज्ञानी मी असें ।। ३९ ।। आपुली कीर्ती ऐकूनी जाण ।। परीक्षा पहावया आलों दुरून ।। स्वामी म्हणती गरीब ब्राम्हण ।। न कळे जाणा मज कांहीं ।। ४० ।। विप्र म्हणती यात्रादाटी ।। अवतार म्हणोनि येती भेटी ।। नकळे म्हणोनि सांगतां गोष्टी ।। परीक्षा दृष्टी दाविजे आम्हां ।। ४१ ।। हासंत बोले दीक्षित आपण ।। मी काय करूं सांगा विचक्षण ।। दरिद्री म्हणोनि सांगतांही जन ।। येती वचन न ऐकतां माझें ।। ४२ ।। पंडित म्हणती कैसेंतरी ।। वाद करा आम्हांसरी[2] ।। वादार्थचि आमुचें येथवरी ।। आगमन ना तरी काय कारण ।। ४३ ।।दीक्षित शांतविती सविनये ।। बहुप्रकारें बोधितांही स्वयें ।। न ऐकती गर्वांधहृदयें ।। देवमाये विमोहित ।। ४४ ।। म्हणती आवेशें पंडित ।। वाद कीं यात्रासमवेत ।। येतां सांगा श्रीक्षेत्राप्रत ।। चित्तीं त्वरित विचारूनी ।। ४५ ।। आम्ही असों वादीं निर्भय ।। जाणतों वेदशास्त्रहृदय ।। आमुचा करणारा पराजय ।। धुंडितां त्रैलोक्यीं कोणी नसे ।। ४६ ।।

शि व चि द म्ब र

१. गरीब २. आमचे बरोबर

गर्विष्ठ शास्त्रीभारती ।। ऐकोनि स्वामी बोलती ।। आपुलें सांगणें असे निश्चिती ।। प्रतीति पाहोनि बोलावें ।। ४७ ।। विद्याविनयसंपन्न ।। पूज्य होतो सर्वत्र ब्राम्हण ।। अनंत असती वेद जाण ।। वेदोनारायण म्हणती श्रुती ।। ४८ ।। सर्व वेद जाणता ।। सर्वज्ञ शिवचि तत्त्वतां ।। जीवराशी स्वल्पज्ञता ।। असे सर्वज्ञता शंकरीं ।। ४९ ।। वेदहृदयवेत्ते आपण । सर्वज्ञ आहा नारायण ।। सर्वज्ञांचे आज्ञोल्लंघन ।। जीवा हातून घडेल कैसे ।। ५० ।। त्याकरितां आपुली इच्छा ।। पूर्ण होणार यथेच्छा ।। दर्शनयोग मात्रें सर्वज्ञांच्या ।। धन्य त्रिवाचा मी झालों ।। ५१ ।। ऐसें म्हणत हासे कृपासागर ।। तंव तेथें कडेसी कुमर ।। घेवोनि आली विप्रांगना सत्वर ।। धावोंनि पायांवर पडतसे ।। ५२ ।। तियेसि उठवूनि कृपाघन ।। बैसावें म्हणता एक क्षण ।। बाळकासी पुढें बोलावोन ।। बैसवीती जाण स्वामी त्यासी ।। ५३ ।। चार केळीं आपुल्या हातीं ।। बाळास प्रसाद घ्यावा म्हणती ।। तेणें भक्षिलीं अतिप्रीती ।। स्वामी बोलती तयालागीं ।। ५४ ।। प्रसाद भक्षितां बालक ।। झाला सर्वविद्याविशारद देख ।। ज्ञानमूर्तीची होतां कृपा सुरेख ।। काय कौतुक न होय ।। ५५ ।। बाळ नमोनि गुरुपाय ।। हात जोडोनि सविनय ।। सत्वर बोलतसे गीर्वाणवाक्य ।। आज्ञा काय सांगा मजसी ।। ५६ ।। बाळासी म्हणे सर्वज्ञ ।। मी असें गीर्वाणभाषानभिज्ञ[1] ।। बोलसी जरी तेंचि तूं वचन ।। तुज असे आज्ञा हीचि माझी ।। ५७ ।। काशीक्षेत्रीचे थोर ब्राम्हण ।। परीक्षा घ्यावयासि आले जाण ।। त्यांसी परीक्षा द्यावी आपण ।। वेद म्हणोन दाविजे ।। ५८ ।। तंव बाळ पठत चारी वेद ।। पंडितां प्रश्न करी विशद ।। श्रुति शास्त्री कोठें आपुला वाद ।। होऊं द्या अगाध भिऊं नका ।। ५९ ।। बाळक वार्द काय करील प्रखर ।। ऐसी शंका न धरावी तिळभर ।। म्हणोनि गीर्वाणभाषें सत्वर ।। शास्त्रीं विचार करूं लागे ।। ६० ।। बाळमुखें शास्त्रवाद ।। ब्राम्हण ऐकोनि सद्गद ।। म्हणती ईश्वरीकळा अगाध ।। घडला अपराध आम्हांलागीं ।। ६१ ।। पुढें जोडोनि दोनी कर ।। साष्टांग नमिती वारंवार ।। म्हणती

१. संस्कृतभाषा न जाणणारा




शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

प्रगटे ईश्वरी अवतार ।। अन्यायी अपार झालों आम्ही ।। ६२ ।। कलियुगीं चिदंबर सगुणब्रम्ह ।। जयाचिया दर्शनें मोक्ष सुगम ।। त्यासी छळावया आलों दुष्कर्म ।। अनुचित धर्म आचरिला ।। ६३ ।। म्हणती स्वामी सर्वोत्तमा ।। थोर अपराध घडला आम्हां ।। न कळे स्वामीचा महिमा ।। अन्याय क्षमा करा आतां ।। ६४ ।। चौवर्षांचे बालकासी ।। कृपाप्रसादें चारी वेद बोलविसी ।। करुणावंता माय होसी ।। अपराध आम्हांसी क्षमा कीजे ।। ६५ ।। तव बोले दयासागर ।। तुम्ही ब्राम्हण क्षेत्रस्थ थोर ।। मुखीं अक्षय वेदोच्चार ।। समाधान थोर तेणें मज ।। ६६ ।। कृपा करोनि दूर देशीं ।। आलां मज भेटी द्यावयासी ।। ऐसें समाधान करोनि त्यांसी ।। आदरें विप्रांसी आणिले घरा ।। ६७ ।। सन्मान करोनि कांही दिवस ।। आदरें ठेवोनी घेतलें त्यांस ।। वस्त्रें भूषणें देऊनी सर्वांस ।। निरोप तयांसी देती स्वामी ।। ६८ ।। आपण न्यावया मज काशीसी ।। आलां मीही येतों स्वल्प दिवशीं ।। महायात्रा असे काशीयात्रेसी ।। मजविषयी दया ठेवा ।। ६९ ।। आनंदे करोनि ब्राम्हण ।। काशीक्षेत्रासी पावले जाण ।। तेथें करिती कीर्तिवर्णन ।। अवतार पूर्ण चिदंम्बर ।। ७० ।। क्षेत्रीं पावल्याचें उत्तर ।। स्वामीसि पाठविती सत्वर ।। महावस्त्र आणि पीतांबर ।। चरणीं सादर पाठविलें ।। ७१ ।। पुनर्दर्शनासि येतों म्हणोनी ।। विनंती पत्र धाडिलें लिहोनी ।। तें शास्त्री पंडित पाहोनीं ।। दाविती वाचोनी स्वामीसी ।। ७२ ।। पत्रार्थ ऐकोनि चिदंबर ब्राम्हणांसी दिले महावस्त्र ।। यावे निरोप आलीयावर ।। पत्रोत्तर ऐसा धाडिला ।। ७३ ।। ऐसे प्रत्यय नानापरी ।। चिदम्बर दावितसे सृष्टीवरी ।। कीर्तिवर्णन कोठवरी ।। लिहिणार पत्रीं कोण ऐसा ।। ७४ ।। पत्र करितां धरित्रीसी ।। समुद्राची शाई ऐशी ।। लेखनी करूनि कल्पतरूसी ।। लिहितां शारदेसी पुरेना ।। ७५ ।। 'गुणानुवादः पारं न याति' ।। ऐसे सर्व श्रुती बोलती ।। तेथें मूर्ख मी मंदमती ।। गुण कीर्ति वर्णूं काय ।। ७६ ।। परी तूं बाळमुखें वेद ।। मुकें बोलविशी शास्त्रभेद ।। मज प्राकृत विशद ।। बोलविता अगाध काय ।। ७७ ।। लीला

शिवचिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

दावितसे चिदंबर ।। अविद्यक[1] जनासी भ्रम पडे थोर ।। भाविक विरला नारीनर ।। प्रत्यय अपार दावी त्यांसी ।। ७८ ।। चिदंबरासी जातां शरण ।। ब्रम्हपद मिळे अनायासें जाण ।। हेंचि सांगतसे सर्वांसी खूण ।। करा भजन म्हणे चिदंबरकिंकर ।। ७९ ।। स्वस्ति श्रीचिदंबरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ ।। म्हणोनि ऐका श्रोते समस्त ।। अष्टादशोऽध्याय गोड हा ।। ८० ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे बालमुखेन वेदपाठनवपूर्वकपण्डितगर्वहरणं नाम अष्टादशोऽध्यायः ।। १८ ।। ओवीसंख्या ८० ।।

..............................

१. अज्ञ

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

शि
व
चि
द
म्ब
र

# गयावलाय सहस्ररूप्यकप्रदानम्




गयावळ पत्र काढोनि सुरस । ठेवी सभाजनां पुढें ॥
ऐसे म्हणता चिदम्बर । ब्राह्मणासि रुपये सहस्र । देवोनि गयेसि पाठविला

शिवचिदम्बर

॥ श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ॥ तुज शरण येतां चिदंबरा ॥ वारिसी श्रम अहंकारा ॥ देशी निजानंदीं थारा ॥ दयासागरा शरण आलों ॥ १ ॥ माझे मनोरथ गुरुनाथा ॥ पूर्ण करीं बा समर्था ॥ वदवी तुझे सरस चरिता ॥ जन व्हावे पुनीत श्रवणमात्रें ॥ २ ॥ स्मरोनी चिदम्बरचरण ॥ मुनीश्वर म्हणे ऐकाहो ब्राम्हण ॥ असे भवरोगरसायन ॥ चरित्र जाण चिदम्बराचें ॥ ३ ॥ गताध्यायीं श्रीचिदम्बर काशीयात्रे येतों निर्धार ॥ सांगे पंडितांसी सर्वेश्वर ॥ तेंचि कथासार सांगूं आतां ॥ ४ ॥ न कळे विंदान[1] सर्वेशाचें ॥ अगाध महिमा कवण वर्णीं वाचें ॥ प्रगट गुप्त कौतुक गुरूचें ॥ रहाटी कलीची झाली कृतसम ॥ ५ ॥ माहात्म्य होतसे निरंतर ॥ सत्यलोकावधि यशःप्रसार ॥ होतां पहावया सुरवर ॥ येती सपरिवार गुरुपुरासी ॥ ६ ॥ यात्रिकांचे संतोषार्थ ॥ करोनि वास्तव्य नगरांत ॥ करितसे चित्रचरित ॥ अमानुष विख्यात प्रतिदिनीं ॥ ७ ॥ श्रीरामकृष्ण चरित्रापरी ॥ दीक्षित ही महिमा करी ॥ श्रवणमात्रें कलिदोष हरी ॥ ऐसा लीलाधारी चिदम्बर ॥ ८ ॥ कलियुगीं जाहलें जन मंद ॥ कुटिल वदती अनीश्वरवाद ॥ कोठें रामकृष्णलीला अगाध ॥ ज्ञाते ग्रंथीं बरळती ॥ ९ ॥ ऐसें दुर्वृत्त जन ॥ जल्पती[2] स्वेच्छेंकरून ॥ तयांसी विश्वास द्यावया कारण ॥ लीला गुरूची प्रगटतसे ॥ १० ॥ लीलानाटकी दीक्षितेंद्र ॥ भक्तचकोरांसी पूर्णचंद्र ॥ येथें असोनि सर्वेश्वर ॥ गुप्तरूपें काशीपुरीं पातला ॥ ११ ॥ काशीयात्रा विध्युक्त ॥ करोनि दीक्षित समर्थ ॥ अन्न दक्षिणा दान अपरिमित ॥ करूनि गयेप्रती निघतसे ॥ १२ ॥ क्षेत्रस्थ ब्राम्हणांसी ॥ वस्त्रपात्र देऊनि बहुवसी ॥ आज्ञा घेऊनि गयेसी ॥ मनोवेगेंसी पातला ॥ १३ ॥ शास्त्रोक्त करूनि गयाविधी ॥ कौतुकें दावितसे निजसिद्धी ॥ ब्राम्हणाराधन परमावधी ॥ दक्षिणादानादि करी फार ॥ १४ ॥ ऐसी संपादुनि गयायात्रा ॥ बोलावोनि ब्राम्हण सत्पात्रा ॥ अपार देतसे वस्त्रपात्रा ॥ आबाल नारीनर तृप्त केले ॥ १५ ॥ प्रस्थान करोनि चिदम्बर ॥ पुरोहिता बोलावोनि सत्वर ॥ द्रव्य दिधलेंसि मज

शिवचिदम्बर

१. करणी २. बडबडतात

तूं अपार ।। संख्या सविस्तर सांग आम्हां ।। १६ ।। तंव पत्र आणोनि पुरोहित ।। हिशोब करितां रुपये नियुत[1] ।। वरी दहा सहस्त्र सात शत ।। जाहले निश्चित तेथें ।। १७ ।। हिशोब पाहोनि सद्गुरु ।। पांच मुष्टी रुपये परिकरू ।। कलशांतुनि देतां थोरू ।। जाहला चमत्कारू अद्भुत ।। १८ ।। मोजितां हिशोब पुरवणीसी ।। एकसहस्त्र रुपये परियेसी ।। उणे जाहले मग त्यासी ।। पत्र स्वहस्तें दिल्हें लिहून ।। १९ ।। लोक पाहती तटस्थ ।। काय वर्तलें अद्भूत ।। पांच मुष्टि रुपयांत ।। लक्षगणित कैसे जाहले ।। २० ।। कीं देत रुपये धरणी ।। अथवा वर्तली चिदम्बरकरणी ।। प्रसन्न झाली असेल कामजननी[2] ।। म्हणोनि वाढती रुपये ।। २१ ।। गणणाराचे हात थकले ।। भरणार जन कंटाळले ।। ठेवणेसी स्थळ न राहिलें ।। रुपये भरले जिकडे तिकडे ।। २२ ।। जन म्हणती हा नर न होय ।। असेल कीं रमासखय ।। म्हणोनि नवनिधी वश सत्य ।। मानवा अशक्य करणी याची ।। २३ ।। काय वानूं याचें औदार्य ।। दातृत्व आणि वाङ्माधुर्य ।। पाहतां उमारमण दिसे सत्य ।। संदेह नसे सर्वथा ।। २४ ।। यासारखी मागें कोणीही ।। यात्रा केली नसे पाहीं ।। पुढें कोणाकडुनही ।। होणार नाहीं यापरी ।। २५ ।। ऐसें जन परोपरी ।। स्त्रोत्र करिती नानापरी ।। तंव तो भक्तकाजकैवारी ।। पाचारित पुरोहिता ।। २६ ।। मी जातों निजस्थळा ।। मजवरी अनुग्रह पाहिजे केला ।। आमुच्या ग्रामा येतां दयाळा ।। ऋण सकळ फेडीन तुमचें ।। २७ ।। मनोवेंगें चिदम्बर ।। गुरुपुरा पातले निर्धार ।। इकडे कोणासि लेशभर ।। यात्राचमत्कार न कळेचि ।। २८ ।। त्या उपरी चारमासीं ।। गया पुरोहित गुरुपुरासी ।। येउनी भेटला स्वामीसी ।। नमोनि परियेसी बैसला ।। २९ ।। शंकर पुसे पुरोहिता ।। कोठला कोण आपण तत्त्वतां ।। नाम सांगा आपुलें निश्चिता ।। पुढें जातां कवण्या स्थळा ।। ३० ।। गुरुवचन ऐकोन ।। पुरोहित म्हणे हांसोन ।। कां विसरलां मज आपण ।। पुरोहित जाण मी तुमचा ।। ३१ ।। गयाक्षेत्रीं माझी वस्ती ।। आपण दोन मास निश्चिती ।। गृहीं वसोनि

१. लक्ष २. लक्ष्मी

शि व चि द म्ब र

पडली भ्रांती ।। आश्चर्य चित्तीं वाटे मज ।। ३२ ।। तेथें खर्च केले यात्रानिमित्त ।। लक्ष रुपये आंपण सत्य ।। सहस्त्र रुपये अवश्य ।। स्वामिराया देई माझे ।। ३३ ।। ऐकुनी ब्राम्हणवाणी ।। बोले स्वामी गद्गद हांसोनी ।। सभाजनहो ऐका कानीं ।। काय म्हणतो ब्राम्हण ।। ३४ ।। कधीं केली म्यां यात्रा तरी ।। देई म्हणे रुपये सहस्त्रपरी ।। धैर्य किती याचे अंतरीं ।। मागतो रुपये म्हणोनियां ।। ३५ ।। ऐकुनी दीक्षितवचनास ।। पुरोहित न बोलतां विशेष ।। पत्र काढोन सुरस ।। ठेवी सभाजनांपुढें ।। ३६ ।। पाहोनि स्वामीचें हस्ताक्षर ।। जन पावले विस्मय थोर ।। मौन धरोनि नारीनर ।। चमत्कार पाहती सर्व ।। ३७ ।। नकळे चिदम्बराची कळा ।। दावितसे अगाध लीला ।। सत्य मिथ्या म्हणावयाला ।। निश्चय चित्ताला कळेना ।। ३८ ।। स्वामी दिवाकरासि बोलवित ।। सांगतसे सुमंदहसित ।। गयाद्विजासी रुपये त्वरित ।। देई आतां सहस्त्र एक ।। ३९ ।। यात्रेसि गेल्या वेळीं याचे ।। देणे राहिले रुपये साचे ।। पत्र दावितो माझे मुद्रिकेचें ।। दिले पाहिजे याकारणें ।। ४० ।। तंव दिवाकर दीक्षित ।। क्रोधें होवोनि संतप्त ।। बोले स्वामीसी निश्चित ।। पुरोहित अनृत वदे ।। ४१ ।। आपण असतां याच गांवीं ।। यात्रा आपणा घडली केवीं ।। गयाद्विज मिथ्या स्वभावी ।। शिक्षा द्यावी यांसि सत्य ।। ४२ ।। तंव सुमंदहसितानन ।। बोलतसे द्विजा शचीरमण[1] ।। मिथ्या मागणें कधींही जाण ।। होईल काय मूळ नसतां ।। ४३ ।। मन्नामाक्षर सुशोभित ।। पत्र देवोनि मागे पुरोहित ।। पत्रासि मान किंचित ।। देईं दशशत रुपये वेगीं ।। ४४ ।। तंव म्हणे दिवाकर ।। ऐसे जरी आपण देणार ।। असंख्य येईल द्विजभार ।। द्याल रुपये सर्वां ।। ४५ ।। मग बोधी दीक्षितेंद्र ।। ऐसे आचरतील कां द्विजेंद्र।। जीव नसतां देह स्वतंत्र ।। किंचिन्मात्र ही नाचेना ।। ४६ ।। बीजावीण अंकुरोद्गम ।। वृक्षावीण फलस्तोम ।। गर्भ नसतां पुत्रजन्म ।। व्हावया नेम कोण सांगें ।। ४७ ।। नोवरी नसता लग्न ।। कोण मांडील सुजाण ।। तैसें नसतां कारण ।। मागेल ब्राम्हण रुपये कैसे

शि व चि द म्ब र

..........................

१. श्रेष्ठ

शि
व
चि
द
म्ब
र

|| ४८ || ऐसें म्हणतां चिदम्बर || ब्राम्हणांसि रुपये सहस्त्र || देवोनि वस्त्रालंकार || गयापुरासी पाठविला || ४९ || ऐसी नित्य नूतन || स्वामी निज महिमा दावून || सन्मार्गा लावितसे सर्व जन || स्मरणें भवभय निवारितो || ५० || अनेक जन्मींचें सुकृत || पदरीं असे ज्यासि संचित || त्यासी चिदम्बरीं नेमस्त || विश्वास सत्य होतसे || ५१ || चिदम्बरस्मरणमात्रें पतित || तत्काल होतसे पुनीत || म्हणोनि ऐका श्रोते समस्त || एकाग्र चित्त करोनियां || ५२ || मुनीश्वर म्हणे ब्राम्हणांसी || पुढें अवधान द्यावें कथेसी || अमृतपान अप्रयासीं[1] || लाधे तुम्हांसी श्रवणमात्रें || ५३ || नित्य यात्राजन दाटीं || होतसे मलापहातटीं || गतागताची गणना मोठी || जाणता जगजेठी चिदम्बर || ५४ || ऐसें चरित्र अत्यद्भुत || दावित असतां त्रैलोक्यनाथ || आली दोन पुत्रांसहित || स्वामीदर्शनार्थ विधवा एक || ५५ || दुरूनि देखतां स्वामीसी || नमस्कार करी साष्टांगेसी || स्वामी पाहूनी विधवेसी || आशीर्वचन देतसे || ५६ || मंदहासें स्वामी बोलती || अष्टपुत्रा सौभाग्यवती || होईं सुवासिनी निश्चिती || ऊठ नारी म्हणती तिये || ५७ || ऐसें श्रीगुरुवचन || ऐकोनि हांसती सभाजन || स्वामी विधवेसी पुत्रजनन || कैसेनि जाण होईल || ५८ || सभाजनांची परिसतां वाणी || बोले स्वामी हांसोनी || सहज माझे मुंखातुनी || ऐशी वाणी निघाली || ५९ || हें वचन करावया सत्य || समर्थ असे उमासखय || एतद्विषयीं कोणी संशय || धरूं नका लेशही || ६० || विप्रकांतेसि स्वामी बोलत || माई कुंकू लावीं म्हणत || येई म्हणे भ्रतार गत || स्वामी म्हणती बोलूं नये || ६१ || स्वामीचें वचन परिसोनी || उगी राहिली अधोवदनीं || स्वामी तिचा संशय पाहोनी || हांसोनियां बोलती || ६२ || तुझा भ्रतार पाठविला तीर्थाटनीं || कुंकू लावीं संशय सांडोनी || स्वामीचें वचन परिसोनी || विधवा चरणीं विनवितसे || ६३ || गृहीं मेला सत्य भ्रतार || स्वहस्तें त्याचा संस्कार || जाहला असे निर्धार || कुंकुम स्वीकार करूं कैसा || ६४ || स्वामीचें वचन पालन || तैसेंचि

शि
व
चि
द
म्ब
र

........................

१. अनायासें

धर्मसंरक्षण ।। दोनी कैशीं घडतीं म्हणोन ।। संदिग्ध मन झालें माझें ।। ६५ ।। मग बोले चिदम्बर ।। शंका कां करिसी वृथा फार ।। होता समंध तुझे घरीं निर्धार ।। दहन त्याचें त्वां केलें ।। ६६ ।। तुझा पती तीर्थयात्रार्थ ।। पाठविला असे खचित ।। तूं कुंकूं लावोनि अर्धचंद्रवत ।। सुवासिनीगणांत बैस वेगीं ।। ६७ ।। पृथ्वीभार शेष सोडील ।। सूर्य होईल शीतळ ।। त्रिकाळीं माझें वचन केवळ ।। कधींही बरळ[१] न होय ।। ६८ ।। मागुती ती नारी नमूनी ।। विनवितसे गुरुचरणी ।। स्वामी माझा पती आणोनी ।। केधवां नयनी दाविसी ।। ७० ।। तुझा भ्रतार देतो आणून ।। कुंकू लावी आनंदे करून ।। विप्रकांता हर्ष मानोनि ।। कपाळ भरोनि कुंकू लाविले ।। ६१ ।। स्वामी म्हणे ऐक सुंदरी ।। उगी राहें एक संवत्सरीं ।। भेट होईल त्याउपरी ।। चिंता तिळभरी करुं नको ।। ७१ ।। नारी तथास्तु म्हणोनियां ।। सन्निध राहिली स्वामीपाया ।। संवत्सर पूर्ण होता लवलाह्यां ।। पती दावीं म्हणे स्वामीसी ।। ७२ ।। तंव प्रगटे चिदम्बरी कळा ।। सृष्टी स्थिती लय लीळा ।। इच्छामात्रें करी तो खळा ।। त्या सद्गुरुला असाध्य काय ।। ७३ ।। तैलंग ब्राम्हण एक ।। आला जटाधारी देख ।। स्कंधी गंगाकावडी सुरेख ।। घेउनी गुरुपादुकां वंदितसे ।। ७४ ।। स्वामी पुसती ब्राम्हणास ।। स्थान आपुलें कोण देशीं ।। जायापुत्र असत कीं तुम्हांसी ।। सांगा आम्हांसी या वेळीं ।। ७५ ।। गुरुवचन परिसोनि तो विप्र ।। स्वामिसी विनवितसे क्षिप्र ।। सर्वज्ञा काय करिसी विचार ।। जाणसी शंकरा वृतांत माझा ।। ७६ ।। काय सांगू मी लौकिकार्थ ।। तुझी लीला असे अघटित ।। निमिषमात्रें रचिशी निश्चित ।। सृष्टी सत्य देवदेवा ।। ७७ ।। तव इच्छें होईल तृण ।। क्षणांत मेरूसमान ।। जरी करिसी वक्रनयन ।। तृणप्रमाण होय मेरू ।। ७८ ।। तव सुमंदहसित ।। बोलतसे जगन्नाथ ।। ही असे तव जाया निश्चित ।। दोघे सुत असती तुझे ।। ७९ ।। यांसी घेवोनियां सुखें ।। प्रपंच करीं हरिखें ।। अये पतिव्रते ऐके ।। लक्षण देखे भ्रताराचें ।। ८० ।। मग तिनें ओळखिलें भ्रतारचिन्ह ।। लज्जित

.........................

१. व्यर्थ.

शि
व
चि
द
म्ब
र

होवोनि अधोवदन ।। राहिली मौन धरोन ।। दोघे सुत स्तवित प्रेमें ।। ८१ ।। तैलंग भाषेकरून ।। स्तोत्र करिती दोघेजण ।। आंगी रोमांच भरून ।। नाचती परमानंदें ।। ८२ ।। जयजयकारें गर्जती सर्वही ।। नमस्कारिती स्वामिपायीं ।। प्राकृत संस्कृत भाषें पाहीं ।। स्तविती होवो विजयी चिदम्बर ।। ८३ ।। तव महिमा असे अगाध ।। मृत ब्राम्हणा करिसी सुबुद्ध ।। स्मरणमात्रें छेदिशी भवबंध ।। आनंदकंदा तुज नमो ।। ८४ ।। जो असे सर्वांतर्यामी ।। तोचि तूं नाचसी आनंदधामीं ।। ब्रम्हादिकांचा होशी तूं स्वामी ।। आवडी नामीं देईं आम्हां ।। ८५ ।। जगदाधारा जगद्रूपा ।। जलतरंगन्याय[१] एकरूपा ।। निराकारा निरंजना निरूपा ।। सर्वव्यापका चिदंबरा ।। ८६ ।। रज्जू[२] सर्प भासे जैसा भ्रमें ।। भ्रम नासतां रज्जू गमे ।। तुझें निजरूपज्ञानें विरमे ।। जगभ्रम सर्वही ।। ।। ८७ ।। सर्वदा बोधरूप असशी ।। प्राण्यांचे हृदयाकाशीं ।। अंहकारापूर्वी भाससी ।। संकल्प नासतां दिससी प्रत्यक्ष ।। ८८ ।। सर्वसाक्षी स्वप्रकाशा ।। कर्तुमकर्तुं सर्वेशा ।। निर्लेपा निरंजनाविश्वेशा ।। सांभाळी सहसा आम्हां अनाथा ।। ८९ ।। तूं कृपा करिशी जयावरी ।। तो होतसे तुजसरी ।। तुजविण आम्हां कष्टनिवारी ।। नरहरी कवण असे ।। ९० ।। यापरी सर्व जन ।। स्तोत्र करिती अपार जाण ।। प्रत्यक्ष महिमा पाहून ।। डोलती परमानंदें ।। ९१ ।। कवण वर्णी त्याचें भाग्य ।। प्रत्यक्ष पाहती सद्गुरुपाय ।। चित्री लिहितां ही सूर्य ।। प्रकाश नये लिहावया ।। ९२ ।। याकरितां विश्वास ।। चिदम्बरी धरा सुरस ।। तेणें भवसागरास ।। तरुनि मोक्ष पदीं चढा वेगीं ।। ९३ ।। अमृताची आरवंटी[३] ।। दीक्षितचरितरुपें असें गोमटी ।। ज्यांसि अमरत्व इच्छा पोटी ।। त्यांनी भरावी घोटीं पोटभरी ।। ९४ ।। चिदम्बर असे तारक ।। भजणारां ब्रम्हसुख ।। अप्रयासें लाधते देख ।। म्हणे कैवल्यकिंकर ।। ९५ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टें सद्गुरुनाथ ।। म्हणोनिया ऐका भाविक भक्त ।। एकोनविंशोऽध्याय रसाळ हा ।। ९६ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे

शि
व
चि
द
म्ब
र

१.पाण्यावरील लाटांप्रमाणें. २. दोरी ३. पाणपोई

## जलाज्यकरणम्



ऐकूनि स्वामीची भारती । शतघट घेवोनि स्कंधावरती । घटखाली ठेवोनि जंव पाहती । दिसती सर्वही घृतभरित ॥

चिदम्बरचरित्र

अध्याय विसावा

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। ज्याच्या चरणनौकाश्रयें ।। दौर्भाग्यसागर तरूनि स्वयें ।। पावतो परपद निर्माये ।। त्या सद्‌गुरुचे पाय धरा चित्तीं ।। १ ।। मुनीश्वर म्हणे ब्राम्हणांसी ।। अवधान द्यावे कथेसी ।। चिदम्बरकथा असे सुरसी ।। श्रवणमात्रेंसी आनंद होय ।। २ ।। एके दिवशी यात्राजनसमवेत ।। आले संगोळी ग्रामा दीक्षित ।। मंडलेश्वर ऐकूनी हा वृतांत ।। दर्शनार्थ पातले ।। ३ ।। कुचित्काळ मलापहातटीं ।। वास करी जगजेठी ।। नित्य होतसे यात्राजन दाटी ।। दर्शनमात्रें निवती सर्व ।। ४ ।। पुढें येतां वैशाखमास ।। शुक्ल पंचमीसी चिदम्बरेश ।। शंकर नाम तनयास ।। उपनयन आरंभित ।। ५ ।। चार दिवस जाहला सोहळा ।। मिळाला ब्राम्हणमेळा ।। आबालवृद्धजन सकळा ।। श्रीप्रसाद सुलभ सेवनार्थ ।। ६ ।। प्रत्यहीं ब्राम्हणसंतर्पण ।। होत असे असंख्य जाण ।। सापूपशाक सांभारीं पक्वान्न ।। लेह्यपेयादि पूर्ण वाढितसे ।। ७ ।। पोलिका क्षीर मांडे ।। शर्करान्न श्रीखंड वडे ।। प्राज्याज्य लाडू रोकडे ।। यथेच्छ वाढी ब्राम्हणांसी ।। ८ ।। आकंठपर्यंत जेवुनी ।। ब्राम्हण जाती स्वस्थानीं ।। ऐशा समाराधना प्रतिदिनीं ।। होती त्या स्थानीं अधिकाधिक ।। ९ ।। एके दिवशीं माध्यान्हसमयीं ।। ब्राम्हण मिळाले भोजना पाहीं ।। पात्रीं पदार्थ सर्वही ।। वाढिले स्वामिसेवकें ।। १० ।। तंव स्वामिसी आज्याधिकारी ।। विनवितसे नानापरी ।। घृत नसे कोठीमाझारीं ।। पात्रे तरी वाढलीं आतां ।। ११ ।। घृत आणावया बहुत ।। गेले असती सेवक समर्थ ।। येतील एक प्रहरांत ।। स्वामी आतां काय करूं ।। १२ ।। ब्राम्हण बैसले क्षुधित ।। पात्रीं वाढिले सर्वपदार्थ ।। घृत वाढावया विलंब होत ।। मजप्रत शापितील ।। १३ ।। हे दीक्षितेंद्र कृपासागर ।। मज आला समय दुर्धर ।। शिव्या देती नारीनर ।। भोजना विलंब होतो म्हणोनी ।। १४ ।। निवारावें माझें संकट ।। यासी काय असे पुढें वाट ।। दयासागरा मज विस्पष्ट ।। युक्ती प्रगट सांग वेगीं ।। १५ ।। ऐकुनी त्याची करुणावाणी ।। स्वामी बोलती, हांसोनी ।। भिऊं नको तूं अतःकरणीं ।। उपाय करोनी कार्य साधीं ।। १६ ।। येथें कोणाचिया गृहीं ।। घृत लाधेल कीं पाहीं ।। प्राप्तकार्य सांप्रत निर्वाहीं ।। आलियावरी फेडी उसणें

शिव चिदम्बर

शिव चिदम्बर

|| १७ || तंव बोले घृताधिकारी || एक दिनीं घृतघट शंभरी || खर्च करी ऐसा भक्तकैवारी || समर्थ या पुरी कोण असे || १८ || ग्राम असे लहान || जन असती बहुत दीन || कोण देईल शतघटप्रमाण || तूप उसणें स्वामिराया || १९ || तंव बोले श्रीदीक्षित || या गांवीं नारी एक समर्थ || तिचे घरीं पूर्ण सर्वसंपन्न || याचक मनोरथ पुरवितसे || २० || नांवे साजे मलापहारी || तिजकडे जावें त्या सत्वरी || घृत मागतां देईल निर्धारी || सेवकांसि घेऊनि जाईं || २१ || तो विनवितसे स्वामीसी || धैर्य नसे मज जावयासी || आपण यावें या कार्यासी || तरीच सिद्धीसी कार्य जाय || २२ || परिसोनि त्याची विनवणी || बहुत शिष्य सवें घेउनी || निघाले मलापहादर्शनीं || घेवोनि पूजासामग्री || २३ || येवोनियां नदीतटानिकट[1] || महापूजा आरंभिली सुभट[2] || मग जोडोनि करसंपुट || स्तोत्र विस्पष्ट करितसे || २४ || अंबे जो तुझिया उदकीं || स्नान करी धरुनी भक्ति निकी || अनंत जन्मींचा जरी तो पातकी || स्नानमात्रें पुनीत होय || २५ || दर्शनमात्रें जनांचा मळ || संहार करिसी म्हणोनि केवळ || नाम असे मलापहा विमळ || लोकोद्धार करिशी अंबे || २६ || सेवकाची कामना पूर्ण || करिसी माते तू तत्क्षण || म्हणोनियां तव तटीं म्या जाण || ब्राम्हणाराधना आरंभिली || २७ || अंबे तुझिया अनुग्रहीं || प्रचुर असे सिद्धी सर्वही || घृत एक उणे असे पाहीं || तावन्मात्र देईं मजला तूं || २८ || ऐसें स्तोत्र करोनी || ब्राम्हणा सांगे कलशपाणी || माता देईं घृत तुम्हालागुनी || घट भरोनि घ्यावे वेगीं || २९ || ऐकुनी स्वामीची भारती[3] विप्र घटीं जळ भरिती || शतघट[4] घेवोनि स्कंधावरती || भोजनशालेप्रती आले वेगीं || ३० || घट खाली ठेवूनी जंव पाहत || दिसती सर्वही घृतें भरित || हे पाहोनि कौतुक अद्‌भुत || विप्रजात गर्जती जयनादें || ३१ || जय जय चिदंबरा || तूंचि होशी चंद्रशेखरा || जल केलेंसि घृत उदारा || आनंदसागरा दयानिधे || ३२ || महादेवा तुज आम्ही शरण || आलों स्वहितसाधनाकारण || करूनियां

१. नदीच्या तीरावर  २. सुंदर  ३. वाणी  ४. शंभर घागरी



शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

भवार्णवोत्तीर्ण[1] ।। संरक्षण करीं आमुचें ।। ३३ ।। रोगियां अमृतखाणी ।। मुमूर्षूसी संजीवनी ।। जैसे होय हर्षदानी ।। तैसा आम्हा लाधलासी ।। ३४ ।। प्रत्यक्ष करणी तुझीं पाहतां ।। तूंचि दिसशी व्यापक अनंता ।। आमुचा विकल्प जगन्नाथा ।। सावित्रीकांता निवारी बा ।। ३५ ।। स्तोत्र करोनी नानापरी ।। साष्टांगे नमिती पायांवरी ।। दीक्षिताज्ञा मानोनी शिरीं ।। भोजनासी गेले द्विज ।। ३६ ।। समस्तही द्विजेंद्र ।। जेविले असती धणीवर ।। स्वाद्वन्न पक्वान्न सार ।। नारीनर तृप्त झाले ।। ३७ ।। इतुक्यांत पूर्वप्रेषित ।। त्वरें येती राजदूत ।। शतघट घेवोनि घृतभरित ।। तंव सभानाथ बोलतसे ।। ३८ ।। मातेकडोनि आणिलें ऋण ।। तें फेडा तूप देऊन ।। ठेंवू नका स्वार्थ धरून ।। ऋणापासुनी मुक्त व्हावें ।। ३९ ।। स्वामीसी तंव अधिकारी म्हणे ।। गंगेत पाण्यासी काय उणें ।। हें घृत ब्राम्हणाकारणें ।। होईल पुढें उपयुक्त ।। ४० ।। गंगेंसी समर्पितां पाणी ।। उपकार ती न मानी ।। उष्णोपचारें वासरमणी ।। संतोष मनीं काय होय ।। ४१ ।। चंद्रासि करितां शीतोपचार ।। कां मानील याचा उपकार ।। पर्वतासी समर्पितां प्रस्तर[2] ।। देईल काय वर त्यासी ।। ४२ ।। नातरी हितार्थ सिंधूसी ।। समर्पितां लवणराशी ।। कां होय उपकार त्यासी ।। तैसें गंगेसी घृत समर्पणें ।। ४३ ।। तंव बोधितसे जगज्जीवन ।। बरेंचि असें तुझें ज्ञान ।। धनिकापाशीं घेउनी ऋण ।। न देतां जाण दोष असे ।। ४४ ।। दाता समर्थ भक्तकैवारी ।। विश्वास ठेवोनि त्यावरी ।। स्वार्थ न करावा तिळभरी ।। उदारता अंतरी राखावी ।। ४५ ।। जो असे उदार पुरुष ।। त्यासी कल्पतरु जगदीश ।। कृपणासी लागती सर्वदोष ।। सोडीं आशेस या समयीं ।। ४६ ।। ऐसे दीक्षितवाग्रसायन[3] ।। अंतरीं प्रवेशता जाण ।। दुराशामळ होउनी दहन ।। उदारपण वाढले अंगीं ।। ४७ ।। मग तथास्तु म्हणोनि ।। अधिकारी गेला घृत घेवोनि ।। शतघट गंगेंत ओतितांक्षणीं ।। जलवत्‌घृत वाहतसे ।। ४८ ।। पाण्यांत घालितां पाणी ।। जैसे मिळे समरसोनी ।। तैसें घृत प्रवाहीं मिळोनि ।। ऐक्य होवोनि वाहतसे ।।

........................

१. संसार सागर तरणें. २. दगड ३. वाणीरूप रसायन



शिवचिदम्बर

४९ ॥ हा पाहोनि चमत्कार ॥ लोक करिती जयजयकारे ॥ कित्येक करिती वारंवार ॥ नमस्कार साष्टांगेंसी ॥ ५० ॥ कोणी करिती स्तोत्र बहुवसी ॥ चिदंबरा तूझे स्वरूपासी ॥ पाहतां तूं व्यक्त दिससी ॥ तूंच अससी महेश्वर ॥ ५१ ॥ ज्यापासूनि विधि हरिहर ॥ अवतरती सर्व सुरवर ॥ तो तूं सदानंद निर्विकार ॥ मूळ चिदंबर रूप तुझें ॥ ५२ ॥ तूं निर्गुण शुद्ध स्वप्रकाश ॥ नित्यानंद नियामक निर्विशेष ॥ ब्रम्हांडरचना क्षणमात्रें सरस ॥ करिसी सर्वेशा निरायासें ॥ ५३ ॥ कालत्रयीं तूं एकरूप ॥ मायापंकाचा तुज नसे लेप ॥ दुर्ज्ञेय असे मायामाप ॥ जिणें जीव पावे पुनर्जन्म ॥ ५४ ॥ मायास्पर्श आम्हांसी ॥ न होय ऐसी ॥ कृपा करी बा हृषीकेशी ॥ इतुकेंचि पायांसी मागणें ॥ ५५ ॥ एवं स्तोत्र ऐकुनी चिदंबर ॥ पुढें करूनि वरद कर ॥ सर्वांसी देऊनी वर ॥ निज मंदिरी पातला ॥ ५६ ॥ ऐसें नित्य नूतन ॥ चरित्र दावी दीक्षितराण ॥ यश वाढलें त्रिलोक भरुन ॥ नित्य येती जन कामनीक ॥ ५७ ॥ आलिया भूदेव मनोरथ ॥ पुरवित असतां श्रीसमर्थ ॥ एके दिवशीं दुर्बळ अनाथ ॥ आला दर्शनार्थ विप्र एक ॥ ५८ ॥ वंदुनी श्रीगुरुचरणीं ॥ धनेच्छा धरूनि अंतःकरणीं ॥ राहिला करांबुज जोडोनी ॥ एकोभावें स्वामीपुढें ॥ ५९ ॥ ब्राम्हण पाहोनि जगज्जीवन ॥ तत्काळ ओळखिलें अंतःकरण ॥ मग करावया तदिच्छा पूर्ण ॥ कठिण गुरूसी काय असे ॥ ६० ॥ परिस लागतां लोहासी ॥ सुवर्ण व्हावया श्रम कायसी ॥ पूजिता कामधेनूसी ॥ मग काय त्यासी दुर्मिळ ॥ ६१ ॥ कल्पवृक्षातळीं बैसतां ॥ कोण काम न होय पुरता ॥ क्षीराब्धिजा[१] गृहीं येता ॥ मग दीनता कां राहे ॥ ६२ ॥ जरी होय प्रसन्न ॥ दैवयोगें नारायण ॥ मग भय मानी कोण ॥ दारुण नरक दुःखांचे ॥ ६३ ॥ दीक्षित होतां प्रसन्न ॥ ब्राम्हणाचें गेलें दुर्दैव उडोन ॥ त्यासमयीं जाहला चमत्कार जाण ॥ ती कथा श्रवण करा भावें ॥ ६४ ॥ तेथें एक आला महासर्प ॥ ब्राम्हणासि बोले जगबाप ॥ तुझें दैव असे निकोंप ॥ म्हणोनि हा सर्प आला पुढें ॥ ३५ ॥ सत्वर घेई भुजंगास ॥ तेणें

१. लक्ष्मी




शिवचिदम्वर

शिवचिदम्बर

होय तुझें दैन्य नाश ।। विप्र ऐकतां गुरुवचनास ।। झाला मानसीं भयग्रस्त ।। ६६ ।। स्वामी म्हणती वेगें धरीं ।। सर्प जातो बिलांतरीं ।। ब्राम्हण भिवोनिया दूरी ।। पळत म्हणे नको धन ।। ६७ ।। तंव ब्राम्हणा संबोखोनी ।। गुरूनें आणविला सर्प सन्निधानीं ।। मग तो भीत भीत जावोनी ।। सर्पा दुरूनि स्पर्श केला ।। ६८ ।। विप्रहस्त लागला सर्पासी ।। सूवर्ण जाहलें बावन्नकशी ।। विप्र घेवोनि तुष्टला मानसीं ।। नगन सद्गुरूसी करितसे ।। ६९ ।। महिमा पाहोनि अगाध ।। स्तुती करितसे नानाविध ।। स्वामी त्यासी करोनि बोध ।। निजसदना पाठविती ।। ७० ।। कृपा करितां जगन्नाथ ।। ब्राम्हणाचें जळालें दुरित ।। द्विज होवोनि श्रीमंत ।। श्रीगुरुनाथा भजतसे ।। ७१ ।। काय वानूं चरित्र गुरुचें ।। जो वदेल नाम वाचे ।। जन्म सार्थक जाहलें त्याचें ।। ब्रम्हपदीं तो नाचे सदोदित ।। ७२ ।। श्रवणमात्रेंसकळ दुःख ।। नासोनि लाधे परम सुख ।। म्हणोनि भावें ऐका भाविक ।। चित्त एकत्र करोनिया ।। ७३ ।। चिदंबरनाम नौकेंत ।। बैसोनिया निश्चिंत ।। मागें तरूनि गेले बहुत ।। तुम्ही तरा तेथ बैसोनिया ।। ७४ ।। हातीं घेवोन डांगोरा ।। चिदंबरकिंकर लहानथोरां ।। सांगतो ऐका निर्धारा ।। तारक चिदंबरीं चित्त ठेवा ।। ७५ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टें सद्गुरुनाथ ।। भावें ऐका श्रोते समस्त ।। विंशोऽध्याय रसाळ हा ।। ७६ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे जलाज्यकरणं नाम विंशोऽध्यायः ।। २० ।। ओवीसंख्या ७६ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

शिवचिदम्बर

## राजारामाय अरण्येमार्गदर्शनम्




तंव बाळ बोले सुमंद हसित । घन असे भयानक अद्‌भुत । येथें दिशा चुकोनि घाबरति पांथ । मार्गदर्शक मी त्यांसी ॥

चिदम्बरचरित्र

अध्याय एकविसावा

शिवचिदम्बर

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। जय कृपासागरा सावित्रीजानी ।। भवभंजना सायुज्यदानी ।। मज कृपादृष्टीं विलोकुनी ।। कर्गापासुनी सोडवीं बा ।। १ ।। आशापाश तोडुनी सभापती ।। करीं निरपेक्ष उदास वृत्ती ।। तुझे भजनीं लागे प्रीती ।। ऐसी मती मज देईं ।। २ ।। कामक्रोधादि मदमत्सर ।। देहीं उठती अनिवार ।। जंव कृपा करी चिदम्बर ।। शुद्ध अंतर तै होय ।। ३ ।। लौकिक प्रतिष्ठा मानाभिमान ।। हें पुढें ओढवलें महाविघ्न ।। तेथेंचि बैसलिया मन ।। तुझें चिंतन घडेना ।। ४ ।। ऐसे अवगुण सांठवोनि अंतरीं ।। तुझा मी म्हणवितों लोकाचारीं ।। येणेंचि भावें भक्त कैवारी ।। मज उध्दरी पतितासी ।। ५ ।। चंचळ मन हे अनिवार ।। तुझे चरणीं असावे स्थिर ।। हेंचि इच्छितों निरंतर ।। जाणसी अंतर चिदम्बरा ।। ६ ।। हस्तें घडावें तुझें अर्चन ।। अथवा संत-चरण सेवन ।। चरणीं घडावें तीर्थाटन ।। अथवा प्रदक्षिणा तुझी देवा ।। ७ ।। नातरी निर्लज्ज होऊन ।। कीर्तनरंगीं व्हावें नर्तन ।। येणें पादांसि होय समाधान ।। इतुका मनोरथ पूर्ण करीं ।। ८ ।। समदृष्टीनें चराचर भूतीं ।। तुजलाचि पहावें सरस्वतीपती ।। विकल्प द्वेष न यावे चित्तीं ।। ऐसा मज निश्चिती देईं वर ।। ९ ।। तुझें चरित्र रसाळ ।। तेंचि मुखें वर्णावें विमळ ।। हीच इच्छा धरोनि सबळ ।। विनवितों दयाळा तुजप्रती ।। १० ।। ही म्यां अघटित घेतली आळ[1] ।। तूं चरित्र वदवीं रसाळ ।। जें श्रवणीं पडतांचि तत्काळ ।। श्रोते प्रेमळ संतोषती ।। ११ ।। मुनीश्वर म्हणे श्रोत्यांसी ।। अवधान द्यावें श्रवणासी ।। सांगतां चिदम्बरकथेसी ।। श्रवणें चित्तासी आनंद होय ।। १२ ।। ज्याविण रिता नसे ठाव अणुप्राय ।। सर्वत्र जो असे पूर्ण अव्यय ।। स्मरोनि त्या चिदंबरपादद्वय ।। सांगेन महासुरस कथा ।। १३ ।। होता राजाराम नाम भक्त ।। लोकोद्धारार्थ सद्‌गुरुनाथ ।। त्याकडून करविले बहुत ।। अभंग प्राकृत अति रसाळ ।। १४ ।। ब्राह्मण पुसती मुनीश्वरांसी ।। हा भक्त उपजला कवणाचे कुशीं ।। सांगा त्याची कथा आम्हासी ।। पूर्वापार साद्यंत ।। १५ ।। द्विजेंद्रासी सांगे मुनीश्वर ।। ऐका भक्तकथा सविस्तर

शिवचिदम्बर

१. हट्ट.

शिवचिदम्बर

|| बहु जन्मींचा असे भक्त थोर || त्यावर पूर्ण गुरुकृपा || १६ || मी असें मंदमती || काय वर्णूं भक्तकीर्ती कीं घडेल मशका[1] हातीं || कैलासावरती आरोहण || १७ || रंक कां बैसेल सिंहासनीं || बाळ आणील काय चंद्र धरोनी || कामधेनूची करणी || अन्य धेनूसी येईल काय || १८ || ज्यासी वर्णिता प्रासादिक कवी || तया मी वानूं शकें केवीं || लक्ष्मीपतीसरी वैभवीं || कोण मानवीं होऊं शके || १९ || भाष्यार्थ सांगती सुधीश्वर[2] || त्यापरी काय वदेल पामर || कल्पवृक्षाचे कारभार || बाभूळ थोर करील काय || २० || पतिव्रतेची साधावया सरी || पांसुला[3] जरी खटपट करी || करितां लक्ष चौऱ्याएंशी फेरी || कैसी तिच्यासम होय || २१ || पंडिताची चातुर्यकळा || कां येईल अजापाळा[4] || नातरी इंद्रपदसोहळा || गोपाळासी मिळेल काय || २२ || असो चिदम्बर कृपामूर्ती || पूर्णत्वें वसे सर्वां भूतीं || विचित्र असे त्याची कृती || हृदयीं वसोनी प्रेरितो || २३ || त्याची जरी असे प्रेरणा || मग कायसा पडे कठीणपणा || होता जरी चिदम्बरकरुणा || मेरूसमान तृण होय || २४ || जीव तुके महेशासी || बाळ वदे वेदराशी || मिळे पुत्रवती नाम वंध्येसी || करणी ऐसी चिदम्बराची || २५ || श्रीरामचंद्राचिया कृपें || दैत्या झालें चिरंजीव पद सोपें || श्रीदत्ताचिया कृपें || शुष्ककाष्ठासी पल्लव फुटे || २६ || श्रीकृष्णाची होतां कृपादृष्टी || झाली सुदामाची दैन्यतुटी || कीं धरितां कुब्जेची हनुवटी || सर्वांगी गोमटी जाहली || २७ || गुरुप्रेरणेपरी कथासार || सांगतों ऐका निर्धार || काष्ठ बाहुलीचें नर्तन थोर || सूत्रधाराचे आधीन || २८ || पूर्वीं नृसिंहावतारीं || याचें नाम प्रल्हाद निर्धारी || रामावतार घेतां श्रीहरी || हाचि वानरीं अंगद जाहला || २९ || हरीनें जन्म घेतां यदुकुळीं || उद्धव होउनी सेविला वनमाळी || हाचि पुढें शिंप्याचे कुळीं || अवतरला नामें नामा || ३० || पंढरपुरीं विठ्ठलभक्त || जगीं जाहला सुव्यक्त || पुढें तोचि तुका निश्चित || जाहला हरिभक्त प्रसिद्ध || ३१ || ऐसें याचें पूर्वाख्यान || भक्तविजय ग्रंथीं लेखन || केलेसें महिपतीनें जाणत

१. चिलटाच्या. २. श्रेष्ठ पंडित. ३. जारिणी. ४. धनगराला



शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

|| तेंचि प्रमाण एतद्विषयीं || ३२ || आतां स्वमुखें राजाराम || अभंगी लिहिलेंसें स्वनाम || पूर्वी होतों तुकाराम || आतां झालों राजाराम ऐसें || ३३ || श्रीकृष्णे घेतला दुसरा अवतार || नाम घेतलें चिदम्बर || तुकया झाला राजाराम सत्वर || पूर्व परंपरेपरी || ३४ || सेवा केली अनन्यभावें || चिदम्बरयश पसरावें || म्हणूनि अभंग रचिले भक्तरावें || ग्रंथी लिहूं कवण शके || ३५ || भक्तराजें स्वचरित्र || निजात्मबोध ग्रंथीं विस्तार || लिहिले असे निर्धार || तोचि अभिप्राय सांगू येथें || ३६ || बाबुळगांव असे गोदातटीं || तेथील पाटील वृत्ती गोमटी || परंपरा घेउनी हातवटी || पूर्वज याचे वसती तेथें || ३७ || होते वंशीं रजपूत || पंचाग्नीसाधनीं निष्णात || तयांचे कुळीं हा महाभक्त || प्रपंची विरक्त उपजला || ३८ || जन्मतांचि तो कुमर || दिसे सर्वांगीं सुकुमार || जसा पौर्णिमेचा शीतकर || जाहला थोर दिवसेंदिवस || ३९ || होतां बाळासी पांच वर्षे || भक्ति वैराग्यादि गुण विशेषें || शोभतसे भागवत अंशें || नातळे क्रीडेस कदाकाळीं || ४० || अरुणोदयीं करितसे स्नान || शिवपूजा पुराण श्रवण || नित्य नेमें करोनि पितृवंदन || नामस्मरणीं मग्न निशिदिनीं || ४१ || ऐसा लोटतां क्वचित्काळ || ऐकिलें ध्रुवचरित्र रसाळ || लागली पोटीं तळमळ || झाला जन्म निष्फळ म्हणत || ४२ || पंच वर्षांचे बाळासी || प्रसन्न झाला हृषीकेशी || मज वर्षे आठ परियेसी || परि कैसा न भेटे देव || ४३ || नरजन्मा येउनी भगवंत || ज्यासी भेटला नसे साक्षात || त्याचा जन्म वृथा खचित || न चुके आघात जन्ममृत्यूचा || ४४ || वृक्ष वाढला उंच बहुत || काय करावा फळविरहित || उदंड असे घरीं संपत || नसतां संतान व्यर्थची || ४५ || लावण्यें पूर्ण असतांही सुंदरी || नसतां भालीं कुंकुम जरी || तिचा जन्म झाला दगडापरी || तैसा भक्तिविणें व्यर्थ जन्म || ४६ || ऐसा होवोनि व्याकुळ || अहोरात्र करितसे तळमळ || एके दिनीं शिव पूजावया निश्चळ || चित्त करूनी बैसला || ४७ || तंव तेथें एक दिगंबर मुनी || आला अनायासें करोनी || वेगें मस्तक त्याचे चरणीं || ठेवूनी साष्टांगें नमितसे || ४८ || पूजा करूनि षोडशोपचार || जोडोनिया दोनी कर || निवेदोनि

शिवचिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

हृद्गतसार ॥ विनवितसे अपार सप्रेमें ॥ ४९ ॥ तंव तों दिगंबर मुनी ॥ तुज प्रसन्न होईल चक्रपाणी ॥ ऐसें संकेतें सांगूनी ॥ तत्काळ अंतर्धान पावला ॥ ५० ॥ त्या दिवसापासुनी ॥ विशेष झुरे अंतःकरणीं ॥ गाय चरता महावनीं ॥ पाडस मनीं झुरे जैसें ॥ ५१ ॥ पाडस चुकलिया हरिणी ॥ धुंडाळितसे वनोवनीं ॥ तैसें बाळ अतःकरणीं ॥ सगुण भेटीसी वाट पाहे ॥ ५२ ॥ नातरी माय गेलिया कार्यासाठीं ॥ बाळ जैसें अस्वस्थ पोटीं ॥ तैसी व्हावया सगुण भेटी ॥ करी अटाटी सदोदित ॥ ५३ ॥ मज उपक्षिलें दीननाथें ॥ होय नाश आयुष्यातें ॥ मज कां अव्हेरिलें सद्गुरुमातें ॥ आतां दुःखातें सांगूं कवणा ॥ ५४ ॥ अगा सद्गुरु कृपासागरा ॥ कां मोकलिसी मज दातारा ॥ तुजविण नसें मज थारा ॥ संसारापासुनी पार करीं ॥ ५५ ॥ तूं मज उपेक्षिसी जरी ॥ अन्य कोण मजला तारी ॥ कोण मज घेईल पदरीं ॥ अव्हेरिसी कासया मज ॥ ५६ ॥ गुरुचिंतन करित अहोरात्र ॥ तीव्र वैराग्यें वाढला थोर ॥ तेव्हां पातला गुरु बाळेश्वर ॥ करुणासागर अनायासें ॥ ५७ ॥ वृती पाहूनि राजारामाची ॥ मती विराली श्रीगुरूची ॥ उपदेश देतां स्थिती याची ॥ तत्काळ निश्चिती होय बरवी ॥ ५८ ॥ ऐसा निश्चय करोनि मनीं ॥ बाळा बोलावूनि सन्निधानीं ॥ महा वाक्योपदेश कानीं ॥ सांगतसे गुरुमाउली ॥ ५९ ॥ तेणें यासी न होतां समाधान ॥ बहु वाढले संकल्प गण ॥ मग म्हणे व्हावें सगुण दर्शन ॥ ऐसें कृपादान मज द्यावें ॥ ६० ॥ शिष्यवचन परिसोनि या रीती ॥ प्रसन्न होवोनि बोले गुरुमूर्ती ॥ सगुण रूपें तुज उमापती ॥ भेट देईल निश्चयें ॥ ६१ ॥ ऐसें सांगुनी गेला वैरागी ॥ तीर्थयात्रा करावयालागीं ॥ इकडे भक्त होवोनि विरागी ॥ सगुण मूर्ती चित्तीं ध्यातसे ॥ ६२ ॥ चौथे दिवशीं त्याचे स्वप्नीं ॥ चिदंबर आला द्विज होवोनी ॥ बोले हंसत रसाळ वाणी ॥ आजपासोनि मनीं शांति धरीं ॥ ६३ ॥ ऐसें वर्ततां एके दिवशीं ॥ राजाराम पातला हुसंगाबादेसी ॥ त्या देशाधिपतीनें तयासी ॥ सेनाधिपत्य दीधलें ॥ ६४ ॥ हातीं दीधलें पंचशत दळ ॥ तयावरी स्वामी केला-केवळ ॥ परी तयाची वाणी रसाळ ॥ शिवनाम सोज्वळ न विसरे ॥ ६५ ॥ एकदां

शि
व
चि
द
म्ब
र

कृष्णभट्ट नामक ।। अवचित भेटला द्विज एक ।। तंव सेनापती त्याच क्षणीं देख ।। काशीयात्रार्थ होता प्रस्थित ।। ६६ ।। चिदम्बरचरित्र ब्राह्मणमुखें ।। ऐकतां सेनापती हरिखें ।। मान हालवित बोले सकौतुकें ।। काय देऊं तुजसी आतां ।। ६७ ।। त्याच दिवशीं गुरुदर्शनासी ।। निघाला सवें घेवोनि द्विजासी ।। तैसाच गुरुबंधु निंबाजीसी ।। सवें घेतला परियेसा ।। ६८ ।। मार्गी लागला पर्वत थोर ।। झाडी दिसें भयानक अघोर ।। न दिसे जेथे जनसंचार ।। श्वापदें अपार गर्जती ।। ६९ ।। योजनांतरी न दिसे ग्राम ।। मार्ग चुकोनि शिरला आडवर्त्म[1] ।। तिघेही अंतरीं भिवोनि परम ।। गुरुस्मरण करूं लागले ।। ७० ।। स्मृतकामपूरणीं कल्पतरू ।। तेथें पावला श्रीचिदम्बरू ।। बालवेष घेवोनि सुंदरू ।। मधुरोत्तरू बोलत ।। ७१ ।। आठ वर्षाचा बाळ सुकुमार ।। कांच्या भिडोनि मनोहर ।। प्रसन्न मुख श्यामसुंदर ।। पुढें उभा राहिला ।। ७२ ।। शिरीं शोभे लहान घोंगडी ।। हातीं वेताटीची छडी ।। मंद हासें बोलत गोडी ।। पुढें उभा राहिला ।। ७३ ।। बालवेष पाहतां मनमोहन ।। तिघांचे निवालें अंतःकरण ।। आदरें पुसती कोण म्हणोन ।। घोर वनीं कां आलासी ।। ७४ ।। तंव बाळ बोले सुमंद हसित ।। वन असे भयानक अद्‌भुत ।। येथें दिशा चुकोनि घाबरती पांथ ।। मार्गदर्शक मी त्यांसी ।। ७५ ।। तुम्हीं धरिला आडमार्ग ।। म्हणोनि धाविन्नलों सवेग ।। यावें मजसवें लागवेग ।। राजमार्ग दावितों ।। ७६ ।। बाळ वेगें चालतसे पुढें ।। मागें पळती तिघांचे घोडे ।। वारंवार फिरोनि तिघांकडे ।। पाहतसे कूर्मदृष्टी[2] ।। ७७ ।। कांहीं पुढें चालतां वाट ।। माध्यान्हीं आला ग्रहश्रेष्ठ[3] ।। क्षुधातुर होतां तिघे अचाट ।। जलाशयानिकट बैसला बाळ ।। ७८ ।। तुम्हां झाली असेल क्षुब्दाधा ।। मजतरी लागलीसे क्षुधा ।। येथें सारा स्नानादि नित्यविधी[4] ।। मीही क्षुधा निवारितों ।। ७९ ।। तिघें देऊं जाती उपाहार।। बाळ घेईना निर्धार ।। म्हणे मजपाशीं असे अपार ।। तुम्ही सत्वर भोजन करा ।। ८० ।। तिघे करोनि उपाहार ।। आरूढले अश्वावर ।। तंव चालतसे बाळ समोर ।। वेताटी फिरवित कौ

1. आडमार्ग 2. कासवाच्या नजरेनें 3. सूर्य 4. नित्यकर्म.



शिव चिदम्बर

शिव चिदम्बर

तुर्के ।। ८१ ।। येर्णेपरी वन उल्लंघोनी ।। राजमार्ग लागतां तीघेजणीं ।। ग्राम दिसूं लागला सन्निधानीं ।। बाळ तत्क्षणीं गुप्त जाहला ।। ८२ ।। सभोंवतीं धुंडितां तिघे ।। बाळ न दिसे पुढें मागें ।। एकाएकी गुप्त निजांगें ।। जाहला कैसेनी म्हणती ।। ८३ ।। मग आश्चर्य पावोनि चित्तीं ।। बाळ नव्हे हा निश्चयें म्हणती ।। आम्हां मार्ग दावावया उमापती ।। पातलासे सत्य सत्य ।। ८४ ।। मग जेथें जाहला गुप्त ।। तेथें करोनि प्रणिपात ।। चिदंबरलीला चित्तीं स्मरत ।। कुंदगोळासी पातले ।। ८५ ।। तेथें असंख्य यात्रिक ।। दर्शन नोहे साहाजिक ।। नाम लेख करोनि सेवक ।। निरोप कळविती स्वामीसी ।। ८६ ।। इतुकें व्हावया लागले तीन दिवस ।। तंव सेनापतीस उपवास ।। दर्शनाविण नेघे अन्नरस ।। म्हणोनि बैसला स्वस्थपर्णे ।। ८७ ।। उपवासें लोटतां चार वासर ।। एकासनीं बैसला करूनि निर्धार ।। त्या दिनीं स्वप्नीं कृपासागर ।। प्रगटोनि अंकीं बैसवित ।। ८८ ।। मग आलिंगन घेवोनि दासाचें ।। बोलत स्वामी मधुर वाचे ।। निग्रह सांडोनि करीं देवाचें ।। सात्त्विक मतीनें आराधन ।। ८९ ।। नानापरी संबोखुनी ।। खोबरें शर्करा घेई म्हणोनी ।। स्वहस्तें कवळ वदनीं ।। प्रीतीनें घालितसे ।। ९० ।। गुरुहस्तें प्रसाद भक्षित ।। पोट भरोनि झाला तृप्त ।। मग सांगे दक्षिण श्रवणांत ।। मंत्र निश्चित तारक जो ।। ९१ ।। गुरु म्हणे त्यानंतर ।। जगन्नियंता मीच सर्वेश्वर ।। नाम माझें असें चिदंबर ।। म्हणोनि स्वरूप दावितसे ।। ९२ ।। अनंतकोटिब्रम्हांड ।। ज्या स्वरूपीं दिसती उदंड ।। कीं एकवटले सहस्त्रमार्तंड ।। तैसें अखंड दिसे तेजोरूप ।। ९३ ।। ऐसें रूप पाहोनि अद्भुत ।। नेत्र झाले संकुचित ।। सर्वांग दिसे रोमांचित ।। हर्षे दंडवत नमितसें ।। ९४ ।। त्यासमयीं अलौकिक अमूप ।। गुप्त करोनि निज रूप ।। घेऊनियां द्विजस्वरूप ।। बोले मायबाप दासाचा ।। ९५ ।। अगा वत्सा उदईक ।। भेटीसि यावें निष्टंक[1] ।। शीघ्र येईं म्हणे उमानायक ।। दीक्षित नावेंच वसे ।। ९६ ।। संसारापासुनी बहुतांसी ।। उद्धार करोनि स्थिर कीर्तीसी ।। स्थापीन तूं सोडी कल्पनेसी ।। येईं दर्शनासी

१. निश्चिंत

प्रीतीनें ।। ९७ ।। इतुक्यांत झाला जागृत ।। कोठेंही न दिसे श्रीगुरुनाथ ।। भक्त म्हणे झालें अद्भुत ।। गिरिजाकांत भेटला मज ।। ९८ ।। भोगाविण तृप्ती केवळ ।। मुखीं असे प्रसाद कवळ ।। मंत्राची स्मृती असे सोज्वळ ।। गेली तळमळ आजि माझी ।। ९९ ।। तत्काळ करोनि प्रस्थान ।। निघता झाला वेगेंकरून ।। जेथें असे साक्षाच्छिवारमण ।। पातला जाण त्या स्थाना ।। १०० ।। भक्त येतां द्वारासन्निध ।। सभाजनांसी स्वामी सांगे विशद ।। आज येतो महात्मा सुबुद्ध ।। चला जाऊं दर्शना ।। १ ।। ऐसें म्हणत चिंदबर ।। सर्वे घेउनी भूसुर परिवार ।। आला भक्तभेटीसी सामोर ।। द्वारासन्निध परियेसा ।। २ ।। दुरूनि पाहतां स्वामीसी ।। करत चालिला लोटांगणेसी ।। स्वामी पाहुनी वेगेंसी ।। आलिंगितसे हृदयीं ।। ३ ।। करोनि मस्तकावघ्राण ।। तटस्थ राहिला सावित्रीरमण ।। नेत्रीं भरले बाष्प पूर्ण ।। रोमहर्षण झाले सर्वांगीं ।। ४ ।। प्रेमे स्फुंदती देव भक्त ।। कंठ भरोनि झाले सद्गदित ।। काय वर्णूं प्रेम अद्भुत ।। देहभान किंचित नाठविती ।। ५ ।। भरत येतां श्रीरामभेटी ।। जैसें प्रेम श्रीरामाचे पोटीं ।। तीच उपमा गोमटी ।। साजे यथार्थ अवधारा ।। ६ ।। कीं द्वैतवनीं असतां पांडव ।। ऐकोनि द्रौपदीचा धांवा अपूर्व ।। द्रौपदीसी भेटतां केशव ।। प्रेमपाझर फुटे जैसा ।। ७ ।। तैसा देव भक्तांचा आनंद ।। पाहुनी जय जय करिती भूविबुध ।। म्हणती स्वामीचा महिमा अगाध ।। कोण हा प्रसिद्ध पुरुष असे ।। ८ ।। ऐसे स्तवितां सर्व जन ।। स्वामी भक्ताचा हस्त धरून ।। सभेसी आले घेऊन ।। दीक्षित म्हणे काय इच्छिसी ।। ९ ।। माग गा जें मनीं इच्छिसी ।। जरी असाध्य द्यावया आम्हांसी ।। मागूनिया परमेश्वरासी ।। देतों निश्चयेसी माग वर ।। ११० ।। ऐकोनि म्हणे भक्तराज ।। एकांतीं सांगेन निज गुज ।। एकांतीं बैसोनि द्विजराज ।। बोलावी सहज भक्तासी ।। ११ ।। काय वसे मागणें मनीं ।। सांग देतों याच क्षणीं ।। सोडीं तूं संशय अतःकरणीं ।। भक्तशिरोमणी तूं माझा ।। १२ ।। ऐकोनि सद्गुरुभारती[1] ।। मस्तक ठेवोनि चरणावरती

1. सद्गुरूची वाणी




शिवचिदम्बर

।। स्वामी ऐक माझी विनंती ।। भक्ति एक मज देईं ।। १३ ।। ऐकोनि भक्तांचें मागणें ।। पूर्वींच सांगीतलें स्वामी म्हणे ।। तेंचि दावितों आतां खुणें ।। संशय जेणें उडे तुझा ।। १४ ।। तंव स्वामीचें रूप पालटे ।। श्रीकृष्णरूप तत्काळ प्रगटे ।। चतुर्भुज दिसे गोमटें ।। दर्शनेंचि तुटे भवव्यथा ।। १५ ।। शंख चक्र गदा पद्म ।। वैजयंतीयुक्त मेघश्याम ।। किरीटाचे नवरत्नधाम ।। शोभतसे परम मनोहर ।। १६ ।। कंठी सुशोभित वनमाळ ।। कपाळीं झळकती मकरकुंडल ।। हस्तीं कटक कटीं सूत्र सोज्वळ ।। त्याला असे बाहुभूषणें ।। १७ ।। हृदयीं रत्नहार झळकती ।। त्यामध्यें कौस्तुभमणी विराजती ।। नक्षत्रमाला शोभे त्यासभोंवती ।। साजे हृदयीं श्रीवत्सलांछन ।। १८ ।। कांसे कसिलासे पीतांबर ।। सर्व लक्षणी पूर्ण श्रीवर ।। पुढें करोनि वरदकर ।। उभा असे समोर भक्ताच्या ।। १९ ।। श्रीकृष्णरूप पाहोनि सुकुमार ।। भक्त पावला विस्मय थोर ।। चरणीं करित नमस्कार ।। न्याहाळित मुखकमल ।। १२० ।। विसरला निज देहभान ।। आनंदाश्रु वाहती नेत्रीं पूर्ण ।। आंगीं आले रोमांच भरून ।। चरण धरून नमितसे ।। २१ ।। मागुती उठोनि पाहतां ।। कृष्णरूप हरपलें तत्त्वता ।। द्विज होवोनि निज भक्ता ।। जाहला वदता गंभीर नादें ।। २२ ।। ऐक वत्सा माझी वाणी ।। जरी होतासि पूर्वीं ज्ञानी ।। दुजा देहसंबंध पावतांक्षणीं ।। प्रमाद अंतःकरणीं येतसे ।। २३ ।। म्हणोनि पूर्वस्मृती व्हावया ।। ज्ञानपद्धती ऐक शिष्यराया ।। सांगतों तुज संक्षेपें करूनिया ।। अवधान द्यावें मजलागीं ।। २४ ।। ऐक व्हावया चित्तशुद्धी ।। स्ववर्णाश्रमधर्म आचरावा आधीं ।। मग सगुण रूपीं त्रिशुद्धी ।। परमावधी भक्ती धरीं ।। २५ ।। शिवविष्ण्वादि विबुधीं ।। तिळमात्र न करितां भेदबुद्धी ।। भजनपूजन करावें शास्त्रविधीं ।। धरीं मद्बुद्धी सर्वांठायीं ।। २६ ।। अनन्य भावें मद्गुणश्रवण ।। करावें एकचित्तेंकरून ।। एवं भक्तिमार्गें करितां गमन ।। होतो जाण ज्ञानाधिकारी ।। २७ ।। आदौ अभ्यासावें ज्ञानांग ।। स्वयें मग ज्ञानी होय अभंग ।। तेंचि सांगतों ऐक यथासांग ।। संक्षेपें अंग पूर्वोक्त ।। २८ ।। आदौ विषयीं विराग धरावा ।। हळूहळू पुढें प्राण जिंकावा ।। सर्वेंद्रियांचा निग्रह करावा ।। द्वंद्व सहावें शांतीबळें

शि व चि द म्ब र

।। २९ ।। गुरुवचनीं विश्वास असावा ।। प्रत्यहीं अभ्यास वाढवावा ।। देहाहंकार दवडावा ।। प्रत्यहीं जोडावा सत्समागम ।। १३० ।। त्रिदेहबंध[1] केव्हां तुटे ।। कदा वासनाजीवन आटे ।। विषयीं वमनवत् चित्त विटे ।। असे शेवटचें अंग हें ।। ३१ ।। ऐसें हें नव अंग मुख्य ।। आधी जाणोनियां अवश्य ।। मग आश्रयावे सद्‌गुरुपाय ।। एकोभाव करोनिया ।। ३२ ।। सप्रेमें करोनि वंदन ।। सविनयें करावे प्रश्न ।। देही मी आहें कोण ।। आणि जगत्कारण कायसे ।। ३३ ।। मग जें सांगती गुरुनाथ ।। ऐकावें करुनि चित्त स्वस्थ ।। गुरुबोध सांगतो शास्त्रोक्त ।। तेणें स्वहित लाधे तात्काळ ।। ३४ ।। तूंचि आहेस ब्रम्ह पूर्ण ।। नित्य मुक्त तूं निरंजन ।। जळीं बुद्‌बुद जैसे उठती जाण ।। तैसें जगज्जनन तुजमाजी ।। ३५ ।। तूंचि मायायोगें धरिसी ।। ईश्वर नाम परियेसी ।। तेणें जगत्कर्ता तूंचि होशी ।। भरुनी राहसी चराचरीं ।। ३६ ।। एवं तूं असूनि पूर्ण ब्रम्ह ।। अज्ञानाध्यासे धरुनी देहभ्रम ।। पावलासी तूं जीव नाम ।। ऐसें बोलिलें वर्म श्रुतिशास्त्रीं ।। ३७ ।। सर्पभ्रम दोरीवरती ।। जैसे अज्ञानें दिसती ।। तैसे जगभ्रम तुजवरती ।। भासती मायायोगें ।। ३८ ।। प्रकाशयोगें होतां रज्जुज्ञान ।। सर्पभ्रम निवारे तत्क्षण ।। तैसें होतां ब्रह्मज्ञान ।। जगभ्रांती दूर होय ।। ३९ ।। उदया येतां भास्कर ।। जैसा हारपे नीहार[2] ।। तैसा होतां ब्रम्हविचार ।। अज्ञान संहार होतसे ।। १४० ।। ब्रह्मीं होतां अहंस्फुरण ।। स्फुरणासीच माया नाम खूण ।। माया नसे ब्रह्माविण ।। एकरूप जाण मायाब्रह्म ।। ४१ ।। जल तरंग जैसे वेगळे ।। जैसें भानू तेज आगळें ।। तैसेंचि माया ब्रम्ह वेगळें ।। सुविचारें कळे मायारूप ।। ४२ ।। माया म्हणिजे मिथ्या ।। भ्रमें तीच भासे सत्या ।। जैसें स्वप्न असूनि मिथ्या ।। स्वप्नीं दिसे सत्यत्वें ।। ४३ ।। जें कार्यरूपें अविचारें दिसे ।। विचारितां तिळमात्रही न भासे ।। त्यासची मिथ्या नामऐसें ।। त्यापरी विलसे ही माया ।। ४४ ।। बागुल[3] नसतां त्रिकाळीं ।। भय पावोनि बाळ तळमळी ।। तैसी माया पीडी अज्ञानकाळीं ।। ज्ञानसमकाळीं लया पावे ।। ४५

शि व चि द म्ब र

१. स्थूल, सुक्ष्म व लिंग देह. २. धुकें ३. बुजगावणें

|| ऐसा जो असे मिथ्या भ्रम || स्फुरणरूपें तोचि असे ब्रह्म || त्यापासुनी महत्तत्त्वाचा जन्म || असे अहं महत्तत्त्वज || ४६ || अहंकारापासुनी त्रिगुण || उपजले सत्त्व रज तम जाण || पंचविंशति तत्त्वें परिपूर्ण || त्रिगुणापासुनी उपजली || ४७ || तमोगुण कार्य पंचभूतें || रजःकार्य म्हणती इंद्रियांतें || सत्त्व कार्य अंतःकरण दैवतें || पंचविंशति तत्त्वांतें जाण ऐसे || ४८ || दशेंद्रियें पंचप्राण || अंपचीकृत भूतें अंतःकरण || ऐसें सप्तदश मिळोन || लिंगदेह जाण उपजला || ४९ || पुढें भूतपंचीकरणें || जाहलें स्थूलाचें उपजणें || मग देह व्यापिला अभिमानें || तेव्हां जीव म्हणे देह मी || १५० || देहाध्यासें दुःखसुख || भोक्ता झाला जीव सम्यक || निजस्वरूप विसरोनि देख || जीव नाम पावला आत्मा || ५१ || तरंग फेन बुद्बुद || जळींच दिसती विशद || तरी न पवती जळभेद || असे जळचि आदी अंतीं || ५२ || जग तैसें ब्रह्मजनित || ब्रह्मरूपचि असे शाश्वत || ब्रह्म सर्वाधिष्ठान सर्वगत || द्वैत किंचित नाहीं तेथें || ५३ || तरंगादिकांचे विनाशें || जळ जैसे तै विलसें || देहादि जग विनाशें || ब्रम्ह त्यासरिसें न पवे नाश || ५४ || जळीं तरंगादिक वृथा || भासती त्याचपरी तत्त्वता || मिथ्या भासे ब्रह्मीं जग तथा || असे ब्रह्म शाश्वत कालत्रयीं || ५५ || याकारणें देहादि जगभ्रम || सांडोनिया प्रेमधाम || शांतीनें ध्याई परब्रम्ह || मोक्ष सुगम होय तेणें || ५६ || दृश्य विलसे जितुकें || नश्वर जाण तितुकें || अदृश्य शांत जें सारिखें || ध्याई सुखें तेंचि ब्रह्म || ५७ || अनिर्वाच्य सर्वगत || स्वयंप्रभ असे शाश्वत || तेंचि बा ब्रह्म निश्चित || स्वहित साधीं तद्ध्यानें || ५८ || ऐसें सांगता चिदम्बर || भक्त करोनि नमस्कार || प्रश्न करिता झाला थोर || चिदम्बरकिंकर म्हणतसे || ५९ || स्वस्ति श्रीचिदम्बरचरित || ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ || एकचित्तें ऐका समस्त || एकविंशोऽध्याय रसाळ हा || १६० || इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे राजारामाय अरण्ये मार्गदर्शनं एकान्ते कृष्णरूपदर्शनं उपदेशश्च नाम एकविंशोऽध्यायः || २१ || ओवीसंख्या १६० ||

|| श्रीचिदम्बरार्पणमस्तु ||

# राजारामाय उपदेशः




ऐकोनि म्हणे भक्तराज । एकांती सांगेन निजगुज : एकांतीं बैसोनि द्विजराज । मस्तकी हस्त ठेविती ॥

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। जयजया श्रीचिदंबरा ।। भक्तचकोरा पूर्णचंद्रा ।। जय जया आनंदसागरा ।। जय षट्कुमरा सावित्रीपती ।। १ ।। तूं माझी माउली केवळ ।। मी तुझें तान्हें बाळ ।। कडे घेउनी सांभाळ ।। करीं गे दयाळे लवकरी ।। २ ।। तूं माझी होशी हरिणी ।। मी पाडस तुझे चरणीं ।। ठेवोनि भाव उदास मनीं ।। सत्वर भेटोनि हर्षवीं ।। ३ ।। तूं होशी माझी धेनु ।। मी तुझा वत्स असें लहानु ।। कृपारस पाजवोनि वांचवीं प्राणु ।। हेंचि मागणें पूर्ण करी ।। ४ ।। तुझ्या अनुग्रहें मानव ।। पावोनि सानुताप विरागभाव ।। भोगतो चित्साम्राज्यवैभव ।। तव पदीं भाव असो माझा ।। ५ ।। ऐका म्हणे मुनीश द्विजेंद्रांसी ।। चिदम्बरकथा सुरस परियेसी ।। श्रवणमात्रें चित्तासी ।। आनंद होय परियेसा ।। ६ ।। पुसे राजाराम स्वामीसी ।। तूंचि ब्रम्ह म्हणोनि सांगसी ।। ऐकतां तुमचे वचनासी ।। संशय मानसीं येतसे ।। ७ ।। जरी होय मीच परमात्म ।। अद्वितीय असे परब्रम्ह ।। ऐसा जायापुत्रादिक भ्रम ।। होतसे मम हृदयीं कैसा ।। ८ ।। हें असें गृह माझें ।। हा मित्र तो शत्रू गांजे ।। मी सुखी दुःखी हें धन माझें ।। हे असती तुझे वाईट खेळ ।। ९ ।। मी कर्ता दानशौंड ।। मी सर्वभोक्ता उदंड ।। मजवांचुनी तृणखंड ।। हालत नाहीं जाणं पां ।। १० ।। संपत्ती राबे माझे घरीं ।। दुजा कोण असे मजसरी ।। मी उदार असें भारी ।। सर्वांहुनी वरिष्ठ ।। ११ ।। इत्यादि कल्पनाजाल ।। चित्तीं कां उठती सबळ ।। ब्रम्हासी तळमळ ।। होय कैसे परी सांगें ।। १२ ।। परमात्मा मी कैसा ।। दृश्य सर्व कैसे मृषा[1] ।। हें निवडूनी सर्वेशा ।। सांग मजसी ।। १३ ।। बहु जन्मींच्या देहाध्यासें ।। मीच देह म्हणून भ्रांती वसे ।। हे संशय जातील कैसे ।। ऐसा बोध करीं आतां ।। १४ ।। तंव स्वामी म्हणे शिष्यासी ।। ऐक वत्सा सावध परियेसी ।। अज्ञान या सर्व भ्रमासी ।। मूळ कारण असें जाण ।। १५ ।। ज्ञानें होंय अज्ञाननाश ।। गुरुभक्ती पाहिजे ज्ञानास ।। वैराग्यावीण भक्तिरस ।। न संभवे कवणे काळीं ।। १६ ।। पश्चात्तापावीण वैराग्य।। कदांही कोणासी न होय

१. खोटें

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

मज सोडवीं बा दातारा ।। शंकरा गिरिजापते ।। ३३ ।। नेणतां तुझा प्रताप ।। पूर्वजन्मीं केलें महापाप ।। तेणें दिधलासी हा संताप ।। आतां मायबापा पार करीं ।। ३४ ।। गर्भापासुनी सोडवी एक वेळा ।। पुढें पापा मी न शिवें दयाळा ।। आजन्ममरणापर्यंत केवळा ।। होईन पदकमळीं लीन ।। ३५ ।। काल घालवीन तव सेवेसी ।। हरे मुरारे हृषीकेशी ।। न स्मरें अन्य विषयांसी ।। भवदुःखापासुनी मुक्त करीं ।। ३६ ।। अगा भवाब्धितारका[१] ।। निवारीं माझे सर्व दुःखा ।। गर्भव्यथा सोसेना मज देखा ।। रमानायका पार करीं ।। ३७ ।। ऐसा शंकरस्मरणें जीव ।। धरोनि समाधान भाव ।। आठवतसे निज दैव ।। गर्भी काळ कंठितां ।। ३८ ।। पूर्ण होतां नव मास ।। सूतिवार्तें[२] पावोनि पीडेस ।। तंतू आकर्षणासरसे ।। कष्टें ये बाहेर योनिद्वारें ।। ३९ ।। भूमीवरी पडतां आर्तनाद ।। जन्मदुःखे पंच रात्र ।। स्तनपान न करितां कुमर ।। स्मरत जन्मदुःख अपार ।। रुदनपर होतसे ।। ४१ ।। मृत्युदुःखाहुनी शतगुण ।। जन्मदुःख असे जाण ।। काय असे संसारी सुगुण ।। ऐसी जाण गर्भव्यथा ।। ४२ ।। आतां बाळपणींचे दुःख ।। सांगतो तुज मी विशेख ।। एकचित्त करोनि ऐक ।। संसारी सुख जाणसी मग ।। ४३ ।। बहिर्वायुस्पर्शमात्रें ।। लीन होतें पूर्वज्ञान सारें ।। अज्ञानें होतसे बारे ।। रोदनपर सदोदित ।। ४४ ।। लोळतसे मळमूत्रअघोरीं ।। दंशमत्कुणादि[३] पीडिती भारी ।। होते परवश खाजवावया तरी ।। होतसे सदा क्षुटतृषादि पीडा ।। ४५ ।। ऐसे दुःख बाळवयीं ।। अनुभवी बाळ वाढतां पाहीं ।। दुःख अधिक पौगंडवयीं[४] ।। क्रीडाविषयीं तत्पर तेव्हां ।। ४६ ।। क्रोधाहंकारें प्रदीप्त ।। खेळ खेळतसे दिनरात ।। सदा भक्षण पाहिजे त्यांत ।। हिताहित न विचारी ।। ४७ ।। अज्ञान सर्वांगी जडे ।। तेणें उपडे रडे ।। करितसे वेडेकुडें वांकडे ।। मोडे चढे जिकडे तिकडे ।। ४८ ।। येणेंगुणें परमात्म्याकडे ।। लक्ष न जाय तेव्हां थोडें ।। व्यर्थ आयुष्य जातसे पुढें ।। कौमारवय ऐसें जाय ।। ४९ ।। व्यावहारिक बोध अपार ।। कौमार्यी बोधिती मातापितर ।। न करी

१. संसारसागर तारणाऱ्या २. प्रसववेदनांनी ३. डास व ढेकूण आदि ४. कुमार वयांत




शिव चिदम्बर

पाठ जरी कुमर ।। ताडन तर्जन[1] बहु करिती ।। ५० ।। सदा शिव्यागाळी करिती ।। होय दुःख बाळाप्रती ।। मधें मधें त्रिताप झडपंती ।। तेणें भीती होतसे बाळां ।। ५१ ।। एवं कुचित्काळ लोटता पुढें ।। यौवनपिशाच अंगीं जडे ।। तेणें जीवाचें मन वांकुडें ।। होतां बडबडे मंदबुद्धी ।। ५२ ।। मत्त होवोनि मद्यपि ऐसा ।। उगेची अहंकारें जल्पी[2] सहसा ।। मानोनी अंगना कुळदेव ऐसा ।। निंदितसे द्विजदेवासी ।। ५३ ।। होवोनि शिश्नोदरपरायण ।। करितसे मायबापाचें धिक्करण ।। मी कर्ता स्वयं भोक्ता पूर्ण ।। दुजा कोण मजसरी ।। ५४ ।। मी करितों संपादन ।। पाहिजे तें मी करीन ।। ऐसा उन्मत्त होऊन ।। न स्मरे जाण आयुर्व्यय ।। ५५ ।। गत दिवसांचा न करितां विचार ।। मीच चिरंजीव असें थोर ।। ऐसा अविचारी होऊन प्रखर ।। साधुबोध नाणी मनीं ।। ५७ ।। आवडे साधूंचा उपहास ।। निंदितसे वृद्धजनांस ।। आदरितसे परस्त्रीदर्शनास ।। परोत्कर्ष न साहे मनीं ।। ५७ ।। परधनी होऊनी लंपट ।। बोलतसे दुसऱ्यासी ओखट ।। अल्पज्ञान होतां फुगे पोट ।। धिक्कारितसे स्पष्ट सर्वज्ञा ।। ५८ ।। आत्मप्रतिष्ठा इच्छून ।। करितसे दुसऱ्यांचें मानखंडन ।। तिळप्राय मिळतां आपणा मान ।। स्वर्गासमान मानी हरिख ।। ५९ ।। करावया धनार्जन ।। अविश्रम रांत्रदिन ।। करितसे महायत्न ।। क्षणही न घेतां विश्रांती ।। ६० ।। पुराणसत्कथाश्रवणीं ।। आदरें बैसतां क्षणीं ।। नाना विकल्प आणी मनीं ।। अर्थ मनीं न शिरेची ।। ६१ ।। किंचित होतां धनलाभ ।। उभवितसे हर्षस्तंभ ।। धननाश होता स्वदंभ ।। सोडुनी रडतसे परियेसा ।। ६२ ।। काष्ठ सदृश गात्राचे ।। रक्षणा यत्न करी साचे ।। कितीही रक्षितां न वांचे । देह मानवाचा नश्वर ।। ६३ ।। न करितां शिवचिंतन ।। करितसे देहसंरक्षण ।। अव्हेरुनी गोक्षीरपान ।। करीत पान अर्कक्षीराचें ।। ६४ ।। कीं सुधा टाकूनी सोमलभक्षण ।। कामधेनू दवडोनी खरदोहन[3] ।। कीं अप्सरा लाथ हाणोन ।। करितों आलिंगन आस्वलाचें ।। ६५ ।। कीं तोडोनी कल्पतरू ।। सिंदीसी घालितसे नीरू ।। तैसा होउनी

१. धाक २. बडबडतो ३. गाढवीचें दूध काढणें




शिवचिदम्बर

उन्मत्त थोरू ।। परमेश्वरू अव्हेरितसे ।। ६६ ।। आपण असे अंतरीं अदय ।। होऊनियां कठिण हृदय ।। सोडीन निज हितसोय ।। स्वयें अपाय करूं लागे ।। ६७ ।। यत्नें जरी रक्षिला काय ।। काळ खाणें सोडील काय ।। क्षणांत काया काळकवळ होय ।। तरी एवढा मोह अज्ञानें ।। ६८ ।। नित्य काळ करी पाठलाग ।। सदां झोंबताती रोगौघ[1] ।। तथापि विषतुल्य अघौघ[2] ।। विषयभोग न सुटे जीवीं ।। ६९।। सर्पमुखींचा बेडूक ।। जीभ चाटी जेंवि मशक ।। तैसे कालग्रस्त नर देख ।। विषयसुख इच्छिती ।। ७० ।। ज्यांसी म्हणोनि माझे ।। घेशी शिरीं कुटुंबओंझें ।। तेच अंतीं सोडती स्नेह तुझे ।। ते तुज सहाय न करिती ।। ७१ ।। जो अंतकाळीं रक्षिता ।। अव्हेरितां त्या भगवंता ।। तेणें अत्यादरें नरकादिव्यथा ।। माथां घ्याव्या लागतीं ।। ७२ ।। जो संरक्षणकर्ता ।। धर्मचि असे तत्त्वतां ।। त्याविण नसे दुजी वार्ता ।। साह्यकर्त्याची काळत्रयीं ।। ७३ ।। ऐसें असतांही संसारी ।। उद्योग करितसे नर भारी ।। न विचारितां पापपुण्य तिळभरी ।। मनोरथपूरीं पडतसे ।। ७४ ।। सदृढ असतां सर्व गात्र ।। तारुण्यवयीं शक्ती फ़ार ।। तधीं जो न करी विचार ।। त्याचा उद्धार नव्हे कदां ।। ७५ ।। तारुण्यपणीं जो नेघे वैराग्य ।। पुढें तयाचा न चले उपाय ।। वार्धक्य येता असहय ।। सद्‌गुरुपाय न साधिती ।। ७६ ।। उष्णाकाळी बीज पेरितां ।। फळ येईल काय हातां ।। तैसा वृद्धपणीं प्रयत्न करितां ।। वैराग्य तत्त्वतां न लाधे ।। ७७ ।। नातरी वाहोनि गेलिया पाणी ।। बांध घालितां न भिजे अवनी ।। यौवन गेलिया सरोनी ।। संतान न होय विवाहमात्रें ।। ७८ ।। द्रव्य सरलिया दान करणें ।। अरुणोदयीं स्त्री संभोगणें ।। वृद्धपणी योगाभ्यास करणें ।। यांसी मूढपणा म्हणती सुज्ञ ।। ७९ ।। याकरितां सदा जागरूक ।। असोनि सर्वात्मभावें सम्यक ।। भजन करावें प्रीतीपूर्वक ।। जगन्नायक सद्‌गुरुचें ।। ८० ।। देह असे क्षणभंगुर ।। विश्वास न धरावा याचा निर्धार ।। मृत्यु खातसे चराचर ।। भविष्य विचार न कळे कोणा ।। ८१ ।। कल्पायुष्य जरि असे देवादिकां ।। मृत्युमार्ग न सुटे देखा ।। अल्पायु

१. रोगसमुदाय २. पापसमुदाय




शिवचिदम्बर

नरा कवण वर्णी फुका ।। यास्तव गुरुपद आश्रयावे ।। ८२ ।। मृत्यु अनिवार्य सर्वांसी ।। याकरितां करावें बाळवयसी ।। सद्गुरूचें भजन विशेषीं ।। पुढें यमदंडासी वारी कोण ।। ८३ ।। लोकसंहाररसिक ।। मृत्यु जरि असे भयानक ।। गुरुभक्तां पाहावया देख ।। असमर्थ कालत्रयीं ।। ८४ ।। जंव सर्वांग अति सुदृढ ।। आयुर्व्यय नसे वाढ ।। तंव सद्गुरु भजोनि गाढ ।। मृत्यु दुखंड करोनि टाकीं ।। ८५ ।। आधीं भोगुनी संसारसुख ।। मग करावें वैराग्यसाधन देख ।। ऐसें जे बोलती अविवेक ।। ते सदा दुःख भोगिती ।। ८६ ।। प्रतिक्षणीं आयुष्यनाश ।। होतसे जाण मनुष्यास ।। मागुतीं न ये गेले दिवस ।। मुत्यु समीप येतसे ।। ८७ ।। याकरितां कौमारपणीं सुरस ।। मृत्युहारक जे धर्म विशेष ।। आचरावें ते दिवसेंदिवस ।। तेणें दुःखनाश होय नरा ।। ८८ ।। बाळपणीं जो सत्कर्म न करी ।। जराग्रस्त[1] तो पुढें काय करी ।। इंद्रियें होतीं विकळ भारी ।। स्वकर्माचारीं असमर्थ ।। ८९ ।। वृद्धपणीं होतां अशक्त ।। अहोरात्र पीडती रोगजात[2] ।। तेणें होउनी चिंताक्रांत ।। क्षणभरी शांत न होय चित्तीं ।। ९० ।। पुत्रदारागृहधनाशा ।। वृद्धपणीं वाढतसे सहसा ।। क्षुधातृषा जाचती बहुवसा ।। भक्षिलें अन्न न पचे जाणा ।। ९१ ।। मलमूत्र व्यथा भारी ।। गमनशक्ती क्षीण झाल्यावरी ।। लोळतसे दुर्गंध शय्येवरी ।। नानापरी दुःख भोगी ।। ९२ ।। ऐशिया दशेंत साधन ।। काहींच न घडे जाण ।। एतदर्थ भगवध्दर्माचरण ।। आचरावें बाळपणीं ।। ९३ ।। यौवनीं नाना विकल्पजाळ ।। तेणें होय चित्त चंचल ।। वार्धक्य पराधीन केवळ ।। बाळपण साधनायोग्य ।। ९४ ।। जरी असती पुत्रसंतती ।। जरठदशा[3] येतां नराप्रती ।। पाहोनि त्याची मलिन वृत्ती ।। अव्हेरिती कंटाळोनी ।। ९५ ।। तो कांही बोलतां वचन ।। न ऐकती चित्त देऊन ।। तेणें कष्ट पावतो जाण ।। जरठपण साहूं न शके ।। ९६ ।। दुर्धर येतां वृद्धपण ।। स्वजनचि म्हणती तया पाहोन ।। केव्हां पापी हा जाय मरोन ।। आम्ही सर्व जन सुखी होऊं ।। ९७ ।। ऐसे नाना दुःखपूर्ण ।। जरठी नराधम अनुभवून ।। अति कष्टें पावतसे मरण ।। करित रुदनश्रवण

१. म्हातारपणानें ग्रासलेला. २. रोगसमूह ३. म्हातारपण




शिव चिदम्बर

स्वजनांचें ॥ ९८ ॥ यापरी येतां मरणदशा ॥ भयंकर यमदूत सहसा ॥ येउनी कंठीं घालिती पाशा ॥ ताडिती बहुवसा कशांघातें ॥ ९९ ॥ नेउनी यमलोकासी ॥ उभा करिती यमापाशीं ॥ विचारूनिया पापासी ॥ सांगती यमासी चित्रगुप्त ॥ १०० ॥ मग यम पापानुसार ॥ शिक्षा सांगे परिकर ॥ यमदूत शिक्षा देती अपार ॥ काय तो विचार सांगूं तुजसी ॥ १ ॥ तप्ततैलकटाहांत[1] ॥ टाकिती निर्घृण[2] यमदूत ॥ असिपत्रें घोर वनांत ॥ करिती घात छेदोनियां ॥ २ ॥ संसारी जो वदे असत्य ॥ त्याचे विदारोनि आस्य ॥ तप्त कांचरस ओतिती निर्दय ॥ सांगावया अशक्य यमयातना ॥ ३ ॥ जो मूढ सर्वांसि वंचोनि ॥ स्वार्थें गोड खाय झणीं ॥ कंकगृध्रादिपक्ष यमसदनीं ॥ पोट विदारोनि खाती मांस ॥ ४ ॥ जो दुर्बुद्धीनें करी परस्त्रीस्पर्श ॥ लोहस्तंभीं बांधीती त्यास ॥ त्याविण नरक विशेष ॥ असती अठ्ठावीस यमालयीं ॥ ५ ॥ संसारीं धरोनिया प्रेम ॥ जो पाप आचरी नराधम ॥ त्या पापा अनुसरोनि यम ॥ तत्तन्नरकीं घालितसे ॥ ६ ॥ कुंभीपाकादि नरक तीव्र ॥ रौरवादि नरक दुर्धर ॥ अनुभवोनि पापी नर ॥ होतो दुःखातुर यमयातने ॥ ७ ॥ एवं यमालयीं यातना घोर ॥ अनुभवोनि जीव पामर ॥ चौऱ्याऐंशीं लक्ष जन्म त्यावर ॥ कर्मानुसार भोगिती ॥ ८ ॥ मग लब्ध होय मानवतनू ॥ त्यांत ही दुर्लभ द्विजकुलजननू ॥ ऐसें असे मायाभ्रमणू ॥ कदापि मोचन न होय ॥ ९ ॥ ज्या दिवशीं होय गर्भसंभव ॥ त्यापासुनी दुःखभोक्ता जीव ॥ ऐसा असे संसारस्वभाव ॥ लेशमात्रही सुख नाहीं ॥ ११० ॥ यास्तव दुर्लभ नरदेह ॥ अलभ्य लाभ जाण निःसंदेह ॥ दों दिवशीं करुनि कामस्नेह ॥ नरदेहरत्न गमावूं नये ॥ ११ ॥ सत्कर्में नृदेह स्वर्गद्वार ॥ जरी करी भक्ति अंगीकार ॥ जिवलग होय गिरिजावर ॥ मोक्ष होय सुकर वैराग्यज्ञानें ॥ १२ ॥ अलभ्य लाभ असतांहि हातीं ॥ जो विचार न करी दुर्मती ॥ त्यासि पुढें अधोगती ॥ होय फजीती यमयातनें ॥ १३ ॥ जो नर नाठवितां भगवद्गुण ॥ काल घालवी करित विषयचिंतन ॥ तो नर नव्हें खर[3] जाण ॥

१. तापलेल्या तेलाच्या कढईत २. निर्दय ३. गाढव.




शिवचिदम्बर

शि व चि द म्ब र

स्वयें अधःपतन अंगीकार ।। १४ ।। अमृत फेकोनि मंदमती ।। सोमल सेवोनि सोडी क्षिती[१] ।। त्याचपरी होय त्याची गती ।। जाण निश्चित देहाभिमानें ।। १५ ।। बळें दवडोनि कामधेनू ।। करावया बैसे खरदोहनू[२] ।। कीं अव्हेरुनी कल्पवनू ।। सुखें दावकृशानू[३] प्रवेशला ।। १६ ।। नातरी सोडोनि अप्सरासंग ।। अस्वलाचा घेतला परिष्वंग[३] ।। तैसा न करी जो सत्संग ।। त्यासि अभंग[४] नरकयातना ।। १७ ।। यास्तव जन्मजराद्यालोचन ।। करावें पै रात्रंदिन ।। तेणें होय पश्चात्ताप पूर्ण ।। जन्ममरण खंडे पै ।। १८ ।। पश्चात्ताप होतां मागुती ।। सर्व पापें जळोनि जाती ।। धुंडाळितां त्रिजगतीं ।। न मिळे पश्चात्तापासम मित्र ।। १९ ।। ज्या विषयीं उपजे पश्चात्ताप ।। तें पाहतां चित्ती व्हावा संताप ।। त्यासी म्हणावा अनुताप ।। तरीच पापें जळती देख ।। १२० ।। एवं नित्य करोनि विचार।। संसार मानोनि असार ।। विषयीं वैराग्य प्रखर ।। संपादावें सर्वत्र साधकें ।। २१ ।। विरागी म्हणावें त्या पुरुषासी ।। जैसे मन विटे वमन भक्षणेसी ।। तैसा जो विटे विषयभोगासी ।। ज्ञान त्यापाशीं वसे सदा ।। २२ ।। जरी असे गोड पक्वान्न ।। विषयुक्त ऐसें जाणता क्षण ।। जेंवि देतसे दूर फेकोन ।। त्यापरी जाण विषयीं व्हावें ।। २३ ।। शीतळ म्हणोनि फणाछाया[५] ।। कवण बैसे विश्रमावया ।। तैसें मन ज्याचें पाहतां विषया ।। होय तोचि ज्ञानमंदिर ।। २४ ।। ऐसियासी देतां उपदेश ।। निश्चयें वाढे दिवसेंदिवस ।। नातरी दिधलिया विषयासक्तास ।। उपदेश वृथा होय ।। २५ ।। यास्तव विषयीं दोषदर्शन ।। करावें प्रत्यहीं जाण ।। हेचि असे प्रथम साधन ।। येणें वैराग्य चित्तीं उमटे ।। २६ ।। ज्ञानादेव कैवल्यमोक्ष ।। ऐसा असे श्रुति सिद्धांत पक्ष ।। चिदम्बरचि तारक दक्ष ।। सर्वांसि सांगे चिदम्बरकिंकर ।। २७ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ ।। म्हणोनि ऐका श्रोते समस्त ।। द्वाविंशोऽध्याय रसाळ हा ।। १२८ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे राजारामाय संसारस्वरूपकथनं उपदेशश्च नाम द्वाविंशोऽध्यायः ।। २२ ।।

१. भूमि. २. गाढवीचें दूध काढण्याकरितां. ३. अरण्याग्नि. ४. आलिंगन. ५. सापाच्या फणाच्या सावलीत.

शि व चि द म्ब र

## नाशिकक्षेत्रे चिदम्बरलीलाप्रकटनम्




गुरुपादुका पुजोनि विध्युक्त। बैसला पादुकी तुळसी वाहत। ः विप्र खवळोनि बहुवसी। मारावया येतां भक्तासि

शि
व
चि
द
म्ब
र

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः।। निजभक्त जें इच्छिती मनीं ।। तें पूर्ण करितो तत्क्षणीं ।। जो बद्धदीक्ष रक्षणीं ।। त्या चिदंम्बरचरणीं नमन असो ।। १ ।। श्रीचिदम्बर म्हणे भक्तासी ।। जन्मोजन्मीं तूं भक्त होशी ।। मजसम तूं ज्ञानराशी ।। लोकोद्देशें तुज सांगूं उपदेश ।। २ ।। पूर्णब्रम्ह तूंच अससी ।। स्वसत्तें सर्व व्यापिलासी ।। तरी उपाधियोगें[१] तूं तुजसी ।। विसरलासी अज्ञदृष्टीं ।। ३ ।। शुक[२] स्वयें धरोनि नलिका ।। बद्ध म्हणोनि चरफडे जेंवि कां ।। तैसा देहोपाधी कल्पोनि तूं फुका ।। कर्मजाळी भ्रमसी जीवभावें ।। ४ ।। जैसें एकचि आकाश ।। घटोपाधीनें दिसे बहुवस ।। होता घटोपाधि विनाश ।। महाकाश एकचि उरे ।। ५ ।। तैसा आत्मा आद्यंतीं असें एक ।। मायायोगें दिसे अनेक ।। विचारें उपाधी सोडितां देख ।। स्वयंप्रभ एक भासे आत्मा ।। ६ ।। आत्मज्ञान व्हावया प्रचीत ।। आधीं गुरुमुखें उपदेश यथार्थ ।। घेउनी साधक तत्त्वमस्यर्थ[३] ।। शांतचित्तें विचारावा ।। ७ ।। स्वप्रकाश सत्य सर्वज्ञ ।। नित्य मुक्त साक्षी निरंजन ।। सर्वांतरात्मा ईश्वर परिपूर्ण ।। तच्छब्दवाच्य[४] म्हणती यासी ।। ८ ।। किंचिज्ज्ञ देहपरिच्छिन्न[५] ।। भोक्तोपाधिस्थेचि[६] भासे अंहपण ।। जीवसंज्ञ जाणता इंद्रियगण ।। त्वंशब्दाचे[७] वाच्यसंज्ञक ।। ९ ।। आतां जीव शिव ऐक्य व्हावया ।। उपाय सांगतों ऐक शिष्यराया ।। उभय वाच्यांश सोडोनियां।। लक्ष्य चैतन्य साक्षित्वें पाहीं ।। १० ।। वाच्यसाक्षी जें शुद्ध चैतन्य ।। तेंचि मी म्हणोनि जो निश्चय ।। त्यासीच म्हणती जीव ब्रम्हैक्य ।। कैवल्य मोक्ष म्हणती त्यासी ।। ११ ।। जीव शिव ऐक्य शुद्ध ।। त्या असे नाम असिपद ।। लक्षणायोगें करूनिया शोध ।। जीवात्म्यैक्य बोध समजावा ।। १२ ।। लक्षणा असे त्रिविध ।। जहत् अजहत भाग भेद ।। तिन्ही सांगतो करूनि विशद ।। व्हावया सुबोध ऐक पां ।। १३ ।। म्हणतां गंगेंत असे घोष ।। यांत निघतो तीरार्थ विशेष ।। जहत् म्हणिजे त्याग परियेस ।। गंगा पदास तीरा ऐसा

शि
व
चि
द
म्ब
र

..........................

१. मायारूपी उपाधीनें. २. पोपट. ३. 'तत्त्वमासि' या वेदवाक्याचा अर्थ. ४. 'तत्' या शब्दानें बोधित होणारा. ५. देहानें दाखविला जाणारा. ६. भोगकर्तृत्वामुळेंच. ७. तूं शब्दानें.

|| १४ || एकात्म्यतेमुळे उभयत्र || न संभवे जहल्लक्षणा अत्र || अजहत् याचा अर्थ तर || अत्यागपर होतसे || १५ || तांबडा पळतो या वाक्यीं देख || तांबडे पद न सोडतां सम्यक || रक्ताश्व ऐसा अर्थ निघे विशेख || अजहत् म्हणती या अर्थासी || १६ || उभय वाच्यांशीं असे विरोधार्थ || यास्तव अजहत् न संभवे येथ || भाग लक्षणा घ्यावी एतदर्थ || तिची यथार्थ सांगतों ऐक || १७ || तो हा असे देवदत्त || या वाक्यें निघे ऐक्यार्थ || त्यागात्याग एक वाक्यगत || जहदजहत् संज्ञा यासी || १८ || देवदत्ताचें स्थानमान || वयोवस्था सर्व सोडून || मनुष्यमात्र पाहतां जाण || ऐक ज्ञान हेंचि तें || १९ || तैसें जीवाचें किंचिज्ज्ञत्त्वादिक[1] || शिवाचे सर्वज्ञत्त्वादि[2] गुण विशेष || त्यजूनि चैतन्य मात्र सम्यक || पाहतां भेदज्ञान मावळे || २० || एकांतीं घालोनि स्थिरासन || विचार करावा एकाग्रमनें || तत्त्वं पदार्थ गुरुसांप्रदाय धरून || आत्मज्ञान होय तेणें || २१ || देहाभिमान गेल्याविण || कदापि नव्हे ब्रम्हज्ञान || देहाभिमान जावया कारण || पंचकोशविवरण[3] करावें || २२ || शिरा मांस हाडें आंतडें || रोमनखादि मिळोनि कातडें || अन्नमय स्थूल देह जो दिसे पुढें || ही एक उपाधी आत्म्यासी || २३ || देहासी असे जन्ममरण || देहीं भरलें अमंगळ पूर्ण || देहसाक्षी मी आत्मा परिपूर्ण || अन्नमय त्याग उपाव हाची || २४ || अपंचीकृत भूतें उत्पन्न || दशेंद्रिय प्राण अंतःकरण || लिंगदेह जाहला इतुकें मिळोन || उपाधी जाण आत्म्यासि दुसरी || २५ || लिंगदेहीं असती तीन कोशें || प्राण मन विज्ञान ऐसे || कोशत्रयसाक्षी वेगळा विलसे || चिन्मात्र असे तोचि आत्मा || २६ || प्राण अपान व्यान उदान || पांचवा जाण नामें समान || जड देह हालवितो आंत भरून || प्राणमय जाण कोश हाची || २७ || जीभ ओंठ न हालवितां जाण || हृदयीं उमटे जें संकल्पानुसंधान[4] || मनोमय कोश तोचि जाण || आत्मा त्याहुनी वेगळा असे || २८ || अहंवृत्तीनें कर्तृत्वादि अभिमान || होतें बुद्धिवृत्तीनें निश्चय ज्ञान || येणें होतो व्यवहार पूर्ण || हाचि जाणा विज्ञानकोश

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

१. अल्पजाणतेपणा. २. सर्वजाणतेपणा. ३ अन्नमय, प्राणमय, मनोमय विज्ञानमय, आनंदमय कोशांचा विचार. ४. इच्छेमुळे होणारी प्रवृत्ति

शिवचिदम्बर

।। २९ ।। तीन्ही कोश मिळोन ।। लिंगदेहा उपाधी दुजी जाण ।। जन्मजरादि दुःखसंतान ।। जीवें माथां पूर्ण वाहे ।। ३० ।। देहद्वयापासूनि आत्मा भिन्न ।। असे सत्य ज्ञानानंद पूर्ण ।। साक्षित्वें जाणतो सप्तदश गण ।। अंतर्वृत्ती जाणतो ज्ञानरूपें ।। ३१ ।। माझे घर म्हणतां क्षणी ।। घराहुनी भिन्न घरधनी ।। तैसा माझा देह म्हणती प्राणी ।। झाला प्राणाहुनी भिन्न देह ।। ३२ ।। एवं देह प्राण मन बुद्धी ।। वेगळेपणें जाणतां देहामधीं ।। मी कोण ऐसें विचारितां त्रिशुद्धी ।। कळेना काय विधी माझा असे ।। ३३ ।। हाचि जाण कारण काय ।। जीवा आवरण मायामय ।। येणेंचि लागला संसारभय ।। जाणुनी स्वयें नेणता झाला ।।३४ ।। मज मी जाणत नाहीं ।। निजाज्ञपण जाणता कोण पाहीं ।। जरी म्हणे मज जीभ नाहीं ।। एवं वक्ता पाहीं मूढा कोण ।। ३५ ।। मज मी जाणूं शकेना ।। जाणता कोण निजाज्ञपणा ।। आपुले आपण जाणतां अज्ञाना ।। तोचि जाण साक्षी आत्मा ।। ३६ ।। यास्तव देहत्रयोपाधी ।। सोडुनी आत्मा विचारीं आधीं ।। उपाधित्रयाहुनी मी त्रिशुध्दी ।। भिन्न म्हणतांही न सुटेरे भ्रम ।। ३७ ।। निश्चयज्ञान व्हावया ।। दृढाभ्यास पाहिजे सखया ।। अभ्यासाविण भ्रम न जाय ।। दृढाभ्यास पाहिजे यास्तव ।। ३८ ।। बहु जन्मींच्या देहाध्यासे सहसा ।। चित्तीं निश्चय मी देह ऐसा ।। तदभ्यासें मी ब्रम्ह ऐसा ।। निश्चयाविणें भ्रम न नासे ।। ३९ ।। भ्रमरभयें कीटक ।। होय भ्रमर जैसा देख ।। तैसा ब्रम्हाभ्यासें जीव निक ।। ब्रम्हपद सुरेख पावतो ।। ४० ।। एकांतीं घालोनि मृदु आसन ।। कुशवस्त्र कृष्णाजिन ।। त्यावरी घालोनि सुखासन ।।बैसावें मन एकाग्र करोनी ।। ४१ ।। मग चित्तीं गुरुमूर्ती आठवावी ।। षोडशोपचारें पूजावी ।। पदकमळीं मस्तक ठेवीं ।। वंदी हाचि त्रैमूर्ती म्हणोनी ।। ४२ ।। शिर कंठ सरळ धरोनी ।। न हालतां बैसावें स्थिरासनीं ।। नासाग्रीं दृष्टी ठेवुनी ।। दिशाद्यवलोकन न करावें ।। ४३ ।। करूनी प्राणायाम तीन्ही ।। विषयापासुनी चित्त काढोनी ।। असावें निर्भय अंतःकरणीं ।। एकोमनीं विचारीं ऐसें ।। ४४ ।। तीन्ही देह मज नाहीं ।। मी कैसा होईन देही ।। देहत्रयाचा साक्षी पाहीं ।। मी सर्वही व्यापोनि अलिप्त ।। ४५ ।। मी असें सर्वगत परब्रम्ह ।। नित्य

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

निर्विकल्प निर्मोह ।। मी स्वप्रकाश अदेह ।। मत्प्रकाशें सर्वही प्रकाशित ।। ४६ ।। अविनाशी आत्मा मीच खरा ।। तेजोरूपी मी नसें दुसरा ।। देहान्यत्वें मज नसे जन्म जरा ।। मज निर्विकारा मल नसे ।। ४७ ।। सत्यज्ञानानंद मी अप्राण ।। निराकार मज नसे मन ।। सर्वसाक्षी नित्य मुक्त मी निर्गुण ।। अकर्ता पूर्ण असंग मी ।। ४८ ।। माझ्या प्रकाशें अक्षगण[1] ।। स्वकर्मी करिती प्रवर्तन ।। मी निरुपाधिक द्रष्टा जाण ।। अवस्थात्रयसाक्षी[2] मीच एक ।। ४९ ।। उगें बैसतां अंतरीं उठती ।। मी आहें म्हणूनि जी स्फूर्ती ।। तीच ब्रम्ह म्हणूनि भावीं निश्चिती ।। निर्विकल्पस्थिती ये हाता ।। ५० ।। निर्विकल्पस्थिती ध्यातां चित्तीं ।। येथूनीच कल्पनाजाल निघती ।। तेचि जाण मायारूप निश्चिती ।। एकीं अनेक कृती दावितसे ।। ५१ ।। आत्मा असे एक सदोदित ।। संकल्प क्षणोक्षणीं भिन्न होत ।। प्रतिक्षणीं भिन्न जी वस्तुजात ।। ती असे निश्चित मिथ्यारूप ।। ५२ ।। माया म्हणजे नसे सत्य ।। सर्व जग दिसे मायामय ।। माया पावलिया विलय ।। आत्मा निरामय स्पष्ट दिसे ।। ५३ ।। आधीं मायानिरसनार्थ ।। यत्न करावे बुद्धिमंते ।। माया गेलिया सर्वगत ।। आत्मसाक्षात्कार सहज होय ।। ५४ ।। माया जावया उपाय ।। संकल्पक्षय हाचि मुख्य ।। संकल्पक्षयाचा उपाय ।। पाहिजे संकल्पसाक्षित्व ।। ५५ ।। उत्पन्न वृत्ती निमाली ।। जंव दुजी वृत्ती न उपजली ।। तीच निर्विकल्प स्थिती सोज्वळी ।। अभ्यासें वाढवावीं तियेसी ।। ५६ ।। तीच जाण स्वरूपस्थिती ।। संकल्प निमालिया प्रगटे ती ।। स्वरूपस्थिती जीवन्मुक्ती ।। म्हणूनि वाजविती श्रुति[3] डांगोरा ।। ५७ ।। येणेंपरी आत्मविचार ।। करुनिया वारंवार ।। जाणोनि सोडावा अज्ञान संसार ।। जीवन्मुक्तीनोवरी मग ।। ५८ ।। एवं अभ्यासितां होशी सत्य ।। स्वानुभवें संतुष्ट निःसंशय ।। यास्तव नित्याभ्यास अवश्य ।। आदरें करूनी मुक्त होई ।। ५९ ।। एवं करितां निरंतराभ्यास ।। देहभान पावे लयास ।। दृढ होय ब्रम्हस्फूर्ती सुरस ।। लागे हातास जीवन्मुक्ती ।। ६० ।। सर्वसाक्षी आत्म्यास ।। जो जाणतो निश्चयेंस ।।

१. इंद्रियसमूह २. जागृती स्वप्न सुषुप्ति या तीन अवस्थांना साक्षीभूत. ३. वेद.

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

ब्रम्हांडसहित देह त्यास ।। शून्यापरी भासे तेव्हां ।। ६१ ।। चिद्रूप अनंत अपार ।। स्वयें आनंदविग्रह थोर ।। अस्तित्वें भासतो प्रखर ।। निरुपाधिक हृदयीं सदा ।। ६२ ।। जीवन्मुक्त असतो देहातीत ।। लौकिकीं दिसतो देहीवत ।। उठतां बसतां चालतां सतत ।। असतो अलिप्त दोषगुणें ।। ६३ ।। नित्यानंदें परिपूर्ण ।। सोडुनी पूर्वापरानुसंधान ।। जीवन्मुक्त असतो उदासीन ।। कार्य कारण न शिवे तया ।। ६४ ।। मोक्षसुख साधावया ।। नित्याभ्यास करावा सखया ।। चालतां जेवितां निजतां गुरुपायां ।। चिंतावें जाण जीवेंभावें ।। ६५ ।। साधकें करावा सदा विचार ।। चित्तीं नाणितां अहंकार ।। जें जें पाहे चराचर ।। चिन्मात्र सार घ्यावें त्यांत ।।६६ ।। चित्त ठेवीं चैतन्यावरी ।। मिथ्या नामरूप दूर करीं ।। नाठवी द्वैतभाव अंतरीं ।। सदा निराकारी मन ठेवीं ।। ६७ ।। इंद्रिये करिती कर्म ।। मी साक्षी असें निष्कर्म ।। जाणूनि ऐसें कर्मवर्म ।। अकर्तृत्व नेम दृढ धरीं ।। ६८ ।। मी द्रष्टा असें अकर्ता ।। कैसा होईन कर्मकर्ता ।। हर्ष शोक चित्तीं न मानितां ।। निज अलिप्तता आठवीं सदा ।। ६९ ।। निंदा द्वेष दवडोनि दूरी ।। सावध होवोनि व्यवहार करीं ।। कर्म करितां ही अंतरीं ।। न विसरीं आत्मानुसंधान ।। ७० ।। आरब्ध कार्य सिद्ध होवो ।। नातरी असिद्धी पावो ।। उभयत्र धरूनि समभावो ।। ध्याईं गुरुपाय सदोदित ।। ७१ ।। कायावाचामनें अंतरंग ।। कोणाचें न करीं बा विभंग[1] ।। सदा संतोषें धरीं विराग ।। जाळीं अघौघ[2] नामस्मरणें ।। ७२ ।। दूर करीं यत्नें दुःसंग ।। आदरें धरीं साधुसंग ।। मोहालस्य विषयभोग ।। त्यजूनी अंतरंग लावीं अभ्यासीं ।। ७३ ।। परोपकाराविण मनोवृत्ती ।। बाहेर न सोडीं विषयावरती ।। सदा राखें ध्यानवृत्ती ।। मोक्षसंपत्ती मिळे तेणें ।। ७४ ।। मोहालस्यें जरी मनोवृत्ती ।। जाईल पै विषयावरती ।। नामस्मरण करीं अति प्रीति ।। तेणें मागुती शांती लाधे ।। ७५ ।। बहिर्वृत्ती आवराबया ।। उपाय दोन असती सखया ।। तत्काळ मन येतसे ठाया ।। प्राणायाम नामस्मरणें ।। ७६ ।। प्राणायाम नामस्मरण ।। वृत्तीचें करावया शांतवन

........................

१. नाश. २. पापसमुदाय.

शिवचिदम्बर

|| समर्थ असती निक्षून || तेणें मन लागे ब्रम्हचिंतनीं || ७७ || अभ्यास करितां सत्वरी || वृत्ती जाय जरी बाहेरी || बळें आणुनी हृदयमंदिरी || आत्मचिंतनार्थ परतवीं || ७८ || प्रतिष्ठा करावी तृणप्राय || बालवृद्धादिकांठायीं नम्र वाक्य || देह नीच असे हें सत्य || अंतरी अवश्य धरीं ब्रम्हता || ७९ || मी सर्वात्मा असें शाश्वत || देह असे नाशवंत || त्याचा मज संबंध किंचित || नसे निश्चित भावी ऐसें || ८० || ब्रम्हादिमशकपर्यंत[1] || स्थूल सूक्ष्म जीवीं असे भगवंत || कोणाचा करूं नये मान हत || कायावाचाचित्तें कर्म करितां || ८१ || दुर्जन बोलोत दुष्ट वचन || अथवा करोत तर्जन ताडन || शांतीबळें तें करोन सहन || बोलावें मृदुवचन प्रीतिभावें || ८२ || शुभाशुभाचा करोनि त्याग || नाना संकल्पांचा सोडोनि संग || लोकलज्जे होवोनि निःसंग || दक्ष गुर्वाज्ञापालनीं || ८३ || गुरूच जाणावा आद्य || गुरूच हृत्कमळीं चिंत्य || गुरूच त्रिकाळीं पूज्य || सर्वदा वंद्य जाण गुरू || ८४ || गुरूसारखी मोठी वस्तू || ब्रम्हांडींही न मिळे जाण तूं || माता पिता स्वजन आप्तू || गुरूचि जाण निश्चयें || ८५ || गुरुचरण ध्यातां चित्तीं || सर्व कामना पूर्ण होती || ब्रम्हा-विष्णु-गिरिजापती || तुष्ट होती गुरुध्यानें || ८६ || गुरु ऐसा भवतारक || दुजा कोणीही देव नसे देख || गुरुकृपें अलौकिक || प्रगटे सम्यक ब्रम्हज्ञान || ८७ || सर्वस्व समर्पोनि गुरुचरणीं || सदा गुरु आठवी अंतःकरणीं || गुरुविणें सांग तरलें कवण झणी || गुरुपदीं रमती ब्रम्हादिकें || ८८ || एवं निश्चय करोनि चित्तीं || गुरूसि पाहें सर्वांभूतिं || मानसीं नित्य गुरुमूर्ती || अति प्रीती पूजा करीं || ८९ || प्रतिमादिकांचे ठायीं || गुरूसीच मानोनिया ही || षोडशोपचारे लवलाहीं || पूजीं गा प्रत्यहीं एकोभावें || ९० || स्तोत्र मंत्र नमस्कार || संतोषें परिकर || जी जी वस्तू आपणा प्रियकर || ती ती समर्पी गुरुचरणीं || ९१ || गुरुचरणांचें तीर्थ घ्यावें || गुरुप्रसादान्न नित्य सेवावें || गुरुनाम मुखीं दृढ धरावें || शुचिर्भूत असावे गुरुजवळी || ९२ || जाणोनि गुरुमनोगत || सेवावें

१. ब्रम्हापासून चिलटापर्यंत




शिवचिदम्बर

शि व चि द म्ब र

करोन स्थिर चित्त ।। गुरुविण करूं नये निजहित ।। गुरुहित तें स्वहित जाणावें ।। ९३ ।। त्रिताप जरी एक क्षणीं ।। आले असती गुरुध्यानीं ।। भिऊं नको अंतःकरणीं ।। पाळितो समर्थ गुरुनाथ ।। ९४ ।। मनीं क्षोभ न धरीं किंचित ।। धैर्य धरीं पर्वतवत ।। राखें जितेंद्रियत्व सतत ।। जाणतो समर्थ निजोत्तर ।। ९५ ।। एवं गुरुभक्ती धरोनि सदृढ ।। सगुण भजन करितां गाढ ।। आत्मानुसंधानी चित्त ठेवोनि दृढ ।। सुखें संचारीं सर्वत्र ।। ९६ ।। एवं करितां ब्रम्हाभ्यास ।। ब्रम्हभावना वाढे दिवसेंदिवस ।। तेव्हा होय अज्ञान नाश ।। स्वानंदी समरस होय जीवा ।। ७९ ।। मग होशी स्वानुभवें तुष्ट ।। लया पावे संसारकष्ट ।। टळलें तुझें सर्वारिष्ट ।। होईं धीट गुरुभजनी ।। ९८ ।। ऐसें बोलोनि सद्गुरुनाथ ।। भक्तशिरीं ठेवुनी निज हस्त ।। मग केलें मुखीं भस्म क्षिप्त ।। तत्काळ यथार्थज्ञान बाणलें ।। ९९ ।। त्या दिवसापासुनी भक्त ।। श्रीचिदम्बरयशांकित ।। अभंग रचिले बहुत ।। भक्ति ज्ञानपंथ प्रगटवाया ।। १०० ।। करुणापर ज्ञानपर ।। बोधपर वैराग्यपर ।। कथापर स्तुतीपर ।। अभंग अपार करुं लागे ।। १ ।। एकूण एक लक्ष एकावन्न ।। सहस्त्रांवरती चतुःशत जाण ।। स्वमुखें अभंग करुन ।। सद्गुरुराण तोषविला ।। २ ।। श्रीचिदम्बरकीर्तिसरीस ।। पावलें याचें यशप्रकाश ।। गुरुपादुका बांधोनि हृदयास ।। भूप्रदक्षिणा संपादिली ।। ३ ।। गुरू आज्ञें अश्वावरती ।। बैसवोनि चिदम्बर भोगमूर्ती ।। छत्र चामरें धरवोनि शिष्यां हातीं ।। चिदम्बरकीर्ती गातसे ।। ४ ।। सवें घेउनी शिष्यसंघ ।। वाजवी टाळ, वीणा मृदंग ।। भजनीं भरोनि प्रेमरंग ।। गातसे अभंग सुस्वरें ।। ५ ।। जेथ जेथ जाय स्वभावें ।। गुरुकीर्ती वर्णोनि प्रेमभावें ।। सांगे चिदम्बरनाम आळवावें ।। तेणें महाभय चुके सत्य ।। ६ ।। एवं बोधित सर्वांलागीं ।। बहुत जनां लावी भक्तिमार्गीं ।। क्षेत्र फिरत पातला वेगीं ।। प्रसिद्ध जगीं नासिक क्षेत्र ।। ७ ।। तेथें स्नान करोनि गंगेंत ।। गुरुपादुका पूजोनि विध्युक्त ।। बैसला पादुकीं तुळसी वाहत ।। आले अकस्मात तेथें ब्राम्हण ।। ८ ।। पाहुनी जोडयावरी तुळसी ।। विप्र खवळोनि बहुवसी ।। मारावया येतां भक्तासी ।। वंदुनी द्विजांसी बोलतसे ।। ९ ।। दयावंत हो क्षणमात्र

शि व चि द म्ब र

शि
व
चि
द
म्ब
र

।। बैसावें करूनि अतःकरण स्थिर ।। एवं बैसवोनि द्विजवर ।। चित्ती चिदम्बर आठवतसे ।। ११० ।। मग चिदम्बरकृपें बोलिला ।। आपुल्या गृहींचें देव मजला ।। दावा आधीं कृपाशीळा ।। त्यानंतर मज द्यावी शिक्षा ।। ११ ।। माझें तुम्हीं मानावें वचन ।। हेंचि चरणीं विज्ञापन ।। ऐसें बोलोनि साष्टांग नमन ।। करितसे जाण ते वेळीं ।। १२ ।। मग ते सर्व भूसुर ।। निज घरा जावोनि सत्वर ।। पाहतां देव्हाऱ्यांवर ।। पादुकामय दिसतीं दैवतें ।। १३ ।। विप्र राहती तटस्थ ।। त्यांसि सविनयें पुसत ।। आपुले पादुकामय दैवता ।। असतां मजवरी कां कोपतां ।। १४ ।। आज्ञा द्यावी पूजेसी ।। जातो मी निज स्थानासी ।। क्षमा असावी मजविशीं ।। हेंचि चरणापाशी मागणें ।। १५ ।। भक्ताची सविनयवाणी ।। ऐकूनी त्या ब्राम्हणांनीं ।। कथिले हा भक्तशिरोमणी ।। याचे विरोधें हानि होय आम्हां ।। १६ ।। ऐसें विचारूनी विप्रजन ।। भक्तासी नानापरी विनवून ।। स्वदेव्हारीं पूर्ववत जाण ।। देवस्थापन करिते झाले ।। १७ ।। निंदी सोडोनि सर्व जन ।। मान्य करिती त्याचें वचन ।। एवं चरित्र दावित जाण ।। भूप्रदक्षिणा करिता झाला ।। १८ ।। चिदम्बरकीर्ती सर्व दिशीं ।। विस्तार करूनि परियेसी ।। लावून भक्तिमार्गी बहुतांसी ।। गूरुचरणापाशीं पातला ।। १९ ।। नित्य येती गुरुदर्शनासाठीं ।। ब्रम्हाविष्णवादि देवकोटी ।। गुप्त रूपेंही होतां दाटी ।। हा प्रत्यक्ष दिठीं[1] पाहतसे ।। १२० ।। ऐसा आहे भक्तिमहिमा ।। जो भजेल गुरूसी निष्काम ।। त्यासी देवदर्शन जाणा सुगम ।। म्हणूनी प्रेमें भजा गुरूसी ।। २१ ।। राजारामरचित ग्रंथीं ।। ज्यासी विश्वास त्यावरती ।। श्रीचिदम्बरकृपा निश्चिती ।। होय प्रचीति पहावी ।। २२ ।। जे असे मानवा असाध्य ।। तें चिदम्बरकृपें होय साध्य ।। चिदम्बरकिंकर सांगे सोय ।। भजा चिदम्बरपाय सर्व काळ ।। २३ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ ।। म्हणोनि ऐका श्रोते समस्त ।। त्रिविंशोऽध्याय गोड हा ।। १२४ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे राजारामाय ज्ञानोपदेशस्तथा नासिकक्षेत्रे

१. दृष्टीनें

शि
व
चि
द
म्ब
र

## मान्त्रिकगर्वहरणम्




हतगर्व होवोनि चिदम्बराला । शरण रिघाला पश्चात्तापें : हात टेकूनि शिष्यस्कंधीं । आला गुरूचे अंगणीं ॥

चिदम्बरचरित्र — अध्याय चोविसावा

।।श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। ॐ नमो गुरुनाथा चिदम्बरा ।। कैवल्यपद देशी निर्धारा ।। करीं सत्यव्रता सर्वांतरा ।। विघ्नसंहार आरब्धकर्मी ।। १ ।। तुझे नामस्मरणमात्रें ।। कोटिजन्मींचें पाप सारें ।। भस्म होवोनि क्षणमात्रें ।। लाधे अखंड शांतिपद ।। २ ।। यास्तव आलों मी शरण ।। तुझे चरणीं दीक्षितराण ।। करूनि विघ्ननिवारण ।। ग्रंथ नेईं सिद्धीसी ।। ३ ।। तुझेचि बळें मी पामर ।। तरावया चरित्रसागर ।। आरंभिले यत्न थोर ।। पार करीं मज दातारा ।। ४ ।। कामधेनू जरी होय माउली ।। असंध्य मागूं नये केवळीं ।। तैसा तूं मज होशीं माऊली ।। अघटित लळे धरिले म्यां ।। पुरवीं बा माझी कामना ।। रसाळ चरित्र वदवीं नारायणा ।। हेंचि मागणें गुरुराणा ।। तव चरणीं परियेसा ।। ७ ।। चिदम्बराचे अतिसुरस ।। जन पाहुनियां यश ।। सेर्ष्य[1] मांत्रिक खल[2] ही विशेष ।। राहिले दास होउनि सेवें ।। ८ ।। ऐसें असतां चमत्कार ।। जाहला सांगतों सविस्तर ।। ऐका चित्त देऊनी कथासार ।। दुष्टगर्व खंडिला ।। ९ ।। एके समयीं शास्त्री थोर ।। मंत्र शास्त्र पाहोनि सविस्तर ।। गर्वे दाटुनी अपार ।। दिग्विजयार्थ निघाला ।। १० ।। क्षेत्रयात्रा निमित्त करोनी ।। स्वभावें जाय जे जे स्थानीं ।। तेथील ब्राम्हणांसी बोलवोनी ।। वादीं जिंकोनि पत्र घेईं ।। ११ ।। ऐसा हिंडतां बहुत देश ।। पातला श्रीशेषाचलास ।। तेथें पाहता व्यंकटेश वैभवास ।। आशामानसी वाढली ।। १२ ।। म्हणे ऐक व्यंकटेशा नवस ।। सहा सहस्त्र रूपये आम्हास ।। देवोनि करावा येथें वास ।। नातरी देवत्त्वास उरों नेंदू ।। १३ ।। ऐसा करूनिया नवस ।। तेथें राहिला तीन दिवस ।। न मिळतां द्रव्यलेश ।। ब्राम्हण क्रोधावला पैं ।। १४ ।। स्नान करोनि वेगेंसी ।। आरंभिलें अनुष्ठानासी ।। जपूं लागला मंत्रासी ।। संज्ञा ज्यासि कलाहरण ।। १५ ।। जलपात्र पुढें ठेवून ।। मंत्रबळें एकैक कळा जाण ।। पाणीपात्रीं ठेवितसे काढून ।। काढी एक दिनीं आठ कळा ।। १६ ।। त्या निशीं[3] अधिकारियाचे स्वप्नीं ।। सांगे व्यंकटेश येवोनी ।। हा मांत्रिक असे क्रूर मनीं ।। माझे कलाहरणीं झटतसे ।। १७ ।। आज एकचि

........................

१. मत्सरी २. दुष्ट ३. रात्रीं



शिव चिदम्बर

शिव चिदम्बर

शि व चि द म्ब र

दिवशी उतरविल्या अष्ट कळेसी ।। सहा सहस्त्र रुपये त्यासी ।। देउनी निरोप देई पै ।। १८ ।। नातरी षोडश कळेसी ।। उदयीक काढील परियेसी ।। हरण झालिया देवत्त्वासी ।। मजसी पुसे कोण सांगें ।। १९ ।। मंत्रबळें आमुचे देवत्त्व ।। मंत्रेंचि गेलिया सत्त्व ।। मग नुरे आमुचें महत्त्व ।। यास्तव विप्रा निरोप देई ।। २० ।। त्या जवळीचे मंत्रोदक ।। तें आणूनि अभिषेक ।। करावा तुम्ही सम्यक ।। तेणे कळा देख पूर्ण होती ।। २१ ।। ऐसें स्वप्नी व्यंकटेश ।। वृत्तांत सांगुनी अधिकारियास ।। तत्काळ पावला अंतर्धानास ।। तंव तो जागृतीस पावला ।। २२ ।। प्रातःकाळीं उठोनी ।। त्याचें तीव्र साहस पाहोनी ।। भिऊनि बाबा अंतःकरणीं ।। द्रव्य देवोनि पाठवी विप्रा ।। २३ ।। मग मंत्रोदक आणोनि देवासी ।। अभिषेक करविला विधीसी ।। हें पाहुनी मांत्रिक मानसीं ।। उन्मत्त झाला मंत्रगर्वें ।। २४ ।। आधींच असे उन्मत्त ।। त्यांत पूर्णपणें विद्वत्त्व ।। लळे पुरवितां दैवत ।। चढला उन्माद अधिकची ।। २५ ।। आधींच असतां वानरजाती ।। त्यासी पाजविलें मद्य निश्चिती ।। विंचू डसतां त्यावरती ।। मग त्याची कृती वर्णी कोण ।। २६ ।। आधीच होय ब्रम्हराक्षस ।। मंत्रें घालितां अक्षता त्यास ।। मग काय पुसावें परपीडेसी ।। जीवंत कवणास राहवी ।। २७ ।। आधींच मूल बोंबाळ[1] ।। त्यांत येतां फाल्गुनमास केवळ ।। मग काय त्याचा खेळ ।। पाहावा रसाळ म्हणोनिया ।। २८ ।। असो यापरी मांत्रिक ।। उन्मत्त होवोनि देख ।। कोणासी न गणतां सम्यक ।। आत्मस्तवनीं जडला तो ।। २९ ।। दिग्विजय कामना धरूनि पोटीं ।। नाना देश फिरोनि शेवटीं ।। चिदंबरकीर्ती ऐकोनि मोठी ।। दुष्टदृष्टी यापरी बोले ।। ३० ।। एकचि दिवशीं रमानाथ ।। केला मंत्रबळें कंपित ।। मानव कोण दीक्षित ।। क्षणांत जिंकून सोडीन ।। ३१ ।। एवमादि गर्ववचन ।। बोलत पातला गुरुपत्तन ।। मांत्रिका पाहोनि सर्व जन ।। गडबडोन बोलती ।। ३२ ।। गुरुजी मांत्रिक आलासे क्रूर ।। कलाहारक खळ निष्ठुर ।। यासि क्षणांत रमावर ।। भ्याला सत्वर द्रव्यही देत ।। ३३ ।। यासी उपायें माघारा

शि व चि द म्ब र

१. नाठाळ

शि व चि द म्ब र

।। पाठवीं बा दयासागरा ।। नातरी करुणाकरा ।। समय अघोर येईल ।। ३४ ।। मांत्रिकभयें भीतजनोक्ती ।। ऐकुनी बोले कृपामूर्ती ।। मांत्रिकभय यत्किंचित चित्तीं ।। जन हो तुम्ही आणूं नका ।। ३५ ।। समर्थ असे सर्वेश्वरू ।। कर्ता हर्ता महेश्वरू ।। शरणागता रक्षितो निरंतरू ।। असे जागरूक सदोदित ।। ३६ ।। ऐसें सांत्वन शिष्यांसि ।। करित असतां चिदम्बर परियेसी ।। इतुक्यांत पातला गुरुपाशीं ।। शिष्यमेळा मांत्रिकाचा ।। ३७ ।। चिदंबरापुढें निष्ठुर वचन ।। बोलती मांत्रिकशिष्यजन ।। त्रिलोकविजयी आमुचा गुरु जाण ।। मंत्रें पाशमोचन केलासे ।। ३८ ।। त्याचें भय न धरितां चित्तीं ।। तूं म्हणवितोसी महीवरती ।। शिवावतार ऐसा निश्चिती ।। म्हणूनि तुजप्रती सांगूं आलों ।। ३९ ।। जरी होशी तूं महेश्वर ।। पूर्व मंत्राचा शापपरिहार ।। तरी करी बा सत्वर ।। नातरी शीघ्र शरण येईं ।। ४० ।। आमुचा गुरु असे कठिण ।। नातरी करिल कलाहरण ।। क्षणमात्रें भ्याला रमारमण ।। त्यापुढें कवण मानव टिके ।। ४१ ।। एवमादि निष्ठुर भाषण ।। मांत्रिकशिष्यांचें परिसोन ।। हंसत बोलिला सावित्रीरमण ।। सर्वेशकला असती अनंत ।। ४२ ।। मी तरी मानव निष्कल ।। माझें कलाहरण तो काय करील ।। अघटित असे अनंताचा खेळ ।। वाचें बरळ बोलूं नये ।। ४३ ।। द्ररिद्रियाचिया घरीं ।। तस्कर प्रवेशल्यावरी ।। धनादि न मिळतां तिळभरी ।। दुःखें भारी पीडतो ।। ४४ ।। आकाशाची मोट बांधणें ।। आकळोनि वायूसी धरणें ।। नवनीत[1] वांटोनि सूक्ष्म करणें ।। तैसे तया यश न मिळे ।। ४५ ।। नवनीतास्तव जलमंथन ।। वाळूचें तेल काढण्या जाण ।। खपंकज[2] आणावया प्रयत्न ।। तैसे तया यश न मिळे ।। ४६ ।। गंधर्वनगर शृंगार करणें ।। वंध्यापुत्राचें लग्न मांडणें ।। स्वप्ननिधीनें व्यापार करणें ।। शंभूकला हरणें यापरी ।। ४७ ।। येणेंपरी गुरुवचन परिसोनि ।। मांत्रिकशिष्यजन ।। सक्रोधें गुरुपाशीं जाऊन ।। साद्यंत गुरुभाषण सांगती ।। ४८ ।। चालूं दे आपुलें अनुष्ठान ।। मग आपोआप येईल शरण ।। ऐसें ऐकोनि शिष्यवचन ।। क्रोधायमान झाला मांत्रिक ।। ४९ ।।

शि व चि द म्ब र

१. लोणी २. आकाशकमल.

सत्वरें करूनिया स्नान ।। कलाहरण मंत्रपुरश्चरण ।। आंरभिलें तीव्रानुष्ठान ।। घातकी जाण निर्दयपणें ।। ५० ।। मांत्रिकाचा पाहुनी निर्बंध ।। मंडलेश्वर[1] होउनी सखेद ।। स्वामीसी विनविती सुबुद्ध।। मांत्रिक कीं क्रोधावलासे ।। ५१ ।। आरंभिलें असें पुरश्चरण ।। पुढें दिसतो समय कठिण ।। आम्हां द्यावा निरोप सुजाण ।। उपाय करून पाठवूं ।। ५२ ।। तंव बोले विश्वव्यापक ।। भिऊं नका लेशही देख ।। त्याचें अनुष्ठान चालूं दे सम्यक ।। शक्तिसारिखें करा सांहाय ।। ५३ ।। ऐसें अभय वचन ऐकोन ।। विस्मय पावले सर्व जन ।। इकडे निराहार सप्तदिन ।। मांत्रिकानुष्ठान चाललें ।। ५४ ।। इकडे चिदम्बरी लीला ।। अनुदिन पावतसे वृद्धीला ।। मांत्रिक ऐकुनी मागुती खवळला ।। दुर्जे पुरश्चरण आरंभित ।। ५५ ।। तत्काळ मंत्राचा विसर पडला ।। पुस्तक पाहतां अंध जाहला ।। मग हतगर्व होउनी चिदम्बराला ।। शरण रिघाला पश्चातापें ।। ५६ ।। हात टेकुनी शिष्यस्कंधीं ।। आला गुरुचे अंगणीमधी ।। त्यासि पाहोनि जगदादी ।। बोलता जाहला परियेसा ।। ५७ ।। धन्य स्वामी आह्मां आपण ।। करणार मंत्रशापमोचन ।। येणें झालें किंकारण ।। तंव मांत्रिक नमस्कार करी ।। ५८ ।। उठीं उठीं म्हणत करुणाकर ।। निज हस्तें मांत्रिक शरीर ।। स्पर्शूनि तद्विद्या स्वीकार ।। केला सत्वर गुरुनाथें ।। ५९ ।। स्पर्शतां मांत्रिकविद्या जाण ।। चिदम्बरें घेतली आकर्षून ।। अज्ञानें शास्त्री गडबडून ।। पायां पडोनि विनवितसे ।। ६० ।। स्वामिराया पुढें माझी गती ।। कैसी होईल सांगा निश्चिती ।। देवद्विज क्षोभ मजप्रती ।। घडला उमापती करूं काय ।। ६१ ।। स्वामी म्हणे मांत्रिकासी ।। आतां सांगणें काय तुजसी ।। पेरिलें फळ भोगावयासी ।। सिद्ध होईं सत्वर ।। ६२ ।। करावें तैसें फळ भोगावें ।। स्वकर्मफळ बळेंचि घ्यावें ।। आतां तुजसी काय सांगावें ।। आधींच असावें सावध ।। ६३ ।। देव द्विजांचा तुज घडला क्षोभ ।। तेणें मिळाले ईदृग्गतिलाभ ।। उद्धटपणें यमदंड सुलभ ।। परिणामीं भोगणें सप्रेमें ।। ६४ ।। ऐसें ऐकुनी गुरुवचन ।। मांत्रिक थरथरां कांपे

..........................
१. राजे.

शिवचिदम्बर

जाण ॥ विनवितसे चरणीं पडोन ॥ म्हणे तारीं तारीं गुरुराया ॥ ६५ ॥ अगा करुणासिंधू सांभाळीं मला ॥ स्वकर्में निघालो निरयार्णवाला[1] ॥ पाहुनी तव पदकमला ॥ गेले मोक्षपदीं पापीही ॥ ६६ ॥ पूर्वीं तुवां वैरियांसी ॥ सद्गती दिधली बहुतांसी ॥ म्हणोनि तव पदपद्मासी ॥ शरण परियेसी आलों देवा ॥ ६७ ॥ माझे अपराध घालोनि पोटीं ॥ पापियासि सांभाळी जगजेठी ॥ करीं मजवरी कृपादृष्टी ॥ म्हणतां उभयदृष्टीं जल भरलें ॥ ६८ ॥ मांत्रिकाचा पाहातां पश्चाताप ॥ श्रीगुरु पोटीं झाला सकृप ॥ त्याचे शिरीं हस्त ठेवोनि जगबाप ॥ अनुग्रहलहरी प्रेरित ॥ ६९ ॥ मग होउनी शांतबुद्धी ॥ गुरुसेवा करूं लागला यथाविधी ॥ ठाव त्यास देई कृपानिधी ॥ भक्तामधीं रहावया ॥ ७० ॥ ऐशापरी गुरूचा प्रभाव ॥ शत्रुमित्रीं सम स्वभाव ॥ यास्तव कोणताही धरुनि भाव ॥ चित्तीं गुरुपाय आठवी ॥ ७१ ॥ वैरभावें रावणादिक ॥ प्रेमभक्तीनें उद्धवादिक ॥ अर्पणभावें गोपीगण देख ॥ गेले सम्यक मोक्षपदा ॥ ७२ ॥ याकरितां कैशाही भावें ॥ सद्गुरुचरणीं चित्त ठेवावें ॥ पदीं चित्त देतां मोक्षा पावे ॥ मनुज सत्य जाणा पै ॥ ७३ ॥ गुरुजवळी वर्तावें सत्यपणें ॥ अगर्वें असावे आर्जवपणें ॥ यास्तव सांगतों तुम्हांकारणें ॥ यथासांग जें साधे कार्य ॥ ७४ ॥ जयाचे चैतन्यबळें ॥ देह इंद्रियें अंतःकरण वेगळें ॥ स्वविषयीं निरनिराळे ॥ जडही दिसती चेतनापरी ॥ ७५ ॥ मागील अवतारीं जाण ॥ सज्जनपालन दुर्वृत्तनाशन ॥ या अवतारी ब्राम्हणत्त्व धरून ॥ दुजियांचें मन न दुखवी ॥ ७६ ॥ एके दिवशीं पूर्व देशस्थ ॥ ब्राम्हण एक कुटुंबासहित ॥ आला भेटीसी वेदपारंगत ॥ श्रोत्रिय श्रीगुरुचे पै ॥ ७७ ॥ येउनी नमितां ब्राम्हण ॥ त्यासी आदरें श्रीगुरु उठवून ॥ कुशल प्रश्नपूर्वक सन्मान ॥ करूनि निज सन्निध बैसवी ॥ ७८ ॥ श्रीगुरु सर्वांतरंग जाणता ॥ श्रोत्रियाच्या ओळखोनि चित्ता ॥ एके दिनीं बोलवोनि एकांता ॥ पुसतसे आदरें ॥ ७९ ॥ अगा श्रोत्रिया मानसीं ॥ काशीयात्रेसि कीं जाऊं इच्छिसी ॥ या समयीं सांग मजपाशीं ॥ काय मानसीं चिंतिसी तूं ॥ ८०

१. नरकसागरालां.




शिवचिदम्बर

शि व चि द म्ब र

।। स्वामीवचन परिसोनि ।। ब्राम्हण कर जोडोनि दोनी ।। विनवितसे करुणावचनीं ।। सावित्रीजानी ऐक म्हणे ।। ८१ ।। दरिद्रियाचे मनोरथ ।। उठतां सर्वेचि लया पावत ।। मी असें परम अनाथ ।। मनोराज्यांत माझी यात्रा ।। ८२ ।। प्रतिमासीं कुटंब रक्षणासाठीं ।। शत रूप्यक लागती जगजेठी ।। ऐसिया दरिद्रा यात्रा मोठी ।। कासयासाठी पाहिजें ।। ८३ ।। यापरी ब्राम्हणाची करुणावाणी ।। परिसोनि बोलिला कृपादानी ।। चिंता सोडीं गा अंतःकरणीं ।। यात्रा संकल्पोनि येईं वेगीं ।। ८४ ।। यात्रेसी लागेल तितुकें ।। द्रव्य देतों जाईं हरिखें ।। मग ब्राम्हण करुनि संकल्प निके ।। आला कौतुकें श्रीगुरुजवळीं ।। ८५ ।। तंव होन दोन त्याचे हातीं ।। देता झाला विश्वपती ।। तोही विश्वास धरूनि चित्तीं ।। क्षेत्रयात्रेप्रती जातसे ।। ८६ ।। खर्च करितां दोन होन ।। मागुती जवळीं दिसती नवीन ।। अक्षय होन पाहोनि ब्राम्हण ।। समाधान पावला मानसीं ।। ८७ ।। ज्या यात्रेसी जाय तेथ ।। द्रव्य वेंचितसे अपरिमित ।। दक्षिणान्न दान देवोनी बहुत ।। विप्रजात तोषवी ।। ८८ ।। यापरी करोनि त्रिस्थळ यात्रा ।। आला माघारा श्रीगुरुपुरा ।। आनंदें पाहोनि गुरुवरा ।। वंदितसे त्वरा करोनिया ।। ८९ ।। श्रीगुरु पुसती ब्राम्हणासी ।। त्रिस्थळ यात्रा यथाविधीसी ।। घडली काय सांगा आम्हांसी ।। भेटलासी बहुतां दिनीं ।। ९० ।। तंव वंदोनि म्हणे ब्राम्हण ।। यात्रा घडली श्रीकृपेंकरून ।। आपुली कृपा असतां पूर्ण ।। काय न्यून भक्तांसी ।। ९१ ।। तंव ब्राम्हणासी सुमंदहंसित ।। मागुती पुसे श्रीदीक्षित ।। दोन होन दिधले ते तुम्हाप्रत ।। आहेत किंवा खर्च झाले ।। ९२ ।। हें ऐकुनी विप्र मनीं ।। विचारितसे साशंक होवोनी ।। आहेत म्हणतां मागेल झणी ।। मज कुटुंबहानी होईल ।। ९३ ।। सद्गुरुजवळीं साशंकपण ।। कपटपणें स्वार्थसाधन ।। हृदयज्ञापुढें मिथ्या भाषण ।। यासी म्हणावें मूर्खत्व ।। ९४ ।। मायबापासीं वंचणें ।। श्वशुरगृहीं जार करणें ।। राजप्रिय वस्तू अपहरणें ।। यासी म्हणावें मूर्खत्व।। ९५ ।। स्वापराध न विचारणें ।। दुजियासि शब्द ठेवणें ।। अतिथीसि न देतां मिष्टान्न भक्षणें ।। यासी म्हणावें मूर्खत्व ।। ९६ ।। आप्तासवें देणेघेणें ।। एकांतीं मित्रस्त्रीसीं

शि व चि द म्ब र

बोलणें ।। केलें पुण्य जनीं सांगणें ।। मूर्खत्वाचीं लक्षणें हीं ।। ९७ ।। असो यापरी तो ब्राम्हण ।। होन सरले आजीच म्हणोन ।। सांगतां श्रीगुरु जाण ।। तथास्तु म्हणोन बोलिला ।। ९८ ।। मग ब्राम्हण भय पावला ।। जावोनि पाहे स्वस्थानाला ।। होन न देखतां मूर्च्छा पावला ।। मुहूर्त मात्र परियेसा ।। ९९ ।। मग येवोनि शुद्धीवर ।। ब्राम्हण होवोनि अति आतुर ।। आला श्रीगुरुजवळीं सत्वर ।। म्हणे पाप अपार मज घडलें ।। १०० ।। मूर्खपणें तुम्हांजवळीं ।। मिथ्या बोलिलों जगमाउली ।। करीं मजवरी कृपेची साउली ।। म्हणोनि भूतळीं लोळतसे ।। १ ।। तेव्हां म्हणे सच्चिदानंद ।। मिथ्या कां बोलिलासी अबद्ध।। सत्याएवढें व्रत शुद्ध।। नाहीं म्हणोनि वेद गर्जती ।। २ ।। सत्यवचनी आनंदधाम ।। विलसे सदा परब्रम्ह ।। व्रतांमध्ये व्रत उत्तम ।। सत्य भाषण मोक्षदानी ।। ३ ।। कदापि सोडूं नये सत्य ।। जरी ये प्राणप्रयाणसमय ।। जधीं गोब्राम्हणांचे रक्षण होय ।। बोलावें असत्य तधीं किंचित ।। ४ ।। सत्ययोगें मोक्षलाभ ।। असत्ये होय निरय[1] सुलभ ।। सत्य वक्त्या मिळे सुख स्वयंभ ।। दुःख भोगी मिथ्यावादी ।। ५ ।। ऐसा वेदसिद्धांत असतां ।। तुजसी मी काय सांगूं आतां ।। स्वकर्म भोगावें तत्त्वतां ।। उपाय कोणता असे यासी ।। ६ ।। ऐसें परिसोनि श्रीगुरुवचन ।। विप्र पश्चात्ताप पावोन ।। मज पापियाचें करावें रक्षण ।। म्हणूनि चरण धरितसे ।। ७ ।। स्वामी मी पापी पापकर्मा ।। पापसंभव मी पापात्मा ।। सद्‌गुरुवंचनें नरकधामा ।! निघालों पुरुषोत्तमा राखी मला ।। ८ ।। मज सांभाळीं दीनबंधू ।। साष्टांगे नमितों करुणासिंधू ।। रुदन करितसे अगाधू ।। बहुधा पायीं वंदितसे ।। ९ ।। तंव करुणानिधी ब्राम्हणासी ।। उठवोनि बहु प्रीतीसी ।। कृपा करोनि बहुवसी ।। सन्मार्ग त्यासी बोधिला ।। ११० ।। यास्तव दीक्षिताची भक्ती ।। निश्चयें सर्वार्थ पुरवी ती ।। सर्व लोकांसी उद्धारगती ।। द्यावया भूवरती अवतरला ।। ११ ।। कलियुगी मंद जन ।। त्यांसी व्हावया सुखसाधन ।। कैलासनाथासी कृपा उपजून ।। स्वयें सांब अवतरला ।। १२ ।। अनेक नगरांठायी ।। चरित्र

१. नरक.

दाविलें बहुतचि पाहीं ।। तें श्रवणमात्रें पापी जनही ।। पुनीत होती दोषांपासुनी ।। ११३ ।। यास्तव श्रोते थयामती ।। चिदंबर किंकराची भारती[1] ।। ऐकुनी सुख अनुभवा निश्चिती ।। हीच विनंती सर्वांसी ।। ११४ ।। स्वस्ति श्रीचिदंबरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्‍गुरुनाथ ।। म्हणोनि ऐका श्रोते समस्त ।। चतुर्विंशोऽध्याय रसाळ हा ।। ११५ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे मान्त्रिकगर्वहरणं तथा दरिद्राय काशीयात्रार्थे सुवर्णनाण्यद्वयदानं नाम चतुर्विंशोऽध्यायः ।। २४ ।। ओवीसंख्या ११५ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।



शिवचिदम्बर

---

१. वाणी.

# वैष्णवानां विष्णुरूपदर्शनम्



मग सूदे चिदम्बरापुढें । शालिग्राम ओतिले रोकडे : शालिग्राम ओळखोनि घ्यावे । घेऊनि स्वस्थळा सुखे जावे :
त्यांची भक्ती पाहूनि विशदू । रूप अगादू दाविता झाला ॥

शिवचिदम्बर

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। ॐनमो जी कैवल्यगुरु ।। जीवेश्वरा परमगुरु ।। श्रीराज्य रामेश्वरा परमेष्ठी गुरु ।। नमो परात्परू चिदम्बरा ।। १ ।। नाना रूप नाना अवतार ।। धरूनी लीला दाविशी सर्वेश्वर ।। आदिकर्तां मायादेवीभ्रतार ।। नमो जी सद्‌गुरु चिदम्बरा ।। २ ।। तुझिया कृपादृष्टी मात्रें ।। धुंडाळितां जीवभाव न उरे ।। स्वरूप होय सृष्टी माघारें ।। काय मी पामर वानूं महिमा ।। ३ ।। हेंचि मागणें तुझे पायीं ।। वरद वाणी मजला देईं ।। तव चरित्र पठतां सर्वही ।। भवापासुनी उद्धरावें ।। ४ ।। चरित्रावलोकनें जन सर्व ।। संशयविरहित सुस्वभाव ।। सर्वांभूती समभाव ।। होवो ऐसें करि देवा ।। ५ ।। सप्रेमें नामघोष ।। निर्विकल्पें एकांतवास ।। यांतचि घडावा सत्सहवास ।। याविण तुम्हांस न मागें कांहीं ।। ६ ।। इतुकें देउनी श्रीहरी ।। पुनर्जन्म देई मुरारी ।। न भियें मी यावया संसारीं ।। जाणसी अंतरीं चिदम्बरा ।। ७ ।। लौकिकाची मज नसे चाड ।। तुझी कीर्ती पसरावी उदंड ।। अंतरसाक्षी जाणसी तूं अखंड ।। इतुकेंचि कोड पुरवीं माझें ।। ८ ।। चिदम्बरा तूं स्नेहाळू माउली ।। मी तुझें बाळ पडलों मायाजाळीं ।। मज करीं गे माये मोकळी ।। तुझे उरस्थळीं खेळवीं ।। ९ ।। आंत बाहेर मागें पुढें ।। तूंचि जगांत सर्वांकडे ।। अखंड सच्चिदानंद जिकडे तिकडे ।। सर्वांकडे नमूं तुजला ।। १० ।। आतां ऐका श्रोते समस्त ।। चित्त करोनिया स्वस्थ ।। चिदम्बरलीला असे अद्‌भुत ।। श्रवणमात्रें पावन करी ।। ११ ।। एके दिवशीं तैलंग ब्राम्हण ।। आला भेटीसी भट्ट नारायण ।। पंक्तींत पाहोनि यावनालान्न[१] ।। मागे शाल्यन्न[२] देई ऐसें ।। १२ ।। मागतां क्षणीं निजपद ।। द्यावया असे जो दीक्षाबद्ध ।। त्यासी काय मागे मतिमंद दुःखद ।। अबद्ध जिव्हास्वाद ।। १३ ।। कल्पवृक्ष सोडोनि सिंदीवनीं ।। कामधेनू दवडोनि खरदोहनीं ।। कीं अमृत टाकोनि मद्यपानीं ।। बैसता कवणा महत्त्व जडे ।। १४ ।। पांचू सोडोनि काच घेणें ।। रत्न टाकोनि गार धुंडणें ।। सिंहासन अव्हेरुनी उकरडीं बैसणें ।। मागणें तैसें झालें त्याचें ।। १५ ।। आरशांत निजमुख जैसें ।। प्रतिबिंब

१. जोंधळ्याच्या कण्या २. भात

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

उमटे त्यासरिसें ।। मागणारासी देव देतसे ।। मानसीं जे वसे तेंचि फळ ।। १६ ।। पंक्तिभेदें महादोष ।। स्वामी म्हणे घडे उभयतांस ।। पृथक् स्वयंपाक करोनि सुखास ।। तृप्ती आपणासी करूनी घेई ।। १७ ।। ऐसें सांगुनी अंजलिभरा ।। तांदूळ देतसे द्विजवरा ।। ते घेउनी गेला सत्वरा ।। महापात्र भरोनि ठेवी ।। १८ ।। तांदूळ जाहले अक्षय ।। समाराधना आरंभिली नित्य ।। तेणें मिळाला विप्रसमुदाय ।। होतसे नित्य अधिकोत्तर ।। १९ ।। जळपाकादिकृत्य वाढतां ।। नारायण त्रासोनि तत्त्वतां ।। करू लागला धिक्कारतां ।। ब्राम्हणांची पदोपदीं ।। २० ।। माध्यान्हीं तुम्ही भोजना येतां ।। आकंठ सुग्रास जेवितां ।। पात्रें त्यजूनि उठोनि जातां ।। मज एकट्या कार्य नाटोपे ।। २१ ।। सावकाराचें घेउनी द्रव्य ।। फेडण्या जैसा होय अशक्य ।। नातरी दीपें करावा जैसा सत्य ।। उपहास भास्कराचा ।। २३ ।। सिंधुनीर घेउेनिया जेंवि घट ।। सिंधूसी धिक्कारी फुकट ।। तैसा ब्राम्हण उद्धट ।। चिदम्बरातें न गणी मनीं ।। २४ ।। कां वाढला जरी जंबुक[1] ।। पंचाननाचे [2] साम्य[3] ऐक ।। कल्पांतीं ही न पवे देख ।। तेंवि विप्रवाक्य जाणपां ।। २५ ।। म्हणे तेथें नित्य होतसे कदन्न ।। माझे गृहीं उत्तम शाल्यन्न ।। यास्तव येथें सर्व कार्य करून ।। यावें जाण भोजनासी ।। २६ ।। एवमादि गर्वोत्तर ।। ऐकोनि सर्व द्विजवर ।। सांगती गुरूजवळी सविस्तर ।। अपमान सत्वर सविनयें ।। २७ ।। तवं तो कैलासरमण ।। ब्राम्हणाचे करूनि सांत्वन ।। स्वमंदिरीं भोजन घालून ।। स्वधर्मवचन सांगतसे ।। २८ ।। आजपासुनी तेथें नच जावें ।। मिष्टान्नकांक्षी मन न घालावें ।। कदन्न स्वाद्वन्न समभावें ।। तृप्ती करिती मानवाची ।। २९ ।। जिव्हास्वादासी भुलतां ।। अवमान अतिदुःख लाधे हाता ।। आदरें जें मिळे आयिता ।। प्रीतीनें जेवतां अमृत होय ।। ३० ।। अनादरें लाधे मिष्टान्न ।। तेणें न मिळे सुख जाण ।। एवं ब्राम्हणासी सावित्रीरमण ।। बोधिता झाला परियेसा ।। ३१ ।। एके दिवशीं चिदम्बर ।। शुक्लवृत्तीनिमित्त थोर ।। करुनि निघाला सत्वर ।। तैलंग घरा पातला ।। ३२ ।। स्वामीनें द्वारी

शिवचिदम्बर

१. कोल्हा. २. सिंहाची. ३. बरोबरी.

उभा राहोनी ।। कौतुकें भिक्षा म्हणतांक्षणीं ।। विप्र फुगोनि अंतःकरणीं ।। तंडुल आणोन घातले पात्री ।। ३३ ।। उगाच श्रीगुरु परतला ।। निजघरासी पातला ।। विप्र पाहोनि रित्या पात्राला ।। मनीं दचकला साशंक ।। ३४ ।। मग हतगर्व होवोनी ।। शरण आला श्रीगुरुचरणीं ।। बोलतसे करुणावाणी ।। साष्टांगें नमोनि श्रीगुरूसी ।। ३५ ।। तारीं तारीं मज करुणाकर ।। पाप घडलें मज अपार ।। गर्वे केला ब्राम्हणधिक्कार ।। गुरुची थोर निंदा घडली ।। ३६ ।। परिसोनि विप्रभारती[1] ।। हंसत सद्‌गुरु बोलती ।। मी काय करू बा तुजप्रती ।। स्वकृत निश्चितीं भोगीं आतां ।। ३७ ।। ब्राम्हण जरी वदे दुर्वचन ।। अथवा करी ताडन ।। तथापि हितेच्छु नरें जाण ।। तया वंदन करावें ।। ३८ ।। विप्रावमानें सर्वस्व ।। नाश पावे ज्ञान वैभव ।। वंदावे ब्राम्हण यास्तव ।। सापराध भाव दिसतांही ।। ३९ ।। यास्तव तूं विप्रचरणांसी ।। शरण जाईं स्वहितप्राप्तीसी ।। विप्रप्रसादें साम्राज्यादि परियेसी ।। कवणासी नोहे दुर्लभ ।। ४० ।। एवं परिसोनि गुरुवचन ।। परलोकभयें तैलंग भिवून ।। गेला ब्राम्हणांसी शरण ।। स्वामिवचन मानोनि चित्तीं ।। ४१ ।। पावन होतां द्विजानुग्रहें ।। स्वामी द्विजासी बोलावुनी निर्मोहें ।। वरदानपूर्वक महानुग्रहे ।। संतोषविला तैलंग ।। ४२ ।। चिदम्बर कलिकल्पतरू ।। त्रिमूर्तीसी तोची होय गुरु ।। तयाचे चरणीं करतां नमस्कारू ।। जन्मजरादि भारू दूर होय ।। ४३ ।। ज्यासी पाहिजे निजसुख ।। तेणें देहाहंकार घातुक ।। आधीं दवडोनि गुरुनायक ।। भजतां मोक्षसुख लाधे हातां ।। ४४ ।। एकें दिवशीं वैष्णव चौघे ।। आले स्वामीसी भेटावया वेगें ।। स्वाभिमान प्रगटण्यायोगें ।। शाठ्यें वंदूनि राहिले ।। ४५ ।। त्यांची एकनिष्ठ विष्णुभक्ती ।। पाहोनियां सावित्रीपती ।। हर्षें बोलिला आचार्यांप्रती ।। असे हरितिथी[2] उदयीक ।। ४६ ।। महापंक्तीमाजी पारण ।। करितां किंवा स्वयंपाक करून ।। तें सांगा मज निक्षून ।। म्हणोनि दीक्षित पुसतसे ।। ४७ ।। तेव्हां बोलती ते वैष्णव ।। आम्ही असों सद्वैष्णव ।। महापंक्ती भोजनसंभव ।। घडेल कैचा आम्हांसी ।। ४८ ।। तंव सेवकांसी

१. ब्राम्हणवाणी २. द्वादशी

शिवचिदम्बर

श्रीगुरू ।। सिधासामग्री द्यावया सत्वरू ।। आज्ञा देतां सेवकें परिकरू ।। सामग्री दिधली आणोनियां ।। ४९ ।। आचार्य उठोनि प्रातःकाळीं ।। पाक करोनि देवा जवळीं ।। विष्णूनैवेद्यार्थ सांबळी ।। काढिल्या ते वेळीं चौघानीं ।। ५० ।। शालिग्राम नसती पेटीमाजी ।। विचारिती काय आजी ।। रित्या सांबळी पाहोनि चौघांमाजी ।। आले पुसावया दीक्षितासी ।। ५१ ।। पाकशाळेमाजी चिदम्बरासी ।। पाहुनी बद्धांजळीनें विनयेंसी ।। नमूनि साष्टांगें परियेसी ।। दीक्षितेंद्रासी प्रार्थिती ।। ५२ ।। आम्हां लागलीसे क्षुधा ।। परी विघ्न आले तयाच्या भेदा ।। करोनियां देईं आनंदा ।। भोजनासी वाट दावीं ।। ५३ ।। तंव पुसतसे श्रीगुरू ।। हरिभक्त तुम्हां कोण विघ्न थोरू ।। भोजनी आड आलें सत्वरू ।। करूं प्रतिकारू चिंता सोडा ।। ५४ ।। आचार्य बोलती ऐक दीक्षितां ।। श्रीश गेला आम्हां सोडोनी तत्त्वता ।। भोजन कैसे घडे आमुचे आता ।। देवेंचि सोडिता आम्हासी ।। ५५ ।। आचार्यहो काय आश्चर्य ।। भक्तांशी सोडिलें श्रीसखय ।। कधींन सोडी हा निश्चय ।। असे देवराय भक्तवत्सल ।। ५६ ।। नित्य जयाच्या पूजनाविण ।। अन्नस्पर्श आम्हां नसे जाण ।। आतां पुढें व्हावया भोजन ।। सांगा यत्न देवराया ।। ५७ ।। एकेचि वेळीं चौघांचे ।। देव गेले कैसे तुमचे ।। कारण काय असे याचें ।। सांगा मजसी ब्राम्हण हो ।। ५८ ।। कारण आम्हां नसे विदित ।। आपण सर्व ज्ञाते समर्थ ।। संकट निवारणें त्वरित ।। दीननाथा चिदम्बरा ।। ५९ ।। तंव वदे चिदम्बर ।। भिऊं नका धरा धीर ।। दुजें देतों शालिग्राम सुंदर ।। पूजूनि सारा भोजन ।। ६० ।। उपनयन झाल्यापासुन ।। ज्याठायीं केलें पूजन ।। तेचि मिळतां घडे भोजन ।। नातरी प्राण त्यजूं स्वामी ।। ६१ ।। तयांचि पाहोनि एकनिष्ठ भक्ती ।। कृपा उपजली गुरूचे चित्तीं ।। सूदासी[1] बोलावुनी सांगती ।। सांभाऱ्यामाजी शोधावया ।। ६२ ।। स्वामीवचन परिसोन ।। सूदें हाती पळी घेवोन ।। सांभारी करितां आलोडन ।। पळीभरोन निघाले ।। ६३ ।। मग सूदें चिदम्बरापुढें ।। शालिग्राम ओतिले रोकडे ।। श्रीगुरु पांहोनि आचार्यांकडे ।। बोलता झाला

शिवचिदम्बर

---

१. स्वैपाक्यास

अवधारा ॥ ६४ ॥ शालिग्राम ओळखूनि घ्यावे ॥ स्वस्थळा घेउनि सुखें जावें ॥ नैवेद्य करोनि स्वस्थ जेवावें ॥ दया ठेवावी मजवरी ॥ ६५ ॥ अद्भुत चमत्कार पाहोनि ॥ आचार्य दचकले अंतःकरणीं ॥ म्हणती जळो आमुची करणी ॥ मायाजाळीं गुंतुनी नेणों तुज ॥ ६६ ॥ अगाधचित्रा[1] चिदम्बरा ॥ कुतर्कें तुजसी न जाणतां सर्वेश्वरा ॥ केला महाप्रसाद धिक्कार ॥ तुज सर्वांतरा अवमानिला ॥ ६७ ॥ स्वयें आपण येऊनी श्रीहरी ॥ सेविलीं सुरस सांभारी ॥ आमुचा काय पाड मुरारी ॥ भोजन करण्या दोष नाहीं ॥ ६८ ॥ देवा परिस पूजारी ॥ पूज्य होवोनि बैसला देवहारीं ॥ की पतीपेक्षा सुंदरी ॥ सुखशेवरी निजेली ॥ ६९ ॥ गुरुपेक्षां शिष्यगणें ॥ ढोंग माजवोनि बैसणें ॥ निज स्वरूप निज गुरुसि पाठ सांगणे ॥ झाली त्यापरी आमुचि कृती ॥ ७० ॥ नातरी राजा चालत असता ॥ दूत बैसती सुखासनी तत्वता ॥ तेणेंचि परि जगन्नाथा ॥ जाहली शिष्टता आमुची ॥ ७१ ॥ असो मन गर्वे भ्रमित झाले ॥ आता तव स्वरूप ओळखिलें ॥ तव चरणीं आतां मन रतलें ॥ तारी तारीं दयाळा ॥ ७२ ॥ तूंचि होशी नारायण ॥ नररूपें दिससी परिपूर्ण ॥ थेथेंचि महाप्रसाद भोजन ॥ घ्यावया आम्हांसी आज्ञा द्यावी ॥ ७३ ॥ देवा आम्हांवरी अनुग्रह करीं ॥ तुझे पादसेवक दासांवरी ॥ ऐसे म्हणत पायांवरी ॥ पडले भारी गहिंवरत ॥ ७४ ॥ त्यांसी उठवोनि दयासिंधू ॥ सांतवनें करोनि प्रबोधू ॥ त्यांची भक्ती पाहोनि विशदू ॥ रूप अगाधू दाविता झाला ॥ ७५ ॥ नीलमेघघनश्याम ॥ पीतांबर नेसलासे उत्तम ॥ शोभे चतुर्भुज श्रीवत्सलक्ष्म ॥ पंकजाक्ष मणिकुंडल ॥ ७६ ॥ अनर्घ्यरत्नखचित ॥ किरीट मस्तकीं लखलखित ॥ कंठी वनमाला विराजत ॥ सुशोभित हृदयीं कौस्तुभ ॥ ७७ ॥ नवरत्नप्रभे उल्हसित ॥ कुंडलीं कर्णप्रांत शोभित ॥ केयूर कटक मणिखचित ॥ दीक्षितराज शोभतसे ॥ ७८ ॥ कटिसूत्र मेखला विराजत ॥ शंख चक्र गदांबुजात[2] ॥ स्वीकारोनि शोभतो सुमंदहसित ॥ हार शोभित गळां दिसे ॥ ७९ ॥ शांतमूर्ती प्रसाद सुमुख ॥ भाळीं शोभे कस्तूरीटिळक

..........................

१. अगाधलीला. २. गदा आणि पदम्.




शिव चिदम्बर

|| सुंदर चारुदर्शन सुरेख || सर्वांगीं शोभे श्रीहरी || ८० || वैष्णव पाहोनि विष्णुरूप || योगिध्यानगम्य निष्पाप || नमिती पावोनिया अनुताप || गहिंवरती आनंदें || ८१ || अंगीं भरले रोमपुलक || स्वदेहा विसरूनि पावती हरिख || पायीं मन लावोनि भोगिती सुख || स्तोत्र कौतुकें करूं लागले || ८२ || दामोदरा हरे करुणाकरा || मार्तंडकुलाब्धिनिशाकरा || दीनसुरद्रुमा लक्ष्मीवरा || नारायणा गुरू नमूं तुजला || ८३ || नित्योदिता भक्तोद्धारणा || श्रौतमार्ग करावया रक्षणा || आलासी त्यजूनी वैकुंठपट्टणा || भूवरी आलासी नमूं तुजला || ८४ || नित्योदिता सख्या चिदम्बरा || सर्वजीवपालका सर्वांतरा || सच्चित्सुखा व्यापका चराचरा || जगत्पाला नमूं तुजला || ८५ || विधि महेशा हरि गणेश्वरा || तूंचि धरिसी नानावतारा || क्वचिद्भानुशक्ती वायुकुमरा || क्वचिद्भयंकरा नृसिंहमूर्ती || ८६ || मत्स्यकूर्मादि दशावतार || तूंचि नटलासी चिदंबर || तुझें स्वरूप अगोचर || आम्ही पामर वानूं न शकों || ८७ || सुकृत होते आमुचे थोर || म्हणूनि भेटलासी तूं सर्वेश्वर || आम्हां दीनांचा करी उद्धार || मागणें वारंवार चरणीं हेंची || ८८ || मुनीश्वर म्हणे श्रोत्यांसी || दीक्षितें पाहोनि आचार्यभक्तीसी || उठवोनि आलिंगिलें वेगेंसी || वर देवोनि तोषवी || ८९ || भोजन करवूनि मिष्टान्नेंसी || स्वस्थाना पाठवी हृष्टचित्तासी || कलीमाजी लोकोद्धारासी || दीक्षिता ऐसा समर्थ कोण || ९० || हें नटनाथ चित्रचरित || पवित्र असे त्रिलोकांत || शुद्धभावें जो पठे नेमस्त || सांभाळी दीक्षित त्यासी सत्य || ९१ || एवमादि नाना चरित्र || ऐकुनी श्रीगुरुचें पवित्र || सर्वदेशनिवासी पार || भेटावया येती नित्य || ९२ || काम्य निष्कामिक जन सर्व || चिदंबरासी मनोरथ अपूर्व || मागतां पूर्णकामत्व || पाववोनि महत्पदीं बैसवी || ९३ || पुण्यराशी महापुरुषासी || त्रिलोकीं न मिळे उपमा परियेसी || ज्याची अगाध चरित्रराशी || अशक्य ब्रम्हादिकांसी जाणावया || ९४ || मी असें मतिमंद || काय जाणें चरित्र अगाध || तथापि त्याचा नामसंबंध || कल्याणपद दावितसे || ९५ || गुरुचिदंबर हृदयस्थ || जैसें प्रेरितो सांप्रत || तदनुरूप कथित चरित || ऐका

यत्किंचित श्रोते जन ।। ९६ ।। संपूर्ण सांगावया माहात्म्य ।। जगत्रयीं कोणा होईल शक्य ।। श्लोक श्लोकार्ध पाठक जो होय ।। मुक्त होई पापापासूनी ।। ९७ ।। गोदातीरवासी विप्र एक ।। नवस करी चिदंबरासि ऐक ।। मज पुत्र होईल जरी एक ।। चरणदर्शना येतों तुझे ।। ९८ ।। चिदंबरकृपें विप्रासी ।। पुत्र जाहला एक्या वर्षीं ।। पुढें संतोषें गुरुदर्शनासी ।। सकुटुंबेसी निघाला ।। ९९ ।। मार्गीं शिवालयीं वस्ती ।। करूनि राहिला स्वस्थ चित्तीं ।। तंव बाळासी व्याघ्रें धरिला निश्चिती ।। भिऊनि दंपती गर्जती नाम ।। १०० ।। चिदंबरध्वनी ऐकुनी ।। व्याघ्र गेला बाळ सोडोनी ।। मग दंपतीं बाळ घेऊनि ।। आले सन्निधानीं श्रीगुरुचे ।। १ ।। त्यांसी पाहोनि चिदंबर ।। पोटीं कृपा उपजोनि थोर ।। वरदान देऊनि अपार ।। संतोषवी दंपतीसी ।। २ ।। गुरुकृपा संपादून ।। हर्षें निज पुत्र घेउन ।। गेले स्वगृहासी दोघे जण ।। चिदंबरचरणीं ठेवूनी भार ।। ३ ।। अनाथासी जो कल्पवृक्ष ।। तो सद्‌गुरू धरूनी आमुचा पक्ष ।। फोडोनिया विपत्तीकक्ष[1] ।। रक्षूं दे तुम्हां सर्वकाळ ।। ४ ।। चिदंबर असे कृपानिधी ।। ठेवा भावें चित्त तत्पदीं ।। सांभाळी तुम्हां पदोपदीं ।। म्हणे चिदंबरकिंकर ।। ५ ।। स्वस्ति श्रीचिदंबरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्‌गुरुनाथ ।। म्हणोनि ऐका भाविक समस्त ।। पंचविंशोऽध्याय गोड हा ।। १०६ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे तण्डुलाक्षय्यकरणं तथा वैष्णवानां विष्णुरूपप्रदर्शनं नाम पञ्चविंशोऽध्यायः ।। २५ ।। ओवीसंख्या १०६ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

१. संकटाचें कडें




शिव चिदम्बर

## पाण्डुरङ्गेण स्वभक्ताय स्वप्ने कथनम्




दयाळू पंढरीनाथ । येऊनि सांगे द्विजा स्वप्नांत : मुरगोडी श्रीचिदम्बर ।
त्याचे दर्शनमात्रें निर्धार । दैन्यसंहार होय तुझा ॥

शि
व
चि
द
म्ब
र

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। जय जयाजी चिदम्बरा ।। आदिपुरुषा विश्वंभरा ।। तुज करोनिया नमस्कारा ।। प्रार्थितों गुरुवरा या समयीं ।। १ ।। सरस वदवीं तव चरित ।। जें पान करितां कथामृत ।। श्रोतेजन व्हावे मुक्त ।। असोनिया संसारीं ।। २ ।। तुझी करणी असे अगाध ।। भक्तांसि देशी ब्रम्हपद ।। अज्ञासी देशी सर्वज्ञपद ।। तोडिशी भवबंध नामजपें ।। ३ ।। गर्विष्ठांचा गर्वहरिशी ।। भाविकांसी शांति देशी ।। आतां तुज साम्य देऊं कवणासी ।। सदा वर्तसी स्वप्रकाशें ।। ४ ।। नमो नमो सर्वेश्वरा ।। नमो नमो परात्परा ।। सर्वव्यापका चिदम्बरा ।। नित्यानंदा तुज नमो ।। ५ ।। मुनीश्वर म्हणे ब्राम्हणांसी ।। ऐका चिदम्बरकथेसी ।। श्रवणमात्रें तुम्हांसी ।। लाधे निश्चित गुरुकृपा ।। ६ ।। एके समयीं स्वामीदर्शनार्थ ।। अगडीग्रामस्थ राजपुरोहित ।। आला कुटुम्बासहित ।। रामशास्त्री नाम त्याचें ।। ७ ।। स्वामी सन्मान देउनी त्यासी ।। म्हणे तव मुखें पुराण परियेसी ।। ऐकावें ऐशी इच्छा मानसीं ।। वसे पुरविशी काय पां ।। ८ ।। ऐकुनिया स्वामिवचन ।। भावें चरणीं करुनि वंदन ।। पुराणार्थ शास्त्री बैसतां जाण ।। सभा भरली बहुवसी ।। ९ ।। बोलावया त्र्यंबकशास्त्र्यासी ।। स्वामी पाठवी गोविंदासी ।। तेणें बोलवितां तयासी ।। तंव शिष्यासी म्हणे पंडित ।। १० ।। अरे म्हणविशी दीक्षित शिष्य ।। मजसवें बोलसी प्राकृत वाक्य ।। कैसा गुरु कैसा शिष्य ।। जा अपभ्रंश बोलशी काय ।। ११ ।। तव गोविंद पुसे येउनी ।। विनवितसे स्वामीचरणीं ।। स्वामी शिष्यवाक्य परिसोनी ।। तत्काळ वदनीं भस्म घाली ।। १२ ।। श्रीगुरुकृपा होतांक्षणीं ।। तत्काळ झाला सर्वशास्त्रज्ञानी ।। प्रास श्लेष यमक वदोनी ।। बोलावित पंडितासी ।। १३ ।। ऐकोनि शास्त्री झाला विस्मित ।। म्हणे काय वर्तलें अद्‌भुत ।। मूर्ख बोलतो शास्त्रगर्भित ।। दिसे दीक्षितकृपा मोठी ।। १४ ।। तत्काळ पंडितसभेसी ।। आला पुराणश्रवणासी ।। पाहोनि त्र्यंबकशास्त्रियाशी ।। दचकला मानसीं पुराणिक ।। १५ ।। त्याचें चित्त ओळखोनि चिदम्बर ।। मूख उघडीं म्हणे सत्वर ।। पुराणिकें उघडितां वक्त्र ।। घाली स्वकरें भस्म मुखीं ।। १६ ।। रामशास्त्री आरंभी पुराण ।। आधीं वदला मंगलाचरण ।। पंडित म्हणे सावध

शि
व
चि
द
म्ब
र

होऊन ।। सांगा पुराण मजपुढें ।। १७ ।। स्वामीसी पाहत पुराणिक ।। मंगलाचरण म्हणूनी देख ।। चिदम्बरशब्दार्थं सम्यक ।। सांगू लागला अवधारा ।। १८ ।। व्याकरणासी अनुसरून ।। अठरा अर्थ निरूपून ।। सांगतां त्र्यंबकशास्त्री जाण ।। उठूनि तत्क्षणीं आंलिंगितसे ।। १९ ।। म्हणे चिदम्बरकला अगाध ।। मी नेणतां मतिमंद ।। गर्वें बोलिलों कुशब्द ।। अपराध क्षमा करीं ।। २० ।। मग स्वामीनें पुराणिकासी ।। जावया निजग्रामासी ।। निरोप दीधला परियेसी ।। शास्त्री मानसीं सचिंत ।। २२ ।। मज कांहीतरी श्रीदीक्षित ।। द्रव्य देईल यत्किंचित ।। तेणें दैन्य होईल खंडित ।। आलों दर्शनार्थ याकारणें ।। २३ ।। स्वामींनें तरी बोळविले ।। दैवापुढें उपाय न चले ।। म्हणोनि खिन्न चित्तें निघाले ।। श्रीगुरु ओळखी चित्त त्याचें ।। २४ ।। निरोप देऊनी सर्वांसी ।। बोळवित आले स्वामी परियेसी ।। अर्ध क्रोशावरी एकांत स्थानासी ।। नेत शास्त्रियासी श्रीगुरु ।। २५ ।। मोठा घेउनी प्रस्तर ।। डोईचि शाल काढोनि सत्वंर ।। गुंडाळोनि बोले मधुर ।। निजघरासी घेऊन जाईं ।। २६ ।। गृहींच उकलोनि पाहें ।। मग दैन्य तुझे घरीं न राहे ।। ऐसें बोलोनी पदरीं बांधिलें स्वयें ।। पाठवोनि परतला आपण ।। २७ ।। त्याची भार्या होती कर्कशा ।। तिला असें फार धनाशा ।। स्वामीनें काय दीधले म्हणोनि परियेसा ।। भ्रतारा गृहीं येतां पुसे ।। २८ ।। काय तें दावीं म्हणे सती ।। न दावीन म्हणे तिचा पती ।। यापरी भांडत दंपती ।। दोडवाडाप्रती पातले ।। २९ ।। तेथें स्नाना जातां रामशास्त्री ।। दगड घेवोनियां स्वकरीं ।। मारुनी घेई जंव शिरीं ।। तव तेज भारी चमकलें ।। ३१ ।। एक भाग दिसे सुवर्ण ।। दुजा भाग दगड जाण ।। तंवशास्त्री होऊनी क्रोधायमान ।। वदें दुर्भगे काय केलें ।। ३२ ।। जरी गेलें असतें गृहापर्यंत ।। सर्वही सुवर्ण होते निश्चित ।। असो चिदंबरमहिमा अघटित ।। केला दुरित संहार माझा ।। ३३ ।। ऐसें म्हणत स्वग्रामासी ।। गेले दंपती संतोषी ।। सुखें काळ क्रमिती परियेसी ।। चिदंबरीं प्रीती ठेवोनियां ।। ३४ ।। यापरी चिदंबरचरित ।। भाविकांसी दे स्वहित ।। यास्तव भाव ठेवुनी सतत ।। स्वहितार्थ भजा स्वामीसी ।। ३५ ।। आठ मूर्ती जो झाला ।। चित्तीं


शिवचिदम्बर

आठवूनी तयाला ।। ऐका म्हणे मुनी श्रोत्यांला ।। सुंदर कथा श्रीगुरूची ।। ३६ ।। तुंगातीरीं एक ब्राम्हण ।। वसत होना नामें नारायण ।। शिवभक्त सदाचारनिपुण ।। वेदशास्त्रार्थ जाणता ।। ३७ ।। कुटुंबरक्षणार्थ प्रत्यहीं ।। नानापरी उद्योग करितांही ।। योगक्षेम न चाले पाहीं ।। भिक्षा मागुनी उदर भरी ।। ३८ ।। ऐसा कंठिता कृचित्काळ ।। कन्या पुत्राचा लग्नकाल केवळ ।। द्विज करितसे तळमळ ।। म्हणे देवा काय करूं ।। ३९ ।। त्यांतचि सावकार गांजिती ।। नसे स्वतंत्र पदमात्रवृत्ती [1] ।। बाहेर जावया न देती ।। आडविती सावकार ।। ४० ।। देहपोषण पराधीनपणें ।। प्रपंचीं दैन्य सोशीं जिणें ।। बहुत कर्ज असे देणें ।। जीवन्मृत म्हणती त्या पुरुषा ।। ४१ ।। बाळपणीं विद्याभ्यासाविण ।। प्रौढ दशा गुरुसेवेविण ।। मध्यवय सदाचाराविण ।। दवडी तों जीवन्मृत ।। ४२ ।। अव्यंग असतांही नरतनू ।। जो नाठवीं चित्तीं उमारमणू ।। विषयभोगें मानवतनू ।। गमावी तो जीवन्मृत ।। ४३ ।। असो ऐसी कठिण दशा येतां ।। ब्राम्हण कंटाळोनि तत्त्वतां ।। सोडोनि प्रपंचीं ममता ।। आला पंढरीनाथा भेटावया ।। ४४ ।। स्नान करोनि चंद्रभागेंत ।। आला भावें देवालयांत ।। साष्टांगें करितां प्रणिपात ।। कंठ सद्गदित जाहला ।। ४५ ।। म्हणे माझें दैन्य जावें निःशेष ।। नातरी समर्पीन जीवास ।। ऐसा देवापुढें दुर्धर नवस ।। करूनी क्षेत्रवास केला पै ।। ४६ ।। येणेंपरी करूनी निश्चय ।। सेवा करित राहिला नित्य ।। प्रत्यहीं जेवित पवित्रान्न भैक्ष्य [2] ।। एक संवत्सरपर्यंत ।। ४७ ।। तंव दयाळू श्रीपंढरीनाथ ।। येउनी सांगें द्विजा स्वप्नांत ।। अगा ऐक सांगतों तव हितार्थ ।। दैन्य निश्चित गेलें तुझें ।। ४८ ।। मुरगोडपुरीं दयासागर ।। असें नामें श्रीचिदंबर ।। त्याचें दर्शनमात्रें निर्धार ।। दैन्यसंहार होय तुझा ।। ४९ ।। उदयीक जाईं येथोनी ।। शंका नाणीं तूं मनीं ।। ऐसे पंढरीश सांगोनी ।। अंतर्धान पावला ।। ५० ।। जागृत होवोनि प्रभातीं ।। म्हणें असमर्थ कां तूं जगजेठी ।। कां गज घालिसी मनुष्यापाठीं ।। माझीच ओखटी [3] भाळलिपी [4] ।। ५१ ।। तूं सर्व देवांचा देवेंद्र ।। जरी असमर्थ करण्या दैन्य

१. एक पाऊलभरसुद्धां निर्वाहाचें साधन असलेली जमीन २. भिक्षा मागून आणलेलें ३. खोटी ४. ललाटरेषा

दूर ।। तरी तयाचा संहार ।। कोण करण्या शक्त होय ।। ५२ ।। अगा लक्ष्मीनायका केशवा ।। निवारीं तूंच माझे दुर्दैवा ।। न धाडीं मज नराकडे देवा ।। चित्तींचा हेवा पूर्ण करीं ।। ५३ ।। जरी माझे दुर्दैवातें ।। दुरावर्णे न होय तुझे हातें ।। आधीं श्रीपती ऐशा नामातें ।। सोडीं मनुष्यातें दावीं मग ।। ५४ ।। न जाय मी मानवाप्रती ।। त्वाचि कीजे मनोरथपूर्ती ।। नातरी प्राण सोडितों निश्चिती ।। सत्य जाण चित्तीं पंढरीशा ।। ५५ ।। ऐसें म्हणोनि मागुती ।। उपवास करित केली वस्ती ।। येणेंपरी लोटतां तीन राती ।। स्वप्नीं मागुती विठ्ठल आला ।। ५६ ।। ऐक ब्राम्हणा हट्ट न धरीं ।। देवाची छळणां न करीं ।। चिदम्बराकडे बोलल्यापरी ।। जा अंतरीचा सोडीं भ्रम ।। ५७ ।। येणेंपरी बडव्यासी ।। स्वप्न झालें त्याच निशीं ।। उदयीक पाठवा ब्राम्हणासी ।। चिदम्बरापार्शी प्रयत्नें ।। ५८ ।। प्रातःकाळीं. उठोनि ब्राम्हण ।। करावया येतां देवदर्शन ।। बडवे सांगती बोलावून ।। जावें आपण चिदम्बरापाशीं ।। ५९ ।। जरी भ्रमें तूं आग्रह करिशी ।। तरी देऊळामाजी तुजसी ।। येऊं न देऊं परियेसी ।। विठ्ठलाच्या निरोपें ।। ६० ।। छळण न करी देवाचें ।। मानोनि देवनिरोपा साचें ।। सत्वर येथोनि तूं वचें ।। नातरी वेंचे पुण्य तुझें ।। ६१ ।। विप्र ऐकोनि बडव्यांचें वचन ।। भिऊनि करी साष्टांग नमन ।। म्हणे जातों आज्ञें अनुसरून ।। दया पूर्ण असावी ।। ६२ ।। येणेंपरी बोलून ।। अनुष्ठान केले संपूर्ण ।। करूनि ब्राम्हणसंतर्पण ।। मुरगोडासी निघाला ।। ६३ ।। दुरूनि पाहतां चिदंबरासी ।। दंडवत करी भावेंसी ।। चिदंबर पाहोनि ब्राम्हणासी ।। उठवोनि प्रेमें बोलत ।। ६४ ।। गेला होतासी देवापाशीं ।। मनुष्याप्रती कां आलासी ।। देव असमर्थ ज्याविषी[1] ।। मनुष्य त्यासी करील काय ।। ६५ ।। द्विज ऐकुनी स्वामीचें वचन ।। चित्तीं बाणली स्वसंशयाची खूण ।। मागुती करोनि साष्टांग नमन ।। लोटांगण घालितसे ।। ६६ ।। कंठ झाला सद्गदित ।। अंगीं भरला रोमांचसंघात ।। नेत्रीं बाष्पधारा वाहत ।। त्राहि म्हणोनि विनवितसे ।। ६७ ।। पापी मी पापात्मा कपटी ।। अज्ञानें व्यापिली

.........................

१. ज्याविषयीं




शिव चिदम्बर

ज्ञानदृष्टी ।। माझा अपराध घालीं पोटीं ।। कृपादृष्टी पाहें आतां ।। ६८ ।। मायामोहें मज वेष्टिलें ।। देवें बोधितांही नोळखिलें ।। मी तुज दूषण लाविलें ।। आतां शरण आलों तारीं देवा ।। ६९ ।। तूंचि देवा धर्ममूर्ती ।। पाप पुण्य तुझे हातीं ।। सूत्रधारी नाचविशी ज्या रीती ।। जीव नाचती त्यापरी ।। ७० ।। उद्धरिल्या मज ऐसा पतित ।। तैं वाढे तुझी महिमा अद्भुत ।। नातरी बिरुद तव व्यक्त ।। होईल कैसेपरी सांग ।। ७१ ।। द्विज प्रार्थितां यापरी ।। स्वामी उठवोनि सत्वरी ।। जवळी बैसवोनि कृपालहरी ।। द्विजावरी प्रेरी तेव्हां ।। ७२ ।। पुसे त्याचा कुशल वृत्तांत ।। तन्मुखें ऐकोनि तदीय हित ।। साधावया स्वामी सुमंदहसित ।। वचन वदता झाला जाणा ।। ७३ ।। दैन्यासारिखा तापदायक ।। प्रपंचीं दुजा नसे पावक ।। काय करूं मीही दीननायका ।। उपाय न चले माझाही ।। ७४ ।। कैसें निवारावें तुझें दारिद्य ।। ऐसें चिंती माझें हृदय ।। मनोरथापरी कराया अशक्य ।। दारिद्यामुळें जाणपां ।। ७५ ।। दरिद्यांचे मनोरथ ।। उठतां सर्वेचि लया पावत ।। उपाय सांगतों जाईं तेथ ।। स्थान दावितों दैन्यहारक ।। ७६ ।। स्नान करोनि जेवीं त्वरित ।। आंज राहीं येथें निश्चित ।। उद्यां जाईं श्रीरंगाप्रत ।। वसतों तेथें दानशौंड[1] ।। ७७ ।। तया असे पूर्णय्या नाम ।। तो पुरवील तुझा काम ।। पांच हजार रुपये निष्काम ।। देईल तुज निश्चयें ।। ७८ ।। याउपरि तुवां कांहीं ।। चित्तीं शंका न घेतां पाहीं ।। आज सुखें येथे राहीं ।। उद्यां सुमुहूर्तीं गमन करीं ।। ७९ ।। चिदंबराज्ञा मानुनी प्रमाण ।। दुसरे दिवशीं तो ब्राम्हण ।। प्रस्थान करितां शुभ शकुन ।। होऊं लागले परियेसा ।। ८० ।। द्विज जात असतां मार्गांत ।। भेटला त्याचा एक आप्त ।। म्हणे धुंडित आलों तुम्हांप्रत ।। चला त्वरित नगरासी ।। ८१ ।। तुवां पांच सहस्त्र जाण ।। रुपये दिले पाठवून ।। कर्ज सर्वही फेड करून ।। केला आहे लग्ननिश्चय ।। ८२ ।। आप्तवाणी ऐकतांचि हर्षला।। म्यां कधीं पाठविलें द्रव्याला ।। ही असेल चिदंबरलीला ।। अनुग्रह केला गुप्तरुपें ।। ८३ ।। अगाध दिसे दीक्षितकरणी ।। बोलण्यांत

1. दानशूर

शिवचिदम्बर

येते प्राकृत वाणी ।। मी गरीब अनाथ म्हणोनी ।। बोलुनी धाडिलें मजलागीं ।। ८४ ।। द्रौपदी प्रार्थितां सभेसी ।। गुप्तपणें धाडिसी वस्त्रराशी ।। तैसें मजवरी आजी परियेसी ।। कृपा केली गुरुरायें ।। ८५ ।। विठ्ठलावरी रुष्ट झालों ।। तुजही बहुविधा बोलिलों ।। साशंकचि जवळी आलों ।। तरीही झालों कृपापात्र ।। ८६ ।। अनाथनाथे गुरुमाउली ।। मजवरी करीं कृपेची साउली ।। याउपरी पदकमळीं ।। शुद्धसोज्वळी देईं भक्ती ।। ८७ ।। असो आपण जावें स्वदेशासी ।। स्वामीची आज्ञा असे मजसी ।। जाउनी येतों श्रीरंगासी ।। लग्न कार्यासी आरंभावें ।। ८८ ।। ऐसें सांगुनी आप्तासी ।। पाठविला स्वदेशासी ।। नारायण आला श्रीरंगासी ।। ध्यात मानसीं गुरुपाय ।। ८९ ।। इकडे पूर्णय्याचे स्वप्नीं ।। चिदंबर सांगतसे येउनी ।। माझें वचन ऐक चित्त देउनी ।। तुजलागुनी सांगतों हित ।। ९० ।। तुज येणार एक संकट ।। तो समय आलासे निकट ।। तें दूर व्हावया अरिष्ट ।। असे वाट एक ऐकें ।। ९१ ।। तुंगातीरीचा ब्राम्हण ।। नाम त्याचें नारायण ।। सांगत माझें वचन नामाभिधान ।। येतो जाण तुझे भेटीसी ।। ९२ ।। उदयीक प्रातःकाळीं ।। प्रहरा येतां किरणमाळी[1] ।। येता पूर्व वेशीजवळीं ।। जाईं चालत सामोरा ।। ९३ ।। सन्मानें घरा नेवोन ।। आदरें करोनि पूजन ।। पंच पक्वान्नयुक्त करवीं भोजन ।। रुपये देईं पंच सहस्त्र ।। ९४ ।। मग तयासी बोळवून ।। पोहोंचवीं सद्रव्य जाण ।। तेणें तुज न बाधे विघ्न ।। संकटवारा न लगे कांहीं ।। ९५ ।। यांत होईल जरी अंतर ।। पुढें कल्याण नोहे निर्धार ।। ऐसें सांगुनी चिदंबर ।। पावला सत्वर अंतर्धान ।। ९६ ।। प्रहर दिवस आल्यावरी ।। ब्राम्हण आला वेशीद्वारीं ।। मंत्री पावोनि हर्ष अंतरीं ।। परोपरी पूजितसे ।। ९७ ।। आदरें नेउनी घरासी ।। भोजन घालुनी पंच पक्वान्नेसी ।। पंच सहस्त्र रुपये त्यासी ।। दक्षिणा देता झाला ।। ९८ ।। स्वार शिपाई सांग देउनी ।। पाठविला आनंदेंकरोनी ।। नारायणही निरोप घेउनी ।। हर्षें आला गुरुपाशीं ।। ९९ ।। दुरूनि पाहतां गुरुसीं ।। लोटांगण घालित प्रेमेंसी ।। निघाला विसरोनि

शिवचिदम्बर

१. सूर्य

देहासी ।। ओळखिलें म्हणे स्वरुप तुझें ।। १०० ।। अगाध असे तुझी महिमा ।। जाणावया अशक्त ब्रम्हा ।। मग कोणाची देऊं उपमा ।। सर्वोत्तमा चिदंबरा ।। १ ।। सर्व देवांचा देवेंद्र ।। तूंचि होशी कृपासागर ।। जे तुज भजती तयां सत्वर ।। आनंद देशी दयाघना ।। २ ।। एक मागतां अनंत फळ ।। द्यावया शक्त तूंचि सबळ ।। शक्र हरी कंठनीळ[1] ।। तुझे पदकमळ सेविती ।। ३ ।। येणेंपरी तो ब्राम्हण ।। स्तोत्र करित असतां निक्षून ।। चिदंबरस्वामी उठवून ।। करी सांत्वन नानापरी ।। ४ ।। तुझें दैव होतें सुरस ।। तेणें द्रव्य मिळालें बहुवस ।। कोणासी न सांगें वृत्तास ।। सुखें प्रपंच करी आतां ।। ५ ।। येणेंपरी ब्राम्हणासी ।। सांगुनी पाठविला गृहासी ।। तोही जाउनी स्वदेशासी ।। चिदंबरयश प्रसार करी ।। ६ ।। श्रीचिदंबरानुग्रह ।। असे यापरी सुरम्य ।। ज्यासी पाहिजे इहपर सौख्य ।। तेणें भजावा श्रीगुरु ।। ७ ।। चिदंबरा ऐसा सुखदायक ।। धुंडितां त्रिभुवनीं न मिळे देख ।। यास्तव भजा जनहो भाविक ।। म्हणे चिदंबरकिंकर ।। ८ ।। स्वस्ति श्रीचिदंबरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्‌गुरुनाथ ।। यास्तव ऐका श्रोते समस्त ।। षड्विंशोऽध्याय गोड हा ।। १०९ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे दैन्यहरणार्थे श्रीमच्चिदम्बरं प्रतिगमनाय पाण्डुरङ्गेण स्वभक्ताय स्वप्ने कथनं नाम षड्विंशोऽध्यायः ।। २६ ।। ओवीसंख्या १०९ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

[1] शंकर




शिव चिदम्बर

# व्याघ्राच्छिशुसंरक्षणम्




माते मजवरी विश्वास ठेवोन । जावोनि बाळक माग व्याघ्रास : व्याघ्रापुढें हस्त पसरोनि । निर्भय मनीं मागे ती

चिदम्बरचरित्र — अध्याय सत्ताविसावा

शि व चि द म्ब र

॥ श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ॥ ॐ नमोजी आनंदसागरा ॥ शुद्धबोधा चिदंबरा ॥ सदां वसोनि हृदयमंदिरा ॥ कामव्याधी निवारीं बा ॥ १ ॥ शुद्धबोधप्रकाशें ॥ साक्षित्वें हृदयीं जो विलसे ॥ तेथें वसतां माया नासे ॥ जीव समरसे तुजमाजी ॥ २ ॥ ऐसिया तुझें विस्मरण ॥ तेंचि जाणावें मूळ अज्ञान ॥ तेथें जें तुझें प्रतिबिंब पूर्ण ॥ तेंचि जीवत्वें नाचत ॥ ३ ॥ तुझिया सत्तायोगें अज्ञान ॥ जातसे त्वरित नासून ॥ अंतःकरणादि इंद्रियगण ॥ खेळती सचेतनापरी ॥ ४ ॥ जन्ममरणासी कारण ॥ वासना संकल्प मुख्य जाण ॥ मज अशक्य त्यांचें निवारण ॥ तूंचि गुरुराणा निवारीं ॥ ५ ॥ निर्विकल्पस्थिती देईं मज ॥ याउपरी तुझी भक्ती सहज ॥ सत्संगीं नित्य मिळावी मौज ॥ इतुकें दे मज देवराया ॥ ६ ॥ हृदयमंदिरीं जो राहुनी ॥ आपुलें सदा साक्षित्व राखोनी ॥ इंद्रियगणां विषय भोगवुनी ॥ जो अलिप्त नमूं त्यासी ॥ ७ ॥ म्हणे मुनीश्वर श्रोत्यांसी ॥ घोर संसार तरावयासी ॥ ज्याचें नाम नौका परियेसी ॥ तच्चरित्र सांगतों ऐका ॥ ८ ॥ एके समयीं माघमासीं ॥ आली शिवरात्री चतुर्दशी ॥ स्वामी गेले सुगोल[1] क्षेत्रासी ॥ यात्राजनांसी सवें घेउनी ॥ ९ ॥ रुद्रसूक्तें महाभिषेक ॥ करावया लाविले द्विज बहुतेक ॥ रात्रीं जागरूक ॥ बैसला असे परियेसा ॥ १० ॥ स्तोत्रपाठ करिती कितीएक ॥ ध्याती नाचती प्रीतिपूर्वक ॥ कित्येक पारायण करिती ॥ ११ ॥ कित्येक नाम उच्चारिती ॥ कित्येक गाती नामें गर्जती ॥ सप्रेमें भजन करिती ॥ बिल्वाक्षता वाहती कित्येक ॥ १२ ॥ वाटे शैवमहोत्सव पाहतां ॥ कैलासचि आला भूवरता ॥ कीं रमाकांत पूजेसि तत्त्वता ॥ स्वगणांसवें आले असती ॥ १३ ॥ असे बहुत लोक वृक्षातळीं ॥ निद्रिस्त झाले आनंदमेळीं ॥ ब्राम्हमुहूर्त आलिया सकळी ॥ उठिले तीर्थजळीं स्नानार्थ ॥ १४ ॥ तेथें एक होती सुवासिनी ॥ पतिव्रता स्नानार्थ उठोनी ॥ जंव निघे त्या क्षणीं ॥ तिचा बाळ रडूं लागे ॥ १५ ॥ कडिये बाळ घेउनी आली ॥ श्वशुराचिया निद्रास्थळीं ॥ तंव अंधारीं श्वशुरशय्येजवळीं ॥ व्याघ्र एक बैसलासे ॥ १६ ॥

१. मुरगोडजवळील क्षेत्र (सोगल)

शि व चि द म्ब र

निद्रालस्यें अंधकारीं ।। श्वशुरासी नोळखतां नारी ।। बाळा देवोनि व्याघ्रकरीं ।। माघारी परतली स्नानार्थ ।। १७ ।। मी स्नान करोनि जोवरी ।। येईन बाळ राखा तोवरी ।। ऐसें सांगुनी निर्भय अंतरीं ।। स्नानार्थ गेली सुखें ऐका ।। १८ ।। स्नाना करोनिया जळीं ।। पूजा नमस्कार मन निर्मळीं ।। करोनि चिदंबराजवळीं ।। आली तेधवां दर्शनार्थ ।। १९ ।। इतुक्यांत झाला सूर्योदय ।। व्याघ्र प्रेमें तिचा तनय ।। खेळवितसे निर्भय ।। पाहतां आश्चर्य जनां वाटे ।। २० ।। जिकडे तिकडे आकांत झाला ।। व्याघ्र खेळवितसे बाळाला ।। ऐसें ऐकोनि ती अबला ।। किंचितही चिंता न करी ।। २१ ।। निज नेम आटपोनि सर्वही ।। वंदूनिया स्वामीपायीं ।। आली श्वशुराजवळी पाहीं ।। श्वशुर न दिसे शय्येवरी ।। २२ ।। व्याघ्र बैसलासे भयानक ।। त्याचे हातीं दिसे बाळक ।। हालवित आणि चुंबित देख ।। संबोखितसे नानापरी ।। २३ ।। नारी भिवोनि अंतःकरणीं ।। मूर्च्छना येवोनि पडली धरणी ।। व्याघ्रें घेतलें बाळ म्हणोनी ।। हृदय पिटोनी रडतसे ।। २४ ।। तंव येऊनि शुद्धीवर ।। पळत निघाली सत्वर ।। जेथें वसे श्रीचिदंबर ।। तेथें ती नारी पातली ।। २५ ।। श्रीगुरूपुढें साष्टांग नमोनी ।। अर्धाक्षरें बोले आक्रंदोनी ।। स्वामिराया व्याघ्र येवोनी ।। माझें बाळ धरियलें ।। २६ ।। तुझिया भेटीसि आलें दुरूनी ।। काय झाली देवकरणी ।। बाळ गेलें मज सोडोनी ।। केवीं सदना जाऊं आतां ।। २७ ।। रक्षीं रक्षीं गा कृपानिधी ।। बाळ माझें वांचवीं आधीं ।। ऐसी करुणा भाकित पदीं ।। साष्टांगें वंदी ती नारी ।। २८ ।। तीस पाहोनि कृपासागर ।। म्हणे उठी उठीं सत्वर ।। अंबे सोडोनि शोक दुर्धर ।। सविस्तर वृत्तांत मज निवेदीं ।। २९ ।। करूं दुःखाचा प्रतिकार ।। ऊठ माते धरीं धीर ।। कां झालीस शोकातुर ।। सांग सत्वर मजलागीं ।। ३० ।। मग धीर धरोनि सुंदरी ।। बोलली तेव्हां मधुरोत्तरीं ।। माझा कुमार व्याघ्रें श्रीहरी ।। धरिलासे सोडवीं बा ।। ३१ ।। श्रीगुरु म्हणे नारीसी ।। माते ऐसें अमंगल वाक्यासी ।। न बोले येथें परियेसी ।। जैसें दिल्हेंसी माग तैसें ।। ३२ ।। स्वामी श्वशुराहातीं ।। बाळ देवोनि स्नानाप्रती ।। गेलें मग व्याघ्रें त्यावरती ।।




शिव चिदम्बर

बाळ निश्चिती धरियेलें ।। ३३ ।। ऐसें बोलूं नये माते ।। जागत असतां सोमनाथें ।। बाळ धरावया व्याघ्रातें ।। शक्ती न येई परियेसा ।। ३४ ।। यास्तव तूं जाय वेगीं ।। दिधला तैसा बाळ मागीं ।। देईल तो पुत्र तुजलागीं ।। शोक त्यजीं जाईं सत्वर ।। ३५ ।। जो मनुष्या संहारक ।। तो कैसें सोडी माझें बाळक ।। संकट निवारक बा तूं एक ।। मम बाळक सोडवीं पै ।। ३६ ।। माते मजवरी विश्वास ।। ठेवोनि सोडीं संशयास ।। शीघ्र जावोनि माग व्याघ्रास ।। तुझा बाळ देईल सत्य ।। ३७ ।। जरी असे तो नराहारी ।। सोमेशाचा धाक तया अंतरीं ।। तो बाळ घालील तुझे पदरीं ।। निर्धार करून जाय वेगें ।। ३८ ।। मग तथास्तु म्हणोनी ।। गेली श्रीगुरूसी वंदुनी ।। व्याघ्रापुढें हस्त पसरोनी ।। निर्भय मनीं मागे बाळक ।। ३९ ।। मामाजी पुत्र मजसी ।। देई दुग्ध देतें बुभुक्षितासी ।। ऐसें ऐकुनी मागणें तिसीं ।। व्याघ्रें बाळासी दीधलें ।। ४०।। निज सुतासी घेउनी अंगना ।। आली श्रीगुरूचे दर्शना।। वंदोनि सद्‌गुरुचरणां ।। पुत्रलाभें बहु तुष्टली ।। ४१ ।। स्तोत्र करितसे अपार ।। जयजयाजी करुणाकर ।। अगाध असे तुझें चरित्र ।। सद्‌गुरुनाथा तुज नमो ।। ४२ ।। तूंचि होशी कैलासराणा ।। सत्य तूं कात्यायनीरमणा ।। मी जाणिलें करुणाघना ।। देवराणा दृष्टचरित्रें ।। ४३ ।। नातरी व्याघ्र नराहारी ।। आज्ञापाळण कैसें करी ।। यास्तव मज जगदुद्धारी ।। संसारसागरीं पार करीं ।। ४४ ।। यापरी स्तोत्र करितां सत्वरी ।। दोनी डोळां भरलें वारी ।। प्रेमभक्तीनें गुरुचरणावरी ।। वंदोनी नमस्कारी साष्टांगें ।। ४५ ।। तंव नारीसी करुणाकर ।। उठवोनि शिरीं ठेवी अभयकर ।। देउनी तिजला वर अपार ।। निरोप दीधला अवधारा ।। ४६ ।। श्रीगुरुचें अगाध चरित्र ।। पाहोनि सर्व नारीनर ।। दुःखरूप संसारसागर ।। सांडोनि भजनीं विनटले ।। ४७ ।। मग चिदम्बर सर्वांसीं ।। मिष्टान्नें जेववुनी बहुवसी ।। निरोप देउनी स्वस्थळासी ।। पाठविता झाला तेधवां ।। ४८ ।। मग स्वपरिवार घेवोनि ।। निज सदनासी त्या दिनीं ।। पातला श्रीदीक्षितमणी ।। सर्वजन स्तवित असतां ।। ४९ ।। ज्यासी वंदोनि हरिहर ।। कृतकृत्य झाले विधिगुख सुरवर ।। स्मरोनि तो श्रीचिदम्बर ।। कथा सुखकर सांगतों ।। ५० ।। श्रीगुरूचें

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

अगाध चरित्र ।। नेणंती स्कंदादि कवीश्वर ।। मंदमती नर पामर ।। कैसे वर्णितील पै ।। ५१ ।। श्रीचिदम्बरचरित्र ।। हेंचि होय जान्हवीनीर[१] ।। पोटी पडतां त्याचे बिंदुमात्र ।। पाप दूर होय तत्क्षणीं ।। ५२ ।। यास्तव यथामती किंचित ।। पवित्र जें गंगाबिंदुवत ।। सांगतों श्रीचरित संक्षिप्त ।। स्वदुरित नाश व्हावया ।। ५३ ।। आकाशीं नक्षत्र गणणें ।। वाळुवंटीं माप घेणें ।। बहुकाळीं साधे यत्नें ।। तरी गुरुचरित्र न वर्णवे ।। ५४ ।। नियुतावरती[२] यात्रालोक ।। श्रीगुरुसवें असती देख ।। यदुनायकासवें यादवकटक[३] ।। पूर्व युगीं जेंविं शोभे ।। ५५ ।। कीं हरीसमवेत दाशरथी ।। मां देवांसी घेउनीं शचीपती ।। नातरी स्वगणांसवें उमापती ।। भूवरती आलासे कीं ।। ५६ ।। यात्रिकांसवें कृपावंत ।। त्यापरी शोभे तो भगवंत ।। सर्वांसवें मृदुवचन बोलत ।। आलिया पुसे क्षेमवार्ता ।। ५७ ।। एके दिवशीं दोघे शूद्र ।। स्वामिदर्शनार्थ सहोदर ।। मार्गी येतां व्याघ्र थोर ।। एकासी धरिता झाला ।। ५८ ।। दुजा शूद्र बंधूसी पाहून ।। म्हणे भयातुर होऊन ।। बंधूसी जरी भक्षिसी जाण ।। तुला आण चिदम्बराची ।। ५९ ।। चिदम्बराची शपथ ऐकुनी ।। व्याघ्रें सोडिला शूद्र झणीं ।। बंधूचे गळां वस्त्र बांधोनी ।। आला सत्वर स्वामीजवळीं ।। ६० ।। दोघे बंधू येतां चिदम्बर ।। यात्रादाटी करोनि दूर ।। त्या दोघांसीं बोलावोनि समोर ।। मधुरोत्तरें बोलत ।। ६१ ।। या युगीं असती जन दुर्वृत्त ।। शपथभयें व्याघ्र काष्टवत ।। झालासे त्याचा करितां घात ।। दोष मजप्रत घडेल कीं ।। ६२ ।। यास्तव शीघ्र व्याघ्राजवळीं ।। जाऊनी करी शपथ मोकळी ।। हें ऐकुनि शूद्र पदकमळीं ।। वंदुनी ते वेळी निघाला ।। ६३ ।। ऐकोनियां गुरुवचन ।। चमत्कार पहावया सर्व जन ।। शूद्रासवें निघती जाण ।। व्याघ्र असे ज्या स्थळीं ।। ६४ ।। दुरूनि पाहतां व्याघ्र दिसे ।। तोंड पसरोनि मार्गे पाह्यतसे ।। निश्चल स्थाणूपरी[४] राहिलासे ।। चिदम्बरभयें करोनी ।। ६५ ।। शूद्र उभा राहोनि दूर ।। म्हणे ऐक पंचानना[५] सत्वर ।। गुरुकृपा असे तुजवर ।। भाग्य थोर दिसे तुझें ।। ६६ ।। याउपरी सुटली गुरुशपथ ।। चाल वनीं राहें

शि
व
चि
द
म्ब
र

१. गंगाजल २. एक लाखावर ३. यादवसैन्य ४. खुंटाप्रमाणे ५. वाघा.

स्वस्थ ।। व्याघ्र ऐकुनी ही मात ।। उडी ठोकी वनामाजी ।। ६७ ।। महदाश्चार्य पाहोनि यात्राजन ।। आनंदडोहीं बुडोन ।। चिदम्बराचें स्तवन ।। करिती नानापरी देखा ।। ६८ ।। साधु साधु आमुचें भाग्य ।। थोर होतें झालों धन्य ।। प्रत्यक्ष शिवदर्शनें मान्य ।। होऊं आम्ही लोकत्रयीं ।। ६९ ।। ऐसें जन बोलत असतां ।। शूद्रासी बोलावुनी समीपता ।। वर देऊनी त्याचे ईप्सिता[1] ।। पाठविता झाला श्रीगुरू ।। ७० ।। ज्यासी असे इहपर चाड ।। तेणें संपादावी गुरूची जोड ।। तरीच संसार होय गोड ।। सांगें पवाडा चिदम्बरकिंकर ।। ७१ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्‌गुरुनाथ ।। म्हणोनि ऐका श्रोते समस्त ।। सप्तविंशोऽध्याय गोड हा ।। ७२ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे व्याघ्राच्छिशुसंरक्षणं शूद्ररक्षणं च नाम सप्तविंशोऽध्यायः ।। २७ ।। ओवीसंख्या ७२ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

१. इच्छित २. किर्ती




शिव चिदम्बर

# हरिदासमदभञ्जनम्




तिम्मण्णा श्रीगुरुनाम गर्जोनि । कीर्तन आरंभितसे तत्क्षणीं । तटस्थ जाहले सर्व मनीं । बैसले फिरोनि सभाजन ॥

॥ श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ॥ ॐ नमो जी सिध्दमंत्रा ॥ स्मरणेंचि करिसी विघ्नसंहारा ॥ अनुष्ठाने दाविसी ब्रम्हसाक्षात्कारा ॥ सद्‌गुरुवरा तुज नमों ॥ १ ॥ तुझेचि ठायीं सृष्टी दिसे ती ॥ जळीं जळचर वसती ज्या रीती ॥ अद्वितीय तूं सृष्टी सभोंवतीं ॥ वससी गुरुमूर्ती तुज नमो ॥ २ ॥ मुनीश्वर म्हणे द्या अवधान ॥ तुम्ही भाविक श्रोतेजन ॥ तुमची भक्ती पाहून ॥ वदवील सुरस निजकथा ॥ ३ ॥ जाउनी चिदंबरानिकटीं ॥ कवणाचीही मनोरथ तुटी ॥ जाहली ऐसें श्रवणपुटीं ॥ नायकों गोष्टी न पाहोंची ॥ ४ ॥ ज्या **दैवतीं ज्याची भक्ती** ॥ तेंच रूप धरोनि उमापती ॥ भेट देई भक्तांप्रती ॥ स्वाराध्यदेवमति करोनिया ॥ ५ ॥ मूढाचा मतिभेद करितां ॥ इहपराची हानी होय तत्त्वतां ॥ यास्तव ज्ञानीजन सर्वथा ॥ चित्त ओळखोनी वर्तती ॥ ६ ॥ एके दिवशीं सावित्रीकांत ॥ सहस्त्र यात्रासमवेत ॥ विनोदें आनंदभरित ॥ तडस्नूर ग्रामाप्रत निघाला ॥ ७ ॥ ग्रामांत उतरले यात्राजन ॥ मध्यान्हीं तृषाक्रांत होऊन ॥ जलासाठीं केले यत्न ॥ परी जल न मिळेची ॥ ८ ॥ कोसाहुनी दूर अंतर ॥ उदक आणिती ग्रामजन अपार ॥ श्रम हरावया यात्रिकांचा सत्वर ॥ चिदंबर चित्तीं कृपा उपजे ॥ ९ ॥ स्वामी माध्यान्हीं ग्रीष्मकाळीं ॥ गांवाबाहेर निघाले ते वेळीं ॥ नैऋत्य दिशीं निर्जल स्थळीं ॥ वृक्षातळीं बैसले ॥ १० ॥ निम्नोन्नत विरहित ॥ भूमी पाहोनि श्रीगुरुनाथ ॥ जल उत्पन्न करावया तेथ ॥ उद्युक्त जाहला परियेसा ॥ ११ ॥ तंव तेथें आला एक शूद्र ॥ पाहोनि स्वामीचा यत्न परिकर ॥ पुसे काय करितो द्विजवर ॥ यत्न थोर दिसे तुझा ॥ १२ ॥ शूद्रासि सांगे कृपावंत ॥ तृषेनें झालों फार पीडित ॥ यास्तव करितों जलगर्त[1] ॥ ऐकुनी हांसतसे शूद्र ॥ १३ ॥ अगा हे द्विजोत्तम ॥ पडलासे का तुज भ्रम ॥ येथें काय असे जलोगम ॥ वृथा परिश्रम तूं कां घेशी ॥ १४ ॥ विचारूनि कार्यें करावें ॥ जलोत्पत्तीस्तव भूमि परीक्षावी ॥ प्रतीती घेवोनि वस्तु मिळवावी ॥ तरीच पावे सुख आपणा ॥ १५ ॥ निर्जल स्थळीं उदका यत्न ॥ अथवा वृषभाचें दोहन ॥

1. पाण्यासाठी खड्डा.

पर्वतीं बीज पेरिती जाण ।। वृथा यत्न होय साचा ।। १६ ।। मूढासीं विद्या सांगणें ।। अंधासी दर्पण दावणें ।। बधिरासवें एकांत बोलणें ।। वृथा श्रम घेणें या नांव ।। १७ ।। भूमि धुवोनि मृत्तिका काढणें ।। वनीं बैसोनि रुदन करणें ।। प्रेतासी श्रृंगार करणें ।। वृथा श्रम घेणें या नांव ।। १८ ।। सूर्यापुढें दीप नेणें ।। दुर्दैवी नरा धनिक करणें ।। सागरीं वाहोनि वारि अर्पणें ।। त्यापरी यत्न दिसे तुझा ।। १९ ।। मांगाचें चित्त शुद्ध करणें ।। श्वानपुच्छ[1] सरळ करण्या झटणें ।। त्यापरी येथें गर्त करणें ।। ऐसें मजला वाटतें ।। २० ।। चिदंबर बोले शूद्रासी ।। तृषा लागली मज बहुवसी ।। असे जरी समर्थ कैलासवासी ।। येथेंचि मजसी मिळेल जल ।। २१ ।। इतुक्यांत निघाला भूमींतून ।। जलप्रवाह गजशुंडेप्रमाण[2] ।। हें पाहतां दंडवत घालोन ।। आश्चर्यें भिवोन बोले शूद्र ।। २२ ।। तूंचि होशी कैलासनाथ ।। अशक्य शक्य करण्या समर्थ ।। मी असें मूढ अनाथ ।। माझा बोल चित्तीं नाणीं ।। २३ ।। तूं जरी कृपा करिशी ।। तृण पावे पर्वतसाम्यतेसीं ।। रंक चढे राज्यपदासी ।। अघटित परियेसी करणी तुझी ।। २४ ।। एवमादि नानापरी ।। स्तोत्र करी शूद्र भारी ।। विनवितसे अपरंपारी ।। म्हणे तारिं तारिं मज अनाथा ।। २५ ।। तंव चिदंबर करुणासागर ।। शूद्रा दीधला अभयकर ।। सांत्वन करूनि अपार ।। पाठविला निज गृहा ।। २६ ।। इतुक्यांत यात्राजनीं ।। निघतां झाला कलकल ध्वनी ।। जलप्रवाह आला कोठोनी ।। निर्जल अवनीं एकाएकी ।। २७ ।। यात्रिकवचन कृपामूर्ती ।। ऐकुनी हांसत बोलती ।। शंकरकृपा असे तुम्हांवरती ।। म्हणोनि भागीरथी धाडिली ।। २८ ।। तृषेंकरूनि पीडितांसी ।। तृप्ती करावया तुम्हांसी ।। आली जान्हवी भूमीसी ।। सोडा संशयासी यावेळीं ।। २९ ।। एक वेळ या गंगाजळीं ।। स्नान करितां मन निर्मळीं ।। पापाची होय रांगोळी ।। प्रयागासम फळ मिळे येथें ।। ३० ।। येणेंपरी श्रीस्वामीवचन ।। ऐकोनि सर्व यात्राजन ।। भक्तीनें स्नानदानादि करून ।। आले श्रीगुरुसवें ग्रामासी ।। ३१ ।। अद्यापि जाती भाविक जन ।। पर्व पाहोनि करावया स्नान ।। गुरुहस्तजात

१. कुत्र्याचें शेपूट. २. हत्तीच्या सोंडेप्रमाणें.




शिव चिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

तीर्थ वर्णन ।। करावया कोण समर्थ ।। ३२ ।। यापरी नित्य नूतन ।। होतसे गुरूचें महिमान ।। श्रवणमात्रें सुखसाधन ।। सर्वांसी मिळे श्रीगुरुकृपें ।। ३३ ।। ऐसें चिदंबरचरित्र ।। भक्तिभावें जो पठे नर ।। त्याच्या कोटि कुलांचा उद्धार ।। चिदंबरकृपें होतसे ।। ३४ ।। क्षणामाजी ब्रम्हांडरचना ।। करावया जो समर्थ जाणा ।। त्याचें चरित्र कवणा ।। वर्णावया शक्य असे ।। ३५ ।। सर्व भूतांचा चालक ।। जो वसे साक्षित्वें हृदयीं देख ।। तोचि कर्ता वक्ता लेखक ।। निमित्तमात्र मी ऐकां ।। ३६ ।। भारतयुद्धीं श्रीकृष्ण ।। जैसें सर्व करोनि आपण ।। निमित्तमात्र केला अर्जुन ।। यशोभागीं करोनि ठेविला ।। ३७ ।। नातरी उत्तरगोग्रहणीं ।। अर्जुनची जय संपादोनी ।। उत्तराचें नाम जनीं ।। वाढविलें ज्यापरी ।। ३८ ।। नातरी अमृतमथनीं ।। सुरकीर्ति वाढवोनी ।। स्वयें भार चक्रपाणी ।। साहोनि कार्य साधिलें ।। ३९ ।। त्याचपरी चिदंबर ।। मज करोनि निमित्तमात्र ।। आपण वदोनि स्वचरित्र ।। पाठकां पवित्र करीतसे ।। ४० ।। असंख्यात महच्चित्र[१] ।। तव चरित्र महासागर ।। नेणतां यांत पडलों मी पामर ।। यांतुनी मला पार करीं ।। ४१ ।। तुझें नामस्मरण नाव ।। त्यावरी बैसवोनि महादेव ।। मज पार करीं देवदेव ।। इतुका माझा हेतु पुरवीं ।। ४२ ।। असंख्य यात्रा परिवारीं ।। वर्तत असतां भक्तकैवारी ।। अन्नपूर्णा दिवा रात्रीं ।। हात जोडोनि द्वारीं राहे ।। ४३ ।। सेविती अष्टौ महासिद्धी ।। मानुनीं गुर्वाज्ञा त्रिशुद्धी ।। इंद्रादि देव हरि विधी[२] ।। राहिले पदीं चित्त ठेवोनी ।। ४४ ।। सिध्दऋषि गण गंधर्व ।। नागकन्या देव योगिनी सर्व ।। भावें सेवा करिती अपूर्व ।। प्रत्यहीं अपार गुप्तरूपें ।। ४५ ।। चिदम्बरकृपापात्रभूत ।। पाहती त्या देवांसि भक्त ।। कामधेनू कल्पभूजात[३] ।। तेही सेविती चिदम्बरासी ।। ४६ ।। चिदम्बरकृपा असे अद्‌भुत ।। लाधतां मनुज होय कृतकृत्य ।। अवधान द्या एतदर्थ ।। सांगतों कथा श्रवण करा ।। ४७ ।। एके दिवशीं अति गर्विष्ठ ।। आला हरिदास एक धीट ।। वाचाळ जनरंजनी सुभट ।। त्याचें यश जगीं प्रसिद्ध ।। ४८ ।। गुरुपुरीं मंडलेश्वर

शि
व
चि
द
म्ब
र

१. आश्चर्यानें भरलेलें. २. ब्रम्हदेव. ३. कल्पवृक्ष.

।। वसत होते श्रीकृपापात्र ।। हरिदासाचें कीर्तन सुंदर ।। ऐकुनी श्रवणातुर जाहले ।। ४९ ।। सर्व एकत्रही मिळोनी ।। हरिदासा सांगती बोलावोनी ।। आधीं श्रीस्वामीसन्निधानीं ।। कीर्तन करुनी यावें पैं ।। ५० ।। मग आमुच्या सभेचे ठायीं ।। आपुलें कीर्तन करवूं आम्ही ।। हें ऐकुनी हरिदास पाहीं ।। सांगें सर्वांही निजनेम ।। ५१ ।। जो देईल रुपये शंभर ।। त्याचे गृही कीर्तन एकवार ।। हा गरीब असे चिदम्बर ।। तो का देईल इतुकें द्रव्य ।। ५२ ।। आम्हां द्रव्यासीं असे कारण ।। यावें चिदम्बरासी विचारून ।। आमुचें निरुपम निरुपण ।। वृथा कदापि न जाय ।। ५३ ।। मग आपण-रुपये देउनी ।। स्वामीसी बहुधा विनवोनी ।। कीर्तन आरंभविलें कित्येक जनीं ।। स्वामीनें ओळखिला गर्व त्याचा ।। ५४ ।। त्याचा हरावया गर्व ।। मनन करिती दीक्षितराव ।। गोसावियाचें कीर्तन अपूर्व ।। ऐकत असतां सर्वही ।। ५५ ।। होता महासंद एक ।। तिम्मनामा श्रीगुरुसेवक ।। त्यासी बोलावी जगन्नायक ।। दीर्घ स्वरें त्यावेळीं ।। ५६ ।। श्रीगुरुशब्द पडतां कानीं ।। तिम्म आला जवळीं धावोनी ।। उभा राहिला कर जोडोनी ।। काय आज्ञा म्हणोनि पुसे ।। ५७ ।। दीक्षित म्हणे बा परियेसी ।। तुवां आरंभावें कीर्तनासी ।। तुझें कीर्तन ऐकावयासीं ।। मी बहुवसी आर्त झालों ।। ५८ ।। मग वंदूनी म्हणतसे दास ।। मी मूर्ख म्हणोनि सर्वांस ।। प्रख्यात असे हे जगदीश ।। नेणें विशेष बोलावया ।। ५९ ।। कुरूपी मी गालफाटा ।। करिसी काय बा माझी थट्टा ।। आपुला शब्द होऊं नये खोटा ।। मी असें वेडा निरक्षर ।। ६० ।। सेवकांचें वचन परिसोनी ।। कृपा उपजली स्वामीचे मनीं ।। प्रेमें जवळीं बैसवोनी ।। भस्म वदनीं घालत ।। ६१ ।। तत्काळ झाला ज्ञानप्रकाश ।। गद्यपद्य यमक श्लोक ।। रचूं लागला कवित्व विशेष ।। छत्तीस राग गातसे ।। ६२ ।। आरोहण अवरोहण मूर्च्छन ।। सप्त स्वरें राग रागिणी गान ।। गाउनी आरंभी श्रीगुरुस्तवन ।। ताळ वाद्य निपुण सभारंगीं ।। ६३ ।। श्रीगुरुनाम गर्जोनी ।। कीर्तन आरंभिलें तत्क्षणीं ।। तटस्थ झाले सर्व मनीं ।। बैसले फिरोनि सभाजन ।। ६४ ।। म्हणती तुंबर कीं गातसे ।। अथवा नारद कीर्तन करितसे ।। नातरी गंधर्वगण उल्हासें ।। येतसे स्वामी




शिव चिदम्बर

भेटीसी ।। ६५ ।। नातरी तांडवनर्तन ।। आरंभी अर्धनारीरमण[1] तेथें गातसे नारायण ।। सुस्वर उमटले त्यापरी ।। ६६ ।। यातरी सुरस कीर्तन ।। तिम्मानें आरंभितां क्षण ।। जन सर्व आश्चर्य पावोन ।। चित्त देऊन ऐकती ।। ६७ ।। श्लेष सरसालाप बव्हर्थ ।। शृंगारादि नवरसभरित ।। करूनि कीर्तन अद्‌भुत ।। श्रीगुरुनाथा तोषवी ।। ६८ ।। ज्या ज्या रंगी जो जो रस ।। तदनुरूप जन मानस ।। होतसे तेणें हास्य बाष्प हर्ष ।। पाहोनि विशेष आनंदले ।। ६९ ।। उदया येतां भास्कर ।। निस्तेज होय निशाकर ।। कीं वेदांतशास्त्र येतां हातासी ।। कोकशास्त्रासी[2] पुसे कोण ।। ७१ ।। नातरी वाढितां पक्वान्न ।। सुखें जेवील कोण कदन्न ।। अथवा मिळतां चंदनवन ।। मग हिंगण कोण पाळी ।। ७२ ।। यापरी तिम्मकीर्तनास ।। पाहुनी हतगर्वे हरिदास ।। शरण येउनी श्रीगुरूस ।। अपराधा क्षमा मागत ।। ७३ ।। त्या दिवसापासुनी जगीं ।। प्रख्यात झाला कीर्तनरंगी ।। तिम्मप्पा गोसावी विरागी ।। त्यालागीं आदरिती सर्वही ।। ७४ ।। येणेंपरी चिदम्बरचरित ।। श्रवणमात्रें कलिदोषजात[3] ।। नाश पावती क्षणांत ।। पठणमात्रें सुख लाधें ।। ७५ ।। अमृताची आरवंटी[4] ।। घातलीसे म्यां गोमटी ।। सुखेच्छुहो भरा घोटीं ।। चिदम्बरकिंकर विनवित ।। ७६ ।। स्वस्ति श्रीचिदंबरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्‌गुरुनाथ ।। म्हणोनि ऐका भाविक समस्त ।। अष्टाविंशोऽध्याय गोड हा ।। ७७ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे निर्जलप्रदेशे जलानयनं तथा हरिदासमदभञ्जनं च नाम अष्टाविंशोऽध्यायः- ।। २८ ।। ओवीसंख्या ७७ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

............................

१. अर्धनारी नटेश्वर. २. चार्वाकशास्त्रास. ३. कलिदोषसमूह. ४. पाणपोई.

# शिवेन चिदम्बरनाममहात्म्यकथनम्




हरी करित पूजा गोमटी। मध्यें शोभे देव शंभू। या वीस नामांत। मोक्षदायक शक्ती अद्भुत।
चिदम्बरनाम श्रेष्ठ यांत। उपजे प्रणव जेथूनि

अध्याय एकोणतिसावा

शि
व
चि
द
म्ब
र

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। जो दृग्दृश्यद्रष्टाविरहित[1] ।। तथापि योगियांचे हृदयांत ।। स्वप्रकाश भासतो सतत ।। त्या चिदंबरा नमूं आतां ।। १ ।। मुनी म्हणे आमुचा गुरु ।। दीननाथ करुणाकरू ।। करावया जीवकोटीचा उद्धारू ।। महेश्वरू अवतरला ।। २ ।। युगयुगीं धर्मरक्षण ।। निरपेक्षही करावया आपण ।। नररूपें अवतरोन ।। अगाध लीला दावितसे ।। ३ ।। ज्याचिया साक्षात्कारासाठीं ।। योगी याग-तपःक्रिया मोठी ।। करित घालविती जन्मकोटी ।। तरी भेटी दुर्लभ ।। ४ ।। ज्या दर्शनीं इच्छा धरूनि पोटीं ।। कित्येक घालिती लंगोटी ।। कोणी बैसोनी गिरिकपाटीं ।। करिती खटपटी नानाविध ।। ५ ।। तो हा पूर्णब्रम्ह चिदंबर ।। ब्राम्हणकुळीं घेउनी अवतार ।। नित्य नूतन अपार ।। चरित्र दावितसे परियेसा ।। ६ ।। श्रुतिशास्त्रासी अवर्णनीय ।। आत्मसत्ता दावी देवराय ।। सर्वांचा जाणुनी अभिप्राय ।। बळ देतसे तदनुरूप ।। ७ ।। जेणें जग दिसे सचेतन ।। माया भासे ज्या सत्तेंकरून ।। तें हें ब्रम्ह नररूपें अवतरोन ।। चालतसे यात्रिकांमाजी ।। ८ ।। कोणी एक नृसिंहभक्त ।। छळावया आला स्वामिमंदिरात ।। पाहे दुरूनि तंव अद्‌भुत ।। नृसिंहरूप देखतां झाला ।। ९ ।। सर्वेचि गर्वहत होउनि ।। शरण आला स्वामिचरणीं ।। ऐसी स्वामीची अगाध करणी ।। कोण वर्णी साद्यंत ।। १० ।। किती एक भाविक जन ।। पायातळींची मृत्तिका घेवोन ।। भाळीं स्वीकारितां तत्क्षण ।। होतसे कुंकुम मनोहर ।। ११ ।।अनंत अपार महिमा दावोनी ।। ब्रम्हलिपी टाकितसे धुवोनी ।। सप्रेमें निज भक्तांलागोनी ।। सांगे स्ववृत्तांत तेधवां ।। १२ ।। एके दिवशीं मज प्रार्थी विधी ।। अवतार घेईं कलीमधीं ।। धर्मस्थापना करी त्रिशुद्धी ।। तरीच सत्पदीं राहें जग ।। १३ ।। तेधवां वदलों ब्रम्हयासी ।। मी जरी अवतरेन भूमीसी ।। पुसूनी टाकीन तुझिया लिपीसी ।। तरीच मजसी करी प्रार्थना ।। १४ ।। मग बोलिला ब्रम्हा हासून ।। अवतार घ्यावा आधी आपण ।। मग स्वसत्ता प्रगटवोन ।। सन्मार्गीं बैसवा सर्व जनां ।। १५ ।। तंव स्वामी म्हणे विधी[2] ऐक ।। जगीं कर्ता भोक्ता

शि
व
चि
द
म्ब
र

..........................
१. निराकार २. ब्रम्हदेवा

मीच एक ।। दाता पाळिता संहारक ।। अद्वितीय मीच असें ।। १६ ।। लोकत्रयीं व्यापक निरपेक्षी ।। मीच असें सर्वसाक्षी ।। बहिर्दृष्टी जन काय लक्षी ।। लयाचे शेखी उर्वरिता ।। १७ ।। माझा धाक असे सर्वांसी ।। भीती धरोनी मानसीं ।। वायू चालतो सर्व दिशीं ।। धाकें प्रत्यहीं तपतो सूर्य ।। १८ ।। यमही कांपे माझ्या धाकें ।। इंद्र वर्षतो भेऊनि निकें ।। धाक मानुनी भूतपंचकें ।। पाळिताती स्वाधिकार ।। १९ ।। सिंहव्याघ्रसर्पादिक ।। माझ्या धाकें वर्तती देख ।। कल्पायुपी जरी देवनायक ।। माझा धाक मानिती ।। २० ।। नामस्मरणमात्रें जनांसी ।। उद्धरीं मी निश्चयेसी ।। माझी अगाध चरितराशी ।। नेणती देवर्षि ब्रम्हादिक ।। २१ ।। ऐका गुह्य गोष्ट सांगतो तुम्हांसी ।। जो स्मरे अहोरात्र मजसी ।। तो होय मत्स्वरूप निश्चयेसी ।। यास्तव स्मरा मज सतत ।। २२ ।। येणेंपरी भक्ता दयाळु ।। निजगुज सांगतसे कनवाळू ।। जयासी आवडे निजानंदरसाळु ।। गुरुपद भजावें तेणें ।। २३ ।। श्रीगुरूचें करितां भजन ।। अंगेंचि होय ब्रम्ह पूर्ण ।। प्रपंच होय परमार्थसंपन्न ।। सांगतों आख्यान एतदर्थ ।। २४ ।। एके दिवशीं दोघे भक्त ।। श्याम सांब नामें विरक्त ।। एकांतीं करूनि प्रणिपात ।। स्वामिप्रत पुसते झाले ।। २५ ।। श्रीगुरुराया कृपाघना ।। जगदुद्धाराया गिरिजारमणा ।। भूवरी आलासी ज्ञानपूर्णा ।। तव चरणीं प्रश्न आमुचा ।। २६ ।। स्वामिराया तुझिया भक्तांसी ।। कवण्या लोकीं मुक्ति देशी ।। ही गुजगोष्ट सांगुनी आम्हांसी ।। संशय चित्तींचा निवारीं बा ।। २७ ।। तंव कृपानिधी हांसोनी ।। दोघांसी बैसवोनी स्वासनीं ।। मस्तकीं ठेवूनी वरद पाणी ।। म्हणे ऊर्ध्वनयनीं पाहावें ।। २८ ।। शिरसा गुर्वाज्ञा मानुनी ।। वर पाहूं लागले त्या ॑गीं ।। दिसूं लागले चमत्कार नयनीं ।। सांगतों ऐका एकचित्तें ।। २९ ।। प्रकाश कोंदला सर्वांकडे ।। आद्यन्तरहित चिन्मात्र रोकडें ।। शांत अव्यक्त मागें पुढें ।। तेणें स्थिरावल्या बुद्धिवृत्ती ।। ३० ।। जे असे उदयास्तविरहित ।। गुण ना निर्गुण गुणातीत ।। जें अच्युत अनंत अव्यक्त ।। ब्रम्ह सर्वगत दिसूं लागलें ।। ३१ ।। जेथ नसे हर्षामर्ष[1]

१. रागलोभादि

|| सत्तामात्र निर्विशेष || ज्यासी न शिवे मायालेश || झाले समरस त्या ब्रम्हीं || ३२ || जे झाले बुद्धिपारंगत || संसारासी न शिवत || त्यासी ती वस्तू आस्पद[1] सतत || आकाशवत वायुगतीसी || ३३ || जें उपनिषत्प्रतिपाद्य || सद्योजात ब्रम्ह नित्य || जेथ नाहीं जरामरणादि भय || तेथें भक्त समरसले || ३४ || सागरीं जेंवि लवण मिळे || नीर क्षीर[2] जेंवि न होय निराळें || समरसे जेंवि जळ जळे || तैसे मिळाले ब्रम्हीं दोघे || ३५ || नातरी वाती एकत्र करितां || जेंवि पावे दीप एकतां || कीं विस्फुलिंग[3] वन्हींत मिळतां || एकरूपता पै जैसी || ३६ || अथवा घट फोडितां घटाकाश || जैसें होय आकाशीं समरस || तैसे सोडूनी जीवभावास || ब्रम्हीं एकरस झाले तत्क्षणीं || ३७ || तत्काळ निर्विकल्प समाधी || लागता लीन झाली त्यांची बुद्धी || इंद्रियें बैसली अतींद्रिय पदीं || काय अपूर्व विधी[4] त्यांची नेणों || ३८ || सर्व गती झाल्या निश्चळ || एवं समाधी लावोनि सोज्वळ || अहोरात्र बैसले निढळ || एकासनीं सप्तदिन || ३९ || मग उतरली समाधी || सर्वांगीं पसरली बुद्धी || पाहतां पुढें दिसूं लागला आधीं || प्रकाशामधीं चित्रपर्वत || ४० || को सूर्यांपरी सोज्वळ || शशिकोटि[5] सुशीतळ निर्मळ || नाना मणिप्रभें केवळ || चमके इंद्रधनूपरी || ४१ || कीं विष्णुपद[6] छत्र दंड || तैसे दिसती सानुखंड[7] || पाहतां कल्पवृक्षाची वाढ || व्योम[8] अखंड शिरीं घेतलें || ४२ || गो व्याघ्र सिंह हस्ती || जेथें करोनि निर्वैर मती || स्वजातीपरी एकत्र रमती || कैलासरीती काय वानूं || ४३ || श्रोत्रांसी अमृतापरी || सुनादें कूजित परोपरी || कोकिल हंस मयूरादि पतत्री[9] || खेळती गिरीवरी चहूंकडे || ४४ || स्वादु नीर सुंदर कासारीं || रत्नपायऱ्या त्यामाझारी || तेथें नीरविहार करिती भारी || निज नारींसह सुरवर || ४५ || सुधा पिवोनि सुरुचिरें || प्रमोदभरें भारांतर || सुरवर वेंचिनी वारंवार || रस चामीकरांभोजभर[10]

१. स्थळ २. दूध ३. ठिणगी ४. प्रकार ५. कोटिचंद्र ६. आकाश ७. डोंगरभाग ८. आकाश ९. पक्षी १०. सुवर्ण कमळे.

शिवचिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

।। ४६ ।। रचूनि सरळ शतपत्रमाळा[१] ।। प्रेमें घालिती प्रियसखीगळां ।। प्रयत्नें पुरविती शृंगारकळा ।। सखीमेळा जमवुनियां ।। ४७ ।। एकांती बसलें असतां दंपती ।। सभोंवतीं सोज्वळ स्फटिकभिंती ।। तेथे बहुत प्रतिबिंबित युती ।। पाहूनि दचकलें भीरुचित्त ।। ४८ ।। रजताचळीं ठायिं ठायिं ।। स्वकांतेसि घेउनी सिद्धही ।। बसती चित्रस्वरें गात पाहीं ।। आनंदें क्रीडा करीत ।। ४९ ।। कामधेनूसमुदाय ।। धरूनि बैसले मंदारछाय[२] ।। खंथ करित आनंदमय ।। कैलासमहिमा काय सांगूं ।। ५० ।। कवणे ठायीं मुनीश्वर ।। चित्त करूनि एकाग्र ।। नयन झांकोनि समाधितत्पर ।। शिवानंदें डुल्लती ।। ५१ ।। पशू पक्षी मृग कीटक ।। शिवनामें गर्जती कौतक ।। झाडेंझुडें गुल्मकीचक ।। शिवस्मरणें काळ कंठिती ।। ५२ ।। जन्मोजन्मीं करूनि पुण्य ।। पावले प्राणी कैलासनिलय ।। आतांही शिवानंदमय ।। त्यांचे पुण्य वर्णी कोण ।। ५३ ।। निमिषोनिमीषीं शिवस्मरण ।। करूनि काळ दवडिती क्षणक्षण ।। श्वाससूत्रीं नाम वोंवून ।। शिवचरण प्राणी सेविती ।। ५४ ।। एतादृश कैलासपर्वतीं ।। नवरत्ननिर्मित गृहें सभोंवतीं ।। मध्यें शिवागार अत्युन्नती ।। ज्याचे शिरीं शोभे चंद्रमंडल ।। ५५ ।। सप्त द्वार सप्तावरण ।। सप्त परिघ दिसती अमृतपूर्ण ।। महाद्वारीं हात जोडूनी ।। सर्व देवगण उभे असती ।। ५६ ।। अग्नी यम वरुण ।। निर्ऋती वायू शचीरमण ।। ज्याचे कृपाकटाक्ष इच्छून ।। एकपदें द्वारी तिष्ठती ।। ५७ ।। शिवसन्निधानीं ऋषीसंघ ।। मुखें उच्चारित वेदवेदांग ।। स्तविती शंकरासी अभंग ।। अंतरीं निःसंग होऊनि ।। ५८ ।। कैलासीं शोभे शंकरसभा ।। सर्वांकडे फांके रत्नप्रभा ।। त्यामाजी स्वपरिवारें रंभा ।। उभी असे नाचत ।। ५९ ।। सभोंवती बैसले देवगण ।। चंद्र उभा छत्र धरोन ।। वायू धरी सुरम्य व्यजन[३] ।। स्तोत्र करितसे षण्मुख ।। ६० ।। सूर्ये धरिलीसे दिवटी ।। नंदी वाखाणी कीर्ति मोठी ।। हरी करित पूजा गोमटी ।। मध्यें शोभे देव शंभू ।। ६१ ।। कमनीय रत्नसिंहासनीं ।। सर्वांगीं सर्पालंकार लेवोनी ।। बैसलासे उमाजानी[४] ।। प्रतिमुखीं शोभती त्रिनेत्र ।। ६२ ।। शुभ्रभस्म उद्धूलन

शि
व
चि
द
म्ब
र

१. कमळ माळा. २. मंदारवृक्षाखालीं. ३. पंखा. ४. शंकर

शि व चि द म्ब र

।। त्यावरी त्रिपुंड्र धारण ।। करूनि व्याघ्रचर्म परिधान ।। करिकृत्तीचा[1] शोभे उत्तरीय[2] ।। ६३ ।। सदय हृदयाचिया जटाजूटी ।। गंगा झुळझुळ वाहे गोमटी ।। शरणागताचे पाठीं ।। रक्षक जो अभयदानें ।। ६४ ।। अमूल्य वस्त्र लेवूनी अतौता ।। कृपाकटाक्षें पाहे निजभक्तां ।। वामांगीं शोभे गिरिजामाता ।। चित्सौंदर्यखाणी अंबिका ।। ६५ ।। कात्यायनीवदनामृत ।। पिवोनि जो सदा सुप्रीत ।। त्या शिवासी पाहतां दोघे भक्त ।। प्रणिपात करिते झाले ।। ६६ ।। अंगी रोमांच भरले ।। नेत्रीं बाष्प वाहूं लागले ।। शिवपदीं दंडवत नमन केलें ।। प्रेमभावें उभयतां ।। ६७ ।। तंव पाहतां डोळे उघडोनी ।। पुढें दिसे दीक्षितमणी ।। भ्रम पावोनि अंतःकरणीं ।। स्वामिसन्निधानीं राहिले उगे ।। ६९ ।। कैलासीं असों किंवा भूतळीं ।। शिवनिकटी वसों कीं गुरुजवळीं ।। आंसनीं कीं सभातळीं ।। जागतों कीं स्वप्न पडलें ।। ७० ।। एवं शंकित असतां दोघेजण ।। त्यासी पुसत आनंदघन ।। जो चमत्कार पाहिला आपण ।। तो मजकारण सांगा वेगीं ।। ७१।। भक्त मग सावध होवोनी ।। विनविती श्रीगुरुचरणीं ।। आम्हीं जी वस्तू पाहिली नयनीं ।। सर्वज्ञानी जाणतां ।। ७२ ।। जी वस्तू पहिली आम्हीं ।। सांगाया वाचें नये स्वामी ।। कृपा करूनिया तुम्ही ।। सांगुनी संशय दूर करा ।। ७३ ।। तंव बोले कृपासमुद्र ।। आदौ जी पाहिली वस्तुसार ।। वेदांतवर्णित निरंतर ।। तीच निर्धार परब्रम्ह वस्तु ।। ७४ ।। साधनचतुष्टयसंपन्न[3] ।। सद्गुरूचे जे सच्छिष्य पूर्ण ।। सर्वांगेंकरोनि त्यक्ताभिमान ।। त्यांसी तें स्थान वसावयास ।। ७५ ।। मग जें पाहिले शिवरूप ।। मायिक भक्तगोचर निष्पाप ।। तेंचि नानावताराचा बाप ।। लब्धानुत्ताप[4] पावती भक्त ।। ७६ ।। जे सर्वसंगे निर्मुक्त ।। माझे भजनीं जें सदा रत ।। माझे पूजनीं जे सुप्रीत ।। जाती ते भक्त माझिया लोका ।। ७७ ।। जेथें नसे अल्पही शोक ।। जेथें न दिसे दुःख सांसारिक ।। तो अत्युत्तम मम लोक ।। माझे भक्तांसी मिळे सत्य

शि व चि द म्ब र

१. गजचर्माचें २. प्रावरण ३. नित्यानित्यवस्तुविवेक, इहामुत्रपलभोगविराग, शमदिषट्कसंपत्ति आणि मुमूक्षुत्व यांनी युक्त ४. पश्चात्ताप पावलेले.

|| ७८ || येणेंपरी अमृतस्त्राविणी || श्रीगुरूची ऐकुनि वाणी || आनंद उचंबळोनि अंतःकरणीं || चिदंबरचरणीं लीन झाले || ७९ || चिदंबरापरी सदंबरीं || दोघे समरसोनी चिदंबरीं || स्वयें होउनी शंबरारिमारी[1] || सर्वांतरीं मीलने[2] ते || ८० || मुनीश्वर म्हणे अवधारा || भावें नाम वदनीं धरा || यत्न करूं नका दुसरा || श्रीगुरुवरा आळवा चित्तीं || ८१ || नामस्मरण करावयास || न होय तुम्हां कांहीं सायास || नामें वरा मुक्तिनोवरीस || अल्प सायासें महाफळ || ८२ || यास्तव यत्न करोनि || मुमुक्षुजन हो नाम वदनीं || धरा धरा तेणेंकरुनी || होय मोक्षसदनीं वास तुम्हां || ८३ || त्रिवाचा सांगतों सत्य सत्य || कलीमाजी नामचि मुख्य || नामेंच मोक्ष सुगम होय || आम्नाय[3] गर्जनी यापरी || ८४ || तंव मुनीश्वरासी द्विजवर || साष्टांगें करोनि नमस्कार || पुसते झाले प्रश्न थोर || नाममाहात्म्य जाणावया || ८५ || ज्ञानेंचि मोक्ष लाधे निश्चिती || वेदशास्त्र ऐसें गर्जती || सांगा नामस्मरणें मुक्ती || कवण्या रीती मिळे साधका || ८६ || नामें आहे असंख्यात || कवण नाम असे समर्थ || मोक्षदायक विख्यात || तें आम्हांप्रत निरोपावें || ८७ || नामें ज्ञान उपजे कैसें || हें सांगावें जी भरंवसें || श्रुति शास्त्र पुराणीं विलसे || बहुधा नाम माहात्म्य || ८८ || नामी वसे जी शक्ती || ती विस्तारोनिया निश्चिती || सांगा स्वामी आम्हांप्रती || हीच विनंती पदकमलीं || ८९ || यापरी परिसोनि[4] द्विजभारती[5] || बोले मुनी हर्षोनि चित्तीं || नामहात्म्य अति प्रीती || द्विजाप्रती सांगतसे || ९० || मुनीश्वर म्हणे विप्रांसी || ज्ञानेंचि मोक्ष साधकांसी || ऐसे बोलती श्रुति शास्त्रराशी || ज्ञानाविण मोक्ष नयें हातां || ९१ || ज्ञान व्हावयासी कारण || वैराग्यें अभ्यास पाहिजे निक्षून || चित्तैकाग्रें अभ्यासाविण || कदापि ज्ञान न होय || ९२ || करूनिया दृढ भक्ती || एकचित्तें अभ्यास दिनंप्रती || करिता बहुकालावरती || ज्ञानें मुक्ती होय साधकां || ९३ || कलियुगी मानवासी || चित्तैकाग्र्य कठिण परियेसी || कलिजनोद्धार व्हावयासी || ईश्वरासी पडला विचार || ९४ || मग

१. शिव. २. एकरूप झाले. ३. वेद ४. ऐकून ५. ब्राम्हणवाणी.




शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

काढिला सुलभोपाय ।। नामस्मरणें असे शक्य ।। विचारुनी नामीं अनिर्वाच्य ।। ठेविला स्वकीय प्रभाव मोठा ।। ९५ ।। करितां करितां नामस्मरण ।। दुष्टाचेंही विरोनि अंतःकरण ।। प्रेम उपजे नामीं पूर्ण ।। नामप्रेमें शोधे चित्त ।। ९६ ।। थेंब थेंबही पडतां वारी ।। सांचसे धरणीवरी ।। करितां बीजारोपण सत्वरीं ।। पीक निर्धारी येतसे ।। ९७ ।। शिळेसि करितां प्रहार ।। मूर्ती बनते मनोहर ।। नाम स्मरतां तैसें सत्वर ।। अज्ञान नाश होतसे ।। ९८ ।। ज्ञानासी पापं येतसे आड ।। नाम उच्चारितां होय दुखंड ।। पाप जातां विकल्प बंड ।। नासुनी प्रचंड ज्ञान उपजे ।। ९९ ।। नाममहात्म्य भागवतीं ।। स्वयें बोलिला श्रीपती ।। गीतेमाजी अर्जुनाप्रती ।। नामभक्ती बोधिलासे ।। १०० ।। सप्रेमें नाम उच्चारितां ।। विषयीं होय विरक्तता ।। वैराग्यें भक्ति लाधे हाता ।। भक्तीनें ज्ञाता आत्मरूपीं ।। १ ।। यास्तव मोक्षासाठीं ।। सर्व सोडोनि अटाटी ।। नाम जपावें सतत कंठीं ।। तेणें मुक्ती सुलभ होय ।। २ ।। चिदंबराचीं नामें अनंत ।। असतीं जाणा तुम्ही निश्चित ।। मुख्य नामे वीस त्यांत ।। स्कंदपुराणी वर्णिलीं ।। ३ ।। चित्प्रकाश शिव चिदंबर ।। सांब शंकर शंभु महेश्वर ।। तिल्लवनाधीश गुरु नटेश्वर ।। हर मुनींद्र व्याघ्रपुरीश ।। ४ ।। भगवान् विभू योगींद्र ।। महागुरू चिदीश्वर ।। सभापती दीक्षितेंद्र ।। नामामृतें वीस हीं ।। ५ ।। अन्य नामें आहेत बहुत ।। तरी या वीस नामांत ।। मोक्षदायक शक्ती अद्भुत ।। चिदंबर नाम श्रेष्ठ यांतही ।। ६ ।। आहे सर्वनामांचे ठायीं ।। मोक्षदायक प्रभाव पाहीं ।। त्यांचें कारण तुम्हां सर्वही ।। सांगतों ऐका द्विजवरहो ।। ७ ।। सर्व नामांसी मूळ हेतू ।। निर्विकार चिदंबर निश्चितु ।। जेथुनी प्रणव[1] उपजतु ।। ही मातु व्यास वदे ।। ८ ।। चिदंबरमाहात्म्य ग्रंथ ।। स्कंद पुराणीं व्यासप्रतिपादित ।। असे सोळा सहस्त्र निश्चित ।। याविरहित नाममाहात्म्य ।। ९ ।। एकैकाक्षर महिमान ।। चार सहस्त्र ग्रंथ संपूर्ण ।। सांगूनि ही म्हणे द्वैपायन[2] ।। या नामाचा नलगे अंत ।। ११० ।। जेथें कुंठित व्यासमती ।। तेथें मर्त्याची कवण गती ।। ॐकार मूळ अकार

शिवचिदम्बर

.........................

१. ओंकार. २. व्यासमहर्षि.

शिव चिदम्बर

निश्चिती ।। स्वरउत्पत्ती चिदंबरास्तव ।। ११ ।। निर्विकार जे स्वप्रकाश ।। शूद्धब्रम्ह जे निर्विशेष ।। चिदंबर ऐसें नाम त्या ।। तोचि सर्व नामां जन्मस्थान ।। १२ ।। येथुनी नानावतार ।। उपजती जग चराचर ।। स्थूल ना अणु निरंतर ।। नामसार तेंचि जाणा ।। १३ ।। अव्यय जो जगधाम ।। साराचा सार सर्वोत्तम ।। त्यासीच म्हणे चिदंबर नाम ।। पूर्ण ब्रम्ह वेदोदित ।। १४ ।। चिदंबररूप सर्वगत ।। तेंचि साक्षित्वें विलसे हृदयांत ।। तत्प्रतिबिंब अंतःकरणांत ।। सदोदित भरलेंसें ।। १५ ।। अंतःकरणापासुनी जन्म ।। संकल्पासी असे नेम ।। स्थानभेदें कल्पना परिणाम ।। पावोनि नामत्व धरी ।। १६ ।। चिदंबर ज्ञानसार ।। वृत्तिद्वारें येतसे बाहेर ।। नाम असे ज्ञानपूर ।। मोक्षप्रद सार हेंचि नामीं ।। १७ ।। विहिरीचें काढितां नीर ।। काढणारां कळे गोड क्षार ।। तैसी आत्मशक्ती अपार ।। नामद्वारें थोर कार्य करी ।। १८ ।। ब्रम्ह सर्वगत असतांही ।। भावितां प्रत्यक्ष होय हृदयीं ।। साक्षात्कार झाल्या पाहीं ।। लाधे मोक्ष तत्काळ ।। १९ ।। तैसें सर्व नामीं व्यापक ।। मुक्तिद ज्ञान असतांही देख ।। भावनेविण मोक्षसुख ।। न पवे हातां देवादिकां ।। १२० ।। नामीं भक्ती ठेवूनी ।। सतत उच्चारितां वदनीं ।। ती भक्ती बघूनि अंतःकरणीं ।। मोक्षदानी समर्थ ।। २१ ।। हाचि अर्थ सूत याज्ञवल्क्य ।। शुक कपिल दत्तात्रेय ।। सांगितला ग्रंथी सत्य ।। नाममहिंमा यास्तव मोठा ।। २२ ।। उपाधिभेदें नामें अनंत ।। नामीं निजवस्तूचि व्याप्त ।। एकेनामीं विश्वासें बहुत ।। जाहले मुक्त संसारांतुनी ।। २३ ।। विलोम[1] नामेंही पतित ।। होवोनि संसारीं पुनीत ।। शतकोटि वर्णिला ग्रंथ ।। ऋषीगणांत आला गणनेसी ।। २४ ।। कालकूट पीता शंकर ।। सर्वांग तापलें प्रखर ।। उपशमार्थ गंगा निशाकर[2] ।। धरी सत्वर निजांगीं ।। २५ ।। तरी न होय उंपशम ।। मग धरिला एक नेम ।। सतत स्मरूं लागला नाम ।। तेणें ताप निमाला ।। २६ ।। महापापी अजामिळ ।। पुत्रनाम उच्चारितां केवळ ।। येउनी विष्णुदूत सबळ ।। छेदिला कंठपाश सत्वर ।। २७ ।। सर्व

शिव चिदम्बर

१. उलटें २. चंद्र

नामीं उद्धारशक्ती ।। चिदंबराचीच जाण निश्चिती ।। कलियुगी तीच मूलमूर्ति ।। भूवरती अवतरली ।। २८ ।। पूर्णात्मा परात्पर ।। महीवरी होउनी द्विजवर ।। धरुनी मूलनाम चिदंबर ।। सर्वात्मा अवतरला ।। २९ ।। हाचि असे सर्वेश्वर ।। मायादेवीचा भ्रतार ।। वसे चिदंबरनामीं थोर ।। उद्धारशक्ती यास्तव ।। १३० ।। लाडू, पोळया, श्रीखंड ।। यांचा रस लागतसे गोड ।। तरी शर्करेपरी उदंड ।। नये गोडी वर्णावया ।। ३१ ।। प्रदीपामाजी सूर्यज्योती ।। सर्वत्र तम निवारिती ।। प्रकाशकार्य चालविती ।। परी ज्योती सूर्यसम नोहे ।। ३२ ।। नातरी तळीं विहिरीं पोखरणींत ।। असे मेघोदकचि निश्चित ।। उदककार्य चालविती सतत ।। तरी मेघशक्तींत गणूं नये ।। ३३ ।। नातरी इंद्रियें आंहेत ज्ञानमय ।। व्यवहारीं ज्ञानकार्य ।। चालविती तरी ब्रम्हसाम्य ।। न पवती कवणे काळीं ।। ३४ ।। यास्तव चिदंबरनामीं वसत ।। पापहारक शक्ती अद्भुत ।। ही शक्ती दुज्या नामांत ।। नये कल्पपर्यंत उच्चारितां ।। ३५ ।। तुम्हां आवडे हे नाम ।। म्हणोनि वर्णितां सर्वोत्तम ।। म्हणाल तरी सांगतों वर्म ।। प्रमाणनेम पुराणोक्त ।। ३६ ।। चिदंबर नाम विवर्णनीं ।। व्यास बोले स्कंदपुराणीं ।। तेंचि प्रमाण तुम्हांलागोनी ।। सांगतों ऐका स्वस्थ चित्तें ।। ३७ ।। व्यास उचाव ।। चिदम्बरेति यन्नाम श्रेष्ठं ही बहुनामसु ।। यदुच्चारणमात्रेण पुण्यराशिः स्वयं नरः ।। १ ।। एसें जें नाम ।। नामामाजी होय सर्वोत्तम ।। उच्चारमात्रें पापस्तोम ।। जळूनि भस्म होतसे ।। ३८ ।। श्लोक ।। पञ्चाक्षरं महामन्त्रं पञ्चपातकनाशनम् ।। पञ्चाशत्कोटिगुणितं मुक्तिघण्टापदं मुने ।। २ ।। जपतां पंचाक्षरी महामंत्र ।। होय पंच महापाप संहार ।। जप केलिया पन्नास कोटिवार ।। नाम तया मुक्तिघण्टापद[1] ।। ३९ ।। श्लोक ।। चिदम्बरइति ब्रूयात्सकृज्जननवर्जितः ।। मुक्तिघण्टामणिपदो मोक्ष एव न संशयः ।। चिदंबरनाम एकवार ।। उच्चारितां होय जन्म दूर ।। त्यासीच मुक्तिघण्टामणिपद थोर ।। मोक्षसार म्हणती निःसंशय ।। १४० ।। चिदम्बरनाममाहात्म्य ऐकुनी ।। वेदान्त लज्जित होउनी मनीं ।। म्हणती

१. मुक्तीचा राजमार्ग




शिव चिदम्बर

थकली आमुची करणी ॥ या नामापुढें परियेसा ॥ ४१ ॥ जीवात्मैक्य अनुभवासाठीं ॥ साधक लागती आमुचा पाठीं ॥ चिदम्बरनाम जपतां कंठीं ॥ उठाउठी तो साधे ॥ ४२ ॥ मग त्यासी आमुचें कारण ॥ आदरिती कायसें म्हणोन ॥ यापरी उदासीन होवोन ॥ नेति नेति म्हणोन मौनावले ॥ ४३ ॥ शिवरहस्य पंचमांशीं ॥ नाममहिमा वर्णी व्यासऋषी ॥ चिदम्बरशब्दार्थ बहुवसी ॥ याचपरी प्रतिपादिला ॥ ४४ ॥ व्यास उवाच ॥ चिदम्बरेति नामेदं सकलार्थप्रदायकम् ॥ तस्मान्मोक्षार्थिभिर्नित्यं सेव्यःश्रीमच्चिदम्बरः ॥ ४ ॥ चिदम्बरेति मन्त्रोऽयं जपनीयः प्रयत्नतः ॥ चिदम्बरेति मन्त्रेण पूजनीयः सदाशिवः ॥ चिदम्बरान्महामन्त्रो नान्योऽस्तीति ध्रुवं ध्रुवम् ॥ ५ ॥ चिदम्बर ऐसे चतुरक्षर ॥ नाम हाचि असे महामन्त्र॥ वाचे करितां उच्चार ॥ सर्वकाम पूर्ण होय ॥ ४५ ॥ यास्तव मोक्षार्थी जन ॥ चिदम्बर नामोच्चारण ॥ सतत करा हो भाव धरून ॥ याविण साधन नसे सुलभ ॥ ४६ ॥ नामामाजी नाम थोर ॥ मन्त्रामाजी महामंत्र ॥ चिदंबर हाचि चतुरक्षर ॥ मुखें उच्चारितां होय मोक्ष ॥ ४७ ॥ चिदम्बर हा महामंत्र ॥ प्रयत्नपूर्वक निरंतर ॥ जप करितां सर्व मंत्र ॥ सिद्ध होती साधकां ॥ ४८ ॥ चिदम्बर मंत्रेच साधक नर ॥ भावें पूजिता कर्पूर गौर ॥ तेणें संतोष होय अपार ॥ शंकरासी सत्य जाणा ॥ ४९ ॥ चिदंबरमंत्रासारिखा ॥ महामंत्र दुसरा नसे देखा ॥ ऐक म्हणे प्राणसखा ॥ कैलासनायक पार्वतीसी ॥ १५० ॥ श्लोक ॥ चिदम्बरेतिमन्त्रोऽयं सतारं[1] मम शोभने ॥ यन्मुखे वर्तते नित्यं सोऽहमेव न संशयः ॥ ६ ॥ शिव म्हणें पार्वतीसी ॥ ऐक शोभने महामंत्रासी ॥ मंत्र सप्रणव चिदम्बर परियेसी ॥ ज्याचे मुखीं वसे तोचि मी ॥ ५१ ॥ श्लोक ॥ सर्वोत्तमो महामन्त्रः शिवपूर्वश्चिदम्बरः ॥ मन्त्रराज इति ख्यातः स्मरणात्सर्वसिद्धिदः ॥ ७ ॥ चिदम्बरनाममाहात्म्य ॥ वर्णावया असे अतर्क्य ॥ ब्रम्हयासीही जाणावया अशक्य ॥ सहस्त्र वर्षें अभ्यासितां ॥ ५२ ॥ प्रलयार्णव महाजळीं ॥ ब्रम्हदेव उपजला कमळीं ॥ शून्य पाहोनि भ्रमजाळीं

१. ओंकारासहित

शि
व
चि
द
म्ब
र

॥ पडोनि तळमळूं लागला ॥ तंव करुणाकर चिदम्बर ॥ ब्रम्हयासी सांगे आकाशव्याहार[1] ॥ जप करीं नाम निरंतर ॥ तेणें रुचिर ज्ञान लाधे ॥ ५४ ॥ ब्रम्हदेव ऐकुनी सत्वर ॥ जपूं लागला नाम मनोहर ॥ चिदम्बरमंत्र चतुरक्षर ॥ सप्रणव सुनाद ॥ ५५ ॥ नामसामर्थ्यें ब्रम्हदेव ॥ पावला वेद समुदाव ॥ जाणोनि सृष्टिरचनावैभव ॥ चराचर जीव रचूं लागे ॥ ५६ ॥ चतुर्दश ब्रम्हांड सृष्टी ॥ नामबळें रची परमेष्ठी ॥ यास्तव नाममहती मोठी ॥ मोक्षसाधनीं सुलभोपाय ॥ ५७ ॥ चिदंबरगुरूचें नाम देख ॥ असे सर्वसिद्धिप्रदायक ॥ आतां नामार्थ सांगतों सुरेख ॥ ऐका श्रोतेजन एकचित्तें ॥ ५८ ॥ चित् म्हणिजे शुद्धज्ञान ॥ अंबर म्हणिजे गगन[2] ॥ गगनासारिखें जें परिपूर्ण ॥ तें शुद्धज्ञान चिदंबर ॥ ५९ ॥ मायानियंतृ सर्वव्यापक ॥ वेदान्तवेद्य जें आत्मसुख ॥ ज्यासाठीं योगी झटती सम्यक ॥ तें पूर्णब्रम्ह देख चिदंबर ॥ १६० ॥ अथवा चित्तदंभाचे बळ ॥ दहन करी रेफशक्ती केवळ ॥ एकैकाक्षराचा अर्थ सोज्वळ ॥ यापरी निघतसे ॥ ६१ ॥ चतुरक्षर यासी म्हणती मंत्र ॥ प्रणव योजितां होय महामंत्र ॥ शिवपूर्वक करितां उच्चार ॥ नाम थोर मंत्रराज ऐसें ॥ ६२ ॥ मंत्रार्थ असे कथियला ॥ आतां महामंत्रार्थ ऐका भला ॥ अकार उकार मकार मिळाला ॥ म्हणुनी झाला ओंकार ॥ ६३ ॥ भूर्भुवादि लोकत्रय ॥ वर्णत्रयीं वसताति नित्य ॥ श्रुतित्रय आणि अग्नित्रय ॥ प्रणवसदनीं राहिले ॥ ६४ ॥ हा जो सर्वात्मा प्रणव ॥ ज्या शक्तीनें पावला साकार भाव ॥ तो हा असंग देवदेव ॥ चिदंबर नामें शोभतो ॥ ६५ ॥ यापरी कथिला महामंत्रार्थ ॥ आतां सांगू मंत्रराजार्थ ॥ जीवब्रम्हैक्यज्ञान यथार्थ ॥ मंत्रराजांत निघतसे ॥ ६६ ॥ शिव म्हणिजे कल्याण ॥ कल्याण तोंचि आनंद जाण ॥ चित् म्हणिजे शुद्धज्ञान ॥ अंबरनाम सत्पदासी ॥ ६७ ॥ सच्चिदानंद पदत्रय ॥ दावितसे ब्रम्ह अद्वितीय ॥ जैसें श्वेत गोड मृदु गुणत्रय ॥ शर्करेमाजी वसताती ॥ ६८ ॥ तैसा आनंद चित् सत् ॥ पदत्रयें पूर्णात्मबोध सर्वगत ॥ होतसे जाणा निश्चित ॥ याविरहित सर्व मायिक ॥ ६९ ॥ जग

शि
व
चि
द
म्ब
र

१. आकाशवाणींत २. आकाश

शि व चि द म्ब र

जीव शिव इत्यादि मायिक ।। मनोल्हासें दिसती सम्यक ।। मन नसतां एकही न दिसे देख ।। सर्वदा सर्वात्मक भासे आत्मा ।। १७० ।। यास्तव त्रिकाळीं शिव चिदंबर ।। एकचि भासे निरंतर ।। जाणा तत्त्वमस्यर्थसार ।। शिवचिदंबर मंत्र हा ।। ७१ ।। कर्म भक्ती योग ज्ञान ।। सकलही साधती नाम जपून ।। यास्तव गुरुमुखें मंत्र घेवोन ।। अनुष्ठान चालवावें ।। ७२ ।। वदनीं करितां उच्चार ।। अश्वमेधादिकर्मफळ अपार ।। प्राप्त होतसें सत्वर ।। यारिती कर्मपर विनियोग ।। ७३ ।। श्वासोच्छ्वासीं धरितां नाम ।। योगाभ्यास होतसे सुगम ।। मन करितां नामीं विश्राम ।। संकल्पोद्गम शांत होय ।। ७४ ।। चित्तीं आणोनि चिदंबरमूर्ती ।। नाम स्मरतां अति प्रीती ।। चिदंबरीं जडे चितवृत्ती ।। तेणें सद्भक्ती लाधे अनायासें ।। ७५ ।। अर्थी ढेवोनिया चित्त ।। नाम स्मरती अंतरंगांत ।। तदाकार होवोनि स्वांत[1] ।। आनंदांत लीन होय ।। ७६ ।। कलीमाजीं नामानुष्ठान साधनात उत्तम साधन ।। साधका पूर्ण देवोनी ज्ञान ।। शेखी नामाचि पूर्णानन्द होय ।। ७७ ।। चिदम्बर नाम वसे ज्याचे मुखीं ।। अनुपम होय तो त्रिलोकीं ।। यमदूतही तया शेखीं ।। न भेटती नामभयें ।। ७८ ।। जाणतां नेणतां वाचें उच्चारिती ।। जन्मांतरींचीं पापें भस्म होतीं ।। एवढी नामाची असे महती ।। सांगतों एतदर्थी कथा एक ।। ७९ ।। मुर्खे सांगतां शर्करागोडी ।। रसनेची[2] न पुरे आवडी ।। तेंवी तुम्हां सांगतां नामप्रौढी ।। विकल्प ओढी सोडीना ।। १८० ।। सुलाखणीं नार्णे टोंचून ।। खरें पारखिती सज्ञान ।। तेंवि साक्ष कांहीं दावोन ।। संशय खंडन करीन ।। ८१ ।। कां मोहरीस गुंडाळोनि सूत ।। टाकुनी पाहती अग्नींत ।। तेंवि तुम्हां नामाची प्रचीत ।। दावीन निश्चित या समयीं ।। ८२ ।। कीं हिरा ठेवूनी ऐरणीवरी ।। पारखी घण हाणिती भारी ।। तेंचि नाममहिमा या अवसरीं ।। दावीन सत्वरी सुजाण हो ।। ८३ ।। नरगुंद गांवीं मांडलीक ।। होता राजा एक धार्मिक ।। दैवयोगें त्यासीं घडली देख ।। भयानक ब्रम्हहत्या ।। ८४ ।। त्रिमठ स्वामीसी कळले वृत्त ।। त्यांहीं केला बहिष्कृत ।। कांहीं

शि व चि द म्ब र

.........................

१. मन. २. जिभेची.

शि व चि द म्ब र

केलिया न करिती पुनीत ।। आला श्रीदीक्षितपुरवेशीं ।। ८५ ।। शुध्द व्हावयाची धरूनि इच्छा ।। षण्मास राहे ग्रामाबाहेर साचा ।। नित्य केर काढी राजा अंगणीचा ।। करी गुरुगृह प्रदक्षिणा ।। ८६ ।। एके दिवशी पुसे शिवशास्त्री ।। तूं कां राहिलासी द्वारीं ।। ऐकुनी राजा त्या अवसरीं ।। निजवृत्त निवेदित ।। ८७ ।। शास्त्री म्हणे राजाप्रती ।। तुज प्रायश्चित्त सांगतों निश्चिती ।। आचरोनि भोजनाप्रती ।। माझे सांगाती शीघ्र येईं ।। ८८ ।। मग चिदंबर नाम दोन वेळ ।। म्हणविलें उच्च स्वरें केवळ ।। आंत नेला धरूनि करकमळ ।। आपुल्या जवळ बैसविला ।। ८९ ।। हे पाहुनी सर्व ब्राम्हण ।। निघाले भोजन सोडून ।। तंव आला सद्‌गुरुराण ।। निवेदिली विप्रकृती ।। १९० ।। स्वामी विचारी शास्त्रियासी ।। कां आणिला बहिष्कृतासी ।। तंव शास्त्री सांगे स्वामीसी ।। उत्तम प्रायश्चित्तें आणिला ।। ९१ ।। काय दिल्हेंसी प्रायश्चित्तं ।। तें शीघ्र सांग बा येथ ।। मग वंदुनि शास्त्री बोलत ।। शास्त्रोक्त प्रायश्चित्त सांगतों ।। ९२ ।। याचा अनुताप पाहुनी केवळ ।। चिदंबर नाम दोन वेळ ।। वदवुनी धरिलें करकमळ ।। हेंचि सबळ प्रायश्चित्त ।। ९३ ।। ऐसें ऐकुनी शास्त्रीवचन ।। म्हणे याचे शुद्धीस्तव जाण ।। पुरे एकचि वेळ उच्चारण ।। वृथा दोन वेळ वदविलेंसी ।। ९४ ।। स्वामीच करितां अंगीकार ।। पंक्तिमाजी घेतला द्विजवर ।। ऐसा असे नाममहिमा थोर ।। स्मरणमात्रें पाप नासे ।। ९५ ।। ब्रम्हघातक पतित पण ।। नामें झाला पंक्तीपावन ।। हें पाहुनी सकल जन ।। नामोच्चारण करूं लागले ।। ९६ ।। तये वेळीं झालें अद्‌भुत ।। दोषी झाले सर्व पुनीत ।। रोगी झाले रोगमुक्त ।। नाम मुखीं उच्चारितां ।। ९७ ।। नरनारी बाळवृद्धातुर ।। नामें करिती जयजयकार ।। करितांक्षणीं नामोच्चार ।। स्वकामना लाधल्या ।। ९८ ।। जाणुनी अथवा नेणूनी ।। उत्तमश्लोक[1] नाम येतां वदनीं ।। सर्व पापा होय धुणी ।। जैसे काष्ठ वन्हिमाजी ।। ९९ ।। जेथें असे नामध्वनी ।। कलिप्रवेश नाहीं त्या सदनीं ।। काळ दचकतो त्यासी पाहोनी ।। वसती त्या अवनी सर्व क्षेत्रें ।। २०० ।। पापसंघ निर्दळणाप्रती ।।

शि व चि द म्ब र

१. पवित्र.

शि व चि द म्ब र

नामामाजी वसे जी शक्ती ।। तीसम धुंडिती त्रिजगतीं ।। न मिळे कल्पांतीं कोणासी ।। १ ।। एक्या नामें जीं पार्पे नासतीं ।। तितुकीं करीन म्हणोनि मागुती ।। चवदा लोक जरी जाळिती ।। तरी त्यासम न होय ।। २ ।। एकनाम एकगुरु ।। एकदेव एकभ्रतारु ।। येथें द्वैत भावितां नरु ।। पावतो यमपुरीं कल्पवरी ।। ३ ।। श्रीकृष्णही नाममाहात्म्य ।। याचपरी बोलिला सत्य ।। नामस्मरण सोडूनी कृत्य ।। साधन दुसरें नसे जाणा ।। ४ ।। नामेंचि होय चित्तशुद्धी ।। नामेंचि लाधे सर्व सिद्धी ।। नामेंचि मुक्ती, होय त्रिशुद्धी ।। नाम सर्वांमधी श्रेष्ठ असे ।। ५ ।। वेदोक्त कर्माचरण ।। सदा गुरुनामाचें स्मरण ।। करावें हेंचि मुख्य साधन ।। ब्राम्हणांसी अन्य नसे ।। ६ ।। ज्यासि पाहिजे निजहित ।। तेणें जपावें नाम सतत ।। नामस्मरणें लाधे स्वहित ।। म्हणे सर्वांप्रत चिदंबरकिंकर ।। ७ ।। स्वस्ति श्रीचिदंबरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्‌गुरुनाथ ।। म्हणोनि ऐका भाविक समस्त ।। एकोनत्रिंशोऽध्याय रसाळ हा ।। २०८ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे नामवैभवखण्डे स्वयंशिवेन चिदम्बरनाक्ष ममहात्म्यकथनं नाम एकोनत्रिंशोऽध्यायः ।। २९ ।। ओवीसंख्या २०८ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

## ।। नामवैभवखण्डसमाप्तिः ।।

शि व चि द म्ब र

# रिक्तभूखातपूरणं दुर्भिक्षनिवारणं च




सर्व पेंव उकरोनि पाही । धान्यराशी केली एक्या ठायी ः भक्तवचन परिसतां जन । एकापुढे एक सरे जाण ।
धाविन्नले चहू कडोन । धान्य लुटति यथेच्छ ॥

शि
व
चि
द
म्ब
र

।। श्रीचिदम्बरमहागुरवेनमः ।। ॐनमोजी यज्ञमूर्ती ।। श्रीचिदम्बरां सभापती ।। देईं मजला कथास्फूर्ती ।। तुझें चरित्र वर्णावया ।। १ ।। तुज नमितां मंदमती ।। निश्चयें होतो ज्ञानमूर्ती ।। हें आणोनि सावित्रीपती ।। याचक होवोनि पायीं आलों ।। २ ।। माझे मनोरथ पूर्ण करीं ।। चरित्रश्रवणें जनां उद्धरीं ।। इतुकेंचि मागणें भक्तकैवारी ।। दानशौंडा चिदम्बरा ।। ३ ।। ज्यानें केला यज्ञविस्तार ।। त्रिलोकीं असे प्रख्यात थोर ।। त्या देवासि करूनि नमस्कार ।। सांगतों चरित्र परियेसा ।। ४ ।। द्विज पुसती मुनीश्वरासी ।। सांगा यज्ञमहोत्सवासी ।। श्रवणाची उत्सुकता मानसीं ।। अधिकोत्तर वाढतसे ।। जगामाजी प्रख्यात ।। कैसा यज्ञ करी श्रीदीक्षित ।। कृपा करूनि सांगा आम्हाप्रत ।। दयानिधे मुनिराया ।। ६ ।। यापरी ब्राम्हणवाणी ।। मुनीश्वर तेव्हां परिसोनी ।। चरित्र सांगावया तत्क्षणीं ।। परमानंदें आरंभित ।। ७ ।। श्रीगुरूचा यज्ञ अपूर्व ।। पाहतां भूलले सर्व देव ।। तेथें काय टिकती मानव ।। विस्मयभाव पावले ।। ८ ।। ब्रम्हा गुरु रवी शेष ।। आदिकरोनि सर्व त्रिदश[1] ।। यज्ञमहोत्सव पाहतां विशेष ।। लीन मानसीं जाहले ।। ९ ।। वर्णी देवांच्या चित्र बाहुल्या ।। मंडपा भोंवतीं रचियेल्या ।। त्यापरी देवपंक्ती शोभल्या ।। पाहिल्या भक्तजनांनीं ।। १० ।। यापरी देवादिका जो अतर्क्य ।। तो वर्णावया कवणा शक्य ।। मी तरी मंदामाजि मुख्य ।। तो यज्ञोत्सव वानूं कैसा ।। ११ ।। तथापि चिदम्बरप्रेरणें ।। यत्किंचित तुम्हांकारणें ।। सांगतो ऐका एकमनें ।। प्रेमभावें सकळिक ।। १२ ।। समस्त दिग्गजांचे शिरीं ।। शुद्धनिजकीर्ती सुंदरी ।। शोभे ऐसा त्रिपुरारी ।। महीवरी खेळत ।। १३ ।। वर्तत असतां गुरुपुरीं ।। चिदम्बरकीर्ती दिगंतरीं ।। पसरों लागली परोपरी ।। जेणें यात्रा भारी मिळतसे ।। १४ ।। काम्यनिष्काम्य लोक ।। जमों लागले होवोनि सेवक ।। अन्नदानें श्रीगुरुनायक ।। सर्वांसी रक्षितसे ।। १५ ।। ऐसें असतां क्षयसंवत्सरीं ।। दुर्भिक्ष पडला भारी ।। तेणें लोक सर्व महीवरी ।। अन्नोदकावीण तळमळती ।। १६ ।। अन्नार्थी होवोनि जन ।। अनेक उद्योग करिती जाण

शि
व
चि
द
म्ब
र

१. देव

|| परी न होय कुटुंबरक्षण || म्हणतीं सोडू प्राण याउपरी || १७ || तंव ऐकोनि चिदम्बरकीर्ती || अन्नार्थी जन धावत येती || कित्येक अस्थिपंजर पायां पडती || आक्रंदती प्राण रक्षावया || १८ || दुर्भिक्षें पीडिलें जनांसी || पाहतां श्रीगुरूचे मानसी || दया उपजोनी बहुवसी || आदरें त्यांसी अभय देत || १९ || बुभुक्षित[१] ब्राम्हणांकारण || मृदु वाचे करोनि सन्मान || कण्या भाकरी तक्रादि भोजन || देऊनि संतोषवी आधी || २० || मग कालयोगेंकरून || दुर्भिक्ष वाढतां निक्षून || स्वामीमानसीं विचार जाण || यापरी उपजला || २१ || जरी एकदाचि दुर्भिक्ष संहार || करीन स्वविक्रमें निर्धार || तरी काळमनोभंग होईल फार || माझ्या अवतारा दोष लागे || २२ || || यास्तव काळ चालों दे निकाम || स्वयुक्तीनें अन्नोदक उत्तम || देवोनि काळमुखें जनस्तोम || काढूनिया रक्षूं म्हणे || २३ || मग गुरुपुरीं दिवाकरासी || आलिया अन्नोदक द्यावयासी || ठेवुनि बहुत यात्रिकांसी || सर्वे घेऊनि निघाले || २४ || मार्गीं चालतां दीक्षितेंद्र || सिद्ध सुर सनकादि बरोबर || हरी चालतों किंवा हर || यापरी शंकर शोभतसे || २५ || मधुर वाचें कथाराशी || मार्गीं सांगत सर्वांसी || हर्षवित हृषीकेशी || आनंदें जातसे || २६ || सभोंवतीं पादचारी जन || शकट आणि तुरंगमगण[२] || ताराकदंबी[३] चंद्र जाण || शोभिन्नले श्रीदीक्षितेंद्र || २७ || शुभ्रांबर भस्मभूषितासी || कलशधर श्रीचिदंबरासी || प्रेक्षकजन पुण्यराशी || आनंदेंसी पाहती || २८ || निमेषपातें दर्शनासी विघ्न || होतां शब्द ठेविती विधीकारण[४] || काय केलासी निमेषनिर्माण || पावलासि जेणें फल काय || २९ || यापरी चिदंबरेश्वर || मनुष्याऐसा विचरे सत्वर || पातला बेडसूरासि सपरिवार || नाम स्मरत सदानंदें || ३० || गांवां येतां चिदंबर || फळपूगादिउपायनकर[५] || धांविन्नलें पौर नारीनर || स्वामीदर्शन घ्यावया || ३१ || स्वामीसी पाहतां ग्रामजन || फलपूगादि पुढें ठेवोन || आनंदें सांडोनि देहभान || साष्टांगें नमन पैं करिती || ३२ || स्वामी त्यांची भक्ती पाहोनी || आदरें सर्वांसी उठवोनी

१. भुकेनें व्याकुळलेले. २. घोडदळ. ३. नक्षत्रसमूहांत. ४. ब्रम्हदेवास. ५. नजराणा हातांत घेऊन.



शिवचिदम्बर

शि व चि द म्ब र

।। कुशल प्रश्न विचारूनी ।। आशूद्रादिका तोषवी ।। ३३ ।। मग बोलावूनि मल्लासी ।। पुसे क्षेमवृत्त आदरेंसी ।। कीं तव धर्माश्रित मजसी ।। स्मरसी बा प्रतिदिनीं ।। ३४ ।। चंद्रासी प्रतिदिनीं चातक ।। स्मरें जेंवि प्रीतिपूर्वक ।। तेंवि स्मरत तुजसी देख ।। आलों दर्शनार्थ येथवरी ।। ३५ ।। मल्ल म्हणे स्वामीसी ।। सर्वाश्रया जगन्नाथा मजसी ।। वाचे किमर्थ मोहविशी ।। आलों शरण पदकमळीं ।। ३६ ।। मी असें तुझा दास ।। तुझाचि होय हा निवास ।। येईं सत्वर तंव गृहास ।। ऐसें म्हणत नमितसे ।। ३७ ।। मग स्वामी सुमंदहंसित ।। सपरिवारें मल्लगृहाप्रत ।। पातला तद्दिनीं तोही भक्त ।। आतिथ्य करीं सयात्रिका ।। ३८ ।। चिदंबराची करूनी पूजा । नानाभक्ष्य परमान्ने सद्विजे ।। जेववुनी तोषविला दीक्षितराजा ।। मग प्रसाद घेतला आपण ।। ३७ ।। भोजन करूनि स्वामीसन्निध ।। पातला जंव परमानंदे ।। तंव आले ब्राम्हण द्वंद्व ।। अन्नार्थी दुर्भिक्षपीडित ।। ४० ।। पोट लागलें पाठीसी ।। दृष्टांत कूपाचा[1] डोळियांसी ।। नेत्रचि थारा प्राणांसी ।। शरीर बाकी त्वगस्थिमात्र[2] ।। ४१ ।। ऐसे दोघे ब्राम्हण ।। स्वामीसी पाहतां दुरोन ।। दंडापरी नमस्कारून ।। सद्गदित होवोनि विनविती ।। ४२ ।। महादेवा चिदंबरा ।। त्रिभुवनपालका सर्वेश्वरा ।। आमुचे सुदैवें कृपासागरा ।। भेटलासी अवतारपुरुषा ।। ४३ ।। दयाळा आम्ही दोघे ब्राम्हण ।। दारिद्र्यें जर्जर झालों जाण ।। त्यांत घरीं भारी कुटुंबजन ।। त्यांचे रक्षणीं थकलों देवा ।। ४४ ।। नित्य कुटुंबासी पोटभर अन्न ।। आधींच होतें मिळणें कठिण ।। त्यांत दुर्भिक्ष पडलें दारूण ।। अन्नान्न म्हणत चरफडती ।। ४५ ।। मरणोन्मुखाचे शिरीं ।। कडकडुनी वीज पडल्यापरी ।। जन्मदरिद्रियां आम्हां श्रीहरी ।। दुष्काळ हा भारी जाचतो ।। ४६ ।। नातरी नदीवेगें शिथिलमूल ।। आधींच लोंबतो वृक्ष केवळ ।। त्यावरी कुठारघाव[3] सबळ ।। पडल्यापरी काळ हा ।। ४७ ।। या समयीं अन्नपाण्याविण ।। सकुटुंब आम्हीं सोडावे प्राण ।। ऐसा केला होता निश्चय पूर्ण ।। आन उपाय न सुचे आम्हां ।। ४८ ।। इतुक्यांत तुझें यश पूर्ण ।। प्रवेशिलें

शिं व चि द म्ब र

१. आडाचा ( खांचेचा) २. हाडेंकातडें एवढेच ३. कुऱ्हाडीचा घाव.

आमुचें कर्णसदन[1] ।। मग आलों तव चरणां शरण ।। करीं प्राणरक्षण याउपरी ।। ४९ ।। घरीं कुटुंब आणि बाळ ।। अन्नावीण करती तळमळ ।। याउपरी त्यांचे रक्षण केवळ ।। तुझिये कृपेवीण नोहे देवा ।। ५० ।। दीनदयाळा अगा सांबा ।। पोटभरी अन्न देवोनि स्वयंभा ।। रक्षिं रक्षिं गा दीनकुटुंबा ।। ऐसें विनवित नमियले ।। ५१ ।। अश्रुधारा वाहे नेत्रीं ।। विप्रयुग्म लोळती भूवरी ।। त्यांसि पाहोनि स्वामीचे उदरीं ।। कृपा भारी उपजली ।। ५२ ।। बाळकांचे कष्ट पाहोनी ।। माता जेवि कळवळे मनीं ।। तेविं दीक्षितअतःकरणीं ।। करुणा उपजली परियेसा ।। ५३ ।। उठवोनि धरी पोटासी ।। अभय देत स्वामी उभयतांसी ।। जे मागें कष्ट जाहले तुम्हांसी ।। ते गेले मानसी धरा धीर ।। ५४ ।। आधीं करा स्वस्थपणें भोजन ।। मग तुमचे मनोरथ पूर्ण ।। निश्चयें करितो उमारमण ।। चित्तीं खंती करूं नये ।। ५५ ।। स्वामीचें अभयवचन ऐकोनी ।। ब्राम्हण गेले भोजनालागूनी ।। इकडे स्वामी मल्लासि बोलावुनी ।। धर्मज्ञान बोधित ।। ५६ ।। दुर्भिक्षीं जो अन्नदाता ।। सुभिक्षीं द्रव्य दे याचकाकरितां ।। भीतासि अभयदाता ।। हे तिघे मान्य शिवासी ।। ५७ ।। यास्तव या दोघां ब्राम्हणांसी ।। संवत्सरपूर्ती धान्यराशी ।। देउनी होईं शंकरासी ।। हर्षदाता यासमयीं ।। ५८ ।। दूर्भिक्षि किंचित जरी देशी ।। तेणें संतुष्टे शिव तुजसी ।। अनंत फळ देतो निश्चयेंसी ।। संशय मानसी आणूं नको ।। ५९ ।। ऐसें स्वामीचें वचन परिसोन ।। मल्ल विनवी पायीं वंदोन ।। स्वामी असे दुर्भिक्ष काळ कठिण ।। घरीं कुटुंब फार असे ।। ६० ।। अतिथींचा संमर्द[2] ।। नित्य होतसे बहुविध ।। आणि प्रत्यहीं भिक्षुकवृंद ।। द्वारीं आक्रंदती क्षणोक्षणीं ।। ६१ ।। निर्भयें या दुर्भिक्षांतुनी ।। कैसा पार पडेन म्हणोनी ।। चिंता करितों प्रतिदिनीं ।। पाळूं कैसी आज्ञा ही ।। ६२ ।। मुनी सांगे द्विजासी ।। मग चिदम्बरही मल्लासी ।। सदुपदेश देऊनि बहुवसी ।। दानशौंड ऐसें नाम दिधलें ।। ६३ ।। तोचि बोध तुम्हांसी ।। सांगतो ऐका एकोभावेंसी ।। श्रवणमात्रें मानसीं ।। कार्पण्य निश्चयें

१. कानावर. २. गर्दी.





शिव चिदम्बर

शि व चि द म्ब र

उरेना ।। ६४ ।। स्वामी म्हणे अगा मल्ला ।। धान्य किती असे तव संचयाला ।। सांग मग मी तुजला ।। सांगतो हित जेणें होय ।। ६५ ।। मल्ला म्हणे ऐक गुरुराया ।। अंगणीं आहेत या समया ।। यावनाळपेंव[१] नव संख्या ।। गृहीं खर्चही असे फार ।। ६६ ।। यापरी सत्य वचन ।। मल्लमुखें परिसोन ।। मग स्वामी सुहास्यवदन ।। बोलते जाहले तेधवां ।। ६७ ।। इतुके घरीं असतांही धान्य ।। केवढें करिशी बा कार्पण्य[२] ।। येणें काय होसी तूं धन्य ।। सत्यासत्य विचारीं ।। ६८ ।। धनधान्य जायापुत्र ।। गृह आणि आप्त स्वगोत्र ।। जरी असती सत्य निर्धार ।। तरीच चित्तीं धरी कृपणता ।। ६९ ।। नातरी तुझा प्रयास ।। व्यर्थ होईल निश्चयेंस ।। कासयाचा मानिसी विश्वास ।। मायामय संसारीं ।। ७० ।। येथें विद्युल्लताप्राय ।। नश्वर जाणपां भोगसमुदाय ।। तप्ततव्यांतील जलबिंदुप्राय ।। आयुष्य जाण प्राणियांचें ।। ७१ ।। सर्पमुखीं सांपडोनि भेक[२] ।। जैसा गिळूं इच्छी मशक[३] ।। तैसे संसारीं मूढ लोक ।। भोगसुख इच्छिती ।। ७२ ।। सुखाकरितां जें जें करी ।। तेणें दुःखचि मिळे भारी ।। तसे सुख स्वप्नोपम संसारी ।। पहा विचारूनि मानसीं ।। ७३ ।। रात्रीं एकत्र वसोनि पक्षीसंघ ।। जैसा प्रभातीं पावे वियोग ।। जायापुत्रादिकांचा संग ।। तयापरी जाणपां ।। ७४ ।। संपत्ती असे चंचल ।। तरंगापरी तारुण्य बरळ ।। रोगमंदिर देह केवळ ।। जाणपां सुख काय येथें ।। ७५ ।। ज्या देहसुखास्तव मनुष्य ।। कष्ट साहोनि करितो उपाय ।। तो हा जड देह पंचभूतमय ।। आत्मा त्याहूनि भिन्न असे ।। ७६ ।। उदरपूर्तीचिया इच्छेनें ।। जेंवि मूढ पेंव भरी अन्नें ।। तेंवि आत्मसुखाकारणें ।। देहपोषण यापरी ।। ७७ ।। निज शीतबाधा व्हावया दूर ।। जेंवि खरासि लेववी पीतांबर ।। तैसें जाणपां निर्धार ।। स्वहितार्थ देहरक्षण ।। ७८ ।। देहातिरिक्त आत्म्यासी ।। न जाणतां मूढ परियेसी ।। नाना संकल्प घेवोनि मानसीं ।। होतो कष्टांसि बळेंचि पात्र ।। ७९ ।। विचारें नेणता सुखवर्म ।। सुखार्थं करोनि नाना कर्म ।। बळेंचि नाना योनीभ्रम ।। पदरीं बांधितसे मनुज हा ।। ८० ।।

१. जोंधळ्याचे पेंव. २. चिक्कूपणा. ३. चिलटाला.

शि व चि द म्ब र

अवचित देह पडतां जाण ।। येथेंचि राहतें सुखसाधन ।। मायापाशास वश होवोन ।। जन्म मरण फेरा संपादितो ।। ८१ ।। सहज स्थिती गर्भी रक्षितो ।। तो कां आतां मोकलितो ।। रात्रदिवस भोंवतीं जागतो ।। कासया वाहसी स्वाभिमान ।। ८२ ।। तो जरी होय उपेक्षिता ।। मग तूंतें कोण रक्षितां ।। आपणा जरी आपण पाळितां ।। तरी मरती कोण सुखें ।। ८३ ।। यास्तव सोडीं देहबुद्धी ।। धर्ममती स्वीकारीं आधीं ।। तेणें तुज सुख मिळे त्रिशुद्धी ।। अंतीं रक्षिता धर्म एक ।। ८४ ।। गगनीं गंधर्व नगरापरी ।। किंवा मरुमरीचिका[1] ज्यापरी ।। तैसें दृश्य मिथ्या निर्धारी ।। आद्यंतीं आत्मा एक सत्य ।। ८५ ।। हे माझे म्हणोनि जयांवरी ।। प्रीति धरिशी तूं अंतरीं ।। शेखीं तेचि होती तुज वैरी ।। नानापरी दुःख द्यावया ।। ८६ ।। स्वकर्माधीन स्वजन ।। ते केंवि रक्षिती तुजलागोन ।। आपापलें करावया पालन ।। असमर्थ जे असताती ।। ८७ ।। आपणासि रक्षिता आपण ।। ऐसें असे श्रुतिवचन ।। श्रुतीवरी विश्वास ठेवोन ।। सोडीं चिंता संसाराची ।। ८८ ।। आत्मा असे सर्वव्यापक ।। चराचरीं तोच पूर्ण देख ।। त्याविण दृश्य सर्व मायिक ।। तत्तोषार्थ कर्म करीं ।। ८९ ।। चतुर्मुख[2] आदिकरून ।। सर्व जीवीं आत्मा पूर्ण ।। आत्मानुग्रहार्थ जाण ।। जीवसंतर्पण करावें ।। ९० ।। यास्तव तूं या समयीं ।। या दोघां ब्राम्हणांविषयीं ।। परमात्मबुद्धी करोनी पाहीं ।। धान्य देईं वर्षपूर्ती ।। ९१ ।। यापरी श्रीगुरुमुखें बोध ।। ऐकतां भक्त जाहला सुबुद्ध ।। आधीं वंदोनि श्रीगुरुपद ।। ब्राम्हणासी पाचारी ।। ९२ ।। म्हणें पेंव काढोनि तत्काळ ।। यथेच्छ घ्यावे यावनाळ ।। संवत्सरपूर्ती होय सबळ ।। कुटुंबासी तावन्मात्र ।। ९३ ।। यापरी भक्तवाणी ।। परिसोनि ब्राम्हण तत्क्षणीं ।। धान्य घेवोनि स्वामिचरणीं ।। वंदोनि निघते जाहले ।। ९४ ।। हा वृतांत ऐकून ।। प्रांतवासी ग्रामजन ।। धांविन्नले मल्लापाशी जाण ।। धान्यार्थी दुष्काळपीडित ।। ९५ ।। आधीं वंदोनि चिदम्बरासी ।। म्हणती दानशौडा परियेसी ।। आलों ऐकोनि तव कीर्तीसी ।। प्राण वांचविसी म्हणोनियां ।। ९६ ।। दुर्भिक्ष

शि व चि द म्ब र

१. मरुस्थानातींल मृगजल २. ब्रम्हदेव

शि
व
चि
द
म्ब
र

पीडितांचें कुटुंबरक्षण ।। धान्य देवोनि करिसी म्हणोन ।। आलों यश ऐकोन ।। प्राण वांचवीं प्रभुराया ।। ९७ ।। जनांची परिसोनि दैन्यवाणी ।। स्वामी बोले तेधवां हांसोनि ।। हा मल्ल असे दानशूराग्रणी ।। त्या सन्निधानीं माग जा ।। ९८ ।। जनांचे दैन्यवचन परिसोनी ।। तया उपरी चिंदंबरवाणी ।। ऐकोनि द्रवला अंतःकरणीं ।। भक्तराज तेधवां ।। ९९ ।। सर्व पेंवें उकरोनि पाही ।। धान्यराशी केली एक्या ठायीं ।। मग साष्टांगें नमूनि स्वामिपायीं ।। मधुर वचनें बोलत ।। १०० ।। सर्वात्मा चिदम्बर ।। अनंतरूपें येथवर ।। याचक होवोनि आले निर्धार ।। धान्य समर्पिलें श्रीपदीं ।। १ ।। स्वीकारावें धान्य निर्भय ।। कुटुंब संरक्षोनि पावा सौख्य ।। यापरी उच्चारोनि वाक्य ।। तुळसीपत्र ठेविलें धान्यावरी ।। २ ।। भक्तवचन परिसतां जन ।। धांविन्नले चहूंकडोन ।। एकापुढें एक सरे जाण ।। धान्य लुटती यथेच्छ ।। ३ ।। कोणी नेती खांद्यावरी ।। कोणी मोट वाहोनि शिरीं ।। कित्येक बैलगाड्यावरी ।। घेवोनि जाती निजमंदिरा ।। ४ ।। यापरी दिनत्रयपर्यंत ।। धान्य नेती जन समस्त ।। सर्व धान्य नेलिया विप्रजात ।। श्रीगुरुनाथ बोलतसे ।। ५ ।। मी बोलिलों सहज वाक्य ।। तुवां मानुनि तेंचि मुख्य ।। केलेंसी सर्व धान्य व्यय ।। पाळिसी कैसें पुढें स्वजना ।। ६ ।। स्वामीवचन परिसोनी ।। भक्तराज न ढळतां मनीं ।। श्रीगुरुपाया वंदोनी ।। सुहास्यमुखें बोलिला ।। ७ ।। समर्थ सर्वजीव नियंता ।। विश्वंभर जागता अन्नदाता ।। मज कायसी कुटुंबचिंता ।। पालनभार त्याचे शिरीं ।। ८ ।। तव वचनामृतपान करितां ।। सर्व चिंता दुरावली समर्था ।। दृष्टीस लाधली समता ।। तूंचि दिससी सर्वांकडे ।। ९ ।। भक्ताचा निश्चय पाहोनी ।। श्रीगुरूबोले मधुरवाणी ।। यापरीच जाणोनि अंतःकरणीं ।। शांती राखें अंतरीं ।। ११० ।। लौकिकार्थं बाह्य व्यवहार करीं ।। कार्य साधो न साधो तरी ।। व्यवहार मिथ्या जाणोनि अंतरीं ।। समत्वासी ढळूं नेदीं ।। ११ ।। प्रातःस्नान करोनि यथाविधी ।। भावें नित्यकर्म करीं आधीं ।। वेदपाठाविषयीं सुबुद्धी ।। आवडी असूं दे प्रतिदिनीं ।। १२ ।। वैभवानुसारें प्रत्यहीं ।। शिवपूजा करावी पाहीं ।। पितृतर्पण वैश्वदेवही ।। भावें आचरी अनुदिन

शि
व
चि
द
म्ब
र

शि
व
चि
द
म्ब
र

|| १३ ||.नैवेद्य दावूनि शिवासीं || आधीं अन्न देईं अतिथीसी || मग जेवीं घेउनी परिवारासी || शिवस्मरणे काळ कंठीं || १४|| यापरी कर्म आचरितां || कर्मबंध तुटे आयता || प्रवाहप्राप्त कर्म करितां || कर्मलेप नोहे निश्चित || १५ || यापरी मल्लासी सद्बोध || सांगोनि उठला आनंदकंद || पदरीं जोंधळें घेवोनि मंदमंद || चालिला पेंवापाशीं || १६ || रितें पाहूनि पेंवां || दया उपजली देवदेवां || ऐका प्रतिपेंवांत तेधवां || एकैक मुष्टी घातली || १७ || मग मल्लासि सांगे श्रीगुरू || तिसरे दिवशीं परिकरू || पेंवा काढोनि सत्वरू || धान्य अपारू संग्रहीं बा || १८ || आलिया अन्नार्थियासी || अन्न देईं आतृप्तीसी || जे येती याचक त्यांसी || धान्य देई परिपूर्ण || १९ || यापरी सांगोनि जगदीश || विस्तारोनि कर्माचार विशेष || सवें घेउनी यात्रिकांस || कुसुगल्लपुरीं पातला || १२० || इकडे मल्ल तिसरे दिवशीं || पेंव काढोनि स्वामिवचनासरसी || तंव यावनाळभरित पेंवासी || देखोनि मानसीं आनंदला || २१ || अगाध कौतुक पाहतां || विस्मय पावोनि चित्ता || म्हणे सद्गुरु चिदंबरताता || न कळे मूढा तुझी कळा || २२ || इतुकें वदोनि मल्ल मनीं || विश्वास ठेवोनि स्वामीवचनीं || प्रवर्तला अन्नदानी || ज्यापरी देवें प्रबोधिला || २३ || या मल्ल नामक भक्तयोगें || न वाटे प्रातंस्था दुष्काळाजोगें || देई याचक जें जें मागे || पुरवी चिदंबर तयासी || २४ || येणेंरीती दावुनी भक्तराणा || पुरवी जनांची मनकामना || लौकिकीं दावुनी भक्त अभिधाना || निवारी स्वयें दुष्काळभय || २५ || येणेंरीती चिदंबर || लीला दावोनि अपार || दीधलें ज़नां सुख थोर || म्हणोनि किंकर सांगतसे || २६ || स्वस्ति श्रीचिदंबरचरित || ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ || म्हणोनि ऐका श्रोते समस्त || त्रिंशोऽध्याय गोड हा || १२७ || इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे यज्ञवैभवखण्डे रिक्तभूखातपूरणं दुर्भिक्षनिवारणं च नाम त्रिंशोऽध्यायः || ३० || ओवीसंख्या १२७ ||

|| श्रीचिदम्बरार्पणमस्तु ||

शि
व
चि
द
म्ब
र

अन्नपूर्णाप्रकटनम्




मग माकणीवरी घट ठेविती । सवेचि जळपूर्ण घट दिसती । खाली उतरवोनि जलसमर्पिती ।
चारसहस्त्र जनां तेंव्हा

शिवचिदम्बर

॥ श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ॥ ॐ नमोजी सद्गुरुनाथा ॥ न कळे तुझी लीला कृपावंता ॥ परी वाटते माझ्या चित्ता ॥ उल्हास तवगुण गावया ॥ १ ॥ जेणेंरीती बेडसुर ग्रामीं ॥ दुष्काळभय निवारले स्वामीं ॥ त्याचपरी परियेसा तुम्ही ॥ नानागांवी भय वारिलें ॥ २ ॥ कुसुगल्लपुरा येतां श्रीगुरु ॥ मध्यान्हीं यात्रिक मिळाले अपारू ॥ तेथें अन्नपाण्याचे दुष्काळ थोरू ॥ कोसावरूनी आणिती जल ॥ ३ ॥ क्षुधातृष्णापीडित यात्रिक ॥ ॥ अन्नपाणी म्हणोनी फोडिती हांक ॥ त्यांचे ताप पाहोनि श्रीगुरुनायक ॥ आणवी साखर ताटभर ॥ ४ ॥ स्वामी सर्वांसी साखर वाटिती ॥ यात्रिक भक्षिती आतृप्ती ॥ चार सहस्त्र जन तेंव्हा होती ॥ तरी साखर न सरे ताटीं ॥ ५ ॥ इतुक्यांत आली एक माकण ॥ त्यावरी धांविन्नलें तृषित जन ॥ क्षणांत चारी घट जळपूर्ण ॥ यात्राजनें रिती केली ॥ ६ ॥ मागुती पाण्याची हाकाटी ॥ ऐकुनी श्रीगुरु कर्णपुटीं ॥ म्हणें न करा आतां अटाटी ॥ व्हा संतुष्टी सेवुनी जल ॥ ७ ॥ मग माकणीवरी घट ठेविती ॥ सर्वेचि जळपूर्ण घट दिसती ॥ खालीं उतरवोनि जळ समर्पिती ॥ रितें ठेविती माकणीवरी ॥ ८ ॥ भरिले ते खालीं घेती ॥ रिक्त ठेविती वरी मागुती ॥ चतुःसहस्त्र पावले तृप्ती ॥ तरी घट दिसतो जळपूर्ण ॥ ९ ॥ कित्येक तांब्या भरोनि नेती ॥ मग स्वस्थचित्तें विश्रांती घेती ॥ माकणींत परिपूर्ण दिसती ॥ घट ते जैसे तैसे ॥ १० ॥ मग इकडे श्रीचिदम्बर ॥ आठ पायली जोंधळे सत्वर ॥ दळवोनि अर्ध पीठ परिकर ॥ अर्ध कणी करवित ॥ ११ ॥ भरोनि ठेवी दोन पोतीं ॥ स्वामीकरवी पाक निगुती ॥ किती घेतांही पीठ कण्याप्रती ॥ न दिसे उणेपणा ॥ १२ ॥ चार घागर पाणीं ॥ ठेववी चार रांजणीं भरोनि ॥ किती घेतांही पाण्यालागोनि ॥ उणे न दिसे सर्वथा ॥ १३ ॥ कीं पीठ कण्याचा पर्वतलागला ॥ कीं रांजणांसि पाझर फुटला ॥ कीं चिदंबरलीलौघ प्रगटला ॥ दुष्काळभय निवाराया ॥ १४ ॥ यापरी आठ दिवस ॥ तेथे राहूनी सर्वेश ॥ मग नेमोनि ठेवी एकास ॥ आलिया अन्न द्यावया ॥ १५ ॥ म्हणे दुष्काळ सरेपर्यंत ॥ याचक जे येती त्यांना पर्याप्त ॥ पीठ कणी जळ आदरें देत ॥ राहें येथ म्हणे स्वामी ॥ १६ ॥ श्रीगुरुची

शिवचिदम्बर

शि व चि द म्ब र

लीला विचित्र ।। एक्यापुर्ते देताही पीठ नीर ।। त्यांतजेविती दहा नर ।। लीला वर्णावी कोठवरी ।। १७ ।। यापरी त्या प्रांतस्थांसी ।। निवारोनि दुर्भिक्षभयासी ।। सपरिवारें शिरहट्टीसी ।। पातला तो दयानिधी ।। १८ ।। तेथील जन दुर्भिक्षपीडित ।। त्यांचा आक्रोश ऐकोनि बहुत ।। चित्रलीला दावी गुरुनाथ ।। सांगतों संक्षिप्त परियेसा ।। १९ ।। कार्तिकमासीं प्रातःकाळीं ।। श्रीची स्वारी माडी चढली ।। चारी दिशा नमोनि त्यावेळीं ।। मेघजाळ उपजवी ।। २० ।। क्षणांत वर्षों लागले मेघ ।। सुखावला तत्पुरप्रांतभाग ।। यापरी अहोरात्र अभंग ।। पर्जन्य वर्षला ।। २१ ।। मागुती पर्जन्य निवारणार्थ ।। जनांची प्रार्थना ऐकुनी बहुत ।। पुनरपि श्रीगुरुनाथ ।। माडी चढोनि प्रार्थित ।। २२ ।। क्षणांत निरभ्र झालें गगन ।। मग जनांसी सांगे गुरुराण ।। शेतीं बीज पेरा सुखेंकरोन ।। येतें परिपूर्ण पीक हातां ।। २३ ।। स्वामीवचनें पेरितां बीज ।। ऐका जाहले महा चोज[1] ।। त्या प्रांतभागीं दुष्काळ निर्बीज ।। जाहले क्षेत्र पिकतां ।। २४ ।। सभोंवती पंच क्रोशांत ।। दुष्काळ उरला नाहीं किंचित ।। जन पावोनि सुख बहुत ।। श्रीगुरुनाथा भजूं लागले ।। २५ ।। सूर्य उदया समकाळ ।। प्रकाश जैसा पडे सोज्वळ ।। नातरी चंद्रासवें चंद्रिका[2] निर्मळ ।। भूतळीं प्रकाशे ज्यापरी ।। २६ ।। त्यापरी स्वामीसवें यात्राजन ।। चिदंबरलीलावश होवोन ।। नित्य असती परिपूर्ण ।। त्यांत दुष्काळ पातला ।। २७ ।। मग काय विचारावा यात्रालोट ।। नित्य येऊं लागली अलोट ।। स्वामीही निवारावया जनकष्ट ।। अन्नपूर्णेसी प्रगटवी ।। २८ ।। विश्वंभरनाम अन्वर्थ ।। दावी तेव्हां सद्गुरुनाथ ।। जैसे मिळती जन समस्त ।। तैसा हर्ष बहुत देवासी ।। २९ ।। कीं यादवांसवें श्रीकृष्ण ।। स्वपरिवारें कीं सीतारमण ।। आला करावया कलिमर्दन ।। तसा दयाघन शोभतसे ।। ३० ।। कीं दुष्काळरूपें मदोन्मत्त करीं[3] ।। त्यासवें भिडावया चिदंबर हरी[4] ।। तैसा येत महाराज भक्तकैवारी ।। भक्तसंकट निवारित ।। ३१ ।। अन्नदानें जना रक्षितो ।। इतुकेंचि ना ऐका सांगतों ।। याचकांचा पूर्ण करितो ।। दुर्धरही

.........................

१. आश्चर्य. २. चांदणें. ३. हत्ती. ४. सिंह.

शि व चि द म्ब र

मनोरथ ।। ३२ ।। एके दिवशीं चौघे ब्रम्हण ।। मार्गी एकमेकासी बोलोन ।। मनीं इच्छित मग येऊन ।। बैसले भोजनार्थ पंक्तींत ।। ३३ ।। स्वामी ओळखोनि त्यांचें इच्छित ।। चौघासी नेती घरांत ।। त्यांसी बैसवोनि निज पंक्तींत ।। तत्तदीहित[1] वाढवी ।। ३४ ।। एकासी वाढवी तूप पोळी ।। दुजिया मांडे साखर निवळी ।। तृतीयासी दही पोहे घाली ।। चौथ्या देत केशरभात ।। ३५ ।। यापरी चौघां ब्राम्हणां ।। मनःकल्पित पक्वान्ना ।। वाढितां चौघेही जाणा ।। लज्जायुक्त पैं झाले ।। ३६ ।। स्वामी आदरें वाढवीत ।। द्विज अपराधा क्षमा मागत ।। विनवीती स्वामीप्रत ।। त्यांचे अपेक्षित पुरवी स्वामी ।। ३७ ।। ऐशापरी लीलाधारी नानाचरित्रें खेळे भूवरी ।। भक्त अभक्त दुराचारी ।। त्यांचाही कैवारी चिदंबर हा ।। ३८ ।। ज्याचे सेवितां नामरसायन ।। जळती सर्व रोगगण ।। जन्ममरण फेरींतून ।। पार पडतो निश्च्चयें ।। ३९ ।। चिदंबर ऐसा दयानिधी ।। कोण मिळे त्रिलोकामधीं ।। सांगतों ऐका यथाविधी ।। श्रीगुरूची दयाळुता ।। ४० ।। एके दिवशी श्रीचिदंबर ।। सर्वे घेवोनि भक्ती परिवार ।। सहज निघाला गांवाबाहेर ।। शेतें सर्व अवलोकित ।। ४१ ।। कोणी घातले असती नांगर ।। कित्येक शीतांतपां[2] अपार ।। राहोनिया कष्ट थोर ।। साहती बैलांसहित ।। ४२ ।। त्यांसी पाहतां श्रीदीक्षित ।। कृपें द्रवोनि भक्तांप्रत ।। बोले होय जेणें स्वहित ।। वैराग्यप्राप्ती श्रोत्यांसी ।। ४३ ।। बाल्यापासुनी मरणावधी ।। जन कष्टती संसारामधीं ।। केव्हांही न भजती चित्तशुद्धी ।। सुखदायक शंकरासी ।। ४४ ।। मम मायावश होवोन ।। अज्ञ भोगिती जन्ममरण ।। प्रलय होतांही मोचन ।। मूढजन न पावती ।। ४५ ।। संसारीं भ्रांती पावोनि ।। भावी सुखीं चित्त ठेवोनि ।। नानाविध कष्ट सोसोनि ।। दुःखावरी दुःख पावती ।। ४६ ।। दुःखसमय येतां अवचित ।। औषधोपाय करिती बहुत ।। यत्न थकलिया मजप्रत ।। मग येती शरण ते ।। ४७ ।। दैवें आरोग्यदशा येतां ।। सर्वेचि प्रपंचलोलुपता ।। अंगिकारोनि मागुता ।। विसरताती मजलागी ।। ४८ ।। यापरी माझी दुर्धर माया ।। उपायें अशक्य तरावया

१. त्यांचें इष्ट २. थंडीतही.




शिवचिदम्बर

शि व चि द म्ब र

।। जे शरण येती मज पायां ।। तेचि तरती मायेंतुनी ।। ४९ ।। यापरी भक्तासवें ।। स्वामी बोलतां आनंदभावें ।। जें भक्तासी बोधिलें देवें ।। तें सांद्यंत शूद्रें ऐकिले ।। ५० ।। तंव शूद्र आला धावोंनि ।। विनवी आडवा पडोनि ।। स्वभावें आमुची तामस योनी ।। आम्हां कोठोनि येवढें ज्ञान ।। ५१ ।। जाया पुत्र गृह धन ।। हेंच आम्ही सत्य मानोन ।। संसारीं घेतसों भ्रमण ।। तुझें स्मरण घडे केधवां ।। ५२ ।। आमुच्या सुदैवें या वेळा ।। भेटलासी तूं दयाळा ।। आतां काय केलिया तुजला ।। प्रिय होऊं सांगपा ।। ५३ ।। किती ही गचका खाती ।। श्वानसंयोगापरी मूढ चित्तीं ।। संसारीं न कधीं कंटाळती ।। मागुती तेथेंची गुंतती ।। ५४ ।। कोणाचा असे हा आग्रह ।। काय केलिया संसारमोह ।। दुरावे ऐसा बोधप्रवाह ।। प्रेरोनि पावन करी ।। ५५ ।। यापरी शूद्रव्याहार[1] ।। ऐकोनि बोले चिदंबर ।। बोधासी योग्य हा शूद्र ।। शिवशास्त्री बोधा यासी ।। ५६ ।। श्रीगुरु आज्ञा मानोनी शिरीं ।। आधीं वंदोनि दीक्षितांध्री ।। जेंवि बोध शूद्रांतरीं ।। ठसे तैसा उपदेशित ।। ५७ ।। शास्त्री म्हणे शूद्रासी ।। तुजवरी गुरुकृपाराशी ।। असे यास्तव मार्गासी ।। सांगतों ऐके यावेळीं ।। ५८ ।। अगा संसारकष्टासी कारण ।। मुख्य जाणपां देहाभिमान ।। तो गेलिया पूर्ण ज्ञान ।। लाधे सहसा गुरुकृपें ।। ५९ ।। ज्ञानप्राप्तीची युक्ती ।। सांगतों ऐकपा यारीतीं ।। गुरुवचनीं आणि शिवावरती ।। जो विश्वास तीच भक्ती ।। ६० ।। भक्तीनें शंकरा भजतां ।। निजानंद येतसे हातां ।। सर्वत्र पूर्ण शंकराची सत्ता ।। त्यासी नेणतां दुःख भोगिसी ।। ६१ ।। यास्तव शिवज्ञान व्हावया ।। मार्ग सांगतो तुज या समय ।। गुरुवचनीं विश्वास ठेवोनिया ।। नित्य अभ्यास करावा ।। ६२ ।। नित्याभ्यासावांचोनि ।। भक्ती न ठसे अंतःकरणीं ।। ऐसे शास्त्रीवचन ऐकोनि ।। शूद्र वंदोनि विनवित ।। ६३ ।। स्वामी करावा अभ्यास ।। कवण्यापरी आणि कोण देवास ।। भजतां ठसे विश्वास ।। सांगा आम्हांस तोचि मार्ग ।। ६४ ।। मग बोले मधुर वाणी ।। शास्त्री लक्ष ठेवुनी गुरुचरणीं ।। ऐक ब्राम्हमुहूर्तीं उठोनि ।।

शि व चि द म्ब र

१. शूद्राचें वचन

आधीं चिंतावे गुरुचरण ।। ६५ ।। मग मुखें नाग उच्चारित ।। शुचिष्मंत होवोनि चित्तांत ।। गुरुमूर्ती ध्यावी सुप्रीत ।। आपादमस्तक एकोमनें ।। ६६ ।। श्यामसुंदर कौमार वयस्क ।। सुंदरावयव सरळ नासिक ।। कंबुकंधर पंकजाक्ष देख ।। ध्यावें गुरूसी हृत्कमळीं ।। ६७ ।। अमौल्यरत्नखचित ।। किरीट मस्तकी लखलखित ।। सद्रत्न कुंडलमंडितें ।। कर्णप्रांत साजिरा ।। ६८ ।। आदर्शापरी गंडस्थळ ।। पोंवळ्यासारिखे अधरयुगल ।। शोभती ज्याचे सोज्वळ ।। चिदंबर गुरु ऐसा हा ।। ६९ ।। मंदहास कुंददंत ।। विशाल हृदयीं रत्नजडित ।। मुक्तामाळ पदक गर्भित ।। शोभतसे सूर्यापरी ।। ७० ।। भुजंगापरी सरळ भुजीं ।। सुंगध चर्चिलासे श्रीयाजी ।। उन्नत अंसद्वयामाजी ।। केयूर विराजे रत्नभूषित ।। ७१ ।। वलित्रयें ललित उदर ।। तेथें शोभे नाभि गंभीर ।। त्यांत उपजोनि हृन्मंडपावर ।। रोमलता विराजे ।। ७२ ।। पीतांबर काश्मीर ।। कासे कशिलासे सुंदर ।। त्यांत करभोरु युगलतर ।। मनोहर शोभतसे ।। ७३ ।। वृत्त जानु रम्य पोटऱ्या ।। गूढगुल्फ पद्मपाद ज्याचिया ।। स्थान सद्भक्तहृदयीं शूद्रार्या ।। ऐसें गुरुरूप ध्यान करी ।। ७४ ।। अष्टपत्र हृदयकमळीं ।। सोमसूर्याग्नि प्रकार मेळीं ।। सुंदर गुरुमूर्ती बैसली ।। ऐसे ध्यान धरी बा ।। ७५ ।। ज्याचा नखचंद्रप्रकाश ।। लोपवी सर्व प्रकाशास ।। कटक कटि सूत्रादिक विशेष ।। अलंकार ल्यालासे ।। ७६ ।। दोही भागीं दोही सती ।। सावित्री आणि सरस्वती ।। स्वामीं पार्श्वभागी शोभती ।। मध्यें गुरुमूर्ती बैसलीसे ।। ७७ ।। स्वस्तिकासनी बैसलासे ।। अमृतपूर्ण गुंडी विलसे ।। भस्म सर्वांगीं चर्चिलेंसें ।। त्यावरी भासे त्रिपुंड्र ।। ७८ ।। केशरीगंध ललाटीं ।। वरी कस्तूरी टिळक गोमटी ।। रुद्राक्ष हार शोभे कंठी ।। पाहे कृपादृष्टीं भक्तांकडे ।। ७९ ।। प्रसाद सुमुख सौम्य दर्शन ।। सुमंदहास लावण्यपूर्ण ।। आंम्रेडित[1] ज्याचें भाषण ।। सवत्र पूर्ण जो निजसत्तें ।। ८० ।। चित्त करोनि निर्विकल्प ।। ध्यायीं बा ऐसें गुरुरूप ।। क्षणांत नासोनि सर्व पाप ।। होय पुण्यरूप साधक ।। ८१ ।। प्रेमार्द्रचित्तें मनीं ।। मुहूर्तमात्र ध्यान करोनि ।। मग आसन पाद्य

..............................

१. मधुर



शिवचिदम्बर

देवोनि ।। नाना उपचारें पूजीं बा ।। ८२ ।। ज्या ज्या तुजसी अपूर्व वस्तू ।। दुर्मिळ म्हणुनी साधण्या तूं ।। यत्न करिशी त्या समस्तु ।। अर्पी शंकरासी प्रेमभावें ।। ८३ ।। प्रत्यक्ष समर्पितां उपचार ।। यापरी न पवे शिवासी हर्ष थोर ।। मानस पूजेनें श्रीगुरुवर ।। आनंद अपार पावतो ।। ८४ ।। यापरी भावें पूजन ।। करोनि करीं नमन ।। चरणीं शिर ठेवोन ।। करीं प्रार्थना यारीतीं ।। ८५ ।। घोर संसार सागरीं ।। पडोनि कष्टलों दयाळा भारी ।। माझें संसारभय निवारी ।। याउपरी देवराया ।। ८६ ।। यापरी ध्यावोनि हृदयीं ।। पूजी बा नियमें प्रत्यहीं ।। उत्थानादि[1] स्वापपर्यंत[2] पाहीं ।। गुरुनाम भावें जपावें ।। ८७ ।। जेथें होय दृष्टी प्रचार ।। तेथें भावीपा शंकर ।। अवश्य कर्तव्य जो व्यवहार ।। करावा निर्हेतुक ।। ८८ ।। कर्ता देव चिदंबर ।। ऐसें दृढ करोनि अंतर ।। न होतां चिंतेसी पात्र ।। पांथापरी[3] राहे घरीं ।। ८९ ।। श्वान चांडाल आदिकरोनि ।। सर्वत्र देव व्यापक म्हणोनि ।। नम्रभावे सर्वांलागोनि ।। आदरें मानीं देवापरी ।। ९० ।। कामक्रोध दवडोनि दूर ।। शांत मनें होईं बा स्थिर ।। पाणप्रोई जेंवि व्यवहार ।। त्यापरी कुटुंबीं संग धरी ।। ९१ ।। शिवापेक्षां अधिक भक्ती ।। शिवभक्तावरी करी निश्चिती ।। सर्वस्व अर्पी शिवाप्रती ।। जे जे प्रीतीपात्र आपणा ।। ९२ ।। देव गुरु आणि भक्त ।। येथें न पाहे बा द्वैत ।। सर्वात्मा श्रीगुरुनाथ ।। एकचि से सर्वां ठायीं ।। ९३ ।। भजन पूजा पुराणश्रवण ।। प्रत्यहीं करावें भाव धरोन ।। पर्वीं उपोषण जागरण ।। शिवाकारणें करित जावें ।। ९४ ।। नित्य करा अन्नदान ।। यापरी भक्तिमार्गाचरण ।। करितां तुष्टें सावित्रीरमण ।। कर्मबंधन छेद करी ।। ९५ ।। इहलोकीं मान्य होवोनि ।। अंतीं बैसे कैलाससदनीं ।। यापरी शास्त्री बोलोनी ।। गुरुध्यानीं बैसला ।। ९६ ।। तंव बोले चिदंबर ।। ऐकलास कां तूं एकाग्र ।। जो सांगितला बोध थोर ।। भक्तराजें तुजप्रती ।। ९७ ।। भावें आचरी त्यारीतीं ।। येणें मोहनदी तरसी निश्चिती ।। अंती पावसी सायुज्य गती ।। नाणी चित्तीं भवव्यथा ।। ९८ ।। यापरी बोलोनि श्रीगुरु ।।

१. उठल्यापासून २. झोंपेपर्यंत ३. वाटसरूंप्रमाणे

त्याचे शेतीं प्रवेशला सत्वरू ।। सर्वत्र करित करित प्रचारू[1] ।। पाचारूनि म्हणे शूद्रासी ।। ९९ ।। भूप्रदेश दाखवोनि एक ।। एथें भूमी खणी गा सम्यक ।। स्वामी वचनापरी खणिता देख ।। शूद्रासी निधी लाधला ।। १०० ।। तंव तो घट घेवोनि शूद्र ।। आनंदेपूर्ण अंतर ।। स्वामीपुढें ठेवूनि सत्वर ।। नमन करी दंडवत ।। १ ।। हे पाहोनि श्रीचिदंबर ।। शूद्रासी आज्ञापि निर्धार ।। द्रव्य घेवोनि प्रवेशी मंदिर ।। उक्तप्रकारें आचरी ।। २ ।। यापरी शूद्रासी बोध ।। सांगोनि भक्तासवें आनंदकंद ।। परतोनि मंदमंद ।। निजमंदिरीं प्रवेशी ।। ३ ।। शूद्र तो द्रव्य घेवोनि समस्त ।। उकसाबुकसी स्फुदंत ।। श्रीगुरुलीला अद्‌भुत ।। चित्तीं स्मरत घरा पातला ।। ४ ।। शांस्त्रीनीं बोध ज्यारीतीं ।। केला होता आपणाप्रती ।। त्यारीतीं आचरित भक्ती ।। सरस्वतीपतीस भजूं लागला ।। ५ ।। चिदंबरकृपें इहलोकी ।। धनपुत्रादिकें झाला सुखी ।। दातृत्वें प्रख्यात होवोनि शेखीं[2] ।। शिवलोकीं बैसला ।। ६ ।। यापरी चिदंबरदीक्षित ।। इहपराचे द्यावया स्वहित ।। कल्पवृक्षाहुनी यश उन्नत ।। वाढवित लोकत्रयीं ।। ७ ।। जो चिदंबरीं विश्वास ठेवी ।। होवोनी इहलोकीं सुस्वभावीं ।। अंतीं ऐक्य पावे सदाशिवीं ।। म्हणोनि सांगे चिदंबरकिंकर ।। ८ ।। स्वस्ति श्रीचिदंबरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्‌गुरुनाथ ।। यास्तव ऐका श्रोते समस्त ।। एकत्रिंशोऽध्याय स्वादुतर हा ।। १०९ ।। इति श्रीचिदंबरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे यज्ञवैभवखण्डे अन्नपूर्णाप्रगटनं मनोभीष्टभोजनं नाम एकत्रिंशोऽध्यायः ।। ३१ ।। ओवीसंख्या १०९ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

........................

१. संचार २. शेवटी




शिव चिदम्बर

# द्विजव्रणनिवारणम्




तया पुसे श्रीगुरू । व्रण दावी सावरू ॥ द्विज ऐकोनि स्वामीवचनातें । बंधन उकलोनि व्रणातें ।

पाहता व्रणचिन्हही तेथें । न दिसता विस्मय पावला

चिदम्बरचरित्र

अध्याय बत्तिसावा

शि
व
चि
द
म्ब
र

॥ श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ॥ अरूपही चिदंबर ॥ भक्तासाठीं रूप अपार ॥ दावोनि धरितो नानावतार ॥ त्या चिदंबरा वंदू आतां ॥ १ ॥ यापरी शिरहट्टीपुरीं ॥ महिमा दावित नानापरी ॥ वसत असतां श्रीहरी ॥ नानाविध यात्रा येती ॥ २ ॥ ऐसे वर्ततां चिक्कोडीपुरीं ॥ अण्णंभट्टनामें विप्र सदाचारी ॥ कदाचित तो कांतेवरी ॥ आला कोपुनी गुरुजवळी ॥ ३ ॥ येथें कांहीं दिवस ॥ वसत असतां त्याच्या कांतेस ॥ वर्तमान कळतां पुत्रास ॥ घेवोनि तेथें पातली ॥ ४ ॥ तिणें स्वामीसी वंदुनी आधीं ॥ पुत्र समर्पोनि पतिपदीं ॥ नमितां तो होवोनि क्रोधी ॥ शिळें मारूं धांवत ॥ ५ ॥ तंव ती शरण श्रीगुरूसी ॥ गेली भिवोनि मानसीं ॥ मग बोले कृपारांशी ॥ द्विजासी संबोधुनी ॥ ६ ॥ अगा आधींच जो जाणता ॥ त्यानें पाणिग्रहण करूं नये तत्त्वतां ॥ अंगीकारोनि मग त्यजितां ॥ नरकभोग होय त्यासी ॥ ७ ॥ कांतात्यागा प्रमाण तुजसी ॥ सांगतों सावधपणें ऐकसी ॥ होय जरी अप्रजा सती तीसी ॥ सोडावी दहा वर्षांवरी ॥ ८ ॥ भर्तृविद्वेषिणी धर्मवारिणी ॥ शिशुघ्नी आणि व्याभिचरिणी ॥ तत्काळ सोडावी सुज्ञ जनांनीं ॥ कालनियम नसे तिशीं ॥ ९ ॥ धर्मपत्नी घरीं असतां ॥ तीसी सोडोनि उपाय करितां ॥ बहुहीन ये सुखलेश हातां ॥ ऐसे बोलती धर्मशास्त्र ॥ १० ॥ येन केन प्रकारेण ॥ करावें कुटुंबरक्षण ॥ अंगीकारोनि त्यजितां जाण ॥ यमशिक्षेसी पात्र होय ॥ ११ ॥ यापरी मनुयाज्ञवल्क्य ॥ पराशर आणि दत्तात्रेय ॥ आदिकरोनि स्मृतिकार वाक्य ॥ नानापरी बोधिती ॥ १२ ॥ यास्तव तूंही साध्वीसी ॥ सुखें घेवोनी प्रपंचासी ॥ करी जायीं निज गृहासी ॥ धर्मपत्नीसी न सोडी बा ॥ १३ ॥ यापरी श्रीगुरुवचन ॥ ऐकतां झाला क्रोधायमान ॥ गुरुवचनासी धिक्कारोन ॥ निघोन गेला अन्य गृहां ॥ १४ ॥ तो गेलिया महाकोपें ॥ स्वामी तीसी म्हणे पूर्णकृपें ॥ आई धीर धरी निष्पापें ॥ स्वीकारितो तूतें आपोआप ॥ १५ ॥ मग तथास्तु म्हणोनि ती बाई ॥ राहिली स्वामीजवळी पाही ॥ स्वामीसी पक्षपाती म्हणत तोही ॥ परगृहीं राहिला ॥ १६ ॥ चित्रलीला श्रीगुरुची ॥ बुद्धी पालटतां विप्राची ॥ लोक करूं लागले छी छी ॥ आली प्रचीत तेचि

शि
व
चि
द
म्ब
र

रात्रीं ।। १७ ।। गुरु आज्ञोल्लंघनें उदित ।। मांडीवरी व्रण अद्‌भुत ।। उपजतां विप्र जाहला व्यथित ।। शोकें आक्रांत करूं लागला ।। १८ ।। क्षणांत व्रणदाह वाढला ।। साहूं न शके ऐसा जाहला ।। प्राणापायभयें विप्र भ्याला ।। शरण आला गुरूसी ।। १९ ।। आक्रंदोनि म्हणे त्रिपुरारी देवा मज अनाथा तारि तारि ।। अपराध घडला मज भारी ।। तुजवरी क्रोधावता ।। २० ।। ऐसिया पाहतां द्विजासी ।। स्वामी बोले सुमंदहासी ।। कां बा तूं येथ आलासी ।। अन्य गृहासी जाईं सुखें ।। २१ ।। मी असें स्त्रीपक्षपाती ।। तूं अससी वैराग्यमूर्ती ।। कां आलासी मजप्रती ।। जाय सुखार्थी स्वेच्छंदें ।। २२ ।। नेणतां तुझा अगाध महिमा ।। धिक्कारिलें तुज पुरुषोत्तमा ।। तेणे कष्ट पावलों आनंदधामा ।। सोडवी मजला दुःखापासुनी ।। २४ ।। तूं जरी क्रुद्ध होसी ।। भूमी अवघी भस्मराशी ।। तृणावरी कृपा करिसी ।। पर्वत जाळि तें क्षणामाजी ।। २५ ।। अगा समर्था गुरुराया ।। सोडवी या व्रणभया ।। ना तरी जातों यमालया ।। व्रणदाह सोसवेना ।। २६ ।। बैसावया चालावया ।। अशक्त जाहलों गुरुराया ।। या उपरीं तुझे वाक्या ।। पाळितों म्हणे आण वाहोनि ।। २७ ।। मग स्वामी पुसे विप्रासी ।। सत्य माझें वाक्य पाळिसी ।। कीं देवाची आण वाहसी ।। तरी ही पत्नी स्वीकारी ।। २८ ।। द्विज म्हणे शपथ करितों ।। निश्चयें जाया स्वीकारितों ।। असह्य दुःखें प्राण सोडितों ।। आधीं वाचवी यांतुनी ।। २९ ।। तंव म्हणे द्विजासी श्रीगुरू ।। व्रण दावी कोठें सत्वरू ।। पाहोनि करीन प्रतिकारू ।। कासया थोरू आक्रंदिसी ।। ३० ।। द्विज ऐकोनि स्वामीवचनातें ।। बंधन उकलोनि व्रणातें ।। पाहतां व्रणचिन्हही तेथें ।। न दिसतां विस्मया पावला ।। ३१ ।। म्हणे समर्था कृपावंता ।। अगाध असे तुझी सत्ता ।। माझा अपराध गुरुनाथा ।। नाणी चित्ता दयाळा ।। ३२ ।। यापरी तो ब्राम्हण ।। पश्चात्तापें करितां नमन ।। म्हणें तेधवां सावित्रीरमण ।। भार्येसवें सुखें रहा ।। ३३ ।। मग तो विनवी श्रीगुरूसी ।। असार संसारभयें तुजसी ।। शरण येतां मागुती मजसी ।। तेथें घालिसी

१. अर्धनारी नटेश्वर २. चार्वाकशास्त्रास ३. कलिदोषसमूह ४. पाणपोई




शिवचिदम्बर

नसे उपाय ।। ३४ ।। आपण सर्वज्ञ जाणते ।। मागुती बळें संसारातें ।। करावया बोधितां मातें ।। माझेंच दुदैव बलिष्ठ ।। ३५ ।। यापरी ब्राम्हणभाषा ।। ऐकतांचि स्वामी सहसा ।। वर्षावत वाङ्मधुररसा ।। बोलता झाला तयासि ।। ३६ ।। अगा ज्ञानमार्ग सोडोनि ।। बोले जेंवि ब्रम्हज्ञानी ।। त्यापरी बोलसी म्हणोनी ।। माझे मनीं विस्मय होत ।। ३७ ।। ज्यापरी अज्ञ मनुष्य ।। तृषेनें इच्छोनि पानीय ।। धांवें सांडोनि कूपतोय ।। मरीचितोय[1] घ्यावया ।। ३८ ।। ना तरी पात्रस्थ अन्न सोडोनि ।। मनोराज्यें मांडे खाऊं म्हणोनि ।। झटें जैसा प्रौढ अज्ञानी ।। तैसें तूं मनीं वैराग्य इच्छिसी सत्यसंसार असार होय ।। यांत असंगत्व हेंचि मुख्य ।। कीं कुटुंब त्यागितां वैराग्य होय ।। हा असे अयोग्य विचार ।। ४० ।। देहाभिमान असतां एक ।। भार्यादिकांवरी ममत्व होय देख ।। तेणें क्रोध हर्ष शोक ।। चित्तीं उठती सहसा ते ।। ४१ ।। ज्या उद्देशें सुख तुजला ।। व्हावें म्हणोनि करशी यत्न भला ।। तो देह अंतीं कृमिविड्भस्माला ।। मुख्य पात्र जडरूप ।। ४२ ।। देहाभिमान असतां जागत ।। कसें तुझें असंगत्व ।। काम क्रोध वैरी निश्चित ।। मूळ होत संसारासी ।। ४३ ।। योगीयाचेही महातप ।। क्षणांत गिळती हे कामकोप ।। त्या दोहीं जरी बद्धनिजरूप ।। होय सोपा मोक्ष कवणां ।। ४४ ।। यास्तव मोक्ष मार्ग तुजला ।। सांगतों ऐक विप्रा भला ।। जो न स्पर्शी कामक्रोधाला ।। तोचि मोक्षाला अधिकारी ।। ४५ ।। कामक्रोधत्यागाविण ।। कल्पांतीहीं संसारमोचन ।। न मिळे हे निश्चय जाण ।। श्रुतिवचन असे या रीती ।। ४६ ।। त्या दोघांसी बाळगोनि ।। तप करित राहतांही वनीं ।। सुख न लाधतां तिळमात्र झणी ।। केवळ श्रमभागी होतसे ।। ४७ ।। वनीं तप करण्यापेक्षा ।। घरीं राहोनि स्वधर्मदीक्षा ।। घेवोनि जो करी सुखापेक्षा ।। तो पावे मोक्षा सुलभत्वें ।। ४८ ।। विषयशत्रू जिंकावया ।। सुलभोपाय गार्हस्थ्य व्दिजवर्या ।। गडांत राहोनि वैरी जया ।। नृप पावें जैसा निरायासें ।। ४९ ।। ज्याचें मन असे स्वाधीन ।। तो घरीं असतांही अलिप्त जाण ।। परतंत्र असे ज्याचें मन ।। त्यासी साधन न घडे कदापि ।। ५० ।। यास्तव



शिवचिदम्बर

शि व चि द म्ब र

तूं घरीं राहोन ।। जायापुत्रादिकांचें रक्षण ।। करित व्यवहार करी पूर्ण ।। निःसंगपण धरोनि चित्तीं ।। ५१ ।। आत्मा असे अलिप्त निःसंग ।। सच्चिदानंद अभंग ।। इंद्रियें कर्म करतांही सांग ।। आत्मा असंगत्वें वेगळाचि ।। ५२ ।। आकाशापरी सर्वगत ।। आत्मा असे सर्व व्याप्त ।। स्फटिक जैसा रक्तपुष्पस्थ ।। तैसा अलिप्त आत्मा सर्वत्र ।। ५३ ।। संसारगुण आत्म्यासीं नलगे ।। तरी नेणती अज्ञानयोगें ।। देहाध्यासें ब्रह्म संसाऱ्याजोगें ।। अज्ञ दृष्टीसी भासतें ।। ५४ ।। सर्व प्रकाशकही भानू ।। जैसा अभ्रयोगें म्हणावी आच्छन्नू ।। तैसा अज्ञानें आत्म्यासी जनू ।। म्हणती संसारी ऐसा ।। ५५ ।। यास्तव स्वाज्ञान निवारणार्थ ।। गुरूपदेशें वेदांतपथ ।। जाणोनि भक्तिश्रध्दापुरस्कृत ।। विचार सतत करावा ।। ५६ ।। नित्याभ्यासाविण आत्मज्ञान ।। कल्पांतींही न वाढे जाण ।। नित्याभ्यासें ज्ञानविज्ञान ।। वाढोन मुक्ती लाधते ।। ५७ ।। आधीं करावें एकांत सेवन ।। मग करावें प्राणपूरण ।। कुंभक आणि रेचन ।। हळूहळू अभ्यासावे ।। ५८ ।। यापरी अभ्यासितां प्राण ।। तेणें होय मन स्वाधीन ।। मन स्वतंत्र होतां अंतःकरण ।। पावे समाधान निर्विकल्पत्वें ।। ५९ ।। मग विचारावी यारीतीं ।। अन्नप्राण मनोविज्ञान स्थिती ।। आनंद ऐसें पंचकोशाप्रती ।। सोडोनि आत्मस्थिती धुंडावी ।। ६० ।। हा स्थूलदेह अन्नमयकोश ।। याचा जाणता जो निर्विशेष ।। तोचि आत्मा चित्प्रकाश ।। साक्षी तोचि मी ऐसें मानी ।। ६१ ।। लिंगदेहीं असती तीन कोश ।। प्राण मन विज्ञान नाम त्यांस ।। पंचकर्मेंद्रियें पंचप्राणांस ।। प्राणकोश नाम असे ।। ६२ ।। चित्त मन ज्ञानेंद्रिय पंचक ।। नाम याचें मनोमय देख ।। अहंकार बुध्दीसी विज्ञान संज्ञक ।। कोश ऐसें नाम असें ।। ६३ ।। ऐसा जो कोशत्रयात्मक ।। दुजा देह जाण लिंग संज्ञक ।। तेथें वसतो देहचालक ।। जीवनामें आत्मप्रतिबिंब ।। ६४ ।। जीवासी जे हर्ष शोक ।। कर्मानुसारें प्रदायक ।। अज्ञान ते कारण देह देख ।। आनंद संज्ञक कोश हाचि ।। ६५ ।। यापरी तीन देह पंचकोश ।। याचा विचार करोनि विशेष ।। ओळखावें साक्षि चैतन्यास ।। तेणें जीवास मुक्ती लाधे ।। ६६ ।। तीन देहांचा जो जाणता ।। तोचि साक्ष्यात्मा मी ज्ञाता ।। सर्व प्रकाशक

शि व चि द म्ब र



2AB

माझीच सत्ता ।। मज जाणता कोण दुजा ।। ६७ ।। साक्षी मी इंद्रियातीत ।। स्वप्रकाश मी सर्वगत ।। ऐसें निजरूपध्यानें सतत ।। देहत्रयाभिमान निरसावा ।। ६८ ।। देहामाजीं जो अवकाश ।। तत्पूर्ण आत्मा निरवकाश ।। सर्वसाक्षी न शिवे देहगुणास ।। देहीं वसोनि अलिप्तपणें ।। ६९ ।। तेथें ठेवोनिया मन ।। पूर्ण धरावें समाधान ।। जरी विषयावरी जाय मन ।। मागुती आणोनि वैसवी तेथें ।। ७० ।। यापरी नित्याभ्यासें चित्ता ।। बळें आणोनि आत्मवश करितां ।। स्वानंदानुभव लाधे हातां ।। तोंवरी यत्नें अभ्यास करी ।। ७१ ।। दृश्य सर्व मायिक ।। मिथ्याच भासे काल्पनिक ।। यापरी संकल्पबीज सग्यक ।। जाळोनि निर्विकल्पक साधीं बा ।। ७२ ।। हृदयस्थ सर्व कामना जेधवा ।। समूळ नाश पावे तेधवा ।। शाश्वत सुख ब्रम्हानुभवा ।। पावे जीव अभ्यासयोगें ।। ७३ ।। जोंवरी वासना नोहे क्षीण ।। तोंवरी अभ्यास करावा निक्षून ।। वारंवार दृश्य विलोकन ।। आत्मस्वरूपीं करावें ।। ७४ ।। चैतन्यावीण अल्पही ।। वस्तुजात कांहीं नाहीं ।। ऐसें ब्रम्हानुभवें जाणोनि पाही ।। इच्छेनुरूप कार्य करीं ।। ७५ ।। जोंवरी मी कर्ता मी भोक्ता ।। ऐसे उपजे अहंकारता ।। तोंवरी अभ्यास तत्वता ।। करी बा सतत यत्नें ।। ७६ ।। येणेंपरी सदाचार करित ।। प्रपंचीं कुटुंब सांभाळित ।। विषयभोग करीं बा स्वस्थ ।। तरी कर्मलेप नोहे तुजसी ।। ७७ ।। कां ठसला माझा बोध ।। कीं जायापुत्रावरि करिसी क्रोध ।। किंवा पाळिसी धरोनि आनंद ।। जो तुझा छंद सांग आतां ।। ७८ ।। तंव म्हणे स्वामीसी आण्णंभट्ट ।। तुझा बोध ऐकतां स्पष्ट ।। माझा मोह झाला नष्ट ।। यापुढें तुझी आज्ञा पाळितों ।। ७९ ।। यापरी बोलोनि ब्राम्हण ।। स्वामीसी करोनि नमन ।। स्वामी आज्ञें सतीपुत्रा घेवोन ।। निज निकेतना[1] पातला ।। ८० ।। घरीं श्रीगुरुबोधासारिखे ।। सदाचार करित हरिखें ।। कुटुंब संरक्षित सुखें ।। शंकरभजनीं विनटला ।। ८१ ।। यापरी सदाचार करितां ।। अत्यंत शांती द्विजचित्ता ।। आली तेणें गुरुभक्तता ।। सर्वथा प्रगटली त्याची ।। ८२ ।। ज्याच्या बोधें मंदही ।। ब्रम्हज्ञान

१. घरीं.




शिव चिदम्बर

पावतो हृदयीं ।। चित्त ठेवोनि त्या दीक्षितपायीं ।। चिदम्बरकिंकर निवे मनीं ।। ८३ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ ।। यास्तव ऐका श्रोते समस्त ।। द्वात्रिंशोऽध्याय गोड हा ।। ८४ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे यज्ञवैभवखण्डे द्विजव्रणनिवारणपूर्वकंसद्बोधामृतवर्षणं नाम द्वात्रिंशोऽध्यायः ।। ३२ ।। ओवीसंख्या ।। ८४ ।।

श्रीचिदम्वरार्पणमस्तु ।।


शि व चि द म्व र

# घण्टारवगर्वखण्डणम्




इकडे पांच वर्षांचा मुका । स्वामीपुढें उभा होता देखा । त्यासी बोलावोनि सावित्रीसखा । मुखीं विभूती घालित ॥

शिवचिदम्बर

॥ श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ॥ ज्याचे पाददर्शनयोगें ॥ जगीं दुर्जनही अवघे ॥ आपुली दुर्बुध्दी टाकुनी मार्गे ॥ भजती निजांगें श्रीगुरूसी ॥ १ ॥ ते चिदम्बरचरण ॥ वंदोनिया तुम्हालागोन ॥ कथा सांगतों द्यावें अवधान ॥ क्षणएक आतां ॥ २ ॥ यापरी शिरहट्टीपुरीं ॥ वसत असतां लीलावतारी ॥ पूर्वदेशस्थ ब्राम्हण निर्धारी ॥ होता वेदशास्त्रीं पारंगत ॥ ३ ॥ अष्ट विकृती अष्टादशपुराणीं ॥ निःसीम पंडित तो म्हणे मनीं ॥ मजसरी जगीं कोण ज्ञानी ॥ त्यांसी शोधोनि वाद करूं ॥ ४ ॥ वादीं जिंकू पंडितासी ॥ जयपत्रें घेऊं देशोदेशीं ॥ त्रिलोकीं पसरूं कीर्तिराशी ॥ ऐसा मानसीं निर्धार केला ॥ ५ ॥ छत्र चामर घेवोनि बरोबरी ॥ आपण बैसला शिबिकेवरी[1] ॥ निज बिरुद वाखाणित परोपरी ॥ दिग्विजयार्थ निघाला ॥ ६ ॥ विद्याबळें प्रस्थान केलें ॥ नाना देश तेणें संचरलें ॥ बहुत पंडितांसी वादीं जिंकिले ॥ जयपत्रें घेतली त्यांकडून ॥ ७ ॥ यासी पाहतां कित्येक ॥ होती तत्काळ कृष्णमुख ॥ कित्येक पाहती कौतुक ॥ पंडितासी आणोनि ॥ ८ ॥ शर्दूलनाद[2] ऐकतां हरिण ॥ जैसे पळती रानोवन ॥ ऐकतां तैसें याचें आगमन ॥ विद्वद्गण पळ घेती ॥ ९ ॥ नातरी हिरण्यकशिपु येतां ॥ भिवोनि जेवि पळाल्या देवता ॥ अथवा ऐकतां भार्गववार्ता[3] ॥ नृपजन जेंवि गडबडे ॥ १० ॥ कीं दृष्टी पडतां मार्जार ॥ जैसा पळें मूषकवार ॥ तैसे सर्व देशीं द्विजवर ॥ त्याचे दृष्टीसमोर न येती ॥ ११ ॥ ऐसें वर्ततां पंडित ॥ जयपत्रें घेवोनि बहुत ॥ गर्वे म्हणे होवोनि उन्मत्त ॥ कोण जगीं पंडित मजपुढें ॥ १२ ॥ मीच असें जगीं सर्वज्ञ ॥ अप्रतिम वादीं निपुण ॥ ऐसें म्हणत बिरुदचिन्ह ॥ हातीं बांधोन माजला ॥ १३ ॥ घंटा बांधोनि निजकरीं ॥ म्हणे माझें नांव घंटारवशास्त्री ॥ ज्यासी पांडित्याभिमान अंतरीं ॥ त्याहीं मजसरी वादा यावें ॥ १४ ॥ नातरी जयपत्र द्यावें ॥ ऐसें म्हणत दुःस्वभावें ॥ देश संचारितां स्वभावें ॥ चिदम्बरकीर्ती ऐकिली ॥ १५ ॥ म्हणे याचें दिगंत विस्तीर्ण ॥ यश ऐकूं येतसें पूर्ण ॥ या एकासी जिंकितां क्षण ॥ दिग्विजय पूर्ण

शिवचिदम्बर

................................

१. पालखीत २. सिंहनाद ३. परशुरामाचें नाव.

होतसे माझा ॥ १६ ॥ ज्याचें असें सुदैव ॥ त्यासी अनुकूल सर्व देव ॥ त्याचे मनोरथ साधती सर्व ॥ म्हणे अपूर्व भाग्य माझें ॥ १७ ॥ चतुःसमुद्रपंडितांचा ॥ गुरु हा भेटला मज दैवाचा ॥ पराभव करोनि याचा ॥ विद्वत्तेचें सार्थक करूं ॥ १८ ॥ ऐसें म्हणत तो पंडित ॥ प्रवेशला श्रीगुरुपुरांत ॥ इकडे सभा रचोनि अद्भुत ॥ श्रीदीक्षित बैसलासे ॥ १९ ॥ तो शास्त्री गर्वांधीभूतनेत्र[1] ॥ स्वामीमहिमा नोळखतां थोर ॥ होवोनि पंडित वादातुर ॥ आला सत्वर श्रीसभेसी ॥ २० ॥ दुरोनि पाहतां स्वामीसभा ॥ आगाध दिसूं लागली शोभा ॥ सभा पाहतां शास्त्री प्रभा ॥ उतरोनि झाला कंपित ॥ २१ ॥ श्रीचिदम्बरासभोंवतीं ॥ थोर पंडित बैसले असती ॥ वेदशास्त्रीं त्यांची मती ॥ वादीं तयाप्रती जे उत्सुक ॥ २२ ॥ श्रीगुरुसन्मुख भूमिपाळ ॥ नानालंकार लेवोनि सोज्वळ ॥ जोडोनिया दोनी करकमळ ॥ बैसलेती देवापरी ॥ २३ ॥ श्रीचरणदर्शनार्थ ॥ कौतुक धरोनि चित्तांत ॥ कित्येक जन नगरस्थ ॥ स्वस्थचित्तें बैसलेती ॥ २४ ॥ उभे राहोनि वेत्रधारी ॥ स्वामीयश वाखाणित परोपरी ॥ स्वार शिपाई शस्त्रधारी ॥ सभाद्वारीं शोभती ॥ २५ ॥ ऐसिया सभेसि पाहतां ॥ पंडित दचकोनि चित्तां ॥ म्हणे कां मी येथ आलों आतां ॥ कां भयव्यथा चित्तीं उपजली ॥ २६ ॥ कीं आलों अवचित कैलासीं ॥ श्रीशिवनाथाचिया सभेसी ॥ नातरी शिरलों विष्णूसभेसी ॥ सभाप्रभा फांके अनिर्वाच्य ॥ २७ ॥ पाहतां सभेची कांती ॥ भ्रमित होय माझी मती ॥ येथें जय मिळे कवणें रीती ॥ हाचि चित्तीं उठे संशय ॥ २८ ॥ ऐसा वितर्क करीत ॥ सभेंत येतां भीतभीत ॥ दृष्टी पडला श्रीदीक्षित ॥ उत्तमासनीं एकोभावें पंडितमेळा ॥ पाहे ऐसिया दीक्षितासी ॥ ३० ॥ जवळी येतां पंडित ॥ उठोनि वंदी श्रीदीक्षित ॥ उत्तमासनीं सुमंदहंसित ॥ बैसवोनी बोलत तेघवां ॥ ३१ ॥ कोठें आपुलें स्थान ॥ येणें झालें कोठून ॥ पुढें आपलें असें गमन ॥ कोठपर्यंत सांगावें ॥ ३२ ॥ बिरुद कायसें हातीं ॥ घंटालक्षण दिसें उन्नती ॥ यापरी पुसतां आनंदमूर्ती ॥ बोले स्वामीप्रती

१. गर्वानें अंधळा झालेला. २. शुभ्र भस्मानें.

पंडित ।। ३३ ।। निवास आमुचा पूर्वदेशीं ।। तेथुनी आलों तुम्हांपासी ।। दिग्विजयें संपादित परियेसी ।। बिरुद हस्तासी बांधिला ।। ३४ ।। माझें नांव जाण घंटाख ।। चतुःशास्त्रवेत्ता मी अपूर्व ।। चारी वेदार्थवैभव ।। जाणतों चर्चाधुरीण मी ।। ३५ ।। देशोदेशीं फिरलों बहुत ।। माझेपुढें कोणही पंडित ।। वादार्थ झाला नहीं शक्त ।। मग जयपत्रें घेतलीं ।। ३६ ।। तिहीं देवोनि जयपत्र ।। गेले सर्व द्विजवर ।। इतुक्यांत तव यश ऐकिलें थोर ।। मग येथवर येणें झालें ।। ३७ ।। जगीं उरलासी तूं एक ।। पंडित वादीं सुरेख ।। तुजसवें वादार्थ आलों देख ।। वाद किंवा जयपत्र द्यावें ।। ३८ ।। ऐकोनि पंडिताचें वचन ।। तंव स्वामी बोले हांसोन ।। आम्हीं वादाविषयीं अनभिज्ञ ।। श्रेष्ठ आपण पंडित ।। ३९ ।। जो संपादी विद्वद्वैभवा ।। तेणें द्विजाशीर्वाद संपादावा ।। द्विजक्षोभ कदापि न घ्यावा ।। समभावा स्मरे तो ज्ञानी ।। ४० ।। यास्तव पंडितहो येथूनी ।। वादेच्छा त्याग करोनि ।। शांती धरा अंतःकरणीं ।। सोडोनि द्यावें कासया बिरुद ।। ४१ ।। ऐसा सांगतों मी हितार्थ ।। जरी न ऐकें तुमचें चित्त ।। वादार्थ आग्रह असें बहुत ।। तरी सांगतों मात परियेसा ।। ४२ ।। हे जे बैसलेती पंडितसिंह थोर ।। यापुढें न टिकती वादि–कुंजर[१] ।। शमन करतील गर्वभार ।। करी सत्य वादारंभ ।। ४३ ।। तंव हंसोनि बोले घंटाख ।। न ऐकोनि माझा वाद अपूर्व ।। बोलतां आपुला अहंभाव ।। पुढे तोच करोनिया ।। ४४ ।। माझेसमक्ष वादार्थ ।। बैसावाया जगीं कोण समर्थ ।। चतुर्मुखही[२] श्रांतचित्त ।। होय निश्चित माझेपुढें ।। ४५ ।। मजपुढें बैसावया षण्मुख[३] ।। न टिकतां होईल असन्मुख ।। शेष भिवोनि बिलवास देख ।। करोनि सुखें राहिला ।। ४६ ।। व्यासासी कांपवीन थरथरां ।। गुरुसी पाठवीन माघारा ।। नलगे ऋषीश्वरासी थारा ।। माझेसमोर यावया ।। ४७ ।। ऐक दीक्षितेंद्रा माझी वाणी ।। उगवतां मी वादी दिनमणी[४] ।। विद्वदुडुगण[५] प्रकाशोंनि ।। येईल काय मजपुढें ।। ४८ ।। न गणी जेथें चंद्रप्रकाश ।। तेथें कोण पुसे नक्षत्रास ।। जो पिवोनि टाकी सिंधूस ।। थिल्लर[६]

१. हत्तीप्रमाणें झुंजार. २. ब्रह्मदेवहि. ३. कार्तिकेय. ४. सूर्य. ५. विद्वानरूपी नक्षत्रसमूह. ६. डबकें.

त्यास बुडवील काय ।। ४९ ।। जो सिंह न गणी हत्तीसी ।। त्यासी काय वधी मशकराशी[1] ।। जो तार्क्ष्य[2] न भी शेषासी ।। डिंडिम[3] त्यासी मारूं म्हणे ।। ५० ।। तैसें व्यर्थ कासया बापुडे ।। पंडित पाठवीसी मजपुढें ।। सुखें बैसोत एकीकडे । स्वमर्यादा रक्षोनिया ।। ५१ ।। हत्तीसवें झुंजावया ।। न पाठवावें अजसमुदाया[4] ।। मजसवें वाद करावया ।। कां पाठविसी या पंडितां ।। ५२ ।। जरी चित्ती बाळगितां अभिमान ।। तरी पुढें यावें आपण ।। माझा वाद एक क्षण ।। पाहतां अभिमान सोडाल ।। ५३ ।। विद्वत्ताभिमान जरी पोटीं ।। दावा काय असें वादघाटी ।। ना तरी जयपत्र उठाउठीं ।। दावोनि तुष्टी पावा सुखें ।। ५४ ।। यापरी घंटाखवचन ।। विद्यागर्वे जें परिपूर्ण ।। तें ऐकोनि श्रीगुरुराण ।। बोले वचन मधुरवाचें ।। ५५ ।। अगा पंडितराया इकडे ।। भय न बाळगतां मजपुढें ।। वादार्थ येई घडपुढें ।। पूर्वपक्ष आरंभी गा ।। ५६ ।। इकडें पांच वर्षांचा मुका ।। स्वामीपुढें उभा होतां देखा ।। त्यासी बोलावोनि सावित्रीसखा ।। मुखी विभुती घालित ।। ५७ ।। विभूती पडतां मुखकमळीं ।। मुका झाला ज्ञानी अतुर्बळी[5] ।। गुर्वाज्ञा घेवोनि बाळ ते वेळीं ।। शास्त्रीपुढें बैसला ।। ५८ ।। बाळ पुसे पंडितासी ।। आरंभ करा वादासी ।। भय न धरा मानसीं ।। निर्भयें पूर्वपक्ष करा ।। ५९ ।। बाळवचन ऐकोनि पंडित ।। पूर्वपक्ष आरंभी इतुक्यांत ।। हृदयीं कंप उठोनि बहुत ।। झाल्या विकुंठित बुध्दिवृत्ति ।। ६० ।। अंगीं वाहत घाम झरझर ।। सर्वांग कांपे थरथर ।। पडिला सर्वशास्त्रार्थविसर ।। मौनावला भयातुर पंडित ।। ६१ ।। तंव पुसे श्रीचिदंबर ।। पुसा कीं शास्त्रार्थविचार ।। अपण असोनि पंडित थोर ।। उगा किमर्थ बैसला ।। ६२ ।। कां विचार वेदवेदांतीं ।। कीं पूर्वपक्ष शास्त्रार्थी ।। चालूं दे या बाळापुढती ।। भय चित्तीं कायसा आतां ।। ६३ ।। यापरी श्रीगुरु पुसतां ।। वचन एकही न बोलतां ।। मुक्यापरी धरोनि मौनता ।। बैसला चिंताक्रांत ।। ६४ ।। गारुड्यानें टाकतां मंत्राक्षता ।। सर्प कैसी धरी मौनता ।। ना तरी भास्कर उदया येतां ।। जेंवि उडुगण लोपोनि जाय ।। ६५ ।। अथवा

१. चिलटांचा समुदाय. २. गरुड. ३. गांडूळ. ४. बोकडांचा कळप. ५. समर्थ.




शिव चिदम्बर

सिंहनाद ऐकोनि पुढारा ।। मौनमुद्रा पडे कुंजरा[1] ।। तैसी पंडितें मौनमुद्रा ।। दाविली श्रीगुरूपुढें ।। ६६ ।। मग मुहूर्ती होवोनि सावध ।। सुधीश[2] वंदी स्वामीपद ।। म्हणे तुझी लीला अगाध ।। घडला अपराध मज मोठा ।। ६७ ।। पोटीं घालोनि माझे दुष्कृत्या ।। तारी तारी मज देवराया ।। ऐसे म्हणत स्वामीपायां ।। पडिला तेधवां मागुतीं ।। ६८ ।। स्वामी पोटीं कृपा उपजोनि ।। सर्वांगीं फिरवी वरदपाणी ।। तेणें पंडित सावध होवोनि ।। चरण वंदोनि स्तवूं लागे ।। ६९ ।। सत्संगें सर्व पापें जळती ।। ही गोष्ट बाणली माझे चित्तीं ।। पहा केवढी माझी अहंकृती ।। पावलो मुक्ती दर्शनमात्रें ।। ७० ।। सभासद हो पहा प्रत्यक्ष ।। किती गर्विष्ठ माझी बुध्दी देख ।। दर्शनमात्रें श्रीगुरुनायक ।। विमल करोनि टाकित ।। ७१ ।। माझें जन्म सफल झालें ।। श्रीगुरुपदांबुज देखिले ।। सर्व व्यापोनि निराळें ।। गगनापरी तूंचि देवा ।। ७२ ।। तरंग[3] जैसे उपजे जळीं ।। अथवा धूम ज्या रीती अनळीं[4] ।। तैसी प्रकृती उपजली ।। तुजमाजीं स्वामिराया ।। ७३ ।। ती जडही[5] तुझिया सत्तें ।। उपजवी त्रिगुण कार्यातें ।। स्वाधीन ठेवोनि सर्व जीवातें ।। प्रपंचीं जीव नाचवी ।। ७४ ।। देवराया जोंपर्यंत ।। जीव मायेनें आवृत ।। तोंवरी गर्वे होवोनि भ्रमित ।। न भजती तुजसी ।। ७५ ।। ही मायाही अविचारें ।। उपजोनि उपजवी जीव सारे ।। माया लया पावे विचारें ।। स्वकार्यांसहित ।। ७६ ।। प्रकृति आदिकरोन ।। देहापर्यंत तत्त्वगण ।। चित्प्रतिबिंब असती पूर्ण ।। दिसती तेणें चैतन्यापरी ।। ७७ ।। प्रतिबिंबशक्तीनें जडासही ।। चलनशक्ती लाधली पाही ।। प्रतिबिंब जो विलसे हृदयीं ।। श्रुतिमतें तोचि जीव ।। ७८ ।। देहादिकांठायीं जोंवरी ।। भ्रमें जीव अहंममता धरी ।। दुःख संसार न सुटे तोंवरी ।। जीवा भारी दुःख होय ।। ७९ ।। आत्म्यासी संसार नाहीं ।। बुध्दीसी चेतना नाहीं ।। उभयसंगें जीवता हृदयीं ।। अज्ञानें पाही कल्पित ।। ८० ।। देहाभिमान धरोनि अज्ञानें ।। जीव स्वस्वरूप जोंवरी नेणें ।। तोंवरी बुध्द्यादि संगाकारणें ।। जन्ममरणफेरी न सुटे ।। ८१ ।। चिन्मात्र जरी असे

१. हत्तीला. २. पंडितवर्य. ३. लाटा. ४. अग्नींत. ५. प्रकृती.




शिवचिदम्बर

शि व चि द म्ब र

जीव ।। तरी अध्यासें[1] देहभाव ।। तेणें कल्पोनि स्वयंमेव ।। संसारभाव पावलासें ।। ८२ ।। जेंवि जडही स्वभावें लोह ।। अग्निसंयोगें करी दाह ।। तैसा जीव कल्पोनि देह ।। स्वानंदभाव विसरला ।। ८३ ।। जेधवा सुकृतें भक्तसमागम ।। मिळे तेधवां सुटे भ्रम ।। निर्भ्रमें तुज भजतां विश्राम ।। दे सत्समागम स्वामिराया ।। ८४ ।। सत्संग प्राप्त भक्तीनें ।। शांती मिळे जीवाकारणें ।। माया लया पावे तेणें ।। निष्प्रयत्नें स्वयंमेव ।। ८५ ।। तव माया लया पावलिया ।। भवबंध तुटे देवराया ।। सत्समागम मोक्ष द्यावया ।। समर्थ यास्तव त्रिभुवनीं ।। ८६ ।। यास्तव स्वामी मजकारणें ।। तव पदीं अहेतुक भक्ती देणें ।। इतुकी माझी पूर्ण करणें ।। विनंती स्वामी या समयीं ।। ८७ ।। यापरी पंडित स्तवोनि ।। साष्टांगें पडिला चरणीं ।। कृपानिधी त्यासी उठवोनि ।। विद्वच्छ्रेणींत[2] बैसवी ।। ८८ ।। त्या द्विवसापासोनि ।। श्रीचिदंबरसन्निधानीं ।। तो घंटारव वास करोनि ।। चाळीस अवधानी नाम पावला ।। ८९ ।। ज्याचे स्मरणें शुध्द सात्त्विका ।। भक्ती उपजे सौख्यदायका ।। हृदयीं त्या श्रीगुरुपादुका ।। आठवोनि सुख लाधा ।। ९० ।। यापरी नाना चरित्र ।। दावित तेथें चिदंबर ।। दुर्भिक्षभय निवारोनि थोर ।। मुळुगुंदपुरा पातला ।। ९१ ।। तेथेंही अघटित लीला ।। दावी श्रीगुरु सर्वांला ।। निवारोनि दुष्काळभयाला ।। तोषवी अन्नदानें ।। ९२ ।। यापरी स्वामी खेळत ।। असतां मुळुगुंदपुरांत ।। जाहला चमत्कार अद्भुत ।। सांगतों यथार्थ परियेसा ।। ९३ ।। त्या गांवीं होती वेश्या एक ।। जिचें रूपलावण्य देख ।। अप्सरेपरी अलौकिक ।। गाननैपुण्य कोण जाणे ।। ९४ ।। ऐसी होती अपूर्व नारी ।। दैवयोगें तिचे सर्व शरीरीं ।। कुष्ठरोग जडला होतां भारी ।। तेणें अंतरीं तळमळत ।। ९५ ।। तंव ऐकोनि श्रीगुरुकीर्ती ।। तिणें नवस केला चित्तीं ।। आजपासोनि चिदंबरार्थी ।। देह निश्चिती समर्पिला ।। ९६ ।। रोग किंवा प्राण जावो ।। श्रीपदी ठेविला भावो ।। सर्वज्ञ चिदंबर देवो ।। माझा स्वभावो जाणता ।। ९७ ।। ऐसा निश्चय करोनि चित्तीं ।। स्नान करोनि सर्वेचि ती ।। आली

शि व चि द म्ब र

१. मिथ्याज्ञानानें. २. विद्वानांच्या पंक्तींत.

चिदंबरद्वाराप्रती ।। करी तीन दंडवत साष्टांग ।। ९८ ।। मग करोनि तीन प्रदक्षिणा ।। अंगणीं घाली लोटांगणा ।। मग एक प्रहर उभी जाणा ।। राहोनि स्वसदना जातसे ।। ९९ ।। यापरी दिनत्रय सेवितां ।। कृपां उपजली श्रीगुरूचित्ता ।। त्या दिनीं प्रहर दिवस येतां ।। श्री गुरुनाथ आला बाहेर ।। १०० ।। द्वारापासी येतां श्रीगुरू ।। वेश्या करी नमस्कारू ।। लोक तीसी करित असतां दूरू ।। स्वामी सत्वर पाचारी ।। १ ।। जन राहिले मग तटस्थ ।। वेश्या आली द्वाराप्रत ।। श्रीगुरु बोले हंसत ।। पाप अघटित पूर्वजन्मीचें ।। २ ।। तेणें मिळाला रोग थोर ।। रोग व्हावया तो दूर ।। आलीस सुंदरी येथवर ।। तावन्मात्र ऐक वचन ।। ३ ।। द्विजोच्छिष्ट पात्रीं लोटांगण ।। करिसी जरी भावें त्रिदिन ।। तत्काळ होईल रोगनिवारण ।। होय सुवर्ण देह तुझा ।। ४ ।। यापरी ऐकोनि श्रीगुरूवचन ।। वेश्या पाहे उच्छिष्टस्थान ।। गांवाबाहेर पर्वतप्रमाण ।। पडले होते ज्या स्थळीं ।। ५ ।। गुरुवचनीं विश्वास पूर्ण ।। धरोनि वेश्या तत्क्षण ।। विप्रोच्छिष्टीं लोटांगण ।। एकोमनें करूं लागली ।। ६ ।। एक दिनीं करितां लोटांगण ।। पालटत देहवर्ण ।। यापरी करितां तीन दिन ।। सुवर्णवर्ण काया झाली ।। ७ ।। मग अत्यानंदें ती गणिका ।। स्वपरिवार घेवोनि ऐका ।। स्वामीसभेसी येवोनि देखा ।। आरंभी कौतुकें नर्तन ।। ८ ।। सेवा करोनि मुहूर्तमात्र ।। स्वामीसी तोषवी अपार ।। मग जोडोनि उभयकर ।। करूं लागली स्तोत्र सप्रेमें ।। ९ ।। तूंचि सत्य होसी शिवारमण ।। नरवेषें आलासी अवतरोन ।। तुजसारिखा दयाळू कोण ।। धुंडितां त्रिभुवनीं मिळेल ।। ११० ।। मी बहु जन्मीची पापिणी ।। तरी मजवरी कृपा करोनि ।। दयार्द्र दृष्टीं अवलोकोनि ।। रोगापासोनि तारिलेंसी ।। ११ ।। अगा कृपासमुद्रा जन्मापांसोनि ।। रूप यौवन गर्वे दाटोनि ।। बहु पुरुषसंगेंदुष्ट मी पापिणी ।। तरी मजलागोनी पावलासी ।। १२ ।। वित्तार्जनीं पुरुषवंचनीं ।। जन्म घातलें म्यां पापिणी ।। तरी दयाळा मजलागोनी ।। लीले करोनी तारिलेंसी ।। १३ ।। वेदवेत्ते योग्य ब्राम्हण ।। सभोंवतीं बैसलेति सभाभरोन ।।

त्या सर्वांसी उपेक्षून ।। मजकारण धाविन्नलासी ।। १४ ।। परपुरुषसंगें जरी दुष्ट ।। तरी मज बोलावोनि निकट ।। सांगोनि अनुग्रहगोष्ट ।। मम कुष्ठ निवारिलेंसी ।। १५ ।। आंत महापुण्यपुरुषामाजीं ।। बैसलां असतांही सोमयाजी ।। मज पापिणीची पापराजी[1] ।। न गोजतां आलांसी बाहेर ।। १६ ।। दान होम जपादिकेंही ।। जो रोग न शमे तिळमात्रही ।। तो रोग कृपाकटाक्षपातें पाही ।। दयाळा जाळिलासी ।। १७ ।। ऐसिया कृपानिधीसी ।। त्रिभुवनीं धुंडितां कोणासी ।। न मिळे निश्चय धरा मानसीं ।। सांगतें सर्वांसी प्रचीत ।। १८ ।। कायावाचामनें पाही ।। माझें सर्वस्व सर्वही ।। समर्पिले श्रीस्वामीपायीं ।। प्रतिज्ञा ही करितें सर्वांपुढें ।। १९ ।। आनंदगद्‌गदवाचें ऐसी ।। स्तुती करितां बाष्पराशी ।। नेत्रीं वाहत बहुवसी ।। हर्ष मानसीं न समायें ।। १२० ।। करोनि स्तोत्र वारंवार ।। सर्वेचि बोलावोनि स्वपरिवार ।। गान नर्तन सेवा फार ।। करितां श्रीगुरु तुष्टला ।। २१ ।। आधींच वेश्या रूपवती ।। तारुण्यशोभा त्यावरती ।। त्यांत होता श्रीगुरुकृपाप्राप्ती ।। विशेषें कांती फांकतसे ।। २२ ।। वेश्येसी म्हणे चिदम्बर ।। गान आतां पुरे कर ।। स्वाभीष्ट कायसे निर्धार ।। गीतज्ञे माग आतां ।। २३ ।। यापरी अभयवचन ।। स्वामिमुखें वेश्या ऐकोन ।। करोनि साष्टांग नमन ।। पायीं विनवणी करितसे ।। २४ ।। जगन्नाथा मी या समयीं ।। न मागे अन्य वर कांहीं ।। दृढभक्ती एक तंव पायीं ।। आतां देईं स्वामिराया ।। २५ ।। तुझी दुस्तर ही माया ।। मजला न शिवे देवराया ।। ऐसें करीं बा या समयां ।। हेंचि पायां मागणें ।। २६ ।। यापरी वेश्यावचन ।। ऐकतां स्वामी संतोषून ।। म्हणे तुझे हृदयीं पूर्ण ।। ठसलें ज्ञान यावेळीं ।। २७ ।। एक विप्रोच्छिष्ट संसर्गे ।। मुकलीस आतां महारोगें ।। यापरी ब्राम्हण अवघे ।। भजावें त्वां शिवापरी ।। २८ ।। ब्राम्हणपूजें संतोष ।। मजसी होतसे विशेष ।। ब्राम्हणहृदयीं माझा वास ।। जाण भरंवसा पूर्णत्वें ।। २९ ।। द्विजासी पूजिलें असतां ।। माझी पूजा घडली तत्त्वतां ।। जधीं कराल द्विजधिक्कारता ।। अवमानता तीच माझी ।। १३० ।। यापरी

.........................

१. उत्कट पापसमूह.




शिवचिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

स्वामी वेश्येसी ।। बोध सांगोनि बहुवसी ।। सन्मान करोनि निजगृहासी ।। पाठविले तेधवां ।। ३१ ।। स्वामी आज्ञा पाळित ती नारी ।। वैराग्य धरोनि संसारीं ।। द्विजाराधना करित भारी ।। पिंगलेपरी ख्याती पावली ।। ३२ ।। श्रीचिदम्बरकृपें इहलोकीं ।। भक्तजनां प्रिय होवोनि निकी ।। द्विजाराधनबळें शेखीं ।। कैलासलोकीं बैसली ।। ३३ ।। यापरी अगाध चरित्र ।। असे चिदम्बराचें थोर ।। ज्यासि असे चाड इहपर ।। त्याहीं चिदम्बर आश्रयावा ।। ३४ ।। हित सांगे चिदम्बरकिंकर ।। सर्वांसी साधावया इहपर ।। चिदम्बरा ऐसा थोर ।। आश्रय नसे आन कांहीं ।। ३५ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्‌गुरुनाथ ।। यास्तव ऐका श्रोते समस्त ।। त्रयस्त्रिंशोऽध्याय रसाळ हा ।। १३६ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे यज्ञवैभवखण्डे घण्टारवगर्वखण्डनं वेश्याकुष्ठनिवारणं च नाम त्रयस्त्रिंशोऽध्यायः ।। ३३ ।। ओंवीसंख्या १३६ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

शि
व
चि
द
म्ब
र

## यज्ञोपोद्धातवर्णनम्




राजसूयसमक्रतू । आपण कराल निश्चतू

मलापहातटी गोण्णागरः असे आम्रवनही विस्तीर्णः सर्वजनासि छाया जळः आणि वासार्थ विशालस्थळः

शि व चि द म्ब र

॥ श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ॥ ब्रम्हादिक देव सकळ ॥ चरणीं भाव धरोनि विमळ ॥ पूजिती ज्याचे पदकमळ ॥ त्या चिदम्बरा वंदू आतां ॥ १ ॥ नित्यानंदमूर्ती उदारा ॥ भक्तकामपूरा सर्वेश्वरा ॥ तुज नमितों सरस्वतीवरा ॥ देईं मज दातारा सन्मति ॥ २ ॥ चिंतितार्थ पुरवावया ॥ कल्पवृक्षाहुनी जेणें अधिक्या ॥ दाविलें त्या दीक्षितपायां ॥ वंदोनिया सांगू कथा ॥ ३ ॥ मुनीश्वर म्हणे श्रोतियांसी ॥ मुळुगुंदपुरीं स्वामीनें ऐसी ॥ लीला दावोनि बहुवसी ॥ दुर्भिक्षभयासी निवारिलें ॥ ४ ॥ त्या गांवीं ठेवोनि एक छत्र[१] ॥ दीनांचे करावया पोषणमात्र ॥ तेथें नेमोनि एक छात्र[२] ॥ स्वपरिवारें प्रस्थान करी ॥ ५ ॥ देशसंचार निमित्त करोनि ॥ सर्व दुष्काळभय निवारोनि ॥ प्राणिमात्रासी कैलासधनी ॥ सुख साधनीं विनटला ॥ ६ ॥ चरित्र दावित नानापरी ॥ कीर्तिचंद्रिका भुवनामाझारीं ॥ पसरित दीक्षितचंद्र महीवरी ॥ संचार करी भक्तोडुगणें[३] ॥ ७ ॥ जेथजेथुनी चिदम्बर ॥ पुढे जाईं तेथील नारीनर ॥ चित्तीं प्रभूसी ध्यात निरंतर ॥ गृहकृत्य अपार विसरती ॥ ८ ॥ आणि विरहभयें भिवोनि ॥ प्रार्थिती ऐसें श्रीचरणीं ॥ कारुण्यसिंधो कां आम्हां लागोनि ॥ कठिण चित्त करिसी बा ॥ ९ ॥ दयाळा कां आम्हां दीनांसी ॥ विरहाग्नीमाजीं टाकिसी ॥ निष्करुणापरी सर्वेचि जासी ॥ आमुचें सांत्वन न करितां ॥ १० ॥ अहा धात्या[४] कुटिलचित्ता[५] ॥ आधीं दावोनि सुखपंथा ॥ कासया वियोग दीघलासीं आतां ॥ येणें लाभूं कोणता तुजसी ॥ ११ ॥ व्यर्थ करूं नये जीवहिंसा ॥ ललाटीं लेख लिहिलासी कायसा ॥ असो आतां तरी सहसा ॥ पुसोनि झणी टाकपां ॥ १२ ॥ अगा दयासमुद्रा चिदम्बरा ॥ हा विधाता असे रजोगुणी खरा ॥ म्हणोनि लिहिले दुष्टाक्षरा ॥ ललाटीं आमुचिया ॥ १३ ॥ रजोगुणी या मानसीं ॥ दया उपजेल बा कैसी ॥ त्यासारिखा तूं नव्हेसी ॥ दयाराशी चिदम्बरा ॥ १४ ॥ दीनदयाळा तूं शुध्दसत्त्व ॥ दयेनें पूर्ण तुझा स्वभाव ॥ कासया आतां विरहदाव[६] ॥ दाविसी बा देवराया ॥ १५ ॥ विश्वासें शरण आलियासी ॥ कासया आम्हां

शि व चि द म्ब र

.........................

१. अन्नछत्र. २. शिष्य. ३. भक्तरूपी नक्षत्रागध्यें. ४. ब्रम्हदेवा. ५. कपटी. ६. विरहाग्नि.

शिवचिदम्बर

अव्हेरिसी ।। वंचोनि जाणें दयाळासी ।। उचित काय सांगपा ।। १६ ।। आधींच आम्ही पापी जन ।। आम्हां दुर्लभ तव दर्शन ।। ऐसिया स्वतां दर्शन देवोन ।। मागुती वंचोन कां जासी ।। १७ ।। जगीं प्रख्यात सदयचित्ता ।। तुज काय सांगूं दीक्षितेंद्रा ।। आतां ऐसें करणें बा दयावंता ।। उचित नोहें तुजसीं ।। १८ ।। आधीं अंगीकारोनि दीनांसी ।। नरही न सोडती ज्ञानराशी ।। तूं तरी विश्वपाळक हृषीकेशी ।। आम्हां अव्हेरिसी कवण्या गुणें ।। १९ ।। दयाळा बिरुदावळी आजची ।। कां सोडली बहुकाळीची ।। दीनपालका कायही तुमची ।। उपजली मती नवीनचि ।। २० ।। स्वामिराया जेथें तूं वससी ।। सर्वही उत्सव तेथेंचि परियेसी ।। तेथेंचि सिध्ददेवर्षी ।। वसती नित्योत्सव पहावया ।। २१ ।। स्वामीमुखचंद्रदर्शनें ।। ताप दवडोनि शांतपणें ।। तोचि नांदती धन्यपणें ।। यास्तव जन्म सफळ त्यांचे ।। २२ ।। यापरी श्रीगुरुचरित्र स्मरत स्मरत अहोरात्र ।। अवश्यही गृहकर्म थोर ।। सांडोनि गुरुचिंतनीं विनटले ।। २३ ।। श्रीदीक्षितेंद्रा दयासमुद्रा ।। भक्तवत्सला दीनचकोरचंद्रा ।। चिंतितार्थपूरा दावी अभयमुद्रा ।। पाय सत्वर दाखवी बा ।। २४ ।। यापरी सतत गुरुस्मरणीं ।। मन लावोनि राहतां जनीं ।। अवचित त्यांसी दर्शन देवोनि ।। दयाखाणी तोषवीत ।। २५ ।। सांत्वन करोनि बहुवसी ।। आनंद दावोनि त्यांसी ।। अदृश्य होवोनि मागुती हृषीकेशी ।। यात्रिकांसी आनंदवी ।। २६ ।। चिदम्बरासवें यात्राजन ।। चालत असतां आनंदकरोन ।। मार्गीं शिलाकंटकादि जाण ।। होती तूलसमान[1] श्रीगुरुकृपें ।। २७ ।। श्रीचिदम्बर असतां जवळीं ।। हिमतापादिश्रम त्यावेळीं ।। न पवतां सुखी सकळी ।। श्रीगुरुसवें चालती ।। २८ ।। यापरी श्रीगुरुनाथ ।। आनंदभरित यात्रिकांसहित ।। पातला नवलगुंदपुराप्रत ।। आले दर्शनार्थ ग्रामजनही ।। २९ ।। आदरें करोनि सन्मान ।। गांवी नेती श्रीगुरुसी ग्रामजन ।। स्वामी त्यांचे कुशल विचारोन ।। मृदुवचनें तोषवी ।। ३० ।। अग्निहोत्र शिष्य भक्त ।। आणि सरस्वतीकांतेसहित ।। पुरीं वास करोनि स्वस्थ ।। आरंभित व्दिजाराधना

१. कापसाप्रमाणें.

शिवचिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

|| ३१ || कित्येक यात्राजनांमहित || सावित्री आणि काशीनाथसुत || यासी ठेवोनि लालगडांत || पढवित शिष्यसमुदाया || ३२ || केधवां गांवीं वसत || केधवां वसोनि गडांत || नाना चरित्र दावित || श्रीगुरुनाथ खेळतसे || ३३ || भार्यायुग्म पंचपुत्र || सांभाळित अग्निहोत्र || अप्रमेय जो ईश्वर || लोकानुसार लीला दावीं || ३४ || असतांही निरुपाधिक आपण || लोकोध्दार करावया कारण || मनुष्यापरी दावोनि वर्तन || करी महिमान अमानुष || ३५ || कलिकाळीं पापी जन || करावया त्यासी पावन || अगाध लीला शिवारमण || करोनि दावित अत्यद्‌भुत || ३६ || ज्याचें चरित्र श्रवण पठण || करितां जन होवोनि पावन || संसारफेरींतुनी सुटोन || निर्वाणपद[1] पावती || ३७ || याच हेतूनें सर्वेश्वर || भूवरी घेतसे अवतार || ना तरी जो नित्यानंदसागर || कासया अवतार घेणें त्यासी || ३८ || अद्वितीय चिन्मात्रही आपण || लोकोध्दार करावया कारण || मायेनें प्रापंचिक भाव दावोन || सर्वपापघ्न खेळ करी || ३९ || येणेंपरी श्रीचिदंबर || साग्निहोत्र सहपरिवार || प्रत्यही करित परोपकार || सर्वां अपार सुख देईं || ४० || त्याच गांवीं श्रीदीक्षित || शतकुमारासमवेत || मौजीबंधन करित || काशीनाथसुताचें || ४१ || चार दिवस सोहळा || करित आराधी विप्रमेळा || दक्षिणान्नवस्त्र सर्वांला || देवोनि त्यावेळी संतोषवी || ४२ || ऐसें वसतां कृचित्काळ || श्रीमंताचा सखा केवळ || त्या ग्रामा अधिकारी दयाळ || पातला विश्वंभर नामक || ४३ || गोखले ऐसें त्याचें उपनाव || तो चिदंबरपदीं ठेवोनि भाव || स्वामिपायीं समर्पोनि सर्वस्व || झाला सेवेसी तत्पर || ४४ || श्रीगुरुहीं त्यावरी || अंतःकरण करित भारी || ऐसें असतां एके अवसरीं || विनवी स्वामीसी विश्वंभर || ४५ || स्वामिराया महीवरी || दुर्भिक्ष वाढलें भारी || अन्नपाण्याविण प्राणी तरी || नानापरी तळमळती || ४६ || स्वामीराया तव चरणांप्रती || तथापि असे माझी विज्ञप्ती || दुर्भिक्ष नासोनि भूवरती || सुखी व्हावे जन सकळ || ४८ || एतदर्थी कांहीं उपाया || शोधोनि

शि
व
चि
द
म्ब
र

१. मोक्ष.

सांगपा या समया ।। स्वदेश पीडिंत भारी गुरुराया ।। येऊंदे दया चित्तीं तुझे ।। ४९ ।। येणेंपरी विश्वंभरवचन ।। ऐकोनि बोले श्रीगुरुराण ।। या दुःखासी असे कारण ।। अवर्षण मेघाचें ।। ५० ।। यासी उपाय नसे दुसरा ।। वृष्टीवांचोनि विश्वंभरा ।। वृष्ट्युपाय बरवा करा ।। तेणें देश सुखी होय ।। ५१ ।। तंव पायीं करोनि वंदन ।। विश्वंभर विनवी सकरुण ।। करण्या उपायें मेघवर्षण ।। होय तो उपाय सांगपा ।। ५२ ।। स्वामी म्हणे विश्वंभरा ऐक ।। वृष्टी असे पुण्यफळ देख ।। पापरत झाले सकळही लोक ।। यास्तव दुःख अवर्षणादि ।। ५३ ।। आणीक एक गीतावचन ।। सांगतो ऐक तुज कारण ।। अर्जुनाप्रती श्रीभगवान ।। श्रीकृष्णें बोधिलें असे ।। ५४ ।। अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः ।। यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ।। १ ।। कर्म ब्रह्मोद्भवं विध्दिब्रम्हाक्षरसमुद्भवम् ।। तत्मात्सर्वगतं ब्रम्ह नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ।। २ ।। अन्नापासोनि प्राणी जन्मती ।। पर्जन्ये भूवरी अन्न उपजती ।। यज्ञ करितां मेघ वर्षती ।। यज्ञसांग होय पुण्यकर्मे ।। ५५ ।। यास्तव वृष्टीयोगें जनासी ।। सुख व्हावया उपाय परियेसी ।। मिळवोनि योग्य ब्राम्हणासी ।। यज्ञ करवी त्या हातें ।। ५६ ।। तेणें पर्जन्य पडे भूवरी ।। होय जनांचें दुष्काळभय दूरी ।। बोलोनि श्रीचिदंम्बर यापरी ।। आनंदसागर मौनवला ।। ५७ ।। तंव विनवी विश्वंभर ।। तुजपेक्षां जगीं कोण थोर ।। यज्ञा योग्य मिळे भूसुर ।। सांग स्वामी या समयीं ।। ५८ ।। मागुती म्हणे चिदम्बर ।। याग न करी जाणपा मी मात्र ।। यागपध्दती असे दुर्धर ।। आन भूसुर योजी यास्तव ।। ५९ ।। तेणें करवी सोमयाग ।। वृष्टी होय संपूर्ण मग ।। यापरी बोलत असतां यज्ञांग ।। तंव आला दिवाकर ।। ६० ।। पितृचरणीं करोनि वंदन ।। दिवाकर हात जोडोन ।। उभा राहतां श्रीगुरुराण ।। कुशल प्रश्न विचारित ।। ६१ ।। गुरुनवपुरीं सर्वही ।। ताता कुशल असती कायी ।। काय काम इच्छोनी हृदरीं ।। येथ बाळा आलासी ।। ६२ ।। यापरी श्रीगुरूमुखें ।। प्रेमवाक्य ऐकतां पुत्र हरिखें ।। विनवी सर्व असती सुखें ।। क्षेम श्रीकृपें सर्वत्र ।। ६३ ।। तुझी आज्ञापाळण करित ।। निजपुरीं वसतां स्वस्थ ।। एक ब्राम्हण येवोनि




शिव चिदम्बर

शिवचिदम्बर

तेथ ।। भारतपुराण आरंभी ।। ६४ ।। कांही दिवस करितां श्रवण ।। निघालें राजसूयवर्णन ।। त्यांत ऐसे निरोपी ब्राम्हण ।। सांगतो अर्थ परियेसी ।। ६५ ।। धर्मानें राजसूयक्रतू[१] ।। जैसा केला अद्‌भुतू ।। ऐसा अपूर्व महाक्रतू ।। मागें कोणी नाहीं केला ।। ६६ ।। पुढेंही मानव त्यापरी ।। करणार न उपजे भूवरी ।। ऐसें ऐकतां अंतरीं ।। यापरी निश्चय म्यां केला ।। ६७ ।। राजसूयसम क्रतु ।। आपण कराल निश्चितु ।। इतुका धरोनि हेतु ।। आलों येथवरी देवराया ।। ६८ ।। माझी तरी इच्छा ऐसी ।। रुचेल तरी आपणासी ।। माझी विज्ञप्ती पूर्णतेसी ।। न्यावी ऐसें मागणें ।। ६९ ।। तनयवचन परिसोनि ।। स्वामी बोलत हांसोनि ।। असंभाव्य इच्छा मनीं ।। बालभावें धरिलीसे ।। ७० ।। द्वापरीं श्रीकृष्णसहायें ।। जो क्रतुराज जाहला पाहे ।। त्यासम कलिकाळीं कधीं नोहे ।। मर्त्यसहाय्ये[२] ऐक पा ।। ७१ ।। तंव विनवी दिवाकर ।। कलिकाल असतांही दुर्धर ।। आपण दीक्षा घेतां थोर ।। न गणी मी राजसूय ।। ७२ ।। स्वामी म्हणे दिवाकरासी ।। काय वत्सा मूढत्वें बोलसी ।। मनुष्य जरी देवासरसी ।। करील तरी कैसेनि होय ।। ७३ ।। मागुती विनवी दिवाकर ।। तुजसम मिळेल जरी नर ।। देवकार्यपेक्षां थोर ।। कर्म निर्धार होय तेणें ।। ७४ ।। तू अससी कैसा मनुष्य ।। हे मी जाणतो निश्चय ।। कासया बोलसी मोहवाक्य ।। करावा यज्ञार्थ संकल्प ।। श्रीगुरु बोले दिवाकरासी ।। असो तरी या युगी तूं मानसीं ।। धरूं नको यागाग्रहासी ।। कारण तुजसी सांगतों ।। ७५ ।। मी जरी दीक्षा घेईन ।। सहाय्यी तुज मिळेल कोंण ।। असहाय्यें महत्कर्म पूर्ण ।। कैसेनि होईल ।। ७७ ।। विनवी मग दिवाकर ।। आपण दीक्षा घ्यावी निर्धार ।। सहाय्याकरितां काय विचार ।। सुरवरही येती सेवेसी ।। ७८ ।। बाळा यागार्थ मज प्रेरिसी ।। पूर्वापर दृष्टी देवुनी परियेसी ।। मागुती विचारी मानसी ।। खोल विचारोनि सांगपा ।। ७९ ।। मागुती विनवी दिवाकर ।। आधीं विचार करोनि फार ।। चित्तीं केलासे निर्धार ।। अवश्य क्रतुराज आरंभावा ।। ८० ।। यज्ञसामग्री करावया

१. राजसूययज्ञ. २. मनुष्यसहाय्यानें.

शिवचिदम्बर

|| आज्ञा द्यावी स्वामीराया || आन विचार पाहिजे कासया || आरंभावा क्रतूत्तम || ८१ || मागुती बोले चिदम्बर || मी याग करीन निर्धार || तुजवरी पडेल महाभार || यास्तव विचार करी बा || ८२ || तथापि याग करूं इच्छिसी || तरी संपादी सामग्रीसी || अवश्यभाव्य कर्मासी || कवण निवारूं शके || ८३ || यापरी श्रीगुरुवचन || विश्वंभर ऐकतांक्षण || आनंदें विसरोन देहभान || नर्तन करूं लागला || ८४ || विश्वंभर आणि दिवाकर || दोघेही जाहले आनंदनिर्भर || म्हणोनि चिदम्बरकिंकर || सांगे सर्व श्रोत्यांसी || ८५ || स्वस्ति श्रीचिदम्बरचरित || ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ || यास्तवं ऐका श्रोते समस्त || चतुस्त्रिंशोऽध्याय गोड हा || ८६ || इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे यज्ञवैभवखण्डे यज्ञोपोद्घातवर्णनम नाम चतुस्त्रिंशोऽध्यायः || २४ || ओंवीसंख्या ८६ ||

**|| श्रीचिदम्बरार्पणमस्तु ||**



शिव चिदम्बर




**शके सत्राशे एकोणतीसि । प्रभव संवत्सरी चैत्रमासी । शुक्लप्रतिपदा सोमदिवशी । आरंभी यज्ञासि दीक्षितेंद्र ॥**

चिदम्बरचरित्र

अध्याय पसतिसावा

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। ॐनमोजी आदिमूर्ती ।। श्रीचिदम्बरा क्रतुपती[1] ।। यज्ञकथेची बरवी स्फूर्ती ।। देईं चित्ता या समयीं ।। १ ।। म्हणे द्विजासी मुनीश्वर ।। दिवाकर आणि विश्वंभर ।। स्वामीआज्ञें यज्ञसंभार ।। करावया आरंभिती ।। २ ।। राजद्विज दीक्षित ।। ऋत्विज प्रेक्षक आणि भक्त ।। यज्ञोत्सव अवलोकनार्थ ।। हेर धाडित बोलावया ।। ३ ।। स्वामी स्वहस्ताक्षरें सुशोभित ।। गांवोगांवी पत्रें पाठवित ।। त्याचपरी अनेकही दूत ।। देशोदेशीं पाठवी ।। ४ ।। विश्वंभरसहाय्यकरोनि ।। दिवाकरें अल्पदिनीं ।। यज्ञोपयुक्त सामग्री संपादोनि ।। स्वामिसन्निधानीं पातला ।। ५ ।। पहातां दिवाकराचा उद्‌गार ।। संतोषें बोले श्रीचिदम्बर ।। अगा वत्सा माझा विचार ।। सांगतों ऐकसी यत्किंचित ।। ६ ।। मलापहातटीं गोण्णागर ।। या नामें असे एक नगर ।। तेथें एक रम्य मनोहर ।। असे आम्रवन विस्तीर्ण ।। ७ ।। सर्व जनांसी छाया जळ ।। आणि वासार्थ विशाळ स्थळ ।। त्यापरी अन्यत्र दुर्मिळ ।। यागभूमी करावी तेथें ।। ८ ।। यापरी असे माझा विचार ।। तुजही रुचेल तरी सत्वर ।। जाऊं तेथें घेवोनि अग्निहोत्र ।। असे सुमुहूर्त आजची ।। ९ ।। ऐसें स्वामिवचन परिसोनि ।। दिवाकर बोलें आनंदेंकरोनि ।। यान असतीं सिद्ध अंगणीं ।। प्रस्थान करावें आजची ।। १० ।। तंव स्वामी अग्नि समारोपोनि ।। सपत्नीक निघाला त्याच क्षणीं ।। पौरजनही वार्ता ऐकोनि ।। त्याच क्षणीं निघाले ।। ११ ।। प्रेक्षक सेवक आणि भक्त ।। तद्देशीय जन समस्त ।। स्वामीसवें यज्ञदर्शनार्थ ।। धांविन्नले तेधवां ।। १२ ।। कित्येक निघाले घेउनी गाडी ।। यानार्थ घेवोनि बैल घोडी ।। कित्येक शिरीं घेवोनि गाठोडी ।। धांविन्नलें त्या समयीं ।। १३ ।। असंख्य यात्राजनांसहित ।। पायीं चालत श्रीगुरुनाथ ।। सर्वांसी मार्गी आनंदवित ।। मुखें नाम गर्जित चालिले ।। १४ ।। मार्गी पाय ठेवितां जगदीश ।। पायीं उमटत चिन्हविशेष ।। ध्वजसरोरुहवज्रांकुश ।। स्वामिपादस्पर्शे तुष्टत भूमी ।। १५ ।। पादस्पर्शे तोषली म्हणोनि ।। मृदुत्वें शोभिन्नली धरणी ।। नवपल्लव रोमांच भरोनि ।।

१. यज्ञकर्ता. २. आनंदाश्रु.




शिव चिदम्बर

बाष्पपाणी[२] सोडी मधुव्याजें[१] ।। १६ ।। जो साक्षात् शिवावतार ।। तो हा स्वीकरी मनुष्यावतार ।। स्वसमागमें यात्राभार ।। अधिकोत्तर शोभतसे ।। १७ ।। यापरी महोत्सवें श्रीगुरु ।। आनंदवित यात्राभारू ।। पातले गोण्णागरपुरू ।। सहपरिवारें तेधवां ।। १८ ।। नदीतटीं रम्य मंडप ।। निर्माण करवोनि अमूप ।। यात्रिका वसवोनि तेथें अनल्प ।। राहिला आपण अन्य मंडपीं ।। १९ ।। इतुक्यांत सर्वेशहस्ताक्षरें ।। सुशोभित पाहोनि यज्ञपत्रें ।। भूपाल निघाले स्वपरिवारें ।। गोण्णागरासी तत्क्षणीं ।। २० ।। मंडलेश आणि पटवर्धन ।। राजेराजवाडे संपूर्ण ।। शेट सावकार आदिकरोन ।। निघाले यज्ञदर्शनार्थ ।। २१ ।। शास्त्री पंडित वेदपाठीं ।। श्रौतीं ज्योतिषी घनपाठी ।। अपूर्व यज्ञ पहावया दिठीं ।। गोण्णागरानिकटीं पातले ।। २२ ।। सर्वेशाचा यागमहोत्सव ।। दर्शनकौतुकें सर्व नरदेव[२] ।। घेवोनि चतुरंग वैभव ।। गोपुरानिकटीं पातले ।। २३ ।। माणिक्यमौक्तिक सुवर्णभूषित ।। दानोदकें[३] शोभित मंडपांत ।। गंधलोभें झंकारिती भृंग जेथ ।। नीलमणी ओतिल्यापरी ।। २४ ।। सिंदूररंजित घन कुंभभार ।। सपक्ष नीलगिरीपरी सुंदर ।। मंदमंद चालत सेनेसमोर ।। गजभार येतसे ।। २५ ।। रजतकिंकिणी सुवर्णभूषणें ।। सुशोभित नाना तुरंगमगणें[४] ।। स्वार तळपती देवाप्रमाणें ।। शस्त्रगणें नाना सुशोभित ।। २३ ।। नानागति विलासे नाचती ।। कीं स्ववेगें वायुगती ।। मार्गे हटवावया वारू धांवती ।। वायुवेग चित्तीं न साहतां ।। २७ ।। गतीचातुर्ये नाचतां अश्व ।। खुरपट-शब्द उमटे अपूर्व ।। हा काय विचित्र वाद्यवैभव ।। ऐकती सर्व चित्त देवोनि ।। २८ ।। ऐसे रथ असंख्यात ।। राजे बैसले असती त्यांत ।। रथकांती चहूंकडे फांकत ।। गर्जत येती वेगबळें ।। ३० ।। खड्ग ढाल घेवोनि हातीं ।। पायदळ पुढें तळपती ।। स्वपराक्रमें तोषित स्वाधिपती ।। दर्शनार्थ येती श्रीगुरूचें ।। ३१ ।। श्वेतछत्रें नानापरी ।। शोभती भूमिपालकशिरीं ।। बिरुद वाखाणिती वेत्रधारी ।। निजनाथाचे वेळोवेळीं ।। ३२ ।। यज्ञदर्शना कौतुकभरित ।। स्वसैन्यें मिळतां नृपनाथ ।। चतुरंगभारें झाली

१. वसंतऋतूमुळें. २. राजे. ३. हत्तीच्या मदाच्या स्त्रावानें. ४. घोडदळ.




शिवचिदम्बर

क्षणात ।। भूमि पीडित तेधवां ।। ३३ ।। एकत्र भिनतां चतुरंग सैन्य ।। भूभाग न दिसे तिळप्राय ।। नदीगिरीशेतसमुदाय ।। सेनामय झाले क्षणांत ।। ३४ ।। पाहतां सैन्य दिसे अद्भुत ।। सिंधूच की उचंबळोनि गर्जत ।। आला मर्यादा सोडोनि येथ ।। जंणू आच्छादित भूभाग ।। ३५ ।। नातरी रुक्मिणीस्वयंवरार्थ ।। छप्पन्न कोटि यादवांसहित ।। आला असेल यदुनाथ ।। झांकले भूप्रांत म्हणोनिया ।। ३६ ।। यापरी समस्त नृपाळ ।। घेवोनि रथशिबिकामेळ ।। पातले यज्ञदर्शनार्थ केवळ ।। गोण्णागरा जवळी तेधवां ।। ३७ ।। दुरूनि पाहतां गोण्णागर ।। स्वस्वयान उतरोनि सत्वर ।। दूर करोनि छत्र चामर ।। पादचारें चालिले ।। ३८ ।। दुरून पाहतां श्रीगुरूसी ।। लोटांगण घालित बहुवसी ।। भावें येवोनि पायापासीं ।। फळ समर्पोनि वंदिती ।। ३९ ।। स्वस्ववैभव श्रीचरणीं ।। शुद्ध भक्तीनें समर्पोनि ।। उभे राहिले हात जोडोनि ।। स्वामी विचारी कुशल सर्वांचें ।। ४० ।। सर्वांसी उत्तम आसन देववोन ।। निजनिकटीं बैसवी दयाघन ।। मग बोले मधुर वचन ।। मजकारण जाहलां श्रमित ।। ४१ ।। मज गरीबाचें पाचारण ।। मान्य करोनि आपण ।। आला येथवरी श्रमून ।। हेंचि भूषण थोरांसी ।। ४२ ।। मी आपुला धर्माश्रित म्हणोन ।। स्वयमेव आला आपण ।। कार्यभाग आपुला जाणोन ।। यथासांग करावा ।। ४३ ।। निमित्तमात्र मी दीक्षित ।। कार्यभार आपुले शिरीं निश्चित ।। यापरी ऐकोनि श्रीगुरूची मात ।। भूमिनाथ विनविती ।। ४४ ।। सर्व लौकैकपालका ।। तूंचि अससी सर्वचालका ।। पार्वतीसख्या आम्हां तूं का ।। वृथा वाचें मोहविसी ।। ४५ ।। जे जे आम्हां आज्ञापिसी ।। शक्तीपारिखें करूं कार्यासी ।। सर्व जगाचा शास्ता तूं होसी ।। लावी सेवेसी चरणाच्या ।। ४६ ।। मुनीश्वर सांगे द्विजासी ।। इतुक्यांत मिळाले विप्रराशी ।। पूर्वादिचतुर्दिशानिवासी ।। तैलंगदेशींचे बहुतकरोनि ।। ४७ ।। भस्म रुद्राक्षें सुशोभित ।। टोपी पागोटें शिरोवेष्टित ।। कारवीं अजिन कमंडलुहस्त ।। मूर्तिमंत कीं वेदपुरुष ।। ४८ ।। श्रीगुरूचा यज्ञमहोत्सव ।। पाहावया धरोनि

१. कुतूहल भाव.




शिव चिदम्बर

कुतुकभाव[१] ।। आले चहूंकडोनि भूदेव ।। वेदवैभव दावित ।। ४९ ।। कित्येक न्यायव्याकृतिनिष्णात ।। कित्येक मीमांसापारंगत ।। चतुर्वेदी श्रौतशतपथ ।। जाणत होते कित्येक ।। ५० ।। ऐसे सर्व ब्राम्हण ।। स्वामिसन्निधीं एवोन ।। जंव पाहती नेत्र उघडोन ।। श्यामसुंदर दिसे मूर्ती ।। ५१ ।। शुभ्रांबर दिव्यदर्शन ।। सर्वांगीं भस्म रुद्राक्ष भूषण ।। मधुर वचनें दयाघन ।। सर्वांसी आनंदवी ।। ५२ ।। ऐसिया श्रीगुरूसी ।। डोळेभरी पाहोनि विप्रराशी ।। नमन करोनि साष्टांगेसी ।। वेदपाठें स्तवूं लागले ।। ५३ ।। त्या ब्राम्हणासी चिदंबर ।। करोनि अभ्युत्त्थान नमस्कार ।। आदरें बैसवी आसनावर ।। सन्मानपुरःसर सर्वांसी ।। ५४ ।। कुशल प्रश्न विचारोनि ।। नृपांसी म्हणे दीक्षतमणी ।। निवासार्थ या सर्वांलागोनि ।। विशाल स्थान करावें ।। ५५ ।। स्वामीवचन परिसोनि नृपाळ ।। तत्काळ रचवोनि शिबिर सोज्वळ ।। त्यांत वसवोनि विप्रमेळ ।। आणिक मंडप घालविती ।। ५६ ।। मध्यें श्रीगुरूचा मोठा मंडप ।। नदीतीरीं वैदिकमंडप ।। पूर्वभागीं पाकशाला अनल्प ।। रचवीत ते नृपाळ ।। ५७ ।। दक्षिणभागीं सैन्यनिवास ।। सर्व कार्योपयोगी जनास ।। मंडप रचविला विशेष ।। राजनिवास पश्चिम भागीं ।। ५८ ।। मध्यें कमलकर्णिकापरी ।। श्रीगुरुमंडप शोभे भारी ।। सभोंवतीं कंजदळापरी ।। नाना मंडप शोभती ।। ५९ ।। इतुक्यांत आला दिवाकर ।। स्वामीसी वंदोनि बोले मधुर ।। कृपाकटाक्षें कोठीमंदिर ।। अवलोकन करावें ।। ६० ।। तंव तथास्तु म्हणोनि श्रीगुरू ।। निघाले कोठीसी सत्वरू ।। तेव्हां पुढें होवोनि विश्वंभरू ।। दावी श्रीगुरूसी सर्व वस्तु ।। ६१ ।। पोत्या गोण्या कट पिशव्या ।। असंख्य भरोनि ठेविल्या होत्या ।। हळद कुंकु आदि करोनिया ।। नामनिर्देशिं दावित ।। ६२ ।। हळद कुंकू पिशव्या प्रत्येक ।। पांच दावी सकौतुक ।। हळद कुंकू देखतां देख ।। पावला हरिख श्रीगुरू ।। ६३ ।। स्वामी म्हणे विश्वंभरासी ।। दिवाकरें रचित सामग्रीसी ।। काय पाहणें पूर्ण परियेसी ।। शंका मानसीं धरूं नको ।। ६४ ।। तथापि श्रीगुरुराया ।। अमृतदृष्टीनें या समयां ।। पहावें पदार्थसमुदाया ।। तेणें अक्षय होती सर्व ।। ६५ ।। तथास्तु म्हणोनि चिदानंदें ।। आंत प्रवेशितां मंदमंदें ।। विश्वंभर दावी सानंदें ।। अगोदर

गोधूमरासी[१] ।। ६६ ।। शालि तुंडुलराशी ।। दावित विश्वंभर शुभ्रगिरी एसी ।। तुवरी चणक डाळ परियेसी ।। पीतगिरी परी दिसती ।। ६७ ।। पीठ कणीक एकीकडे ।। नवनीत ढीग येरीकडे ।। तूपघट दावी मग पुढें सहस्त्रावधी ।। ६८ ।। साखरेच्या पंचसहस्त्र ।। पिशव्या दावी विश्वंभर ।। गुळाची राशी पर्वतमात्र ।। एकीकडे दावित ।। ६९ ।। गीठ द्राक्षा खडीसाखर ।। चंदन अगरु कर्पूर ।। केशर कस्तूरी आणि नाना वस्त्र ।। प्रत्येकशा दावित ।। ७० ।। तैलघट असंख्यात ।। एकीकडे दावी विश्वनाथ ।। स्वर्ण रुप्याचें नाणें बहुत ।। दावीतसे पाट आसन ।। ७१ ।। पूगजाती नारीफळ ।। लवंग पत्री कंकोळ ।। पानें विड्याचीं कोमळ ।। दावी फळेंही फणसादिक ।। ७२ ।। अनर्घ्यरत्न[२] आणि आभरण ।। दुभत्या महिषी गोगण ।। नाना प्रकारें शिल्पी जन ।। दावित स्वामीकारणें ।। ७३ ।। येणेंपरी नाना वस्तू ।। दावित असतां श्रीदीक्षितू ।। कृपादृष्टी पाहुनि समस्तू ।। बोले हंसत दिवाकरासी ।। ७४ ।। सर्व सामग्री पूर्ण असती ।। चिंता करूं नको तूं चित्तीं ।। ऐसें बोलतां सावित्रीपती ।। दिवाकर मागुती विनवित ।। ७५ ।। पाहावया जमाखर्च मात्र ।। कोणसी ठेवितां कोठीवर ।। ऐसें विचारितां दिवाकर ।। बोले मधुर वाक्यें श्रीगुरु ।। ७६ ।। जमाखर्च पाहणें श्रीमंता घरीं ।। कासया पाहिजे वैदिकमंदिरीं ।। या कामीं कोणासी तरी ।। नेमणूकशरी पंडू नको ।। ७७ ।। यापरी सांगोनि श्रीगुरु ।। निघाले संध्यार्थ नदीतीरू ।। कोठीघर एक क्रोशवरू[३] ।। सर्व संपत्ती समृध्दि जेथें ।। ७८ ।। त्यावरी श्रीगुरुकृपा पूर्ण ।। वर्णन करूं शके कवण ।। परी दिवाकर तो जाण ।। गुर्वाज्ञा नाणी चित्तीं ।। ७९ ।। हिशोब लिहावया कोठीमाजी ।। कित्येक कारकुनांसी योजी ।। इतुक्यांत तेथें आला सहजी ।। योगीराज शामभट्ट ।। ८० ।। त्यासी पाहतां चिदंबरें ।। अभ्युत्थान करोनि सत्वरें ।। आलिंगन दिलें आदरें ।। प्रेमभरें तेधवां ।। ८१ ।। परस्परांचे नमूनि चरण ।। अंगी आनंदें रोमहर्षण ।। नेत्र झाले बाष्पपूर्ण ।। आनंदसांद्र उभयता ।। ८२ ।। तव शामभट्ट विचारी स्वामीसी ।। प्रश्न एक माझा

.........................

१. गव्हासी रास. २. अमोलिक रत्नें. ३. दोन मैलभर.




शिव चिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

परियेसी ॥ सोमपान इच्छा झाली आपणासी ॥ यज्ञभोक्ता देव कोण ॥ ८३ ॥ तंव स्वामी बोले हंसत ॥ माझी इच्छा नसे यत्किंचित ॥ दिवाकराचा आग्रह बहुत ॥ म्हणोनि झालों निरुपाय ॥ ८४ ॥ तंव विनवी शामशिष्ट ॥ कैसा तरी असो उत्कृष्ट ॥ स्वामीनें याग आरंभिला स्पष्ट ॥ तेणें आनंदी जाहलों ॥ ८५ ॥ याग कीर्ती त्रिभुवन ॥ व्यापोनि होतसे पावन ॥ आलो ध्यावया यागदर्शन ॥ येणे जाहला महानंद ॥ ८६ ॥ सुखगोष्टी करित उभय कोटी ॥ बैसोनि क्षणमात्र नदीतटीं ॥ मग निज मंडपानिकटीं ॥ बसवीत योगीशातें ॥ ८७ ॥ इतुक्यांत आली श्रौत मंडळी ॥ स्वामीसी बोलावूं ते वेळीं ॥ तंव निघाला दीक्षितचंद्रमौळी ॥ यज्ञमंडपदर्शनार्थ ॥ ८८ ॥ सभोंवतीं यागभूमी ॥ पाहतां तुष्टला श्रीस्वामी ॥ ऐका चित्त देवोनि तुम्ही ॥ मंडपविस्तार सांगतों ॥ ८९ ॥ शास्त्रोक्त शोधोनि अवनी ॥ आधीं प्राची साधोनी ॥ मग कारिका प्रमाण धरोनि ॥ यागमंडप निर्मिलासे ॥ ९० ॥ आधीं पंचकुंडें सुशोभित ॥ दीर्घ चतुरस्त्र वीस हात ॥ शाला रचवोनि उन्नत ॥ त्यास करिती द्वारें तीन ॥ ९१ ॥ त्याचे संभोंवती लोकमंडप ॥ जननिवासार्थ अमूप ॥ कवण करी त्याचें माप ॥ लोकोत्तर रम्यता ॥ ९२ ॥ शालेपुढें तीन हात ॥ जागा सोडिली ती अंतःपात ॥ तेथोनि पुढें छत्तीस हात ॥ उत्तर वेदी जाणावी ॥ ९३ ॥ सदोमंडप हविर्धान ॥ आग्नीध्रीय शामित्रसदन ॥ इतुकें मंडप शास्त्रधरोन ॥ घातले असती सुशोभित ॥ ९४ ॥ पुढें महावेदी पंच हस्त ॥ चात्वाल मार्जालीय संज्ञित ॥ उपरव धिष्ण्य औदुंबरी प्रांत ॥ यथाशास्त्रें निर्मिले ॥ ९५ ॥ शास्त्रोक्त घालोनि मंडप इतुके ॥ सभोंवतीं लौकिकार्थ देखें ॥ शिल्पिजनें रचवोनि कौतुकें ॥ वेणुकटादिकें आच्छादित ॥ ९६ ॥ मग राजेलोक मिळोन ॥ मंडपासी करीती विभूषण ॥ सभोंवतीं वंदिती नव तोरण ॥ अनर्घ्य रत्नाभरण जागोजागीं ॥ ९७ ॥ मुक्ता आणि सुवर्णमाळ ॥ बांधिती सद्वस्त्र केवळ ॥ ऊंस केळी पोफळी नारळ ॥ बांधिले प्रति स्तंभीं ॥ ९८ ॥ नानाविध चित्रें थोरथोर ॥ लिहिल्या असती बाहुल्या विचित्र ॥ चित्रें पाहतां कीं सुरवर ॥ भासती प्रत्यक्ष उभे ऐसे ॥ ९९ ॥ ध्वज पताका अनेक ॥ शोभती

शि
व
चि
द
म्ब
र

शिवचिदम्बर

श्वेतपीतादिक ।। पुढें भेरीगोपुर सुरेख ।। मनोहारक दर्शनमात्रें ।। १०० ।। नाना विचित्र रंगवल्ली ।। घातल्या त्या स्थळोस्थळीं ।। सुगंधपुष्परोपावळी ।। असंख्य त्या वेळीं स्थापिल्या ।। १ ।। बहुत काय सांगणें ।। मंडपशोभा पहावया कारणें ।। स्वर्गाहुनी संप्राप्त[२] देवगणे ।। विस्मित होवोनि राहिले ।। २ ।। देवाच्या चित्र बाहुल्या ।। कीं मंडपासभोंवती रचियेल्या ।। यापरी देवगण त्या समया ।। स्थाणूपरी देखिले ।। ३ ।। मंडपशोभा पाहोनि ।। विश्वकर्मेही निजमनीं ।। अति विस्मित होवोनि ।। लज्जें अधोवंदन[३] पैं केलें ।। ४ ।। यापरी मंडपसौदर्य ।। स्वामी पाहोनि अनिर्वाच्य ।। जाहला म्हणत संध्यासमय ।। निघाला निजमंडपासी ।। ५ ।। इकडे यज्ञमंडपांत ।। यवन एक आला अवचित ।। त्यासी पाहोनि क्रोधाक्रांत ।। जाहला दिवाकर तेधवां ।। ६ ।। क्रोधें त्यासी मारूं धांवें ।। इतुक्यांत धांवोनि सावित्रीधवें ।। यवनाचा हात धरोनि सुभावें ।। संबोखवी दिवाकारसी ।। ७ ।। आदरें त्याचा धरोनि हस्त ।। यागमंडप दावी समस्त ।। मग तो यवन महावेदींत ।। तत्क्षणीं गुप्त जाहला ।। ८ ।। तंव विनविती जन समस्त ।। स्वामीसी करोनि प्राणिपात ।। हा कोण आला होता येथ ।। म्लेंछरूपें देवराया ।। ९ ।। आपण आदरें त्यासी ।। यागभूमि दाविली प्रेमेसि ।। क्षणांत उत्तर वेदींत कैसी ।। गुप्तगती तो पावला ।। ११० ।। तंव बोले श्रीगुरू ।। आला होता यज्ञेश्वरू ।। निजस्थानीं परिकरू ।। गुप्तरूपें राहिला ।। ११ ।। आतां सांगतो यज्ञविस्तार ।। ऐका म्हणे मुनीश्वर ।। श्रोते बैसले होवोनि सादर ।। चिदम्बरकिंकर सांगतसे ।। १२ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ ।। म्हणोनि ऐका श्रोते समस्त ।। पंचत्रिंशोऽध्याय रसाळ हा ११३ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे यज्ञवैभवखण्डे यज्ञपूर्वाङ्कथनं नाम पंचत्रिंशोऽध्यायः ।। ३५ ।। ओविसंख्या ११३ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

शिवचिदम्बर

१. नगारखाना. २. आलेले. ३. खाली मान.

# यज्ञवर्णनम्




पंचकुंड सुशोभित । अहंपशूचा करोनि घात । कर्मयज्ञ लौकिकार्थ । करोनिया दाविला ॥

चिदम्बरचरित्र

अध्या ३६ ओवी

|| श्रीचिदम्बरमहागुरवे नमः || सोमयागें दीक्षितासी || जो स्मरे चित्तीं चिदम्बरासी || चिंतितार्थलाभें होतो हर्षी || त्या चिदम्बरासी नमूं आतां || १ || द्विजेंद्रहो ऐका समस्त || म्हणे मुनीश कृपावंत || ऐका श्रीगुरूचा यज्ञ विख्यात || श्रवणेंचि लाधे जीवन्मुक्ती || २ || अहंपशूचा करोनि घात || ज्ञानयज्ञ केला प्रख्यात || कर्मयज्ञ लौकिकार्थ || करोनि दाविला जयानें || ३ || दोन यज्ञांचें निरूपण || यथामती तुम्हांलागोन || सांगतों ऐका चित्त सावधान || करोनिया या समयीं || ४ || शकें सत्राशें एकुणतीसीं || प्रभवसंवत्सरीं चैत्रमासीं || शुक्ल प्रतिपदा सोमदिवशीं || आरंभी यज्ञासी दीक्षितेंद्र || ५ || ब्राम्ह मुहूर्ती उठोनि त्या दिवशीं || आधी सारोनि नित्य कर्मासी || वेदवेत्ते ऋषिसदृशासी || ब्राम्हणापाशी पातले || ६ || ज्यापरी आत्मसाधक || आधीं सत्कर्म आचरोनि सम्यक || जैसा गुरूसी सोत्सुक || शरण जाय त्यापरी || ७ || सुस्नात सुवस्त्र भूषणें || विभूषित जायायुग्म जेणें || श्रध्दा भक्ति प्रमाणें || आपणां सर्वे घेतलें || ८ || आधीं वंदोनि कुलदैवता || मग वंदीं विप्रां समस्तां || सभासदांची आज्ञा तत्त्वतां || तयें वेळीं घेतली || ९ || मग करीत सोमसंकल्प || आधीं विघ्नेशपूजा अमूप || करोनि चिदानंददीप || पुण्याहविधी समापित || १० || नांदीमुख पितरांसी || आराधोनि बहुवसी || मग वरावया ऋत्विजासी || ब्रम्हवृंदासी विनवित || ११ || सभासदहो परिसावी विनंती || सोळा ऋत्विज पाहिजेत यज्ञार्थी || कोण त्यासी पाठवा मजप्रती || ऋत्विग्वरण करीन || १२ || स्वामीवचन परिसतां समस्त || पंडित उभे राहिले सभेंत || मी पुढें मी पुढें म्हणत || परस्पर विवदती[1] || १३ || सदभ्यास करूं लागतां || नानाकर्मे जेंवि पुढतां || येवोनि करिती विघ्नता || तैसे पंडित पुढें येत || १४ || तंव सर्वांसी श्रीगुरु || विनंती करीत अत्यादरू || कां वाद करितां परस्परू || बैसावे जी स्वस्थपणें || १५ || मी असतांही गरीब ब्राम्हण || आपण आलां दया करून || सर्वही श्रौतशास्त्रीं निपुण || तथापि ऐका वचन माझें || १६ || यागकर्मी

१. वाद करते झाले.

शि व चि द म्ब र

ऋत्विज सोळा ।। मज पाहिजेत या वेळां ।। ऋत्विजासारिखा सर्वांला ।। समत्वें सत्कार होईल ।। १७ ।। शक्तिसारिखे सर्वांसी ।। पूजा करीन निश्चयेंसी ।। वृथा कलह सोडोनि मजसी ।। वरणार्थ निरोप द्यावा ।। १८ ।। स्वामीचें करितां वाक्सुधापान ।। सर्वही पावले समाधान ।। साधकाच्या दृढनिश्चयें जाण ।। जेवि नानाकर्मे शांत होती ।। १९ ।। जैसा साधक गुरुपंथ ।। मुख्य अंगीकारी स्वहितार्थ ।। तैसे सोळा ऋत्विज स्वापेक्षित ।। वरणार्थ घेई श्रीगुरू ।। २० ।। नवविधा भक्ती अष्टांग योग ।। जैसे साधक वरी निःसंग ।। तैसा स्वामी सर्वांतरंग ।। वरी सप्तदश ऋत्विजांसी ।। २१ ।। यापरी करोनि ऋत्विग्वरण ।। मग करित मधुपर्कपूजन ।। आधीं करोनि पादप्रक्षालन ।। गंधपुष्पादि समर्पिती ।। २२ ।। शाल पीतांबर प्रावरण ।। समर्पोनी सुवर्णमुक्ताभरण ।। केले मधुपर्कपूजाविधान श्रीगुरुनाथे प्रेमभावें ।। २३ ।। काम्य कर्म समारोपोनि ।। जेंवि झटें साधक निजसाधनीं ।। तेंवी समारोपोनि अग्नि ।। यागसाधनीं प्रवर्तला ।। २४ ।। निघाला जंव यागमंडपासी ।। तंव मूर्ती रम्य देखिली जैसी ।। सांगतों ऐका तुम्हासीं ।। ध्यान चित्तीं भरावया ।। २५ ।। स्नान करोनि शुभ्रभस्म ।। सर्वांगीं चर्चोनी आनंदधाम ।। शुभ्रवस्त्र रुद्राक्षस्तोम ।। स्वीकरोनि अत्यंत शोभे ।। २६ ।। हातीं धरोनि सुधापूर्ण कलश ।। दीक्षितेंद्र जातां यज्ञमंडपास ।। कोटिसूर्यापेक्षां दीप्तिविशेष ।। ब्रम्हवर्चसें भासत ।। २७ ।। सद्वस्त्रालंकार संपत्ती ।। लेवोनि दोघीही सती ।। स्वामीमागें चालिल्या मंदगती ।। धरा चित्तीं त्या चिदंबरासी ।। २८ ।। त्यामागें पांचही पुत्र ।। मंदमंद चालिले सुकुमार ।। हातीं घेवोनि यज्ञसंभार ।। ऋत्विजही पुत्रामागें ।। २९ ।। भस्मरुद्राक्षादिकें भूषित ।। गीर्वाणभाषें धर्मशास्त्रार्थ ।। बोलत ऋत्विजासंगे पंडित ।। चालिलेती यागस्थळा ।। ३० ।। सर्वांवरी महावस्त्रें ।। छाया केलीसें शास्त्राधारें ।। हविर्द्रव्यही[1] छायाधारें ।। आणिती ऋत्विज मंडपासी ।। ३१ ।। चित्र वस्त्र नाना भूषण ।। लेवोनि सर्वही भूपालगण ।। दिक्पालापरी दैदीप्यमान ।। पंडितांमागे शोभती ।। ३२ ।।

१. हवनीय द्रव्य.

शि व चि द म्ब र

शिवचिदम्बर

सभोंवती तळपती राजभट ।। धरोनि शस्त्रास्त्र उत्कट ।। स्वामीयश वाखाणित भाट ।। कोगल नादें त्यासगयीं ।। ३३ ।। तूर्यपटहादि मंगल नादें ।। दिक्पर्वतादि प्रतिनादें ।। वीणा मृदंगादि महानादें ।। दाही दिशा दुमदुमित ।। ३४ ।। वेद पठती द्विजवृंदें ।। भक्त गर्जती जयनादें ।। करताळ पिटित आनंदें ।। येणें बधिरावत कर्णछिद्र ।। ३५ ।। वारस्त्रियांचे रम्य गायन ।। ऐकतांचि मूढावत सर्वांचें मन ।। गति खुंटोनि स्तब्ध राहतां जन ।। मार्ग जाहला संदटित ।। ३६ ।। तंव येवोनि वेत्रधारी ।। यत्नें दाटी करिती दूरी ।। मग मंदमंद श्रीहरी ।। पुढें पावुलें टाकित ।। ३७ ।। श्यामसुंदर श्रीगुरुनाथ ।। कमलापरी ज्याचे नेत्र शोभत ।। कृपादृष्टीनें सर्वांकडे पाहत ।। चालतसे हळूंहळूं ।। ३८ ।। दयाघन राजीववदन[1] ।। मंदहासें पाहती भक्तजन ।। कुंददशन[2] प्रभापूर्ण ।। चंद्रिकापरी पसरत ।। ३९ ।। पूर्णकुंभ घेवोनि शिरीं ।। पुढें चालिल्या त्या पुरंध्री ।। मागें चालत स्त्रिया भारी ।। देवांगनापरी त्या वेळीं ।। ४० ।। भक्तेच्छापूरणीं कल्पवृक्षाहुनी ।। जो दक्ष असे दीक्षितमणी ।। त्यासी दृढ धरा ध्यानीं ।। तेणें समाधान पावे चित्त ।। ४१ ।। श्रीगुरु यज्ञमंडपासी महोत्सवें ।। चालिले असतां नाना वैभवें ।। जन पाहती प्रेमभावें ।। कीं नेत्रांबुजें[3] पूजती ऐसे ।। ४२ ।। मंडपासन्निध येवोनि ।। हस्तपाद प्रक्षालोनि ।। हातीं घेवोनि दोन्ही अरणी ।। शालाद्वारीं मंत्र म्हणत ।। ४३ ।। प्रपंच आशा सोडोनि सर्व ।। साधक जाय जेंवि अभ्यासठाव ।। तैसा पातला श्रीगुरुराव ।। यागमंडपा माझारी ।। ४४ ।। जैसा गुरुवाक्यार्थ मंथोनि ।। हृदयकुंडीं स्थापी ज्ञानाग्नी ।। तैशा अरणी मंथोनि दोनी ।। पांचही कुंडीं स्थापित ।। ४५ ।। गुरूपदेश ज्यापरी ।। तैसे वेळोवेळीं साधन करी ।। कात्यायन सूत्राधारें त्याचपरी ।। आध्वर्यव कर्म आरंभित ।। ४६ ।। मग सर्व ऋत्विज मिळोनि ।। दीक्षणीयादि[4] कर्म प्रथम दिनीं ।। कर्तव्य सर्व समापोनि ।। श्रीचरणीं वंदिताती ।। ४७ ।। प्रथम दिनीं कृष्णाजिनदीक्षा ।। होतां शोभत सावित्रीसखा ।। कीं मूर्तिमंत वैराग्य देखा ।। यज्ञमंडपीं बैसला ।। ४८ ।। मग मध्यान्हीं द्विजाराधनार्थ ।। दिवाकरासी

शिवचिदम्बर

१. कमलवदन. २. मोगऱ्याप्रमाणें शुभ्रदंत. ३. नेत्रकमळाने. ४. दीक्षणीया प्रारंभणीया वगैरे इष्टि.

आज्ञापित ।। तंव द्विजेंद्र शुचिष्मंत ।। येवोनि बैसत आम्रवनीं ।। ४९ ।। वेद पठती प्रतिशाखिक ।। कित्येक शतपथ पाठक ।। आणि सामगान करिती सुरेख ।। इतुक्यांत दिवाकर पातला ।। ५० ।। सर्व राजसेवकासी ।। आज्ञा करी वाढणेसी ।। मग एकैक पदार्थासी ।। नेमोनि घेत एकैक ।। ५१ ।। निज सेवकांसमवेत ।। बापू गोखले अन्न वाढित ।। जमखिंडी परशुरामपंत ।। अंगीकारित भक्ष्य वाढणें ।। ५२ ।। हावनूर देशाधीश ।। घृताधिकार घेतला विशेष ।। श्रीमंतांचे अष्ट प्रधानास ।। अपूपादि वोपिले[१] ।। ५३ ।। कित्येकांसी घेवोनि सहाय्यार्थ ।। पुरविती आपापले पदार्थ ।। एकेक गाडी एकेक पंक्तीत ।। स्वस्वपदार्थ भरोनि ठेविती ।। ५४ ।। कित्येक पाक आणुनी गाड्या भरती ।। कित्येक काढोनी वाढिती ।। कित्येक गाड्या पुढें ओढिती ।। नाग गर्जत श्रीगुरूचें ।। ५५ ।। गुप्तरूपें निर्जर ।। वाढिताती द्विजपात्र ।। वीस वीस वाढितां पात्र ।। पंक्ती वाढणे पूर्ण होय ।। ५६ ।। नातरी एक दोन पळांत ।। कैसे वाढतील नृपजात ।। एक एक पंक्ती क्रोशपरिमित ।। मनुष्य कैसें वाढूं शकें ।। ५७ ।। घृतांत समस्त पदार्थ ।। वाढणें होतां परिपूर्त ।। पात्र प्रोक्षोनि शंकरदीक्षित ।। जल सोडित एकोभावें ।। ५८ ।। इतुक्यांत उडविली शतघ्नी[२] ।। तिचा नाद पडतां कानीं ।। ब्राम्हण आपोशन घेवोनि ।। भोजनासी आरंभित ।। ५९ ।। विप्र जेवित असतां स्वस्थचित्तें ।। मृदंग तूर्य कहाल तेथें ।। वाजवूं लागले मंगल वाद्यातें ।। नौबत आदि करोनि ।। ६० ।। येणेंपरी द्विजगणें ।। जेवित असतां स्वस्थपणें ।। कोणत्याही पदार्थासी उणें ।। न दिसत त्यावेळीं ।। ६१ ।। श्रीचिदम्बर सद्गुरुनाथ ।। पुरवितां अन्नादि पदार्थ ।। कितीही वाढितां करस्थ ।। पात्रीं न दिसे न्यूनपणा ।। ६२ ।। लवणादि घृतांत पदार्थ ।। जितुके जेविले तितुके टाकित ।। आकंठ जेवोनि झाले तृप्त ।। तरी वाढित अत्यादरें ।। ६३ ।। मग तांबूल दक्षिणा देवोनि ।। ब्राम्हण तोषविले त्या दिनीं ।। आतां सांगतो तुम्हां लागोनी ।। ब्राम्हणसंख्या परियेसा ।। ६४ ।। बावन्न हजारावरी दोन शत ।। ब्राम्हण जेविले

........................

१. नेमून दिले. २. तोफ.




शिव चिदम्बर

पहिल्या पंक्तींत ॥ वाढपे नृप मंत्री याविरहित ॥ सैनिकादि दोन लक्ष ॥ ६५ ॥ यापरी सर्वही जन ॥ सेवोनि श्रीप्रसादान्न ॥ आनंदें गेले स्वस्वस्थान ॥ स्वामी पातला यागमंडपा ॥ ६६ ॥ भार्यासहित चिदानंद ॥ पिवोनि बैसले गाईचे दूध ॥ इतुक्यांत विद्वद्भूपवृंद ॥ पातले दर्शनार्थ ॥ ६७ ॥ स्वामीसी करोनी प्रणाम ॥ जें जें पुसती शास्त्रवर्म ॥ तें तें सांगे मेघश्याम ॥ यज्ञकर्म बहुवसी ॥ ६८ ॥ सर्वांसी सांगोनि यज्ञकथा ॥ संतोषवोनि समस्तां ॥ तंव दशघटी रात्र होता ॥ निरोप देत सर्वांसी ॥ ६९ ॥ मग सर्वही गुरुवचना ॥ शिरसा मानोनि गेले स्वस्थाना ॥ मग आस्तरोनि कृष्णाजिना ॥ श्रीगुरुराण विश्रमित ॥ ७० ॥ येणेंपरी प्रथम दिवसीं ॥ कर्म झाले तें तुम्हांसी ॥ सांगितलें आतां दुसरे दिवसीं ॥ झाले तें सांगतों परियेसा ॥ ७१ ॥ यज्ञदीक्षा घेवोनि श्रीगुरू ॥ शोभे जैसा तेजस्वी दिनकरू ॥ रुद्राक्ष भस्म शुभ्रवस्त्रू ॥ स्वस्तिकासनीं बैसला ॥ ७२ ॥ दंड कृष्णाजिन मृगशृंग ॥ धरोनि शोभत सर्वांतरंग ॥ त्याचे चरणीं ठेवोनि अंतरंग ॥ कथा अभंग परियेसा ॥ ७३ ॥ दुसरे दिवसीं प्रातःकाळीं ॥ उठोनि ऋत्विज मंडळी ॥ स्नान करोनि श्रीगुरुजवळीं ॥ पातली नित्यानुष्ठानार्थ ॥ ७४ ॥ स्वामीही यज्ञेशासी ॥ वंदोनि आसनीं बैसले संतोषीं ॥ ऋत्विजही इष्टिकर्मासीं ॥ आरंभित भक्तीनें ॥ ७५ ॥ चक्षुरादि ऋत्विग्गण ॥ करित असतां स्वकर्माचरण ॥ साक्षित्वें बैसे जेवि आत्मा यजमान ॥ तैसा श्रीगुरुराण बैसला ॥ ७६ ॥ सोमक्रयादि सर्व कर्म ॥ पूर्ण करोनि ऋत्विक्स्तोम ॥ मग आरंभिलें प्रवर्ग्यकर्म[1] ॥ अग्निज्वाला उडवित ॥ ७७ ॥ स्थाता[2] अध्वर्यू धरोनि दोघे ॥ घर्म[3] नेवोनि मंडपामागें ॥ अजापय ओतितां ज्वाला निघे ॥ चित्रगतीनें तेधवां ॥ ७८ ॥ देवांसी यज्ञवार्ता कळविणें जोगे ॥ स्वर्गा जात कीं व्योममार्गे[4] ॥ ऐसे मानिती जन अवघे ॥ धर्मक्रिया पाहतां ॥ ७९ ॥ मग करोनि धर्मयाग ॥ ऋत्विजीं सेविले यज्ञभाग ॥ तंव झाला मध्यंगत पतंग[5] ॥ विप्रौघ मिळाला आम्रवनीं ॥ ८० ॥ आत्मसुखसंकल्प करोनि ॥ प्रापंचिक सर्व कर्म त्यजोनि ॥ शरण जावोनि

१. धर्म तयार करणेंसाठी केंली जाणारी क्रिया. २. प्रतिप्रस्थाता नावाचा ऋत्विज. ३. तप्तघृतमिश्रितदुग्ध. ४. आकाशमार्गानें. ५. सूर्य.




शिव चिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

श्रीगुरुचरणीं ।। ज्ञानदीक्षा घेतली ।। ८१ ।। मंत्रानुष्ठान यथाविधी ।। निर्विघ्नें चालावया आधीं ।। वैराग्यदीक्षा घेवोनि त्रिशुद्धी ।। प्रथम भूमी साधिती ।। ८२ ।। दुसरे दिनीं दुसरी भूमी ।। स्वीकारोनि आत्मधामीं ।। अभिमान सोडोनि देहसद्यी ।। धर्मविधीनें स्थूळ जाळी ।। ८३ ।। साधनीं विघ्ननिवारणार्थ ।। द्विजसमाराधना आरंभित ।। पूर्व दिवसापरी दीक्षित ।। आराधित ब्राम्हणांसी ।। ८४ ।। शीत सुवासिक जल ।। नानाविध पक्वान्न रसाळ ।। समर्पोनि तोषवी विप्रमेळ ।। गुरुकृपाबळें शंकर ।। ८५ ।। इकडे चिदम्बराज्ञेनें ।। दिवाकर ऋत्विजाकरणें उपहार करवी आदरानें ।। नानाफळें समर्पोनिया ।। ८६ ।। कदळी द्राक्ष खर्जूर ।। अंजूर डाळिंब दुग्ध साखर ।। नारिंग अंबे जंबु जंबीर ।। फळें अपार समर्पित ।। ८७ ।। तृप्त झाले ऋत्विज समस्त ।। ब्राम्हण जेविले पूर्ववत ।। दुसरे दिनीं प्रथमं पंक्तींत ।। ऐका सांगतों विप्रसंख्या ।। ८८ ।। बासष्ट सहस्त्रावरी ।। पंचशत संख्या आवधारी ।। बाकीची संख्या पूर्व दिनापरी ।। सर्वही यथेच्छ जेविले ।। ८९ ।। प्रसाद घेवोनि राजे लोक ।। आले श्रीगुरुसन्निधानीं देख ।। श्रीगुरुही त्यांसी सम्यक ।। सांगे कौतुकें ज्ञानमार्ग ।। ९० ।। इतुक्यात एक चमत्कार ।। जाहला ऐका सांगतों थोर ।। मलापहाडोहीं एक भूसुर ।। पोहतां अवचित बुडाला ।। ९१ ।। हात पाय थकोनि दोनी ।। तळीं पावला तत्क्षणीं ।। इतुक्यांत दीनचिंतामणी ।। काय करी ते परियेसा ।। ९२ ।। बोधित असता एकाएकी । स्वामी दोन्ही नयन झाकी ।। मौन्य धरोनि आणखी । ऊर्ध्ववायू करोनी बैसला ।। ९३ ।। एक्या क्षणांत वस्त्रांतुनी ।। धडधड वाहतसे पाणी ।। पाहतां जन विस्मय पावोनि ।। तटस्थ होवोनि बैसले ।। ९४ ।। इकडे जाहलें विचित्र ।। नदींत बुडाला होतां नर ।। त्याचे भुजमुळीं घालोनि कर ।। कोणीएक वरी टाकित ।। ९५ ।। वरी येतां तवं ते वेळीं ।। मोठी शिळा तेणें देखिली ।। धांवोनि दोनी हातें धरिली ।। मग सावध बैसला त्यावरी ।। ९६ ।। कोणें मला बाहेर काढिलें ।। दयाळें माझे प्राण वांचविले ।। ऐसे चित्तीं चिंतीत त्या वेळे ।। पाहिल्या चारी दिशा ।। ९७ ।। सभोंवतीं नदीतटीं ।। मनुष्यासी न पाहतां दिठीं ।। निश्चय झाला तयेचे

शि
व
चि
द
म्ब
र

पोटीं ।। दीक्षितेंद्रें वांचविलें ऐसा ।। ९८ ।। जाणोनि चिदम्बराची करुणा ।। हर्ष न मावे चित्तीं जाणा ।। आनंदें करित नामगर्जना ।। बैसलासे शिळेवरी ।। ९९ ।। तंव नदीतटीं नामगर्जन ।। ऐकोनि समीपस्थ जन ।। तेथें जावोनि त्याचें वर्तमान ।। ऐकोनि बाहेर काढिती ।। १०० ।। तत्काळ शिला झाली अदृश्य ।। जन म्हणती काय हे अपूर्व ।। ब्राम्हणाचे वांचवावया जीव ।। पाषाण हा प्रगटला ।। १ ।। तंव इकडे श्रीगुरु ।। उठोनि स्वीकरी अन्य वस्त्रू ।। मागुती ज्ञानकथा थोरू ।। सांगत बैसला आनंदें ।। २ ।। इतुक्यांत नदीहूनी ।। जन आले ब्राम्हणास घेऊनी ।। निवेदन करिति स्वामीसन्निधानीं ।। त्याचा सर्वही वृत्तांत ।। ३ ।। हा वृत्तांत ऐकतां ।। हर्ष न समाये जनचित्तां ।। अंग रोमांचभरित तत्त्वतां ।। नेत्रीं वाहती प्रेमाश्रू ।। ४ ।। चित्रचरित्र पाहोन ।। पुनःपुनः करिती वंदन ।। जयजयकारें गर्जत स्तवन ।। करिती तें नानापरी ।। ५ ।। प्रतिदिनीं पाहोनि चरित्र ।। पूर्ण विश्वास जडोनि गुरूवर ।। अप्रयासें पावोनि आत्मज्ञान थोर ।। सेवापरायण जाहले ।। ६ ।। इतुक्यांत आला खिन्नचित्त ।। यज्ञशालेसी दिवाकर दीक्षित ।। स्वामीसी करोनि प्रणिपात ।। विनवीत म्लानमुखें ।। ७ ।। दयाळा कोठीमाझारीं ।। ज्यां जी जी संपादिली सामग्री ।। दो दिवसांत दिसे निर्धारी ।। अवशिष्ट चतुर्थांश ।। ८ ।। याउपरी करावें काय ।। प्रत्यहीं मिळतो जनसमुदाय ।। ऐसें उच्चारित दैन्यवाक्य ।। हिशोब पुढें ठेविले ।। ९ ।। हें पाहोनि मंदहसित ।। बोले पुत्रासी श्रीगुरुनाथ ।। पूर्वींच सांगितलें तुजप्रत ।। वृथा चिंता घेतली तुवां ।। ११० ।। आजपासोनी सोडी साहस ।। कासया पाहिजे हिशोब आम्हांस ।। वैदिक आम्ही जाण भरवस ।। श्रीमंतांसी पाहिजे तो ।। ११ ।। आमुचें धन मुख्य समाधान ।। कासया करिसी व्यग्र लेखन ।। आमुचे रक्षणीं विश्वंभर जाण ।। रात्रंदिन जागतो ।। १२ ।। शुभकर्मासी सहायी ।। शंभू जागत भक्ताठायीं ।। भीती धरूं नको तूं हृदयीं ।। निर्भयें काम चालवी ।। १३ ।। येणेपरी दिवाकरासी ।। सांगोनि समाधान परियेसी ।। स्वामी पाठवी स्वस्थळासी ।। हर्ष चित्तासी तेधवां ।। १४ ।। त्या दिवसापासोनि जगजेठी ।। मुक्तद्वार ठेवी कोठी ।। मग तेथुनी जनदाटी ।। कोठीमाजीं

शिवचिदम्बर

सर्व काळ ।। १५ ।। ज्यासी जे पाहिजेत पदार्थ ।। ते ते स्वीकारिती निर्भीत ।। यथेच्छ घेती जन समस्त ।। श्रीचिदम्बरकृपें ।। १६ ।। तंव शुचिष्मंत आले ऋत्विज ।। सायंप्रवर्ग्य करणेंकाज ।। प्रातःकर्मवत प्रवर्ग्यकरणेज ।। कर्म विध्युक्त समापिले ।। १७ ।। पुढें सोमराज आलंभोनि[1] ।। नमिती भावें श्रीगुरुचरणीं ।। मग स्वामीआज्ञा घेवोनि ।। संध्यार्थ गेले नदीसी ।। १८ ।। इकडे दीक्षितही पिवोनि क्षीर ।। बैसले सुखासनीं स्थिर ।। तंव पौराणिक येवोनि सत्वर ।। पुराण सांगूं लागले ।। १९ ।। प्रेमभावें गायक गाती ।। कुशल वैणत्रिक वीणा वाजविती ।। मंत्र ब्राम्हण वैदिक पढती ।। स्वामीसी सेविती स्वस्वविधें ।। १२० ।। कित्येक जयजयकारें गर्जती ।। कित्येक भजन करिती ।। कित्येक आरती ओवाळिती ।। पुरंध्री[2]वर्ग श्रीगुरूसी ।। २१ ।। आधींच आनंदमूर्ती ।। त्यावरी यज्ञदीक्षासंप्राप्ती ।। शुभ्रनववस्त्र मृगकृत्ती ।। धरोनि शोभत अतिशयें ।। २२ ।। आधींच वपुषा[3] मनोहर ।। घृतदीपप्रकाशें फांके कांती थोर ।। अर्धोन्मीलितनेत्रासी नृपवर ।। नमिती वारंवार सद्भावें ।। २३ ।। यापरी सेवोनि श्रीगुरूसी ।। जन गेले स्वस्वस्थानासी ।। स्वामीही निजानंदें मानसीं ।। विश्रांतीसी पावत ।। २४ ।। देहाभिमान सोडितां ।। दुरावली प्रपंचचिंता ।। शांती अंकुरावली चित्तां ।। विचारा आली पक्वदशा ।। २५ ।। आतां आत्मज्ञान यज्ञांग ।। तिसरी भूमी जी अभंग ।। तृतीय दिवशीं आरंभिली चांग ।। ती यथासांग सांगतों ऐका ।। २६ ।। जो बैसला यागमंडपामाजीं ।। ज्ञानपूर्ण चिदम्बरयाजी ।। सब्दोधें उध्दरित भक्तराजी ।। तत्पदपंकजीं ठेवा चित्त ।। २७ ।। तनुमानस जी तृतीय भूमिका ।। निरंतर अभ्यासें लाधे साधका ।। तत्प्राप्त्यर्थ तिसरे दिनीं देखा ।। लिंगदेहनिरास आरंभिला ।। २८ ।। चक्षुरादि ऋत्विग्गण ।। प्रभातीं शुचिष्मंत होवोन ।। आधीं केलें स्वामीसी वंदन ।। चिदम्बरभानू उगवतां ।। २९ ।। आवश्यक निजकर्म ।। समापोनि ऋत्विक्स्तोम ।। घेतले अलंकार प्रेम ।। भस्म रुद्राक्ष सुवर्णादिक ।। १३० ।। अनर्घ्यरत्न मुक्ताभरण ।। लेवोनि सर्व ऋत्विग्जन ।। आरंभिले

शिवचिदम्बर

........................

१. स्पर्श करून. २. स्त्रीवर्ग. ३. शरीर.

शि व चि द म्ब र

प्रवर्ग्याचरण ।। मंत्र अस्खलित उच्चारित ।। ३१ ।। साम गाती उद्‌गातृ सुस्वरें ।। अध्वर्यु पढत मंत्र सुस्वरें ।। होता स्तवितसे प्रणवोच्चारें ।। सादरें पाहती जनस्तोम ।। ३२ ।। यापरी समापोनि प्रवर्ग्यधर्म ।। आरंभिलें उपसदकर्म ।। पूर्ववत आलंभोनि सोम ।। उत्तरवेदी मोजत ।। ३३ ।। यापरी प्रातरनुष्ठान ।। समापोनि ऋत्विग्जन ।। नदीसी गेले संध्यार्थ जाण ।। दिनमणी होतां मध्यंगत ।। ३४ ।। द्विजाराधना केली पूर्वीप्रमाणें ।। पात्रीं वाढिलीं नाना पक्क्वान्नें ।। इतुक्यांत अगाध प्रमादानें ।। भोजनीं विघ्नसमय पातला ।। ३५ ।। कूष्मांडभाजीचिया हौदात ।। आचारी पडला अवचित ।। हें पाहोनि वाढपे समस्त ।। त्यासी काढिती गडबडीनें ।। ३६ ।। इतुक्यांत झाली त्याची काया ।। पक्व वृतांकापरी[1] भाजली पहा ।। सर्वही म्हणती अहाहा ।। काय समय हा पातला ।। ३७ ।। तंव कित्येक सेवक जन ।। धांवोनि सांगती श्रीगुरूसि जाण ।। स्वामी ओढवले महाविघ्न ।। ब्राम्हणभोजनासी ।। ३८ ।। अवचित शाकहौदामाझारीं ।। पाय निसरोन पडला आचारी ।। वाढपीं काढिले त्यासि वरी ।। अद्यापि मृतापरी दिसतो ।। ३९ ।। याउपरीं द्विजाराधनासी ।। उपाय सांगा ज्ञानराशी ।। ऐसें ऐकोनि दैन्यवचनासी ।। मंदहासें बोलत स्वामी ।। १४० ।। मंगल बोलावें सर्वकाळीं ।। अमंगळ शब्द जिव्हातळीं ।। येवूं नये कवणेकाळीं ।। कंठीं दडवोनि ठेवावें ।। ४१ ।। यापरी सांगोनि सर्वांसी ।। स्वामी निघाले पाकशाळेसी ।। मार्गी कृपादृष्टीनें भक्तांसीं ।। पाहत चालिले हळूंहळूं ।। ४२ ।। दंड कृष्णाजिन उष्णीष[2] ।। धरोनि शोभता सर्वेश ।। ऐसिया श्रीचिदम्बरास ।। पंक्तींत पाहोनि उठिले द्विज ।। ४३ ।। सर्वही करिती नमस्कार ।। कृपादृष्टीनें त्यांसी चिदम्बर ।। पाहत पातला सत्वर ।। पाकालयासी तेधवां ।। ४४ ।। तंव कंठजीवित आचारी ।। पडला होतां भूवरी ।। त्यासी पाहतां स्वामीचे अंतरीं ।। दया भारी उपजली ।। ४५ ।। त्यासी पाहोनि कृपाकटाक्षें ।। त्याचा देह कमंडलु उदकें ।। वरदहस्तें प्रोक्षोनि हरिखें ।। मधु लाववी सर्वांगीं ।। ४६ ।। त्यासी आणवोनि मंडपाजवळीं ।। पानें

शि व चि द म्ब र

१. वांग्याप्रमाणे.   २. पागोटे.

अंथरोनि कर्दळी ।। तेथें निजवोनि चंद्रमौळी ।। आला विप्रांजवळीं आम्रवनीं ।। ४७ ।। म्हणें सर्वांसी दीक्षितश्रेष्ठ ।। भिऊं नका गेलें तुमचें अरिष्ट ।। स्वस्थपणें जेवा आकंठ ।। अपेक्षित पदार्थ मागोनिया ।। ४८ ।। मृदुवांचे सर्वांसी ।। आनंदवित कृपाराशी ।। म्हणे आजि इच्छाभोजन तुम्हांसी ।। अपोहित जे मानसीं ते मागा ।। ४९ ।। ऐसें म्हणत चिदम्बर ।। इच्छाभोजन देतसे अपार ।। ऋतुमानें दुर्लभ तरी सत्वर ।। स्वसत्तें निर्मोनि वाढित ।। १५० ।। विचारितसे प्रतिपंक्तीमाजीं ।। काय इच्छा वसे तुमची आजी ।। फळमूळ पक्वान्न भाजी ।। मागा निर्भयें यावेळीं ।। ५१ ।। काय वानूं श्रीप्रसादान्न ।। नित्य होतसे संतर्पण ।। जेविती ऋत्विज ब्राम्हण ।। नामस्मरणें गर्जती ।। ५२ ।। जेथें पुरविता श्रीभगवान ।। तें काय वर्णूं मी दिव्यान्न ।। त्या अन्नाचे सुवासें पूर्ण ।। सुरगण लाळ घोटिती ।। ५३ ।। त्या अन्नसुवासात येवोन ।। वसंत करी भोंवतीं प्रदक्षिण ।। नित्य जेविती ऋषिगण ।। परी वीट नये सर्वथा ।। ५४ ।। जैसा सोमकांताचा[१] अचळ[२] ।। तैसा भात शुभ्र निर्मळ ।। जैसा सुवर्णनगपीत निखिल ।। तैसें वरान्न वाढिले ।। ५५ ।। अमृतासी आणिती उणे ।। ऐसे पंचभक्ष परमान्नें ।। विप्र जेविती हरिस्मरणें ।। वारंवार गर्जती ।। ५६ ।। घृतदुग्धमधुसरोवर ।। शाका सुवास भरला अंबर ।। जेथें पुरविता चिदम्बर ।। तेथील गोडी काय वर्णू ।। ५७ ।। इच्छाभोजन जेवोनि समस्त ।। सर्वही ब्राम्हण झाले तृप्त ।। तांबूल दक्षिणा देवोनि पाठवित ।। आदरें स्वस्थानांसी ।। ५८ ।। त्या दिवशीं ऐंशी सहस्त्र ।। प्रथम पंक्तींत जेविले भूसुर ।। याविरहित जन अपार ।। पूर्वीप्रमाणें जेविले ।। ५९ ।। ऋत्विजही उपहार करोनि ।। आले यागमंडपस्थानीं ।। तंव पुसती स्वामीलागोनी ।। चरणीं वंदोनि ऋत्विज ।। १६० ।। दयानिधे काय आश्चर्य ।। तूम्ही जागत असतां चित्रकार्य ।। अजुनी हा सूद असह्य ।। दुःखसमुदाय भोगतो ।। ६१ ।। पुरल्या बाळा दाविलेसी ।। प्राण दिले मृत कन्येसी ।। सौभाग्य दीधले विधवेसी ।। अजुनी कैसें दुर्दैव याचें ।। ६२ ।। यापरी ऋत्विजवाणी ।।

..............................
१. चंद्रकांताचा. २. पर्वत.

ऐकोनि बोलत सरस्वतीजानी ।। त्याचें पूर्वाख्यान तुम्हालागोनी ।। सांगतों चित्त दावोनि परियेसा ।। ६३ ।।
हा पूर्वी एके दिवशीं ।। विनंती करी मजसी ।। आदेहपातापर्यंत तुजसी ।। सेवित मी राहीन ।। ६४ ।। शेवटीं
तव सन्निधानीं ।। हा देह पडावा धरणीं ।। इतुकी वेतना[१] मजलागोनी ।। दावोनि हेवा पुरवी माझी ।। ६५ ।।
अंती मज दयानिधी ।। स्थान देई कैलासाभोवतीं ।। त्याची देहावसानसंधी ।। आज होती ऋत्विजहो ।। ६६
।। शुभ कर्मामधीं अमंगल ।। होवो नये म्हणोनि केवळ ।। म्यां विनविला कर्पूरधवळ[२] ।। तेणें दशदिन आयुष्य
दीधलें ।। ६७ ।। आजपासोनि अकराव्या दिनीं ।। प्रातःकाळीं हा देह सोडोनी ।। बैसतो निश्चयें कैलाससदनीं
।। भविष्यवचनीं प्रत्यय धरा ।। ६८ ।। याच्या देहीं व्यथा नसे जाण ।। असे शिवस्मरणानंदीं निमग्न ।। यापरी
ऋत्विजांसी सांगोन ।। मौनावला श्रीगुरुनाथ ।। ६९ ।। स्वामीसी करोनि वंदन ।। ऋत्विज आनंदें परिपूर्ण ।।
सायंप्रवर्ग्य समापोन ।। संध्यार्थ गेले नदीसी ।। १७० ।। स्वामीही पिवोनि गोपय ।। सुखें बैसले आनंदहृदय ।।
सर्वांसी सांगत सद्बोधवाक्य ।। जेणें होय चित्तशुध्दी ।। ७१ ।। प्रवर्ग्य म्हणजे योग्य विचार ।। विचारें तनुमानस
रूप प्रखर।। तृतीय भूमिका साधिली सुंदर ।। दीक्षितेंद्रे तिसरे दिवशीं ।। ७२ ।। आतां निरहंकार रूप ।। चौ
थी भूमी सांगतो निःसंकल्प ।। ऐका अग्नीषोमीय निष्पाप ।। चदुर्थ दिन विधान ।। ७३ ।। चतुर्थ दिनीं प्रातःकाळीं
।। ऋत्विज उठोनि सकाळी ।। आले श्रीगुरुजवळीं ।। नित्यकर्म आरंभावया ।। ७४ ।। तंव सावित्री दीक्षितसती
।। प्रभातीं जहाली ऋतुमती ।। पंडित पाहोनि शास्त्रार्थी ।। म्हणती कार्य आरंभू ऐसे ।। ७५ ।। ज्येष्ठ सती
असतां सन्निधान ।। कार्यासी काही न पडे विघ्न ।। यास्तव अग्नीषोमीयार्थ आपण ।। आज्ञा द्यावी निःसंशय
।। ७६ ।। स्वामी म्हणे पंडितांसी ।। ब्राम्हणभोजन चार दिवशीं ।। होऊं दे पुढें पांचवे दिवशीं ।। अग्नीषोगीय
आरंभा ।। ७७ ।। मग स्वामीआज्ञेवरून ।। ब्राम्हणभोजन चार दिन ।। करी अत्यादरें श्रीगुरुनंदन ।। नाना पक्वान्ने

१. सेवाफल. २. शंकर.




शिवचिदम्बर

शि व चि द म्ब र

करोनिया ।। ७८ ।। चार दिनीं ब्राम्हण ।। जेविले जितुके त्याचे विवेचन[1] ।। सांगतों ऐका चित्त देवोन ।। तीन लक्ष साठ सहस्त्र ।। ७९ ।। मग अष्टमी दिवशीं प्रातःकाळीं ।। आले मंडपाशी ऋत्विजमेळी ।। आधीं वंदोनि श्रीगुरुपदकमळीं ।। दोनी प्रवर्ग्य समापित ।। १८० ।। मग करोनि प्रवर्ग्योत्सादन ।। वेगें करिती अग्निप्रणयन ।। त्यावरीं अग्नीषोमीय निपुण ।। कर्म आरंभिलें यथाविधी ।। ८१ ।। प्रकृति पुरुष दोघांसी ।। अग्नीषोमीय संज्ञा परियेसी ।। अहंममत्वें पावोनि निर्वाण ।। मोक्ष लाधे पावले अहंकारता ।। ८२ ।। अहंकारें व्यापिलें त्रिभुवन ।। तेणेंचि जीवा जन्ममरण ।। अहंकार निरसितां निर्वाण ।। मोक्ष लाधे निरायासें ।। ८३ ।। त्या अहंकाराचे निरसनार्थ ।। अग्नीषोमीय कर्म अद्भुत ।। आरंभिलें ऐका तुम्हांप्रत ।। सुसंगत सांगतों ।। ८४ ।। चिदानंद यजमान ।। येवोनि बैसला वेदीसंल्लग्न ।। मग हृदययूप आणोन ।। अढळ रोविती वेदीपुढें ।। ८५ ।। मग यूपीं अहंपशूसी ।। आणोनि ऋत्विज परियेसीं ।। बांधिती महावाक्यमंत्रेसी ।। ध्यानरशने करोनियां ।। ८६ ।। मग विध्युक्त करोनि संस्कार ।। ऋत्विज बैसले स्वस्थानीं स्थिर ।। करीं बलिष्ठविचारशामित्र[2] ।। नेति संज्ञपन[3] प्रकारे ।। ८७ ।। मग एकाग्र तीक्ष्ण शस्त्रें ।। वपा काढोनि अध्वरें ।। होम करितां ऋत्विज सारे ।। आनंद अपार पावत ।। ८८ ।। मग सोडोनि स्वव्यापार ।। सर्वांगीं होवोनि आनंदमात्र ।। बैसले यजमानाबरोबर ।। विसरोनि सर्व कर्म ।। ८९ ।। यापरी होतां आत्मसाक्षात्कार ।। साधिली चवथी भूमिका थोर ।। पुढें अभ्यास करितां निरंतर ।। पांचवी भूमी लाधे हातां ।। १९० ।। आतां अष्टम दिवशीं दिवाकर ।। ब्राम्हणसंतर्पण करीं अपार ।। त्या दिवशीं एक चमत्कार ।। जाहला थोर सांगतों ऐका ।। ९१ ।। पंक्ती धरोनि ब्राम्हण ।। बैसले असतां स्वामिनंदन ।। चतुर्विधान्न परिवेषण ।। पात्रीं तत्क्षणी करवित ।। ९२ ।। सर्वही पदार्थ वाढिले ।। तूप मात्र वाढणें उरलें ।। तंव तूपाधिकारी बोले ।। श्रीगुरुसी तेधवां ।। ९३ ।। अर्धपंक्तीसी तूप पोहचलें ।। मजकडील घृत सरलें ।।

१. विवरण. २. प्रबळविचाररूपीशमिता (पशुहंता). ३. श्वासनिरोधानें प्राणापनयन.

शि व चि द म्ब र

पुढें सांगितलें पाहिजे दयाळे ।।। अनाथ माउली गती मजसि ।। ९४ ।। तंव बोले श्रीगुरुनाथ ।। भिवूं नको तूं किंचित ।। मलापहेंतुनी यथेच्छ घृत ।। घेवोनि काम चालवी ।। ९५ ।। स्वामीवचनामृत सेवितां ।। हर्ष न समाये अधिकारिचित्तां ।। सेवकांसी घेंवोनी तत्त्वता ।। मलापहेसी जातसे ।। ९६ ।। चिदंबरनाम गर्जोनि ।। घटीं पूर्ण भरवित पाणी ।। तें लोणकड तूप होवोनि ।। घमघमाट सुटतसे ।। ९७ ।। यापरी आणोन तूपासी ।। यथेच्छ वाढी ब्रम्हणांसी ।। तूप सेविता वाटे विप्रांसी ।। आज अमृत वाढिले कीं ।। ९८ ।। मागे सोडोनि पक्वान्न ।। तूपचि सेविती आवडी धरोन ।। मध्यें मध्यें दिवाकर येवोन ।। आदरपूर्वक वाढवी ।। ९९ ।। ज्याचिया प्रसादस्वादीं ।। मोहित होवोनि विबुधी[१] ।। भोजनार्थ बैसले द्विजांमधीं ।। अवदानें[२] तृप्तही द्विजरूपें ।। २०० ।। आकंठ जेविले द्विज समस्त ।। तरी त्यांचे मन नोव्हे तृप्त ।। स्वादलुब्ध होवोनि जेवूं इच्छित ।। अवकाश पोटीं नसतांही ।। १ ।। म्हणती तेधवां द्विज समस्त ।। मागें राजसूययज्ञांत ।। याज्ञ[३]सेनी श्रीयदुनाथ[४] ।। पंक्तीत वाढीत होती ।। २ ।। त्या वेळीचा वृत्तांत ।। कानी झाला होता श्रुत ।। तृप्त ही द्विज पात्र न सोडिती । ते तेथे प्रत्यक्ष देखिले ।। ३ ।। जन समस्त त्या समया । प्रसाद रोगसमुदाया ।। निरोगी जाहले तत्क्षणीं ।। ४ ।। प्रसादबळें निश्चिती ।। सर्वांचिया देहकांती ।। सुवर्णापरी फांकती ।। यारीती आरोग्य पावले ।। ५ ।। येणेंपरी त्या दिवशीं ।। ब्राम्हण जेवोनि गेले स्वस्थानासी ।। आतां सांगतों संख्येसी ।। सावधान परियेसा ।। ६ ।। पंचाण्णव सहस्त्रासी दोन शत ।। उणी संख्या धरोनि निश्चित ।। बाकीची संख्या पूर्ववत ।। जेविले भावें श्रीप्रसाद ।। ७ ।। स्वामी पिवोनि गोपय ।। मंडपीं बैसले आनंदहृदय ।। श्रोतयांसी बोधामृत वाक्य ।। वर्षत बैसले युक्तीने ।। ८ ।। मुहूर्तमात्र बैसोनि ।। सर्वही स्वामीसी वंदोनि ।। आज्ञा घेती विश्रांतीलागोनी ।। कृष्णाजिनीं मग पहुडे[५] स्वामी ।। ९ ।। आतां जीवन्मुक्तीसुखास्तव ।। पंचम भूमिका वैभव ।। सोमयाग रूपकें सांगतों अपूर्व ।। तें परियेसा एकचित्तें

१. देव. २. ग्रास घेऊन. ३. द्रौपदी. ४. कृष्ण. ५. झोपले.




शिव चिदम्बर

|| २१० || चतुर्थ भूमींत तदेकध्यान || लागतां चित्त विसरे अन्य चिंतन || सदोदित चाले आत्मचिंतन || तीनी अवस्थांमाजीं आदरें || ११ || उठतां बैसतां निजतां || जगन्मिथ्या आणि ब्रम्हसत्यता || विचारित बैसतो तत्त्वतां || सत्त्वापत्ति म्हणोनी नाम यासीं || १२ || आतां सत्त्वपरिपाक स्थिती || तिचें नाम असंसक्ती || नामरूपाकार नाणितां चित्तीं || चिन्मात्रवृत्ती भावना || १३ || जंवजंव होय द्वैतदर्शन || तंव नामरूप निरसोन || सर्वत्र चिन्मात्र भावोन || अद्वयानंद भोगित || १४ || उमा म्हणती प्रकृतीसी || जें चिदात्म्यानें धरिलें तीसी || त्याचें नाव सोम परियेसी || तो अहंवृत्तीनें वसे हृदयीं || १५ || मी माझें ऐसी वृत्तीं || जेधवां उठे चित्तीं || तेव्हां करणें उलट वृत्ती || तत्क्षणीं मी चिन्मात्र || १६ || ऐसिया विचारासी || सोमयाग म्हणती महर्णी || लय करणें अहंवृत्तीसी साक्षित्व पाहणें सर्वात्मभावें || १७ || आतां ऐका सोमयागविधान || अपर रात्रीं ऋत्विज उठोन || आले मंडपा स्नान करोन || सुत्याकर्म आरंभिती || १८ || सूत्रेविधानें सुत्याकर्मे || चालविलीं ऋत्विक्स्तोमें || प्रातःसवन आरंभितां प्रेमें || उठिले व्योमीं मंद नाद || १९ || मी पुढें मी पुढें म्हणती || स्वर्गाहूनी देव धांवती || त्यासी प्रत्यक्ष पाहती || राजरामादि महाभक्त || २२० || हुतशेष सोमरस || पान करितां ऋत्विजांस || चित्तीं भरोनि यागहौस || उच्च स्वरें मंत्र म्हणती || २१ || श्रावयामार्गे श्रौषट् || प्रेष्य यजेत विस्पष्ट || उच्चारितां ऋत्विक्श्रेष्ठ || पढताती स्वस्वशस्त्र || २२ || मागुती करिती सोमयाग || यागामार्गे पिताती स्वस्वभाग || सर्वेचि घेवोनि चमससंघ || उच्चस्वरें प्रेष देती || २३ || उग्दातृगण सुनादें || साम गाती चर्चाछंदें || होतृगण स्वस्वभेदें || शस्त्रें गाताती वेळोवेळां || २४ || स्थाता अध्वर्यु बैसोनि पुढें || प्रतिगर देताती धड पुढें || तरी लक्ष न लाविता तिकडे || अप्रमादें पढताती || २५ || शस्त्रांती[१] करोनि प्रदक्षिण || सर्वेचि करिती आश्रवण || मग मधुर कंठ मैत्रावरुण || यज म्हणोन प्रेष देत || २६ || मग होता

१. एकश्रुतिपध्दतीने म्हटला जाणारा मंत्रसमुदाय.




शिव चिदम्बर

वदोनि याज्या[1] ।। सर्वेंचि करी वषट्क्रिया ।। त्यास सर्वें अवदान घालोनिया ।। अध्वर्यु करी सोमयाग ।। २७ ।। पिवोनि सोमरस ।। माजले ऋत्विज त्रिदश ।। उद्गातृसामगानरस ।। ऐकतां तुष्टले जन समस्त ।। २८ ।। आदरें आकारितां भोजनासी ।। न रुचे भोजन द्विजमानसीं ।। सांडोनि सामश्रवणासी ।। न येवूं म्हणती धीटपणें ।। २९ ।। सोमरसें तृप्त दैवत ।। व्दिजांसवें बैसले खेळत ।। यापरी प्रातःसवन समापित ।। द्वितीययामीं ऋत्विज ।। २३० ।। सर्वेंचि आरंभिती माध्यान्हसवन ।। प्रातःसवनापरीं ऋत्विज निपुण ।। सोमयागादि विधी समापोन ।। दक्षिण होम पैकेले ।। ३१ ।। आधीं पूजोनि आत्रेय ।। मग आला श्रीगुरुराय ।। सदोमंडपासी अवश्य ।। ऋत्विजपूजनार्थ ।। ३२ ।। सर्वांचे धुवोनि अंघ्री ।। शिरीं प्रोक्षित तीर्थवारी ।। मग वस्त्राभरण नानापरी ।। ऋत्विजांसी समर्पित ।। ३३ ।। मग सालंकृत शत गायी ।। आणवी स्वामी दक्षिणासमयीं ।। सूत्रोक्त विभाग करोनि पाही ।। दक्षिणाविषयीं दीधल्या ।। ३४ ।। मग स्वामीनें शास्त्री पंडितांसी ।। चगसाध्वर उपऋत्विजासी ।। तैसेचि मंडपस्थ ब्राम्हणांसी ।। दक्षिणा बहुवसी दीधिली ।। ३५ ।। जे जे हात पुढे करिती ।। त्यासी द्रव्य देत सावित्रीपती ।। सर्वही तुष्टले चित्तीं ।। स्वदारिद्य्र निवारणें ।। ३६ ।। याविरहित अन्य जनीं ।। जें जें इच्छिलें अंतःकरणीं ।। तें तें दीक्षितेंद्र विश्राणोनि[2] ।। सर्वांचा मनोरथ पूर्ण करी ।। ३७ ।। ज्याचिया दक्षिणासमयी । अपूर्ण काम एक कलीच पाही ।। त्या विरहित जन सर्वही ।। जाहले पूर्णकाम ।। ३८ ।। पाहता दानशक्ती ।। निर्जरही माथा तुकविती ।। यासारिखा दाता क्षितीं ।। मागे कोणीं न पाहिला ।। ३९ ।। याचिया यज्ञमंडपांत ।। म्हणावा तरी कामहत ।। शंकराविण कोणी न दिसत ।। कामें पूर्ण सर्वही ।। २४० ।। यापरी दक्षिणाकर्म ।। समापोनि ऋत्विक्स्तोम ।। उरले जे सवननेम ।। पूर्ण करित सत्वरें ।। ४१ ।। मग दिवाकरासी श्रीगुरु ।। आज्ञापितसे सत्वरू ।। आतां जेववी द्विजवरू ।। उशीर फार जाहला ।। ४२ ।। स्वामीआज्ञा होतां दिवाकर ।।

१. यज या प्रेषानंतर होत्यानें म्हणण्याची ऋचा. २. देऊन.




शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

वेगें बोलावोनि भूसुर ।। भोजन करवी अत्यादर ।। नाना पक्वान्ने करोनिया ।। ४३ ।। नर नारी मिळोनि ।। शाण्णवसहस्त्र त्या दिनीं ।। ब्राम्हण गेले भोजन करोनि ।। मग नृपादिक पूर्ववत ।। ४४ ।। ऋत्विजही करोनि उपहार ।। तृतीय सवन सुंदर ।। पूर्ण करिती सत्वर ।। कर्मकुशली तेधवां ।। ४५ ।। मग दीक्षितेंद्रचरण ।। वंदोनिया सर्व ब्राम्हण ।। विश्रांत्यर्थ स्वस्वस्थान ।। पातले आनंदमती ।। ४६ ।। ब्रम्हानंदीं निमग्नांतर[1] ।। सुखें बैसला श्रीचिदम्बर ।। सोमयागें जाळोनि अहंकार ।। उरला चित्सागर निर्विकल्प ।। ४७ ।। याउपरी पंचम भूमिका ।। पक्व दशेसी येतां देखा ।। द्वैत मावळोनि उरला निका[2] ।। सर्वात्मा एक पूर्णानंद ।। ४८ ।। याउपरी पदार्थाभाविनी ।। षष्ठी भूमी तुम्हांलागोनि ।। सांगतों ऐका एकाग्र होवोनी ।। अवभृथरूपकें यावेळां ।। ४९ ।। सोमपानें घूर्णितनेत्रासी[3] ।। राजद्विजवंदितपदासी ।। चित्तीं आठवितां परमहर्षी ।। जाहला चिदम्बरकिंकर ।। २५० ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ ।। यास्तव ऐका श्रोते समस्त ।। षट्त्रिंशोऽध्याय रसाळ हा ।। ५१ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे यज्ञवैभवखण्डे यज्ञवर्णनं नाम षट्त्रिंशोऽध्यायः ।। ३६ ।। ओविसंख्या २५१ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

शिवचिदम्बर

१. हृदय गढून गेलेले.   २. केवळ.   ३. पेंगुळलेले डोळे झालेआहेत अशास.

## यज्ञावभृथवर्णनम्




स्वामी करिता गंगास्तुती । प्रकटली गंगेची चित्रकृती : पूर्वी होते जानूमात्र जळ । ते नाभिमात्र वाढले तत्काळ ।
आबालवृद्धांसी सकळ । न्यूनाधिक न दिसे ॥

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। ॐनमोजी पूर्णब्रम्हा ।। हृदंबरीं आनंदधामा ।। चिदम्बरा पुरुषोत्तमा ।। तारकनामा तुज नमो ।। १ ।। नमो नमो पूर्णकामा ।। सगुणरूपा मेघश्यामा ।। श्रीदीक्षितेंद्रा सर्वोत्तमा ।। तारि तारि आम्हा अनाथा ।। २ ।। चारुगात्रा श्यामसुंदरा ।। श्रीरामसख्या कामहरा ।। नामभजकां प्रेमदातारा ।। सोमशेखरा तुज नमो ।। ३ ।। विमलचरित्रा कोमलहृदया ।। कमलनेत्रा निर्मलकाया ।। उगासख्या तूं भूगल हरावया ।। विप्रकुळीं अवतरलासी ।। ४ ।। तुझिया चरणीं चित्त ठेवोनी ।। प्रवर्तलों तव चरित्रवर्णनीं ।। तूं राहोनि माझे अंतःकरणीं ।। वदवी सरसचरित्र ।। ५ ।। व्दिजेंद्रांसी म्हणे मुनीश्वर ।। ऐकाहो तुम्ही सादर ।। तारक श्रीचिदम्बरचरित्र ।। सांगतों मी यथामती ।। ६ ।। संकल्पसाक्षित्वाभ्यासें ।। अहंकार समूळ निरसे ।। अहंकार निरसतां विलसे ।। अव्दयानंद आत्मा हृदयीं ।। ७ ।। यापरी पांचवी भूमी ।। अभ्यासितां हृदयधामीं ।। ब्रम्हानंदे होय निष्कामी ।। जीवात्मा अव्दयानंद ।। ८ ।। क्वचित्संगयोगें विक्षेप ।। होतां उठे चित्तीं संकल्प ।। तेणें मागुती जीवरूप ।। होय आत्मा व्यवहारीं ।। ९ ।। जंव जंव दिसे व्यवहार ।। तंव जीवा दुःख अपार ।। व्यवहारनाशार्थ निरंतर ।। वारंवार अभ्यास करावा ।। १० ।। निरंतराभ्यासें व्यवहार ।। नये कदापि दृष्टीसमोर ।। नामरूप हरपतां चिन्मात्र ।। दिसे सर्वत्र सर्वदां ।। ११ ।। मग अखंड जीवन्मुक्तिसुख ।। लाधे सदोदित आत्म्यासी देख ।। तंव साधिली षष्ठी भूमी सुरेख ।। स्वतां विक्षेप न येतां ।। १२ ।। षष्ठी भूमिकाप्राप्त्यार्थ ।। ज्ञानयज्ञीं सांगीतला अवभृथ ।। तेंचि आतां तुम्हांप्रत ।। सांगूं स्वस्थचित्तें परियेसा ।। १३ ।। मग उगवतां ज्ञानभास्कर ।। ऋत्विज आणि भूसुर ।। सर्वे घेवोनि अवभृथसंभार ।। स्नानार्थ निघाले नदीसी ।। १४ ।। श्रध्दाभक्तीभार्यासहित ।। तेव्हा श्रीचिदम्बरदीक्षित ।। उठिला अवभृथस्नानार्थ ।। चिद्गंगेसी सपरिवार ।। १५ ।। निजवैभवासमवेत ।। राजे निघाले स्नानार्थ ।। कीं पातले अष्टदिशानाथ अवभृथार्थ स्वामीसर्वे ।। १६ ।। गज तुरंग पदाती रथ ।। अनुपम अलंकारमंडित


शिवचिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

।। ध्वज अपार लखलखित ।। जेंवि पुष्करीं सौदामिनी[1] ।। १७ ।। मित्रच[2] ऐसी मित्रपत्रें ।। चंद्रमंडलातुल्य तळपती छत्रें ।। नीळ आरक्तवर्ण विचित्रें ।। संख्येसहित दीसती ।। १८ ।। कुंचे चामरे झळकती ।। गज महानादें किंकाटती ।। हिरे जडले दंतोदंती ।। कर्णी डोलती मुक्ताघोष ।। १९ ।। रत्नजडित पाखरा सुरेख ।। घंटा गर्जती अधोमुख ।। गजर पाहतां भक्त उपासक ।। श्रीगुरुनामें किंकाटिती ।। २० ।। चतुर जे अति सुकुमार ।। अतिरथ उद्भटवीर ।। रणपंडित शस्त्रास्त्रधर ।। प्रचंड शूर पुढें चालती ।। २१ ।। गजस्कंधीं बैसोनि बंदीजन ।। दीक्षितप्रताप वाखाणिती गर्जोन ।। पुढें कनकवेत्रधारी धावोन ।। वाट करिती चालावया ।। २२ ।। स्वामीभोंवते राजे घनदाट ।। ऐसा श्रीचिदम्बर वरिष्ठ ।। ज्यासीं पाहतां निवती कष्ट ।। तो अवभृथासी निघाला ।। २३ ।। स्वामीचे पांचही पुत्र ।। पाठीसी चालती सुकुमार ।। चित्तमागधी यशवर्णनीं थोर ।। प्रवर्तले श्रीगुरूचे ।। २४ ।। सिध्दीवारांगना त्या समयां ।। नाना विलासें नृत्य आरंभूनिया ।। नवविध वाद्यसमुदाया ।। अनुहत वादकें वाजविती ।। २५ ।। तूर्य तुतूरा ताळ वीणा ।। दुंदुभी कहाल शंख जाणा ।। वाजवित वाद्यगणा ।। देव दुंदुभीही नभस्थळीं ।। २६ ।। गीतज्ञ करिती गायन ।। पुष्पें वर्षती देवगण ।। सिध्द ऋषी आदिकरोन ।। स्तविती स्वामीसी नानापरी ।। २७ ।। वैराग्य विचारादि नृपाळ ।। हातीं धरोनि स्वस्वायुध सबळ ।। सभोंवतीं राहिले स्वामीजवळ ।। विकल्पजन दारीं निवारित ।। २८ ।। शुंडादंडीं देवोनि शृंखळ ।। चारी दिशीं चौदंतावळ ।। ठेविले तेही जबळ ।। कोणांसी येऊं न देत ।। २९ ।। बोधदिवाकरसुत ।। मार्गे मंद मंद चालत ।। स्वामीवरी धरोनि छत्र श्वेत ।। दुरावत् जनदाटी ।। ३० ।। कित्येक चामरें वारिती ।। मोरचेल पंखा घेवोनि हातीं ।। प्रेमभावें वारा घालिती ।। ब्रीद वाखाणिती वेत्रधर ।। ३१ ।। तूर्यादि मंगल निर्घोषें ।। एकीकडे पटहादि वाद्य विशेषें ।। वेदपाठ आणि जयघोषें ।। दाही दिशा दुमदुमित ।। ३२ ।। पर्वतीं प्रतिध्वनी उमटत ।। तेणें कर्णछिद्रें बधिरावत ।। हर्षे जनसंदोह चालत

शि
व
चि
द
म्ब
र

१. वीज. २. सूर्यच.

शि
व
चि
द
म्ब
र

|| स्नानार्थ नदीतटासी || ३३ || खर्जूर केळी द्राक्ष कित्येक || स्वामीवरी उडविती सकौतुक || लाह्या पुष्पभार सुवासिक || प्रेमभावें उडविती || ३४ || तैल घृत दुग्ध दही || हरिद्रा कुंकुम गंधोदकही || वारांगनेसी पुरुष लाविती पाही || पुरुषांस त्याही लाविती || ३५ || जनही एकमेकांप्रती || नानाविध रसें चित्रिती || आपआपल्यामाजीं योषिती || खेळताती रसक्षेपें || ३६ || येणेंपरी विनोदें खेळत || नदीतटा पातले समस्त || मग वारुणयाग होईपर्यंत || तटीं बैसवीत सर्वांसी || ३७ || जो स्मरणमात्रेंची तापहारक || ऋत्विजांसहित तो सावित्रीसख || प्रवेशी गंगेंत सपत्नीक || मग समापित वारुणेष्टी || ३८ || जानुमात्र नदीजळीं || स्नानार्थ उतरतां चंद्रमौळी || राजव्दिजादि जन सकळीं || स्नानार्थ उठिले त्यासमयीं || ३९ || आबालवृध्द नरनारी || स्नान करावया नदीमाझारी || प्रवेशिले तये अवसरीं || आनंदचित्तें परियेसा || ४० || स्वामीचेसर्वे जन सर्वही || स्नान करावया पाही || संकेत कळविला त्यासमयीं || डांगोरा पिटोनि सर्वांसी || ४१ || स्वामी करितां क्षणीं स्नान || हत्तीवरचे पडेल निशाण || हीच धरा स्नानखूण || पांच तोफा उडतील || ४२ || त्याच वेळीं सर्वांनीं स्नान || करावें ऐसी कळविली खूण || मग श्रीगुरूनें गंगास्तवन || आरंभिलें बध्दांजळी || ४३ || जय गंगे त्रितापहारिणी || चंद्रचूडजटाजूटसदनीं || निवासोनि त्रितापशमनीं || त्वां संपादिली त्रिगुण शक्ती || ४४ || हें जाणोनि मी स्नानार्थ || आलों सवें घेवोनि जन समस्त || सर्वांसी तुझें अगाध चरित || प्रगट दावोनि पुनीत करीं || ४५ || स्वामी करितां गंगास्तुती || तेव्हां गंगेची चित्रकृती || प्रगटली ती तुम्हांप्रती || सांगतों पा परियेसा || ४६ || पूर्वी होते जानुमात्र जळ || तें नाभिमात्र वाढलें तत्काळ || आबालवृध्दांसी केवळ || न्यूनाधिक न दिसत || ४७ || हा चमत्कार पाहतां || राजस्त्रियांचिया चित्तां || चोज वाटोनि स्नानाकरिता || उतरल्या त्या नदीजळीं || ४८ || आपापल्या सख्यासवें || वारंवार प्रेमभावें || शृंगारादि जलक्रीडा वैभवें || जळ सिंचित खेळूं लागल्या || ४९ || त्या भूपालवनिता || शृंगारादिक क्रीडा करितां || सूक्ष्म वस्त्रांतुनी

शि
व
चि
द
म्ब
र

शि व चि द म्ब र

तत्त्वतां ।। अंगकांती फांकत ।। ५० ।। ऐशापरी राजस्त्रियांच्या लीला ।। चालिल्या असतां स्वामी ।। त्या वेळां जायांसहित संरसावला ।। चिद्गंगेंत स्नानार्थ ।। ५१ ।। अव्दयानंदजळीं श्रीगुरू ।। स्नान करितां सर्व परिवारू ।। जळीं बुडाले सत्वरू ।। एकदाची तेधवां ।। ५२ ।। चिदाभास मिळतां स्वरूपीं ।। संकल्पगण जेंवि लोपी ।। नातरी उगवतां चंडप्रतापी[१] ।। एकदाचि लोपती नक्षत्र ।। ५३ ।। मा[२] किरणगाळी[३] होतां अस्तंगत ।। पक्षिगण ज्यापरी लपत ।। तैसे बुडतां श्रीगुरुनाथ ।। जन समस्त बुडाले ।। ५४ ।। विमानस्थ नभीं सुरवर ।। म्हणती काय झाला चमत्कार ।। एकाएकीं सपरिवार ।। अदृश्य जाहला श्रीगुरू ।। ५५ ।। जळीं पडतां सैंधव ।। जेंवि न दिसे भिन्न भाव ।। तैसा चिदात्मा एकीभाव ।। पावतां व्दैत न दिसत ।। ५६ ।। क्षीरीं क्षीर मिसळतां ।। नातरी नीरीं नीर पडतां ।। जेंवि तत्काळ होय एकता ।। तैसी व्दैतवार्ता मावळली ।। ५७ ।। स्नान करोनि स्वामी उठत ।। तंव सभोंवतीं जनदाटी दिसत ।। कल्पांतीं ब्रम्हसृष्टी उपजत ।। एकदाचि जयापरी ।। ५८ ।। नातरी अंगीं येतां जागृती ।। संकल्पगण जेंवि चित्तीं ।। जागृतीसवें निघती ।। जन त्या रीती देखिले ।। ५९ ।। स्नान करोनि येतां ।। सर्वांगीं दिसे आर्द्रता ।। ऐसी समाधी उतरतां ।। आनंदभरित कल्पना ।। ६० ।। सर्वसंकल्पविरहित ।। चिदात्मा मिळतां स्वस्वरूपांत ।। षष्ठी भूमिका शाश्वत ।। साधिली त्या समयीं ।। ६१ ।। परबोधें किंचिव्द्व्यवहार ।। मागुती समाधितत्पर ।। ऐसी अवस्था साधिता स्थिर ।। षष्ठी भूमी पक्व जाहली ।। ६२ ।। जेंवि स्नान करोनि जळाबाहेर ।। येतांही अंगीं वाहे नीर ।। तैसा ज्ञानी करितांही व्यवहार ।। समाधीतत्पर क्षणोक्षणीं ।। ६३ ।। ही भूमिका साधिल्यावरी ।। त्यासी जीवन्मुक्ति नोवरी ।। आपणचि येवोनि वरी ।। व्दैत बाहेरी जाहलीया ।। ६४ ।। षष्ठी भूमिका पक्व जाहलिया ।। मग अभ्यास नसे साधकवर्या ।। सप्तगी भूमी अवस्था तुर्या ।। तीच पावती परिणामें ।। ६५ ।। यापरी श्रीगुरुनाथ ।। स्नान करोनि अवभृथ ।। मग येवोनि

.........................

१. सूर्य. २. अथवा. ३. सूर्य.

शि व चि द म्ब र

तीराप्रत ।। नेसत शुध्दवस्त्र ।। ६६ ।। भस्मचंदनादि अलंकार ।। ऋत्विजांसहित श्रीचिदम्बर ।। लेवोनि निघाला सत्वर ।। सपरिवारें यागमंडपा ।। ६७ ।। ऐशा महोत्सवें श्रीगुरू ।। मंडपासी पातला सत्वरू ।। तंव नृपासवें दिवाकरू ।। चंद्रमस्यर्थ[1] विनवित ।। ६८ ।। तंव बोले श्रीगुरुराव ।। पुत्रराया करूं नको तूं आग्रह ।। दुर्धर असे प्रतिग्रह ।। न करी मी या सत्कर्मी ।। ६९ ।। तंव म्हणे मागुती दिवाकर ।। यज्ञकर्ग आरंभिलें असतां थोर ।। श्रुतिप्रतिपाद्य चंद्रमसी मात्र ।। अवश्य घेतली पाहिजे ।। ७० ।। चंद्रमसीविषयीं निर्बंध ।। जाणोनि म्हणे आनंदकंद ।। जरी म्हणसी चंद्रगसी शुध्द।। तरी मुहूर्तमात्र अवकाश असे ।। ७१ ।। इतुकें ऐकुनी स्वामीवचन ।। ग्राग क्षेत्र देश द्यावया जाण ।। आले भूपाळ पत्रिका लिहोन ।। मी पुढें गी पुढें म्हणत ।। ७२ ।। पत्रिकाहस्तनृपांची दाटी ।। पाहोनि बोलिला जगजेठी ।। हे राजे येवोत शेवटीं ।। आधीं बोलवा गरीबासी ।। ७३ ।। परिसोनिया स्वामिवचनासि ।। मग दिवाकर मानसीं ।। खिन्न होवोनि ब्राम्हणांसी ।। चंद्रमसीस्तव पाचारित ।। ७४ ।। तंव संतोषें ते ब्राम्हण ।। धाविन्नले चहूंकडोन ।। एक दोन रुपये शक्तिप्रगाण ।। देणारांनीं दाटले गंडप ।। ७५ ।। मग आले भूमिपाळ ।। त्यासी बोले घनसांवळ ।। चंद्रमसीची गेली वेळ ।। ने घे आतां प्रतिग्रह ।। ७६ ।। स्वामीवचन परिसोनी ।। प्रार्थिती राजे विमनस्क होवोनी ।। कांहींतरी सेवा या क्षणीं ।। स्वीकारावी आगुची ।। ७७ ।। तंव बोले कृपाघन ।। कांही चिंता करूं नका आपण ।। तुमचें राज्य संपूर्ण ।। माझें असे शाश्वत ।। ७८ ।। यापरी श्रीगुरू सर्वांसी ।। सांतवन करोनि बहुवसी ।। सगापोनि शेषकर्मासी ।। ईश्वरार्पण पै केलें ।। ७९ ।। यज्ञ सांगता व्हावया ।। ब्राम्हणभोजन संकल्पोनिया ।। पाकशाळेसी त्या समयां ।। पातला श्रीचिदंबर ।। ८० ।। तिकडे चंद्रमासी मोजतां ।। संख्या झाली ती परियेसा आतां ।। दीड लक्षावरी मागुतां ।। तीन शतक गोजिली ।। ८१ ।। इकडे नानाविध पक्वान्नें ।। व्दिजाराधना करी सुप्रीत मनें ।। अपूप भक्ष्य परमान्नें ।। व्दिजाकारणें समर्पीत ।। ८२ ।।

1. आहेर घेण्यासाठी.




शिव चिदम्बर

पन्हें आणि साखर दूध ।। एलोशीरादि[1] संस्कृत विशुध्द ।। स्वादजळ समर्पोनि पूर्णानंद ।। सर्व व्दिजांसी तोषवी ।। ८३ ।। मग तांबूल दक्षिणा समर्पोनि ।। विप्रांसी बोळवी दीक्षितमणी ।। मग नृपादिकां जेववोनि ।। आपण गेला भोजनासी ।। ८४ ।। त्या दिवशीं जेविले ब्राम्हण ।। शाण्णव हजार प्रथम पंक्तीत जाण ।। अन्य जनाची संख्या पूर्वीप्रमाण ।। नागरिकजन याविरहित ।। ८५ ।। यागारंभादि समाप्तिपर्यंत ।। ब्राम्हणसंख्या तुम्हांप्रत ।। सांगतों ऐका साद्यंत ।। जेणें विख्यात जाहला यज्ञ ।। ८६ ।। आठ लक्ष एकतीस सहस्त्र ।। वरी शतक पांच निर्धार ।। इतुके जेविले भूसुर ।। अवभृथदिनपर्यंत ।। ८७ ।। सैनिकादि अन्य याती ।। वीस लक्ष धरा निश्चिती ।। आचांडालादि नागरिक गणती ।। लक्षवरी सहस्त्र सोळा ।। ८८ ।। इतुके जन जेविले तरी ।। श्रीगुरु म्हणे त्या अवसरीं ।। ज्योतिष्टोमासम आजवरी ।। अन्नदान जाहलें नाहीं ।। ८९ ।। दिवाकरा मीं पूर्वी यास्तव ।। सांगितलें न करावा सव[2] ।। माझें वचन अव्हेरुनी बालस्वभाव ।। तुवां आरंभिला क्रतूत्तम ।। ९० ।। जो सर्व जीवांसी रक्षिता ।। त्या विश्वंभराचिया चित्तां ।। कितीही मनुष्यमात्र जेवितां ।। फार म्हणोनि वाटेना ।। ९१ ।। अंतरीं असोनि निःसंग ।। बाह्य दावी मानवसोंग ।। अकर्ता जो सर्वांतरंग ।। कर्माचार मर्त्यमतीनें[3] ।। ९३ ।। ब्रम्हादिक ज्याचे वर्णनीं ।। थकोनि राहिले मौन धरोनि ।। अल्पमती मानवजनीं ।। कोण शके वर्णावया ।। ९४ ।। ज्ञानयज्ञीं वसोनि सदोदित ।। कर्मयज्ञ दाविला लौकिकार्थ ।। तेणें त्रिजगतीं प्रख्यात ।। कीर्ती ज्याची पसरली ।। ९५ ।। मन भोजन करोनि श्रीगुरू ।। नदीतीरा येवोनि सत्वरू ।। आम्रछायीं बैसतां भूसुरू ।। पातले स्वामीदर्शनार्थ ।। ९६ ।। राजेलोक दर्शनार्थ ।। आले तेव्हां नदीप्रत ।। सर्वांसी स्वामी आनंदवित ।। आदरें बैसवित निजजवळीं ।। ९७ ।। तंव बोले श्रीगुरुनाथ ।। सुमंदहासें आम्रेडित ।। आपण जाहला बहु श्रमित ।। मजकारणें यज्ञकर्मी ।। ९८ ।। नृपांसही जो याग दुष्कर ।। तो हा तुमच्या सहायें थोर ।। मज गरीबास झाला सुकर ।।

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

१. वेलदोडे वाळा वगैरे. २. यज्ञ. ३. मानवबुध्दीनें.

पन्हें आणि साखर दूध ॥ एलोशीरादि[1] संस्कृत विशुध्द ॥ स्वादजळ समर्पोनि पूर्णानंद ॥ सर्व व्दिजांसी तोषवी ॥ ८३ ॥ मग तांबूल दक्षिणा समर्पोनि ॥ विप्रांसी बोळवी दीक्षितमणी ॥ मग नृपादिकां जेववोनि ॥ आपण गेला भोजनासी ॥ ८४ ॥ त्या दिवशीं जेविले ब्राम्हण ॥ शाण्णव हजार प्रथम पंक्तीत जाण ॥ अन्य जनाची संख्या पूर्वीप्रमाण ॥ नागरिकजन याविरहित ॥ ८५ ॥ यागारंभादि समाप्तिपर्यंत ॥ ब्राम्हणसंख्या तुम्हांप्रत ॥ सांगतों ऐका साद्यंत ॥ जेणें विख्यात जाहला यज्ञ ॥ ८६ ॥ आठ लक्ष एकतीस सहस्त्र ॥ वरी शतक पांच निर्धार ॥ इतुके जेविले भूसुर ॥ अवभृथदिनपर्यंत ॥ ८७ ॥ सैनिकादि अन्य याती ॥ वीस लक्ष धरा निश्चिती ॥ आचांडालादि नागरिक गणती ॥ लक्षवरी सहस्त्र सोळा ॥ ८८ ॥ इतुके जन जेविले तरी ॥ श्रीगुरु म्हणे त्या अवसरीं ॥ ज्योतिष्टोमासम आजवरी ॥ अन्नदान जाहलें नाहीं ॥ ८९ ॥ दिवाकरा मीं पूर्वी यास्तव ॥ सांगितलें न करावा सव[2] ॥ माझें वचन अव्हेरुनी बालस्वभाव ॥ तुवां आरंभिला क्रतूत्तम ॥ ९० ॥ जो सर्व जीवांसी रक्षिता ॥ त्या विश्वंभराचिया चित्तां ॥ कितीही मनुष्यमात्र जेवितां ॥ फार म्हणोनि वाटेना ॥ ९१ ॥ अंतरीं असोनि निःसंग ॥ बाह्य दावी मानवसोंग ॥ अकर्ता जो सर्वांतरंग ॥ कर्माचार मर्त्यमतीनें[3] ॥ ९३ ॥ ब्रम्हादिक ज्याचे वर्णनीं ॥ थकोनि राहिले मौन धरोनि ॥ अल्पमती मानवजनीं ॥ कोण शके वर्णावया ॥ ९४ ॥ ज्ञानयज्ञीं वसोनि सदोदित ॥ कर्मयज्ञ दाविला लौकिकार्थ ॥ तेणें त्रिजगतीं प्रख्यात ॥ कीर्ती ज्याची पसरली ॥ ९५ ॥ मन भोजन करोनि श्रीगुरू ॥ नदीतीरा येवोनि सत्वरू ॥ आम्रछायीं बैसतां भूसुरू ॥ पातले स्वामीदर्शनार्थ ॥ ९६ ॥ राजेलोक दर्शनार्थ ॥ आले तेव्हां नदीप्रत ॥ सर्वांसी स्वामी आनंदवित ॥ आदरें बैसवित निजजवळीं ॥ ९७ ॥ तंव बोले श्रीगुरुनाथ ॥ सुमंदहासें आम्रेडित ॥ आपण जाहला बहु श्रमित ॥ मजकारणें यज्ञकर्मी ॥ ९८ ॥ नृपांसही जो याग दुष्कर ॥ तो हा तुमच्या सहायें थोर ॥ मज गरीबास झाला सुकर ॥

१. वेलदोडे वाळा वगैरे. २. यज्ञ. ३. मानवबुध्दीनें.




शिव चिदम्बर

सिध्दीस गेला निर्विघ्नपणें ।। ९९ ।। यापरी श्रीगुरूचें वचन ।। ऐकतां नृप चरणीं वंदोन ।। कासया बोलसी मोहकवचन ।। दयाघना देवराया ।। १०० ।। तूंचि होसी पार्वतीनाथ ।। नररूपें अवतरलासी तूं निश्चित ।। निमिषोन्मेषें जीवजात ।। सृजसी पाळिसी तूचि एक ।। १ ।। मनुष्य जरी यज्ञ आचरितां ।। चित्तशुध्दी लाधें हातां ।। शुद्धचित तोचि धर्म जाणता ।। धर्मज्ञीं निवसे दान ।। २ ।। जेथें दान तेथें नारायण ।। नारायणाजवळी इंदिरा आपण ।। जेथें इंदिरा तेथें सुख पूर्ण ।। सुखामाजी वसे आनंद ।। ३ ।। जेथें आनंद तेथें सत्पुरुष ।। सत्पुरुषाठायीं शांती विशेष ।। शांतीमाजीं निवृत्तिवास ।। निवृत्तींत विलसे अभेद ।। ४ ।। अभेद तेथें ब्रम्हानंद ।। ब्रम्हानंदमूर्ती तूं चिदानंद ।। तूंच जरी यज्ञकर्ता अगाध ।। न्यून पूर्ण काय पडे ।। ५ ।। ऐशिया तुज शंकरासी ।। मनुष्यसहाय्यता कैसी ।। ब्रम्हांडरचना खेळ खेळसी ।। लीलानाटकी पुरुषोत्तमा ।। ६ ।। लौकिक वचन विडंबना ।। कासया दाविसी देवराणा ।। जगद्गुरूचियापुढें दयाघना ।। कांहीं प्रश्न आमुचे ।। ७ ।। स्वहितार्थी आम्ही तव पायीं ।। शरण आलों स्वामी या समयीं ।। जरी तुझी दया आमुचे ठायीं ।। असेल तरी विनवितों ।। ८ ।। तव म्हणें श्रीचिदंबर ।। काय तुमचे प्रश्न थोर ।। पुसावें सांगोन यथामतिमात्र ।। आपण दयापात्र निःसंशय ।। ९ ।। यापरी श्रीगुरुवचन ।। ऐकतां सर्वही महीरमण ।। आनंदेंकरोनि पाया वंदून ।। प्रश्न करिते झाले तेधवां ।। १० ।। ते विस्तरोनि सांगतों तुम्हांसी ।। ऐका सावध होवोनि मानसीं ।। स्वहित लाधे श्रवणमात्रेंसी ।। म्हणे चिदंबर किंकर ।। ११ ।। स्वस्ति श्रीचिदंबरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ ।। यास्तव ऐका श्रोते समस्त ।। सप्तत्रिंशोऽध्याय गोड हा ।। ११२ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे यज्ञवैभवखण्डे यज्ञावभृथवर्णनं नाम सप्तत्रिंशोऽध्यायः ।। ३७ ।। ओवीसंख्या ११२ ।।

।।श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।


शिव चिदम्बर

# कायिकयज्ञवर्णनम्



प्रातःकाळीं स्नान । वेदपाठ नित्यकर्मानुष्ठान । भक्तीनें करी अन्नदान । शिवाराधना तीर्थयात्राः

एवमादि सत्कर्मासि । कर्मयज्ञनामे परियेसी ः

शिवचिदम्बर

।। श्रीचिदम्बरगहागुरवे नमः ।। ज्याप्रीत्यर्थ यज्ञ आचरिती ।। सिध्द ऋपपी ज्यासी भजती ।। त्या चिदंबरासि स्मरूं चित्तीं ।। कथास्फूर्ती व्हावया ।। १ ।। द्विजेंद्रासि मुनीश म्हणे ।। श्रीगुरुचरित्र तुम्हांकारणें ।। सांगतों ऐका एकोगनें ।। जेणें नोहे यातायात ।। २ ।। राजे पुसती चिदंबरासी ।। यज्ञविधी आहे किती प्रकारेंसी ।। तें कृपा करोनि आम्हांसी ।। सांगावें स्वामी या समयीं ।। ३ ।। यज्ञ केले असतां फळ काय ।। जो केला आपण यज्ञ दिव्य ।। नृपासिही जो नोहे साध्य ।। या कलियुगाभीतरीं ।। ४ ।। गोरगरीबांसी आचरावया ।। सुलभ जो असेल देवराया ।। तो यज्ञ सांगावा या समया ।। जेणें रोकडा मोक्ष मिळे ।। ५ ।। सर्वांसी सुलभ होय जेणें ।। तैसा यज्ञ आम्हांकारणें ।। सांगावा यासमयीं कृपानिधीनें ।। इतुकी विनंती पायासी ।। ६ ।। ऐकोनि राजयांचे प्रश्न ।। श्रीगुरू बोले हांसोन ।। सांगतों तुम्हां यज्ञविधान ।। सुलभ साधन जेणें घडे ।। ७ ।। हा जो यज्ञ जाहला विस्तृत ।। कर्मनिष्ठासी जाणावा उचित ।। ज्योतिष्टोमें स्वर्ग मिळत ।। श्रुतिसंमत याचपरी ।। ८ ।। यज्ञस्वरूप आणि त्याचा विधी ।। सांगतो स्पष्ट तुम्हांसी आधीं ।। ऐका करून एकाग्रबुद्धी ।। तेणें निःसंशय व्हाल चित्तीं ।। ९ ।। स्वर्गेच्छु पुरुषानें यज्ञ करावा ।। ऐसें जो म्हणतो नरदेवा ।। तो कर्मठ मंदगती जाणावा ।। यज्ञ असे सर्वगत ।। १० ।। ज्ञानी अथवा कर्मी ।। कां असेना चतुराश्रमधर्मी ।। यज्ञ करावा त्यांही निष्कामी ।। चातुर्वण्यासही अधिकार ।। ११ ।। ज्याच्चे पायीं प्रपंचवेडी ।। त्यासि न सुटे द्रव्यआवडी ।। द्रव्याशेनें अधर्म जोडी ।। अधर्म्या न चुके जन्ममाळा ।। १२ ।। यास्तव श्रुतीमाउली ।। द्रव्याशा सोडवावया बोलिली ।। यज्ञें वास घडे स्वर्गांतळीं ।। सुख अक्षय म्हणोनि ।। १३ ।। परलोकसुखीं ठेवोनि मन ।। द्रव्य वेंचिती कर्मठ जन ।। यज्ञपुण्यें शुध्दअंतःकरण ।। होतां द्रव्येच्छा न उठे ।। १४ ।। द्रव्यवासना गेलिया मग ।। देवासी भजूं लागतो अभंग ।। तेणें लाधें मोक्ष मार्ग ।। जीवासी निरायासें ।। १५ ।। चित्तशुध्दीस्तव कर्मयज्ञ ।। श्रुतीमाजीं सांगितले विस्तारून ।। महाफल दाखविल्याविण ।। कोणीही न प्रवर्तती ।। १६ ।। लोकप्रवृत्ती व्हावया ।। फळ दाखवीत श्रुतिमाता ।। मोक्षमार्ग

शिवचिदम्बर

साधावया ।। आधीं पाहिजे कर्ममार्ग ।। १७ ।। यज्ञस्वरूप पाहतां ।। चतुर्वर्णासी असे अधिकारता ।। आतां सांगतो यज्ञशब्दार्ध ।। ऐकतां निवे अंतःकरण ।। १८ ।। यज्ञो वै विष्णुः ऐसे ।। श्रुतीमाजीं प्रमाण असे ।। व्यापक जो चिदात्मा विलसे ।। त्यास विष्णू ऐसी संज्ञा ।। १९ ।। यास्तव जगदीशाचें आराधन ।। यज्ञामाजीं मुख्य यज्ञ ।। तेणें स्वर्गफळ अक्षीण ।। मिळतसें सत्य सत्य ।। २० ।। ऐसें कर्मयज्ञ आचरितां ।। गुणशुध्दी मिळे चित्तां ।। शुध्दचित लागती भक्तिपंथा ।। महेशाराधनीं प्रीतियुक्त ।। २१ ।। शिवाराधनें अहेतुक भक्ती ।। भक्तीनें कर्मबंध तुटती ।। मग शिवानुग्रहें मुक्ती ।। सहज मिळे जीवासी ।। २२ ।। भगवद्भक्तीविण कर्माचरण ।। सर्वही होय निरर्थक जाण ।। यास्तव शिवप्रीत्यर्थ प्रतिदिन ।। सत्कर्म करित असावें ।। २३ ।। निरिच्छेनें जें जें कर्म करी ।। शिवप्रीती होय तेणें निर्धारी ।। भगवत्प्रिय कर्मासि शास्त्रीं ।। यज्ञ ऐसें नाम असें ।। २४ ।। त्या यज्ञामाजीं दोन भाग ।। त्याचे ऐका विभाग ।। कर्मयज्ञ ज्ञानयज्ञ अभंग ।। दोनी यथासांग आचरावे ।। २५ ।। कर्मयज्ञें होय चित्तशुध्दी ।। ज्ञानयज्ञ आचरतां यथाविधी ।। अखंड बैसे निजानंदीं ।। जीवन्मुक्तीसुख भोक्ता ।। २६ ।। स्ववर्णाश्रमधर्मानें ।। तपोयोगें शिवाराधन करणें ।। चितशुध्दी होय येणें ।। कर्मयज्ञ म्हणती यासी ।। २७ ।। यापरी प्रातःकाळीं स्नान ।। वेदपाठ नित्यकर्मानुष्ठान ।। आणि भक्तीनें करी अन्नदान ।। शिवाराधना तीर्थयात्रा ।। २८ ।। एवमादि सत्कर्मासी ।। कर्मयज्ञ नामें परियेसी ।। स्मृतीमाजीं महाॠषी ।। बोलिले असती ।। २९ ।। हा जो कर्मयज्ञ सांगीतला ।। गरीब आणि श्रीमंताला ।। करावया सुलभ सर्वांला ।। अल्पायासें महत्फल ।। ३० ।। आतां ऐका ज्ञानयज्ञ ।। सांगतों तुम्हां विस्तरोन ।। कायावाचामनें करून ।। तीन प्रकारें विभक्त ।। ३१ ।। तीहीं करूनि शिवासी ।। आराधन करणें भावेसी ।। ज्ञानयज्ञ नाम परियेसी ।। श्रुतीशास्त्रीं सुप्रसिध्द ।। ३२ ।। क्रमप्राप्त कायिकयज्ञ ।। आधीं सांगतों संपूर्ण ।। ऐका तुम्ही सादर होऊन ।। जन्मफेरी चुकावया ।। ३३ ।। देहाभिमान गेलिया ।। मुक्तचि जीव नृपवर्या ।। देहाभिमानें बांधोनिया ।। भ्रमें जाहला जीव बध्द



शिवचिदम्बर

शि व चि द म्ब र

|| ३४ || यास्तव गुरु आश्रयावा आधीं || जो युक्तीनें संशय छेदी || निरायासें मोक्षपदीं || बैसवी शिष्यासी || ३५ || ब्रग्हानुभवें जो तृप्त || आणि जाणता सर्वशास्त्रार्थ || ऐसा गुणवंत सद्‌गुरुनाथ || जाणोनि त्यासि शरण जावें || ३६ || अहोरात्र त्याचिये पायीं || देह लावावा सेवेविषयीं || प्रातःस्नान करावे शीततोयीं || भस्म लावावें सर्वांगीं || ३७ || वरी करावें त्रिपुंड्रधारण || शिवप्रीत्यर्थ भाव धरून || गुरूसी मानूनि शिवासमान || पाय धरावें अनन्यभावें || ३८ || शिरीं कंठी उरस्थळीं || करीं कर्णी बाहुमुळीं || शिखीं आणि नेत्रयुगलीं || भावें रुद्राक्षधारण करावें || ३९ || शिवचिन्हाने संयुक्त || हा देह शिवाचाच निश्चित || देहीं अहंपणा किंचित || नाहीं ऐसें मानावें || ४० || ऐसा निश्चय करूनि अंतरीं || देहबुध्दी करावी दूरी || विक्षेपें मन जातां विषयावरी || देह त्यासरी योजूं नये || ४१ || जेथ जेथ जाय मनोवृत्ती || तेथ तेथोनि फिरवोनि मागुती || विचार करावा ऐसा चित्तीं || अदेही मी विषय भोगूं कैसा || ४२ || देह असे तंव सदृढ || परोपकारीं लावावा बाढ || स्वार्थाविषयीं होवोनि गूढ || अभिमाना खंडित असावें || ४३ || गुरुशुश्रूषणादिकां ठायीं || हित अहित कर्म जें घडे कांहीं || तें सर्व केलें ऐसें हृदयीं || विकल्प कांहीं घेवूं नये || ४४ || काष्ठबाहुलीपरी देह || देही सूत्रधारी महादेव || ज्याचिया आधारें नाचतो देह || त्या कूटस्था जाणिजे || ४५ || जैसा नाचवी सर्वेश्वर || तैसा हा परतंत्र || देह नाचतो निर्धार || ज्यापरी सूत्रबाहुली || ४६ || येथें विचारें पाहतां || माझी कायसे कर्तृत्वता || जडदेहीं शिवाची सत्ता || आपादमस्तकीं व्याप्त || ४७ || देह जाणावा नश्वर || देहीं वसे तो परमेश्वर || जीवसंज्ञा भ्रममात्र || सर्वत्र पूर्ण चिदानंद || ४८ || देहीं आपण नाहीं || देहासि आपण नोहे कांहीं || यापरी निश्चय करोनि हृदयीं || देह अहंपणा दवडावा || ४९ || एक मुख्य परमेश्वर || दुसरी प्रकृती जगदाकार || तिसरा कैचा आपण चोर || आणिला मध्यें || ५० || ऐशा करोनि नाना युक्ती || देह अहंकार दवडावा निश्चिती || यासच कायिक यज्ञ म्हणती || देहस्थ ईश्वर जेणें भेटे || ५१ || ऐसा यज्ञ मुख्य आचरतां || न बाधे जन्म-

शि व चि द म्ब र

गृत्युजा चिंता ।। जीवन्मुक्त दशा लाधे हातां ।। अक्षय स्वर्ग नाम यासी ।। ५२ ।। यापरी कायिक यज्ञ कथिला ।। आचरतां मोक्ष लाधे भला ।। आतां वाचिक यज्ञ तुम्हांला ।। सांगतों ऐका सादरपणें ।। ५३ ।। तंव पुसती राजे समस्त ।। स्वामीपायीं करोनि प्रणिपात ।। ज्ञानयज्ञ सांगतां येथ ।। भस्मरुद्राक्षधारण कथियेलें ।। ५४ ।। सर्व पदार्थ सोडोनि ।। भस्मरुद्राक्ष काय म्हणोनि ।। धारण सांगितलें साधकांलागोनी ।। ते आम्हांकारणें सांगावें ।। ५५ ।। भस्मरुद्राक्षमाहात्म्य ।। ऐकावया उत्कंठा आधिक्य ।। होतसे यास्तव अवश्य ।। दोनी महात्म्य विस्तारावें ।। ५६ ।। आम्हां ऐकावया जरी शक्य ।। तरी सांगावें अवश्य ।। ऐसें प्रार्थित नृपसमुदाय ।। आड पडती स्वामीपुढें ।। ५७ ।। तंव नृपांची प्रेमभक्ती ।। पाहोनी द्रवला सावित्रीपती ।। म्हणे सांगतों तुम्हांप्रती ।। दोनही महात्म्यें ।। ५८ ।। ऐसें बोलोनि श्रीगुरू ।। रुद्राक्षमहिमा थोरू ।। सांगावया सादरू ।। होवोनि बैसला ।। ५९ ।। म्हणे चिदम्बरकिंकर सर्वांसी ।। आतां कथा सरस निघेल परियेसी ।। रुद्राक्षमहिमा ऐकतां मानसीं ।। शिवभक्ती लाधे सहज ।। ६० ।। स्वस्ति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे ऐकतां तुष्टे सद्‌गुरूनाथ ।। म्हणोनि ऐका श्रोते समस्त ।। अष्टत्रिंशोध्याय गोड हा ।। ६१ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरूचरित्रे ।। मुक्तिघण्टापथे यज्ञवैभवखण्डे यज्ञार्थकथनपूर्वक कायिकयज्ञवर्णनं नाम अष्टत्रिंशोऽध्यायः ।। ३८ ।। ओवीसंख्या ६१ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

## रुद्राक्षमहिम्ना गर्दभस्यशिवलोकप्राप्तिः



गर्दभ जाहला दुर्बळ । भार न साहता केवळ । मुहूर्तमात्र तडफडत । खर तेधवां प्राण सोडत ।

तंव येवोनि माझे दूत । विमानी त्यासि बैसविती

|| श्रीचिदम्बरमहागुरवे नमः || एकच जो अद्वितीय || ऐसा श्रुतीही केला निश्चय || जो भक्तांसी कल्पतरू होय || त्या गुरुदेवा स्मरूं चित्तीं || १ || श्रीगुरु सांगतील नृपांसी || रुद्राक्षमाहात्म्य बहुवसी || ऐका सादर होवोनि मानसीं || द्विजांसी सांगे मुनीश्वर || २ || चिदम्बर म्हणे नृपांसी || रुद्राक्षमहिमा पुसतां कायसी || ज्याचे महत्त्व श्रुतीशास्त्रराशी || अहर्निशीं वर्णिताती || ३ || व्यासमुनीही दहा पुराणीं || वर्णिलेंसे विस्तारोनि || तेंचि संक्षेपेंकरूनी || सांगू तुम्हांसी या वेळां || ४ || जें नीलकंठाचें भूषण || त्याचें वर्णन करी कवण || यथामती संकलित जाण || सांगेन ऐका सादरें || ५ || तुम्हीं जैसा प्रश्न केला || पूर्वी तैसाच स्कंदें शिवाला || आदरें प्रश्न केला रुद्राक्षाविषयीं || ६ || शिवें जो सांगितला स्कंदासी || तोच महिमा सांगतों तुम्हांसी || शिव म्हणे षण्मुखासी || ऐक भावें रुद्राक्षमहिमा || ७ || आधीं करावें भस्मधारण || मग ल्यावें रुद्राक्षभूषण || दोहीं धरावें भावेंकरून || अनुक्रमें मोक्षसाधक. || ८ || रुद्राक्षधारणाचा नियम || सांगतो ऐका शास्त्रवर्म || कंठदेशीं उत्तम || रुद्राक्ष धारण करावें || ९ || वीस अथवा चाळीस || मस्तकीं बांधावें विशेष || दोहीं कानीं बांधणेंस || सहा सहा घ्यावे प्रत्येकीं || १० || मणगटीं बांधिजे बारा || बाहुतटीं सोळा धरा || नेत्रव्दयीं धारण करा || एकैक रुद्राक्ष || ११ || शिखीं बांधवा एक श्रेष्ठ || हृदयी एक शतावरी आठ || तोचि जाणावा नीलकंठ || जो धरी रुद्राक्ष येणेंपरी || १२ || सुवर्णानें अथवा रजतानें || रुद्राक्ष बांधोनि प्रेमानें || धारण करितां शुध्द मनें || तेणें होय शिवप्रीती || १३ || तार मंत्र उच्चारोनि || निर्व्याजभक्तीने[1] सर्व स्थानीं || जो रुद्राक्ष करी धारणी || शिवप्रीतिपात्र होय तो || १४ || अथवा पंचाक्षरीमंत्र म्हणोनी || रुद्राक्ष धरी उक्तस्थानीं || तो बैसे कैलाससदनीं || होवोनि प्रेमपात्र शिवासी || १५ || शिवज्ञान व्हावया कारण || मुख्य जाणा रुद्राक्ष धारण || ज्याचिये शिखीं रुद्राक्षभूषण || तारकतत्व जाणा तो पुरुष || १६ || दोही कर्णांचे ठायीं || रुद्राक्ष

............................
१. निष्काम भक्तीनें.




शिव चिदम्बर

शि व चि द म्ब र

धरितां पाहीं ।। शिवशक्ती दोघेही ।। त्याचे ठायी निवसती ।। १७ ।। यज्ञोपवीतीं चौपन्न ।। रुद्राक्ष धरितां जाण ।। चतुर्वेद तेथे येवोन ।। राहती परमानंदें ।। १८ ।। दोहीं हातीं दिग्देवती ।। वसताती निश्चिती ।। कंठी देवी सरस्वती ।। स्वाहापतीही[१] वास करी ।। १९ ।। यापरी स्थानस्थानीं ।। वसताती गीर्वाणी[२] ।। ऐशा भावा अंतःकरणीं ।। सर्वदा धरावें ।। २० ।। चारी वर्ण चारी आश्रमस्थ ।। रुद्राक्षधारणीं अधिकृत ।। समंत्रक अधिकार द्विजाप्रत ।। अमंत्र शूद्रादिकां ।। २१ ।। रुद्राक्षधारणयोगें ।। रुद्रचि होय निजांगें ।। पाप नासतें अवघें ।। रुद्राक्षधारणमात्रें ।। २२ ।। निषिध्द वस्तू पाहतां ।। ऐकतां अथवा स्मरतां ।। जें पाप घडे तत्त्वतां ।। नासतें रुद्राक्षधारणें ।। २३ ।। रुद्राक्षधारणें सर्व पातक ।। क्षणांत नाश पावतें देख ।। जैसे कार्पासकदंबक[३] ।। वन्हिसंयोगें[४] भस्म होय ।। २४ ।। रुद्राक्षधारी पुरुष ।। भक्षी अन्नरस ।। तो पावे महेशास ।। निश्चयें श्रुतिवचन ।। २५ ।। जे जे विषय हा सेवित ।। ते ते सेवित शिवाकांत ।। रुद्राक्षधारी पुरुषाप्रत ।। भावें अन्नादि समर्पावें ।। २६ ।। रुद्राक्षधारणाविषयीं ।। लज्जा वसे जयाचे हृदयी ।। कोटि जन्म फेरा घेतांही ।। मोक्ष न मिळे त्या नरां ।। २७ ।। रुद्राक्षधारियांसी पाहोनी ।। जो वदे निंदावचनीं ।। निश्चयें जाणा अंतःकरणीं ।। उत्पत्ती त्याची संकर ।। २८ ।। पूर्वी रुद्राक्ष धारण करितां ।। रुद्रासी लाधली रुद्रता ।। विष्णुब्रम्हादि देवता ।। त्यासही वंद्य रुद्राक्ष ।। २९ ।। सिध्द ऋषी मुनीश्वर ।। जे जे पावले मार्गे पद थोर ।। त्या सर्वांसी कारण निर्धार ।। रुद्राक्ष धारण मुख्य एक ।। ३० ।। रुद्राक्षधारणाऐशी श्रेष्ठ ।। न देखिली वस्तू वरिष्ठ ।। यापुढें सर्वही निकृष्ट ।। त्रिभुवनीं मोक्षसाधना ।। ३१ ।। रुद्राक्षधारिया नरासी ।। जो देई अन्नवस्त्र धनरासी ।। जळोनि तो सर्व पापासी ।। कैलासवासी होय निश्चयें ।। ३२ ।। रुद्राक्षधारी धरोनि भावा ।। श्राध्दकाळीं निमंत्रावा ।। आदरें त्यासी करितां सेवा ।। पितृ सर्व तृप्त होती ।। ३३ ।। पितृगण पावतां तृप्ती ।। त्यासी अंती पितृलोकप्राप्ती ।। होय ऐसे शिवापती

शि व चि द म्ब र

१. अग्नि. २. देव. ३. कापसाची रास. ४. अग्नीमुळें.

शि व चि द म्ब र

।। स्कंदाप्रती सांगत ।। ३४ ।। रुद्राक्षधारियाचे पाद ।। प्रक्षालोनि सुबुध्द ।। तें तीर्थ घेवोनि सानंद ।। पान करी भक्तीनें ।। ३५ ।। त्याचें सर्व पातक ।। नासतें क्षणांत देख ।। अंतीं मिळे कैलासलोक ।। आचंद्रार्क तया नरा ।। ३६ ।। नातरी हार किंवा कटक[1] ।। सुवर्णाचे करोनि सम्यक ।। रुद्राक्षासहित जो धरील देख ।। तो पावे रुद्रपद ।। ३७ ।। अथवा केवल रुद्राक्ष ।। धरो वाटोनि कौतुक ।। समंत्रक किंवा अमंत्रक ।। ज्ञानमूर्ती तो जाणावा ।। ३८ ।। भावसहित किंवा भाववर्जित ।। पुरुषमात्र रुद्राक्ष धरित ।। त्यासी पाहतां यमदूत ।। चळचळां कांपती ।। ३९ ।। लज्जें भयें अथवा विनोदें ।। रुद्राक्ष धरी किंवा आनंदे ।। तो मुकला सत्य पापवृंदे ।। शिवज्ञान लाधे तया नरां ।। ४० ।। फार काय सांगावें ।। षण्मुखा ऐक एकोभावें ।। रुद्राक्षमहिमा न वर्णवे ।। पांचही मुखां माझिया ।। ४१ ।। यास्तव प्रयत्नपूर्वक ।। धारण करावें रुद्राक्ष देख ।। रुद्राक्षमाहात्म्य अलौकिक ।। कोण वर्णूं शके सविस्तर ।। ४२ ।। जैसा देवामाजीं सर्वोत्तम ।। सच्चिदानंद परब्रह्म ।। तैसेंचि जाण सर्वोत्तम ।। त्रिभुवनीं रुद्राक्ष एक ।। ४३ ।। मोक्ष द्यावया जैसे समर्थ ।। गंगा विष्णू उमाकांत ।। तैसे मोक्षदानी समर्थ ।। रुद्राक्ष जाणा सर्व लोकीं ।। ४४ ।। यापरी शिवाचें वचन ।। ऐकतां मागुती षडानन ।। संतोषोनी करी प्रश्न ।। शंकरासी तये वेळीं ।। ४५ ।। अगा दयाळा सदाशिवा ।। यापरी रुद्राक्षमहत्त्वा ।। तुम्हीच वर्णितां देवदेवां ।। सर्वोत्तम म्हणोनि ।। ४६ ।। ऐसें महत्त्व द्यावया ।। कारण काय देवराया ।। तें सांगोनि माझे आशया ।। पूर्ण करी समर्था ।। ४७ ।। यापरी स्वनंदनप्रश्न[2] ।। ऐकतां तुष्टला सर्पभूषण ।। मग बोले पुत्रासी संबोखोन ।। ऐक रुद्राक्षाची उत्पत्ती ।। ४८ ।। तुज सांगतों सविस्तर ।। जेणें जाहला रुद्राक्षमहिमा थोर ।। महापुरुषासही निरंतर ।। पूज्य बुध्दी ज्याठायीं ।। ४९ ।। पूर्वी त्रिपुरनामक दैत्य ।। होता सुरासुरासी दुर्जय ।। तेणें पीडिले देवसमुदाय ।। ब्रम्हाविष्णुआदिकरोनि ।। ५० ।। कित्येकांसी जीवें मारित ।। कित्येकांच्या स्त्रिया क्षोभवित ।। कित्येकांचे वै

शि व चि द म्ब र

१. कडें. २. आपल्या मुलाचा—स्कंदाचा प्रश्न.

भव समस्त ।। हरोनि करी देशधडी ।। ५१ ।। ऐसा आकांत वर्ततां ।। कोणी न मिळे सुरांसी त्राता ।। मग मिळोनि सर्व देवता ।। आल्या कैलासीं मजपासीं ।। ५२ ।। देवीं विनवितां मजसी ।। दया उपजली माझ्या मानसीं ।। मग त्रिपुरसंहाराविशीं ।। कोप अचाट उपजत ।। ५३ ।। अचाट कोप उपजता पोटी ।। त्रिपुरदैत्यवधासाठीं ।। एकांतीं बैसलों एकदिठीं ।। अधोरास्त्र चिंतित ।। ५४ ।। सर्वदेवमय महाशस्त्र ।। अघोरसंज्ञक मनोहर ।। वैरियां दिसावें परम घोर ।। दुर्धर देदीप्यमान ।। ५५ ।। त्रिपुरसंहारार्थ ।। रक्षावया देव समस्त ।। सर्वविघ्ननिवारणार्थ ।। अघोरास्त्रचि पाहिजे ।। ५६ ।। एकाग्र बैसतां एकांतीं ।। दिवस लोटले बहुती ।। देवतासहस्त्रवर्षे निश्चिती ।। गेलीं तव नेत्र म्यां झाकिलें ।। ५७ ।। तव माझे व्याकुल नेत्रांतुनी ।। जलबिंदू पडले अवनीं ।। मग उपजले त्या बिंदूपासुनी ।। महारुद्राक्ष महीरुह[1] ।। ५८ ।। मग माझे आज्ञेनें ।। सर्वांचे हिताकारणें ।। अगा स्कंदा अडतीस भेदानें ।। प्रसिध्द जाहले रुद्राक्ष ।। ५९ ।। सूर्यनेत्रापासोनी उत्पन्न ।। बाराविध झाले कपिल वर्ण ।। सोमनेत्रापासोनी उत्पन्न ।। श्वेत वर्ण झाले सोळाविध ।। ६० ।। वह्निनेत्रसमुद्भूत ।। दहा प्रकार जाहले वर्ण असित ।। यापरी भेद अष्टत्रिंशत ।। असती रुद्राक्षामाजीं ।। ६१ ।। आतां परियेसी जाती ।। श्वेत वर्णासी विप्र म्हणती ।। रक्त वर्ण क्षत्र निगुती ।। मिश्र वैश्य कृष्ण शूद्र ।। ६२ ।। एकमुखी जो रुद्राक्ष ।। तो साक्षात् जाणा कैलासनायक ।। धारणमात्रें ब्रम्हहत्यापातक ।। जाळोनिया टाकितसे ।। ६३ ।। द्विमुख जाणा गौरीशंकर ।। करी द्विविध पापसंहार ।। अग्निरूप जाणा त्रिवक्त्र ।। स्त्रीहत्यापाप नाशी ।। ६४ ।। चतुर्वक्त्र जाण चतुर्मुख ।। संहारी नरहत्यापातक ।। धारण करितांक्षणीं देख ।। पुण्यमूर्ती पुरुष होय ।। ६५ ।। पंचमुख रुद्राक्षासी जाणा ।। कालाग्नि रुद्र ऐसी संज्ञा ।। अगम्यगमनादि पापस्तोमा ।। सद्यःक्षणीं भस्म करी ।। ६६ ।। अभक्ष्यभक्षण आदिकरोनि ।। महाल्पपापसंहारणी ।। समर्थ जाण सेनानी ।। पंचमुख तोचि मी ।। ६७ ।। षड्वक्त्र आदिकरोनि ।। चतुर्दशपर्यंत

१. वृक्ष.

वदनी ।। रुद्राक्ष असती धरणीं ।। एकाहुनी एक श्रेष्ठ ।। ६८ ।। चौदा मुखाचा रुद्राक्ष ।। जरी मिळेल पुत्रा सुरेख ।। मस्तकीं धरावा भक्तिपूर्वक ।। त्याचा देह जाणा शिवाचा ।। ६९ ।। अगा वत्सा वारंवार ।। तुज मी काय सांगूं फार ।। करितां रुद्राक्ष धारणमात्र ।। मजसरी मानिती देव त्यासी ।। ७० ।। रुद्राक्षधारणें सद्गती ।। प्राणिमात्रांसी होय निश्चिती ।। विश्वासार्थ एतदर्थी ।। कथा एक परियेसी ।। ७१ ।। नेपालदेशीचा व्यापारी ।। होता एक दुराचारी ।। रुद्राक्षवाहोनि गर्दभावरी ।। विक्रयार्थ संचारित ।। ७२ ।। ऐसे होतां क्वचित्काळ ।। गर्दभ जाहला दुर्बळ ।। भार न साहतां केवळ ।। मार्गी पडला घोर वनीं ।। ७३ ।। मुहूर्त मात्र तडफडत ।। खर तेधवां प्राण सोडत ।। तंव येवोनि माझे इत ।। विमानी त्यास बैसविती ।। ७४ ।। मग आणिले मजप्रती ।। मीही त्यासी अतिप्रीतीं ।। स्थळ दिधलें प्रथम पंक्तीं ।। पहा अजूनी सेवितो मजसी ।। ७५ ।। आणीक एक गोष्ट ।। तुज सांगतों अतिश्रेष्ठ ।। रुद्राक्षधारणीं विश्वास उत्कट ।। होय ऐकतांक्षणीं षडानना ।। ७६ ।। नंदीपुरीं होती एक वेश्या ।। दावी जनीं ती पतिव्रतचर्या ।। नाट्यमंडप तिचें षडास्या ।। होतें रत्नखचित ।। ७७ ।। तारुण्यलावण्य जिचें भारी ।। नित्यदान करी परोपरी ।। तिनें विनोदार्थ मंडपाभीतरीं ।। बांधिले मर्कटकुक्कुट ।। ७८ ।। शिवभक्ती अधिकोत्तरी ।। करितसे प्रतिवासरीं ।। अळंकार असतांही भारी ।। रुद्राक्ष धरी प्रीतीनें ।। ७९ ।। सखी सेवकांसी रुद्राक्ष ।। बांधवी वेश्या भक्तिपूर्वक ।। मर्कटकुक्कुटासी देख ।। त्याचपरी बांधित ।। ८० ।। ऐसी असता ती वारंगना ।। पतिव्रतांमाजीं आपुली गणना ।। करोनि धर्म आचरी नाना ।। स्वधर्मे परपुरूषा रमवित ।। ८१ ।। तिची कीर्ती पसरली भारी ।। आपण असोनि वेश्या नारी ।। पतिव्रतेचा धर्म आचरी ।। तनुमनधनें प्रत्यहीं ।। ८२ ।। ऐसें असतां एके दिनीं ।। तिची परीक्षा घेवूं म्हणोनि ।। मीच वैश्यरूप धरोनि गेलों तिच्या मंदिरां ।। ८३ ।। कोटिमदनसुंदर ।। ती पाहतां माझें रूपमात्र ।। आली धांवत बाहेर ।। पूजासंभार घेवोनि हातीं ।। ८४ ।। अतिथीभावें पूजूनि मजसी ।। सामोपचारें नेत गृहासी ।। मग मी मोहनार्थ तीसी ।।




शिवचिदम्बर

हातीं घेतलें रत्नलिंग ।। ८५ ।। सूर्यापरी तेजःपुंज ।। लिंगकांती फांके सहज ।। मग ती मागे लिंगराज ।। पूजनार्थ मजकडे ।। ८६ ।। द्रव्यमात्र जरी इच्छितां ।। तरी लक्ष ध्यावें आतां ।। नातरी आला कामेकरितां ।। कुलस्त्री होईन दिनत्रय ।। ८७ ।। दोहीमजीं एक निश्चित ।। सांगोनि द्यावें लिंग त्वरित ।। ऐसी ऐकोनि तिची मात ।। मोहनार्थ पुशिलें तीशी ।। ८८ ।। कामहेतूंने लिंग देईन ।। कीं तूं माझी कुलस्त्री होवोन ।। कैसी राहसी दिवस तीन ।। नित्य नूतन पुरुष तुम्हां ।। ८९ ।। तंव करी वेश्या प्रमाण ।। सांगतें सूर्यचंद्राची आण ।। सत्य आपुली कुलस्त्री होईन ।। दिवस तीन निःसंशयें ।। ९० ।। यांत जरी करीन अंतर ।। बेचाळीस माझे पितर ।। नरक भोगोत निरंतर ।। कोटीकल्प मजसवें ।। ९१ ।। ऐसी ऐकोनी तिची प्रतिज्ञा ।। लिंग दिधलें षडानना ।। मग संतोषें ती वारांगना ।। माझेसन्निधानीं बैसली ।। ९२ ।। उभयतांही मंडपांत ।। विनोदें बैसलों असतां स्वस्थ ।। संध्यासमय झाला संप्राप्त ।। शिवपूजनार्थ गेली पुसोनी ।। ९३ ।। तंव मायेने उपजवोनि अग्नी ।। मंडप जाळिला तत्क्षणीं ।। सर्वेचि बाहेर येवोनि ।। शोक करूं लागलों ।। ९४ ।। माझें प्राणलिंग गेलें जळोनि ।। आतां प्राण सोडीन याच क्षणीं ।। ऐसें म्हणत उडी घेवोनि ।। त्याच अग्नीं प्रवेशलों ।। ९५ ।। तव ती येवोनी बाहेर ।। शोक करीतसे अपार ।। अग्नी प्रवेशिला भ्रतार ।। आतां न राखे मी प्राण ।। ९६ ।। ऐसें म्हणत ती वेश्या ।। बोलावी ब्राम्हणसमुदाया ।। म्हणे सहगमनविधी या समया ।। करवावा मजप्रती ।। ९७ ।। धनधान्यवस्त्रसंभार ।। ब्राम्हणांसी वाटी सत्वर ।। मग सहगमनविधी सविस्तर ।। करी द्विजाज्ञेवरून ।। ९८ ।। आप्त सांगती तिसी बोध ।। काय धर्म आचरिसी अबध्द ।। वेश्याघरीं पुरुषवृंद ।। कामार्थ येती प्रत्यहीं ।। ९९ ।। त्या सर्वांची तूं कुलस्त्री ।। कैसी होसील सुंदरी ।। वृथा प्राण देशी या अवसरीं ।। काय मूर्खपण हें तुझें ।। १०० ।। त्यांसी म्हणे ती वारांगना ।। कासया तुम्ही करितां वल्गना ।। सूर्यचंद्राचे करोनि प्रमाणा ।। झाले अंगना तीन दिवस ।। १ ।। मरण न सुटे कधींही ।। धर्मे सोडितां देह पाही ।। उध्दारगती बेचाळीसही ।। पावतीं

उभयकुल || २ || ऐसे संबोखोनि बांधवां || उडी घेतली वन्हींत तेधवां || दया उपजोनि मज सदाशिवा || प्रत्यक्ष तीसी जाहलों || ३ || सर्वेचि अग्नी केला शांत || तिच्या धर्मे होवोनि तुष्टचित्त || सपरिवारें वेश्येसी शाश्वत || दिधलें कैलासपद || ४ || त्यांत जे मर्कटकुक्कुट || दग्ध झाले होते स्पष्ट || त्यांसी पुढे जन्म उत्कृष्ट || राजकुळीं जाहले || ५ || पूर्वजन्मीचें जें पुण्य || रुद्राक्षधारणेंचें होतें अगण्य || तेणें अखंड राज्य–लावण्य || ते बहु काळ भोगिती || ६ || पुनरावृत्तिवर्जित || अंतीं पद लाधले शाश्वत || रुद्राक्षमहिमा अद्‌भुत || यास्तव वाचामगोचर[1] || ७ || रुद्राक्षधारणाचा विधी || शास्त्रोक्त सांगतों एक सुबुध्दी || भक्तीने धरितां कैलासपदीं || बैसतो निश्चयें आचंद्रार्क || ८ || पूर्वोक्त प्रकारें मस्तकीं एक || सव्वीसानें शिरोमाळ सुरेख || पन्नासाची माळ हृदयी देख || भक्तिपूर्वक धरी बापा || ९ || धरावी दोहीं बाहुतटीं || षोडशाची माळ गोमटी || बाराबारा मणगटीं || धरी ताता धर्मबुध्दी || ११० || अष्टोत्तर शताची माळ || अथवा चौपन्नाची सोज्वळ || नातरी सत्तावीसाची केवळ || संपादावी साधकें || ११ || ऐशापरी रुद्राक्षमाळ धरितां || अगण्यपुण्य लाधे हातां || नातरी जपासी योजितां || अनंतफळ साधत || १२ || अष्टोत्तरशत रुद्राक्ष माळ || जो धरी भावें सोज्वळ || त्यासी शताश्वमेध फळ || पदोपदीं मिळतसे || १३ || रुद्राक्षधारी पुरुष || उध्दरोनि एकवीस कुळास || पावे तो शिवलोकीं निवास || शिवसायुन्य पावोनि || १४ || श्रीचिदंबर सांगे नृपांसी || यापरी शंकरें षण्मुखासी || रुद्राक्षमहिमा सांगीतला बहुवसी || तोचि तुम्हासी कथियला || १५ || यापरी रुद्राक्षमहिमा || सांगितला अगाध तुम्हां || आतां ऐका भस्ममहिमा || यथामती सांगिजेल || १६ || सर्वांसी चिदंम्बरकिंकर|| मागे तो अवधानमात्र || पुढील रसाळ चरित्र || ऐकावें सादर चित्तें || १७ || स्वस्ति श्रीचिदम्बरचरित || ऐकतां तुष्टे सद्‌गुरुनाथ || यास्तव ऐका श्रोते समस्त || एकोनचत्वारिंशोऽध्याय रसाळ

........................

१. वर्णनापलीकडचे.

हा ॥ ११८ ॥ इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघंण्टापथे यज्ञवैभवखण्डे रुद्राक्षमहिमावर्णनं तथा गर्दभस्य शिवलोकप्राप्तिर्नाम एकोनचत्वारिंशोऽध्यायः ॥ ३९ ॥ ओवीसंख्या ११८ ॥

॥ श्रीचिदम्बरार्पणमस्तु ॥


शिव चिदम्बर

भस्ममहिम्ना पतितस्यकैलासगमनम्



गांवाबाहेर टाकिलें प्रेत । कोणी संस्कार न करित : प्रेतांगी शिवद्धारीचे भस्म । श्वानयोगें लागता पापस्तोम ।
जळोनि होत पुण्यात्म । तेणे शिवदूती विमानीं वाहिले ॥

शिवचिदम्बर

॥ श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ॥ ॐनमो पूर्ण ब्रम्हा ॥ श्रीचिदम्बरा पुरुषोत्तमा ॥ आदिमूर्ती आनंदधामा ॥ ज्ञानपूर्णा तुज नमो ॥ १ ॥ द्विजासी म्हणे मुनीश्वर ॥ नृपांसी सांगे चिदम्बर ॥ भस्ममाहात्म्य सादर ॥ ऐका सरिस्तर सांगतों तुम्हां ॥ २ ॥ चिदम्बर सांगे नृपास ॥ शिवपुराणीं कथा असे सुरस ॥ तेंचि भस्ममाहात्म्य तुम्हास ॥ सांगतों ऐका संक्षेपें ॥ ३ ॥ सूत सांगे ऋषीश्वरासी ॥ भस्ममाहात्म्य ऐकाहो महर्षी ॥ शिवें बोधित सनत्कुमारासी ॥ तेंचि तुम्हांसी सांगतों ॥ ४ ॥ रुद्राक्ष आणि शिवनाम ॥ शिवप्रियकर तैसेंचि भस्म ॥ हे तीन्ही जे सेविती सप्रेम ॥ ते नर नव्हेती महादेव ॥ ५ ॥ सर्वमंगलदायक ॥ भस्म असे द्विप्रकारक ॥ महा आणि अल्प संज्ञक ॥ सांगतो ऐका दोन्ही प्रकार ॥ ६ ॥ भासतें म्हणोनि भस्म संज्ञा ॥ चिदानंद शिवरूपासी जाणा ॥ अग्नी जल व्योमादिकांना ॥ भस्म संज्ञा असे वेदांती ॥ ७ ॥ सर्वां भूतीं भासमान ॥ चिन्मात्र शंकर परिपूर्ण ॥ ऐसें जें शिवात्मैक्यज्ञान ॥ महाभस्म म्हणती यासी ॥ ८ ॥ आतां ऐका अल्पभस्म ॥ त्रिप्रकार असे सर्वोत्तम ॥ श्रौत स्मार्त लौकिक नाम ॥ शिव तुष्टे धारणमात्रें ॥ ९ ॥ श्रौत स्मार्त मुख्य ब्राम्हणांसी ॥ लौकिक भस्म अन्य वर्णांसी ॥ समंत्रक विधी विप्रांसी ॥ अन्यांसी अमंत्रधारण ॥ १० ॥ अग्निहोत्रज भस्म मुख्य ॥ तें न मिळतां शुष्क गोमया ॥ जाळोनि करावें भस्मद्रव्य ॥ तेंहि योग्य धारणासी ॥ ११ ॥ अग्निवीर्यसंभूत ॥ उमाकांतासी जें आवडत ॥ तें भस्म पापसंघात ॥ जाळितसे धारणमात्रें ॥ १२ ॥ अग्निरित्यादि सप्त मंत्र ॥ जाबालश्रुतींत पवित्र ॥ त्या मंत्रें उद्धूलनमात्र[1] ॥ आद्य वर्णांनीं करावें ॥ १३ ॥ उद्धूलून त्रिपुंड्रधारण ॥ सर्वोत्तमत्त्वें विवर्णन ॥ जाबाल उपनिषदांत पूर्ण ॥ वर्णन केलें असें ॥ १४ ॥ शिवविष्णुब्रह्मादिक ॥ त्रिपुंड्र धारण करिती सम्यक ॥ यास्तव असे आवश्यक ॥ सर्व वर्णांसी भस्मधारण ॥ १५ ॥ भस्मोद्धूलन त्रिपुंड्र ॥ जे न धरिती मूढ नर ॥ त्यांसी न सुटे घोर संसार ॥ कोटि कल्प फिरलिया ॥ १६ ॥ त्रिपूंड्रधारणाविण ॥ कदापि नोहे शिवज्ञान

शिवचिदम्बर

१. हळुवार लेपन.

|| करितां शुभ्रभस्म लेपन || सर्वपाप नाश होई || १७ || विभूती नसे ज्याचे भाळीं || रुद्राक्ष नसे ज्याचे गळीं || नसे शिवनाम मुखकमळीं || तोचि भूतळीं पतित जाण || १८ || नाम गंगा विभूती यमुना || सरस्वतीनदी रुद्राक्ष जाणा || जो करी त्रितयधारणा || तोचि त्रिवेणी निश्चय || १९ || ज्या देशीं विभूतिभूषित || शिवज्ञानी वसे तेथ || वसती त्रिकोटि तीर्थ || शिवाज्ञेवरूनी || २० || फार काय तुम्हां सांगणें || अवश्य भस्म धारण करणें || तैसेंचि षडक्षर जपणें || लिंगार्चन मुमुक्षूसी || २१ || ब्रम्हाविष्णुमहेश्वरासी || सिध्दमुनी महर्षीसी || भस्ममाहात्म्य वर्णावयासी || शक्ती नोहे निश्चयें || २२ || जो न करी भस्मधारण || शिवद्वेष करी ज्याचे मन || तोचि पंचपातकी[1] जाण || संकरजन्म निश्चये त्याचा || २३ || जो भस्म धरियासी || ताडन्न करी क्रोधेसी || चांडालबीज तो निश्चयेसी || जाणा ऐसें व्यास वदे || २४ || विप्रक्षत्रीं मानस्तोकेति म्हणोन || करावें भस्माभिमंत्रण || वैश्यांनीं त्र्यंबक उच्चारोन || पंचाक्षरी बोलिले स्त्रीशूद्रांसी || २५ || सद्योजातादि पंच ब्रम्हमंत्रें भस्म लावावें गृहस्थें सादरें || लावावें त्र्यंबक अघोरे तारें || व्रती वनस्थ संन्यासी || २६ || सर्व वर्णांसी भस्मधारण || अवश्य असे शिवाज्ञेवरून || प्रमादेंही धारण || कदापी सोडूं नये || २७ || भस्मस्नानें जितुके कण || निजांगीं होती संलग्न || अंगीं तितुकें लिंगधारण || केले जाणा निश्चयें || २८ || चतुराश्रमवासी भाविक || नर्यभस्में[2] करितां त्रिपुंड्रांक || त्यांसी लाधे मुक्तिसुख || सत्य सत्य त्रिवाचा || २९ || रुद्राक्ष भस्म सोडोनि || घेऊं नये अन्नपाणी || जरी प्रमादें स्वीकरी कोणी || पापभोजनी नाम त्याचें || ३० || जे निंदिती त्रिपुंड्रासी || ते निंदा पावे शिवासी || जे धरिता भावेंसी || शिवपदासी पावती || ३१ || धिक् भस्मरहित भालासी || धिक् शिवरहित गांवासी || शिवार्चाविमुख कुलासी || असो धिक्कार सर्वथा || ३२ || विभूती शिवासी जे निंदिती || ते निरयगामी[3] जाण अंतीं || त्यांचे दर्शनें दोष घडती || भाषण त्यासवें नरकद्वार || ३३ || जरी प्रमादें

१. ब्रम्हहत्या करणें गुरूतल्पगमन,सुरापान करणें,वा सुवर्ण चोरणें आणि यांची संगत करणारा असा. २. चिताभस्मानें. ३. नरकांत जाणारें.

शि
व
चि
द
म्ब
र

घडे दर्शन भाषण ।। सर्वेचि घ्यावें सूर्यदर्शन ।। पापें नासतीं तेणेंकरून ।। निश्चयेसी जाणपां ।। ३४ ।। सर्वदा धरावी विभूती ।। कांही न धरावें विभूतीवरती ।। जरी चंदनधारण इच्छिती ।। धरा विभूती मिश्र करोन ।। ३५ ।। सर्वांगीं करोनि उद्‌धूलन ।। वरी करितां त्रिपुंड्र धारण ।। स्त्रीगोहत्यादि पापें जळोन ।। जाती तत्क्षणीं निःसंशय ।। ३६ ।। शिवद्रव्य अपहारानें ।। आली शिवनिंदावचनें ।। संपादिलें जीं पापगणें ।। तीं भस्मधारणें नासतीं ।। ३७ ।। भस्म रुद्राक्ष ज्याचे अंगीं ।। तो जरी जातीनें मातंगी ।। तरी होय शिवलोकभागीं ।। तीर्थे अवधीं सेवितीं त्यासी ।। ३८ ।। ज्याचे अंगीं त्रिपुंड्र ।। त्यासी साधती सप्त कोटि मंत्र ।। सहस्त्र पूर्वजांचा उध्दार ।। होतसे त्रिपुंड्रधारणें ।। ३९ ।। सर्व भोग भोगुनी इहलोकीं ।। दीर्घायु होय महासुखी ।। अंती बैसे कैलासलोकीं ।। सुखें देह सोडोनियां ।। ४० ।। कोण वर्णी भस्मधारणपुण्य ।। सर्व देवांसी होय मान्य ।। शिवसायुज्य पावे तो धन्य ।। ऐसें माहात्म्य भस्माचें ।। ४१ ।। भस्मस्नानचि गंगास्नान ।। भस्मासनीं होय विज्ञान ।। भस्म असे त्रैलोक्यपावन ।। भस्मरूपी प्रत्यक्ष शिव ।। ४२ ।। भस्माविण जें जें पुण्य करी ।। तें तें व्यर्थ होय निर्धारी ।। भस्ममाहात्म्य असे यापरी ।। शिवमुखें कथित ।। ४३ ।। आतां त्रिपुंड्रधारणविधी ।। सांगतों ऐका त्रिशुध्दी ।। जाणोनि धरिता यथाविधी ।। शिवपदीं वास मिळे ।। ४४ ।। दोनी भिवयांबरोबर ।। ललाटीं लावावें त्रिपुंड्र ।। असंलग्न तीनी रेखा मात्र ।। सावधानीं कराव्या ।। ४५ ।। मध्यमाअनामांगुलीनीं दोन रेखा ।। आधीं सरळ लावाव्या देखा ।। त्यामाजीं अंगुष्ठें तिर्यग्रेखा ।। लावितां होय त्रिपुंड्र ।। ४६ ।। अथवा कनिष्ठांगुष्ठ सोडोनि ।। मध्यांगुलीनीं रेखा तीनी ।। भाळीं करा भाव धरोनि ।। भोग मोक्ष साधे जेणें ।। ४७ ।। एकैक रेखेचिये ठायीं ।। नव दैवतें वसतीं पाही ।। त्यांचीं नामें धरा हृदयीं ।। वेगळीं करोनि सांगतों ।। ४८ ।। भूरात्मा गार्हपत्य रजोगुण ।। अकार ऋग्वेद प्रातःसवन ।। क्रियाशक्ति उमारमण ।। प्रथम रेखा दैवतें हीं ।। ४९ ।। उकार दक्षिणाग्नी शंभू व्योम ।। माद्यंदिनसवन यजुःस्तोम ।। इच्छाशक्ती सत्त्व अंतरात्म ।। मध्यम रेखा दैवतें हीं ।। ५० ।। मकार आहवनीय

शि
व
चि
द
म्ब
र

तम ।। धैर्शानशक्ती वेद साम ।। तृतीय सवन शिव परमात्म ।। हीं दैवतें तृतीय रेखेचीं ।। ५१ ।। यापरी रेखा दैवतासी ।। भावें नमोनि प्रतिदिवशीं ।। भोग मोक्ष जे इच्छिती मानसीं ।। त्रिपुंड्र धारण करावें ।। ५२ ।। आतां त्रिपुंड्र धरावया ।। स्थानें आहेत नृपवर्या ।। सांगतों ऐका या समया ।। वेगळीं ती करोनि ।। ५३ ।। द्वात्रिंशत् षोडश अष्ट पंच ।। स्थानें आहेत उच्च नीच ।। तेथें लावावें त्रिपुंड्र स्वच्छ ।। शिवप्रीती व्हावया ।। ५४ ।। शीर्ष श्रोत्र नेत्र नासा ललाट ।। वक्त्र पार्श्व वक्ष अंस नाभी कंठ ।। गुह्यद्वयोरु स्फिग्जानु कूर्पर मणगट ।। जंघा गुल्फ पाद हे बत्तीस ।। ५५ ।। अनुक्रमें बत्तीस देव वंदोनि ।। लावा त्रिपुंड्र स्थानस्थानीं ।। अष्टमूर्ति अष्टविद्येश आणि ।। अष्ट दिक्पति अष्ट वसू ।। ५६ ।। आतां ऐका षोडश स्थान शास्त्रीय ।। शिरो भाल कंठ कर्णद्वय ।। अंस कूर्पर मणिबंध हृदय ।। नाभी पार्श्व पृष्ठ ऐसे ।। ५७ ।। अश्विनी दैवत शिव शक्ती ।। सदाख्य विद्याख्य ईशान देवती ।। तैशाचि वामादि नवशक्ती ।। सोळा देव स्मरा अनुक्रमें ।। ५८ ।। आतां जे अष्ट स्थान ।। सांगतों ऐका विस्तारोन ।। गुरुस्थान ललाट नाभी कर्ण ।। हृदयस्थान अंसयुग्म हे ।। ५९ ।। ब्रम्हा आणि सप्तर्षि ।। या स्थानदेवते परियेसी ।। येथें लाविला त्रिपुंड्रासी ।। सदाशिव होय संतुष्ट ।। ६० ।। आतां ऐका स्थानपंचक ।। बाहूद्वय हृदय मस्तक ।। नाभी पांचवें स्थान देख ।। त्रिंपुंड्रधारणासी ।। ६१ ।। देशकालासी अनुसरोन ।। यथासंभव करावें धारण ।। केधवां न घडे जरी उद्धूलन ।। त्रिपुंड्रधारण सोडूं नये ।। ६२ ।। जो त्रिनेत्र सर्वदेवजनक ।। त्रिगुणाधार कात्यायनीसख ।। स्मरोनि त्यासी पंचाक्षरपूर्वक ।। भालीं भस्म लावावें ।। ६३ ।। ईशाभ्यां नमः ऐसे म्हणोनि ।। त्रिपुंड्र लावावें पार्श्वस्थानीं ।। बीजाभ्यां नमः वदोनि ।। मणगटीं धरावें ।। ६४ ।। नाभीं अधःस्थानीं पितृभ्यां नमः ।। नाभीवरी उमेशाभ्यां नमः ।। पृष्ठभागीं भीमाय नमः ।। येणें मंत्रें विशेष विधी ।। ६५ ।। भस्म धारण पुण्य ।। ब्रम्हादिकासी अवर्ण्य ।। जाळितसे पापारण्य धारणमात्रें ।। ६६ ।। जाणतां नेणतां जरी विभूती ।। अंगीं लागतां पापें जळती ।। कथा ऐका एतदर्थी ।। सांगतों तुम्हांसी अगाध ।। ६७ ।। एक विप्र होता महा

अमंगळ ।। शूद्रस्त्रियेसी रतला बहुकाळ ।। तिच्या भ्रतारें साधुनी वेळ ।। जीवें मारिलें द्विजातें ।। ६८ ।। गावांबाहेर टाकिलें प्रेत ।। कोणी संस्कार न करित ।। तंव आले यमाचे दूत ।। विक्राळवदन दारुण ।। ६९ ।। गळपाश बांधोनि त्वरित ।। नेत होते ताडित तर्जत ।। भयानें तो विप्र आक्रंदत ।। जाच बहुत भोगितसे ।। ७० ।। जें पाहवया असंभाव्य ।। नरकयातना अभव्य ।। देत होते दूत निर्दय ।। त्या महापापियासी ।। ७१ ।। इकडे शिवसदन उत्तम ।। त्यापुढें पडिलें होतें भस्म ।। महाशिवरात्रीं दिवशीं सप्रेम ।। भक्त पूजनीं बैसले ।। ७२ ।। त्या भस्मांत श्वान सवेग ।। येवोनि बैसलें पाहे शिवलिंग ।। भस्मचर्चित त्याचें अंग ।। जात मग त्वरेनें ।। ७३ ।। पडिलें होतें जें विप्रप्रेत ।। त्यावरी बैसलें अकस्मात ।। कुणपास[1] भस्म लागत ।। पाप त्वरित जळालें त्याचें ।। ७४ ।। प्रेतांगीं शिवद्वारीचें भस्म ।। श्वानयोगें लागतांही द्विजाधम ।। सर्व जळोनि पापस्तोम ।। पुण्यात्मा जाहला तो ।। ७५ ।। तंव ते यमाचे दूत ।। नाना यातना अत्यंत ।। होते त्या प्राण्यासी देत । महापापी म्हणोनि ।। ७६ ।। तंव शिवदूत धांवत आले ।। त्यासी पाहतां यमदूत भ्याले ।। त्या जीवा नरकांतुनी काढिले ।। पळाले बाहेर टाकुनी ।। ७७ ।। मग तो ब्राम्हण सावध झाला ।। शिवदूतीं विमानीं वहिला ।। कैलासासी जावोनी राहिला ।। संहारूनी पापसमूहा ।। ७८ ।। ऐसें हें भस्म पवित्र शिवभूषण ।। त्याचें न वर्णवे महिमान ।। बहुत पापियांचे बंधमोचन ।। भस्मधारणें जाहलेसें ।। ७९ ।। वामदेव अंगीचें भस्म लागतां ।। राक्षस झाला पूर्वकर्म जाणता ।। मग त्याने कृपें भस्म लावितां ।। शिवसुखभोक्ता जाहला ।। ८० ।। भस्म देतां ऋषभयोगी ।। भद्रायूबाळ महारोगी ।। भस्मबळें होवोनि निरोगी ।। शिवभक्त जगीं प्रख्यात झाले ।। ८१ ।। भस्मधारणसामर्थ्यें ।। जिंकोनि शत्रुसमुदायें ।। इह भोगोनि निष्कंटक राज्यें ।। शिवसायुज्य अंतीं पावें ।। ८२ ।। यापरी भस्ममहिमा अगाध ।। संक्षेपें तुम्हांसी केला विशद ।। आतां सिंहावलोकनें सावध ।। ऐका मागील अनुसंधान ।। ८३ ।। म्हणे चिदम्बरकिंकर ।।

१. प्रेताला.

चिदम्बरचरित्र हें पवित्र ।। जो ऐके सावध नर ।। होय प्रीतिपात्र श्रीगुरूसी ।। ८४ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्‌गुरुनाथ ।। यास्तव ऐका श्रोते समस्त ।। चत्वारिंशोऽध्याय गोड हा ।। ८५ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे यज्ञवैभवखण्डे भस्ममहिमाकथनं पतितस्य कैलासगमनं च नाम चत्वारिंशोऽध्यायः ।। ४० ।। ओवीसंख्या ८५ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।



शिव चिदम्बर

# नृपेभ्यो ब्रह्मोपदेशः




भूपालहो तुम्हासी । संक्षेपें सांगीतले यक्षत्रयासी : श्रीगुरुबोध रसाळ । ऐकतां सर्वही भूमिपाळ ।
आनंदसागरीं बुडोनि केवळ । बैसले ते शांतचित्ते ॥

शिवचिदम्बर

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। चित्तीं होतां ज्याचें स्मरण ।। चित्तशुद्धी होय तत्क्षण ।। स्मरोनि त्याचिये चरण ।। चरित्र सांगतो परियेसा ।। १ ।। चिदम्बर म्हणे नृपांसी ।। वाचिक यज्ञ तुम्हांसी ।। आतां सांगतों ऐका एकोमानसीं ।। श्रवणमात्रें पाप नासे ।। २ ।। ब्रम्ह असे सर्वत्र व्यापक ।। शांत सच्चिदानंद नित्यसुख ।। द्वैत नसे अद्वय एक ।। श्रुतिवचन ऐसें असे ।। ३ ।। ऐसियां पूर्ण ब्रम्हाठायीं ।। जैसा रज्जू दिसे भ्रमें अही[1] ।। तैसें चराचर जग सर्वही ।। मायायोगें दिसताहे ।। ४ ।। जळीं जैशा बुदबुदलहरी ।। नसतचि दिसती त्यापरी ।। तैसेंचि परब्रम्हावरी ।। नसतेचि दिसती देहादिक ।। ५ ।। देहाचे आंत बाहेर ।। पूर्ण ब्रम्हाचि निरंतर ।। भरिलेंसें निर्धार ।। घटाभोंवतीं व्योम[2] जैसें ।। ६ ।। आकाशीं उडतां पक्षी ।। सभोवतीं व्योम जेंवि व्यापकी ।। नातरी मीन संचरी उदकीं ।। ब्रम्ह व्यापक तैसे देहीं ।। ७ ।। सत्तामात्र सर्वव्यापक ।। तरी अंतःकरणीं आत्मा सम्यक ।। अहंरूपें भासतो व्यक्त ।। व्योमगुण[3] भेरींत जैसा ।। ८ ।। यास्तव सर्व देहाठायीं ।। ब्रम्ह पूर्ण व्यापक पाही ।। अस्तित्वें जें अहंस्फुरण हृदयीं ।। तेथेंचि ब्रम्हसाक्षात्कार ।। ९ ।। मी आहें ऐसें जें भान ।। अवस्थात्रयीं असे पूर्ण ।। तेथील गेलिया एक मीपण ।। ब्रम्ह पूर्ण असे निजांगे ।। १० ।। जीवाचे ब्रम्हत्वविस्मृतीसी ।। कारण ऐका सांगतों तुम्हांसी ।। अनादि अज्ञान एक परियेसी ।। तेणें जीवासी भ्रम होय ।। ११ ।। अज्ञान माया मूळ प्रकृती ।। एकरूप जाणा तुम्ही चित्तीं ।। नाममात्रीं विलसे भेदप्रतीती ।। तेंणे जीव दिसती भिन्न भिन्न ।। १२ ।। जो हृदयीं उठे संकल्पगण ।। तेथें ब्रम्हप्रतिबिंब पडे पूर्ण ।। प्रतिबिंब नांव चिदाभास जाण ।। जीव नाम विलसे त्यामाजीं ।। १३ ।। प्रतिबिंब हरपलिया परब्रम्ह ।। एकचि विलसे आनंदधाम ।। यास्तव गर्जे वेदांतस्तोम ।। ब्रह्म अद्वितीय ऐसें ।। १४ ।। यास्तव ब्रह्मसाक्षात्कारासाठीं ।। अभ्यासाची पाहिजे खटपटी ।। ऐका अभ्यासकृती गोमटीं ।। जेणें उठाउठी मोक्ष मिळे ।। १५ ।। अस्तित्वें ह्दयीं आत्मा वसे ।। तेथेंचि वृत्तीरूप माया विलसे ।। वृत्ती नसता न दिसे ।। तेव्हां

शिवचिदम्बर

१. साप. २. आकाश. ३. आकाशाचा गुण शब्द.

भासे अखंड आत्मा ।। १६ ।। जेथें नसे मनाची गती ।। तेथुनी वाणी उपजती ।। सर्व श्रुती ऐसे बोलती ।।
उठे वाग्वृत्ती मनापूर्वी ।। १७ ।। वाग्वृत्ती उठतांचि तीमाजीं ।। आत्मप्रतिबिंब पडे सहजीं ।। भानु उगवतां
गगनामाजी ।। जेंवि जळीं प्रतिबिंब पडे ।। १८ ।। त्या वृत्तीपासोनि नानाविध ।। संकल्प निघताती स्वच्छंद ।।
स्थानभेदें असती नामभेद ।। एकचि वृत्तीसी परादिक ।। १९ ।। आत्मा असे व्यापक ज्ञानमय ।। त्याविण स्थळ
नसे अणुप्राय ।। विचारें पाहतां ज्ञानमय ।। वृत्तीसमुदाय सर्वही ।। २० ।। थिजले घृतापरी ज्ञान ।। वृत्तिरूपें
विलसे सघन ।। येणें वृत्ती असे यावत्प्रमाण ।। तावत्प्रमाण जाणा ज्ञानात्मा ।। २१ ।। जें वृत्तीमाजीं ज्ञानमात्र
।। तेंचि वाग्रूपें येतसें बाहेर ।। जेंवि कुल्याद्वारें तटाकनीर ।। कुल्यामात्र वाहतसे ।। २२ ।। जी वृत्ती नाभिस्थळीं
।। अव्यक्त स्फुरणरूपें उमटली ।। परावाणी म्हणीतली ।। योगींद्रानें स्थानबळें ।। २३ ।। सर्व वृत्तीसी तीच कारण
।। प्राणगतीनें पावतां हृदयस्थान ।। तीच अर्थाकर होवोन ।। पश्यंती अभिधान पावली ।। २४ ।। तीच संकल्पात्मक
होवोनि ।। पुढें येतां कंठस्थानीं ।। विषयगण चिंतिती म्हणोनी ।। मध्यमा वाणी म्हणती तीसी ।। २५ ।। तीच
अक्षररूपें येतां पुढें ।। मुखस्थानी वैंखरी नाम रोकडें ।। पावोनि पसरे चहुंकडे ।। वृत्तिपरिणाम असे या रीतीं
।। २६ ।। जें ज्ञान मूलाधारीं ।। तेंचि आलें पश्यंतीमाझारीं ।। जेंवि घटाधारें कूपवारी ।। वोढितां वरीवरी येतसे
।। २७ ।। शब्दमात्र वैंखरींत ।। विचारितां ज्ञानमात्र दिसे त्यांत ।। मुखांतुनी निघतां शब्दजात ।। नासोनि उरे
अर्थमात्र ।। २८ ।। निज हृद्गत अभिप्राय ।। दुसऱ्यांसी कळाया मनुष्य ।। बोलती वैंखरी वाक्य ।। जेणें स्वाभिप्राय
कळे सर्वांसी ।। २९ ।। वैंखरी म्हणजे शब्दब्रम्ह ।। असें ऐसें श्रुतिवर्म ।। यास्तव जाणोनि आचरावा सद्धर्म ।।
जेणें घडे वाग्यज्ञ ।। ३० ।। वाचें करावें भगवदाराधन ।। त्याचे नाम वाग्यज्ञ जाण ।। यांचे सांगतो करोनि विवेचन
।। एकचित्तें परियेसा ।। ३१ ।। वेदपाठ स्तुती जाप्यकर्म ।। प्रत्यहीं करावें धरोनि नेम ।। सतत उच्चारावें मुखीं
नाम ।। एकनिष्ठा धरोनिया ।। ३२ ।। शब्दरूपीं जो गिरिजासख ।। सर्व शब्दांमाजी तोचि व्यापक ।। ऐसा भाव

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

धरोनि निष्टंक[1] ।। वाचें संथ उच्चारावा ।। ३३ ।। सत्य शिवाकांत असे वक्ता ।। तेथें काय असे माझी अहंता ।। ऐसा निश्चय करोनि चित्तां ।। वक्तृत्वाभिमान सोडावा ।। ३४ ।। वाणीचा अहंभाव ।। सोडोनि तियेचिये ठायीं ममत्व ।। धरोनि सर्वात्मभाव ।। आचरावा वाग्यज्ञ ।। ३५ ।। सर्व प्राणीमात्रीं शंकर ।। समभावें वसतो निरंतर ।। यास्तव करावा वागुच्चार ।। सर्वांसी हित होय ज्यापरी ।। ३६ ।। शिवमंत्र जपा एकोभावें ।। शिवनाम मुखी दृढ धरावें ।। शिवस्मरण सदा करावें ।। आळवा प्रेमभावें सदाशिवासी ।। ३७ ।। ज्याचे वचन ऐकतां ।। संतोष होय जीवजातां ।। तैसें वचन बोलावें तत्वतां ।। शिवानुग्रह व्हावया ।। ३८ ।। निर्लज्जेनें आदरपूर्वक ।। शिवभजन करावें सम्यक ।। नृत्यगीतादि करावें देख ।। जैसा भरे प्रेमरंग ।। ३९ ।। गुरुत्वाहंकार सोडोनि ।। संबोध सांगावा शिष्यजनीं ।। अथवा गुरुमुखें बोधवाणी ।। वेदतुल्य मानोनि ऐकावी ।। ४० ।। यापरी वचनपालनासी ।। वाग्यज्ञ ऐसें म्हणती महर्षी ।। वाग्यज्ञीं त्याज्य दोषासी ।। सांगतों निवडोनि परियेसा ।। ४१ ।। चहाडी सांगणें मिथ्या बोलणें ।। आणी परांचीं निंदावचनें ।। तैसेंचि मर्मोद्घाट करणें ।। हे वाग्यज्ञध्वंसक जाणावें ।। ४२ ।। आणी कठोरपणें वर्तणें ।। दुसऱ्याचें हेळण करणें ।। परमनोभंग होय जेणें ।। ऐसे वचन त्याग कीजे ।। ४३ ।। ऐसा निर्दुष्ट वाग्यज्ञ ।। जो प्रत्यहीं आचरी सुज्ञ ।। तोचि जाणावा अभिज्ञ ।। या भयानक संसारीं ।। ४४ ।। त्यासी संतोषें शिवानायक ।। भक्ती देवोनि अहेतुक ।। संसारमोचन करितो सम्यक ।। सत्य सत्य त्रिवाचा ।। ४५ ।। आतां सांगतो मनोयज्ञ ।। ऐका नृपहो चित्त देवोन ।। जेणें होय संसारमोचन ।। समाधान पूर्ण मिळे परब्रम्ही ।। ४६ ।। सुलभ होय गुरुभक्तांसी ।। मोक्ष लाभे तत्काळ साधकांसी ।। मन असे चंचल बहुवसी ।। जेणें जीवांसी भवफेरा ।। ४७ ।। मन उठतां संसार उठे ।। मन नसतां संसार आटे ।। निर्मनस्कांसी ब्रम्ह भेटे ।। ऐसें असें श्रुतिवचन ।। ४८ ।। मनोयोगें नाना दुःख ।। जीवांसी होतसे देंख ।। मनोनाशें लाघे पूर्ण सुख

१. निरातंक.




शिवचिदम्बर

|| मोक्ष सुगम त्याच समयीं || ४९ || शाश्वत जो कैलासनाथ || वसतो सर्वांच्या हृदयांत || जन्ममरणादि विरहित || संकल्पसाक्षी तोची जाणा || ५० || ऐसाही जो सदाशिव || ज्याच्या संगें पावला जीवभाव || विसरोनि निजानंदभाव || दुःखी स्वभाव अंगीकारी || ५१ || स्वरूप पाहतां जीवाचें || नित्यानंदरूप असे त्याचें || तथापि फलभोक्ता दुःखाचें || जाहला ज्याच्या संगें || ५२ || मनानें देहकल्पित | तोचि मी म्हणोनि जीव भ्रमित || तेणें जन्मादि दुःख बहुत | भोगितो परवश होवोनि || ५३ || ही माझी जाया हे माझे सुत || हें माझे मंदिर हें माझे आप्त || धन पशु क्षेत्रादि समस्त || मनानेंची कल्पिलें || ५४ || या सर्वांचिया ठायीं || माझेपणाचा अभिमान हृदयीं || दृढ असल्यानें पाही || दुःखबंधन जीवासी || ५५ || यास्तव सर्व दुःखप्रदायक || वैरीच जाणा मनोनामक || ज्ञानयज्ञें त्यासी सम्यक || वधितां निजसुख लागे हातां || ५६ || वैराग्यदीक्षा घेवोनि || हृदयकुंडीं पेटवा ज्ञानाग्नी || ध्यानयूप सबळ रोवोनि || बांधा आणोनी मनपशूसी || ५७ || विचारतंतूने बांधवा || महावाक्यमंत्रे संस्कारावा || मग निरंजनशामित्रगृहा[1] न्यावा || संहारावे साक्षीप्रकारें || ५८ || निर्ममत्व तीक्ष्ण शस्त्र घ्यावें हातां || पशूवरी न करीतां ममता || छिन्नभिन्न करोनि मागुता || करी हवन ज्ञानाग्नीमाजीं || ५९ || यापारी आचरितां ज्ञानयज्ञ || तेणें संतोषोनि नागभूषण || देतो अक्षय्य स्वर्गस्थान || पुनरावृत्तिविवर्जित || ६० || मन पावलिया नाश || उरे एक स्वरुप अविनाश || यास्तव व्हावयां मनोनाश || यज्ञरूपक दाविलें || ६१ || मन असतां संसार || मन गेलिया होय चिन्मात्र || बोलिला ऐसा निर्धार || उपनिषद्भागीं || ६२ || प्रत्यहीं सावध चित्तें || ध्यावे चित्तीं निर्विषय प्रभूतें || मनानें छेदन करूनि मागुतें || जीवन्मुक्तिसुख पावावे वेगीं || ६३ || हा जो मानसिक यज्ञ || सर्व सिद्धी द्यावया निपुण || जो आचारी भावें सुज्ञ || त्यासी सुलभ अक्षय्य सुख || ६४ || भूपाल हो तुम्हासी || संक्षेपें सांगीतलें यज्ञत्रयासी || विश्वास धरोनि मानसीं ||

१. निरंजनरूपी यज्ञपशुगृहांत.




शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

अभ्यास करा येणेंविधीं ।। ६५ ।। स्ववर्णाश्रमधर्मी विश्वास ।। धरोनि सेवित असतां यज्ञत्रयास ।। इह भोगूनि सुख विशेष ।। परत्र निरायासे मोक्ष लाधे ।। ६६ ।। मुनीश्वर सांगें द्विजांसी ।। श्रीगुरू भूमिपाळांसी ।। यापरी सांगोनि ज्ञान बोधांसी ।। स्नानार्थ उतरले नदी जळी ।। ६७ ।। स्नान करोनि श्रीगुरू ।। यागस्थाना येवोनि सत्वरू ।। होमविधी सारोनि परिकरू ।। स्वस्थ चित्तें बैंसले ।। ६८ ।। इकडे श्रीगुरुबोध रसाळ ।। ऐकतां सर्वही भूमिपाळ ।। आनंदसागरीं मन बुडोन केवळ ।। बैंसले तें शांत चित्तें ।। ६९ ।। गुरुबोधाचें करूनि मनन ।। समाधिस्थ जाहले नृपजन ।। ब्रम्हानंदसागरीं लीन ।। होती तेधवां सर्वंही ।। ७० ।। गुरुशिष्यपण निमालें ।। श्रवण मनन तें राहिलें ।। स्वरूपार्णवीं निमग्न जाहले ।। अवघे ते एकदाचि ।। ७१ ।। निरसोनि सकळ आधी ।। लागली केवळ अक्षय समाधी ।। हरपली मन–चित्त–बुद्धी ।। सर्वही उपाधी निमाली ।। ७२ ।। मग एक मुहूर्तानंतर ।। सावध होवोनि नृपवर ।। संध्या करोनि सत्वर ।। आले श्रीगुरुसन्निधानीं ।। ७३ ।। तंव नृपासी बोलावोनि जवळी ।। सुमंदहासे चंद्रमौळी ।। फलमंत्राक्षता घेवूनि या वेळीं ।। निघावें सकाळीं स्वस्वस्थळां ।। ७४ ।। यापारी श्रीगुरुवचन ।। ऐकतां दचकले सर्वही जन ।। नेत्र झाले शोकाश्रुपूर्ण ।। बोलिले मंदमंद खिन्न वाचें ।। ७५ ।। दयाळा आजी नवल वर्तलें ।। भास्करापुढें कीं तम उभारिलें ।। तैंसे आमुचे दैंवबळें देखिला खेदसमय हा ।। ७६ ।। जोंवरी श्रीगुरुपदद्वन्द्व ।। हृदयी न प्रवेशी महादेव ।। तोंवरी भोक्ता होय मानव ।। विरहादि व्यथा अपरिमित ।। ७७ ।। दुःखाचलविदारक वज्र ।। जोंवरी तव नाममात्र ।। न बैंसे जीभसिंहासनावर ।। तोंवरी दुःख भारी होय देवा ।। ७८ ।। जोंवरी गुरुमुखें बोधामृत ।। न पडे शब्दसदनीं[1] किंचित ।। तोंवरी दुःखसंघात ।। श्रीगुरुनाथा जाच देवो ।। ७९ ।। श्रुतिप्रतिपाद्य रम्यमूर्ती ।। ज्याचें दर्शनेंचि इंद्रियें निवती ।। ती न ये जोंवरी नेत्रपंथीं ।। करुणामूर्ती सदाशिव ।। ८० ।। तोंवरी गृहांधकूपपतित ।। वियोगादि दुःखसंघात ।। मूढमती भोगूं

१. कानांत.

शिवचिदम्बर

दे सतत ।। अनिवार्य जें आन यत्नें ।। ८१ ।। सकल दुःखसंहारक ।। आणी शाश्वत सुखदायक ।। तव पदपंकज सुरेख ।। ब्रम्हादिकही सेविती ।। ८२ ।। ते प्रत्यक्ष पाहिले असतां ।। आणी भावें सेवित असतां ।। हें वियोगद्दुःख कृपावंता ।। राहिलें कैसे आजवरी ।। ८३ ।। उगवतांही दिनमणी ।। अंधार राहिला कैसेनी ।। कीं लागतांही स्पर्शमणी ।। उरलें लोखंडीं मलिनपण ।। ८४ ।। नातरी दामोदरकांता ।। प्रसन्न होवोनि घरां येतां ।। राहिली कैसेनि दारिद्र्यचिंता ।। सांग कृपावंता या समयीं ।। ८५ ।। अथवा पीयूष[1] पडतां मुखकमळीं ।। कीं रोगभीती न उडाली ।। कामधेनू बैसलिया जवळीं ।। न पुरली कीं क्षुद्बाधा ।। ८६ ।। यापरी दयाधना ।। चोज वाटतें आमुचे मना ।। प्रत्यक्ष देखतांही तव चरणां ।। हें वियोगभय आले कोठूनी ।। ८७ ।। पूर्वीच दुर्विधीं[2] आम्ही ।। राज्यगर्ती पडोनि स्वामी ।। दारा-सुत-आप्त-धन-धामी ।। चरफडत होतों गुंतोनिया ।। ८८ ।। दयाळा तुवा स्वयमेव ।। सर्व सौख्यदायकपदद्वन्द्व ।। दावोनि आमुच दुःख सर्व ।। दुरावोनि सुख दाविलें ।। ८९ ।। मागुती विरहाग्नीमाजीं ।। कां आम्हां टाकिसी सोमयाजी ।। काय बळाचार आला आजी ।। आमुच्या दुर्दैवां ।। ९० ।। अहो विधात्या तुज दया ।। कां नये आमुची या समया ।। आधीं दावोनि श्रीगुरुपाया ।। अनिर्वाच्य सौख्य दाविलेंसी ।। ९१ ।। आंता ते परत घेवोनि ।। आम्हां टाकिसी विरहाग्नीं ।। येणें फळ काय तुजलागोनि ।। वृथा प्राणियां ताप देवूं नये ।। ९२ ।। श्रीचिदम्बरा करुणाघना ।। सांबा शंभो दयापूर्णा ।। तुज येवूं दे आमुची करुणा ।। निवारी या विरहिभया ।। ९३ ।। शरणागत आम्ही तव पायां ।। आम्हां राख राख गा शिवा सखया ।। निवारि बा विरहभया ।। क्षणमात्र साहूं न शको ।। ९४ ।। यापरी जनांची करुणावाणी ।। ऐकोनि द्रवला अंतःकरणीं ।। हर्षे बोलिला कैलासधनी ।। विरहहारक वचन तेधवां ।। ९५ ।। परिसा माझें वचनमात्र ।। ज्या वियोगभयें शोकातुर ।। आपण जाहला पृथ्वीश्वर ।। त्याचा विचार सांगतों ।। ९६ ।। आज किंवा शताब्दांवरी ।। देहासी मृत्यू असे निर्धारी

१. अमृत. २. अभागी.




शिवचिदम्बर

शि व चि द म्ब र

।। वियोगभय नसुटे तेव्हां तरी ।। जाणा अंतरीं सत्य सत्य ।। ९७ ।। विचार करोनि पूर्ण चित्तीं ।। जाणाल जरी माझी स्थिती ।। कल्पांत होतां ही निश्चिती ।। वियोगखंती नये तुम्हासी ।। ९८ ।। तें माझे स्वरूप तुम्हांसी ।। सांगतों ऐका सावधेसी ।। मायायोगें स्वीकृत देहासी ।। कार्यांतीं लय असे निश्चय ।। ९९ ।। पूर्वी होतें ब्रम्ह एक ।। नित्य मुक्त अविकारी देख ।। पूर्णज्योति स्वयंप्रकाशक ।। सत्यज्ञान निरंतर ।। १०० ।। तेंचि ब्रम्ह जगदीश्वर ।। निज शक्तीचा करोनि अंगीकार ।। स्वयमेव होवोनि चराचर ।। स्वइच्छें विचरतें ।। १ ।। ज्या ठायीं उपजे जगत्रय ।। ज्या सत्तेंनें चालते प्रपंच कार्य ।। जेथें सर्व पावे अंतीं लय ।। चिदानंद तें रूप माझें ।। २ ।। जगाचे आधीं आणि जगामधीं ।। जो एकलाची व्याप्त त्रिशुध्दी ।। लयाअंतीं जें उरे अनादी ।। तेंचि पूर्णानंद स्वरूप माझे ।। ३ ।। तुमच्याही अंतःकरणाठायीं ।। त्रिकाळीं वसतों पूर्णत्वें पाही ।। मी आहें ऐसी जी स्फूर्ती हृदयीं ।। तेथेंचि असे वास माझा ।। ४ ।। तेथील मीपण सोडोनि ।। आहेपण जें भासे अंतःकरणीं ।। तेंचि रूप मी म्हणोनि ।। ओळखा निश्चयें नृपाळहो ।। ५ ।। अवस्थापूर्वी अवस्थात्रयीं ।। साक्षित्वें भासे अस्तित्व हृदयीं ।। अवस्था नसतांहि पाही ।। अस्तित्व असे स्वयंप्रकाश ।। ६ ।। देह नासलिया आहेपणासी ।। नाश नोहे निश्चयेंसी ।। सर्वात्मा मी हृषीकेशी ।। तेंचि स्वरूपें सर्वत्र वसतों ।। ७ ।। अस्तित्व हेंचि सर्वाधिष्ठान ।। देहादि अध्यारोप पूर्ण ।। त्यावरी कल्पित मायेकरोन ।। विचारें पाहतां आत्मा एक ।। ८ ।। सिंधूमाजीं जेंवि लहरी ।। अथवा नीलिमा निर्मळ अंबरीं ।। जैसें अभेदें कल्पित त्यापरी ।। अधिष्ठानावरी देहादिक ।। ९ ।। सूर्यकिरणांवरी वारी ।। नातरी भुजंग रज्जूवरी ।। जैसा अभेदें कल्पित त्यापरी ।। भ्रमें जग भासें अधिष्ठानीं ।। ११० ।। अथवा शिंपींत जेंवि चांदी ।। गंधर्वनगर गगनामधीं ।। तैंसे कल्पित देहादि ।। अधिष्ठानीं भासत ।। ११ ।। यास्तव विचारोनि बहुवसी ।। सोडितां देहादि पंच कोशांसी ।। पूर्वीप्रमाणें अस्तित्व परियेसी ।। स्वयंप्रकाशें भासत ।। १२ ।। विचारें जें जें सोडतां येत ।। तें तें जाणावें मिथ्याभूत ।। जें दवडिता न जाय व्योमवत ।। तें सर्वगत

शि व चि द म्ब र

अस्तित्व जाणा ।। १३ ।। नाना युक्तीनें निवारितां ।। न जाय जी आत्मसत्ता ।। तीच मी जाणा सर्वथा ।। हृदयस्थ सर्व जनांचा ।। १४ ।। तेथें चित्त ठेवोनी ।। स्वाहंकार सोडितांक्षणीं ।। जीव ब्रम्हीं समरसोनि ।। होय तत्क्षणीं एकरूप ।। १५ ।। भ्रमें अहंकार उठे सत्तेवरी ।। देहादिकार्चे ममत्व अहंकारीं ।। अस्तित्व सत्तेस त्यावरी ।। मायिक देहादि भासती ।। १६ ।। देहादिबुद्धीपर्यंत ।। मीपण आहे किंचित ।। माझेपण विलसें जेथ ।। आत्मता नाहीं त्या ठायीं ।। १७ ।। यास्तव अहंकारापूर्वी जें विलसें ।। तें अस्तित्व शिवरूप असे ।। जो शिव तोचि मी असे ।। विचारें ऐसा निश्चय करावा ।। १८ ।। निश्चय करोनि यापरी ।। जो सेवी मजसी अंतरीं ।। तो न पडे विरहवैश्वानरीं[1] ।। कालत्रयीं निर्धारा ।। १९ ।। यास्तव आम्हा तुम्हां ठायीं ।। देहात्मबुद्धी सोडोनि हृदयीं ।। अखंडैकरस सर्वां ठायीं ।। शिवभावना करावी सतत ।। १२० ।। प्रवाहपतित कर्म करावें ।। कर्माभिमानीं चित्त न गुंतावें ।। सर्वकाळीं निज अकर्तृत्व स्मरावें ।। असावेंचि स्वस्थपणें ।। २१ ।। यापरी श्रीगुरु चिदानंद ।। नृपांसी सांगोनि सद्बोध ।। दूर करोनि मिथ्याभेद ।। पुसे मागुती नृपेंसी ।। २२ ।। जो बोध सांगीतला तुम्हासीं ।। उमजला कां हो मानसीं ।। अथवा काय इच्छा ती मजसी ।। सांगतां तैंसें आचरूं ।। २३ ।। ऐसी ऐकतां श्रीगुरूवाणी ।। निवाले जन सर्व तत्क्षणीं ।। निरहंकारें स्वामीचरणीं ।। नमिती स्वानंदतुष्ट मानसीं ।। २४ ।। मग बद्धांजळीनें विनविती ।। स्वामी तूं अससी त्र्यबमूर्ती ।। तुझी आज्ञा या भूवरती ।। उल्लंघन करूं शके कोण ।। २५ ।। ज्याचे भयें वायू चालतो ।। भास्करही ज्या धांके तपतो ।। इंद्र वर्षतो वन्ही जळतो ।। मृत्यूसी असे धाक ज्याचा ।। २६ ।। जैंसी करितां तुम्ही आज्ञा ।। तैंसें वर्तू आम्ही सर्वज्ञा ।। तथापि चरणीं विज्ञापना ।। असे गुरूराया परियेसी ।। २७ ।। सोमयागें कृतकृत्य गुरूसी ।। स्ववैभवें पोहोंचवोनि नगरासी ।। आम्ही जाऊं स्वस्वस्थळासी ।। ऐसी मानसीं इच्छा वसे ।। २८ ।। याविषयीं दयाघना ।। जैंसी आम्हां देसी आज्ञा ।। तीच

१. विरहाग्नीत.




शिवचिदम्बर

आम्हां कैलासरमणा ।। शिरोभूषण जाणपां ।। २९ ।। यापरी नृपविनवाणी ।। ऐकोनि बोले दीक्षितमणी ।। जैसें इच्छितां अंतःकरणीं ।। होऊं दे तैसें आनंदपणें ।। १३० ।। ऐसें सांगोनि नृपांसी ।। बोलवा म्हणे दिवाकरासी ।। चिदम्बरकिंकर म्हणे सर्वासी ।। ऐका पुढील रसाळ चरित्र ।। ३१ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सदगुरुनाथं ।। यास्तव ऐका श्रोते समस्त ।। एकचत्वारिंऽशोध्याय रसाळ हा ।। १३२ ।। इती श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे यज्ञवैंभवखण्डे वाचिकमानसिक यज्ञकथनं तथा नृपेभ्यो ब्रम्होपदेशो नाम एकचत्वारिशोऽध्यायः ।। ४१ ।। ओवीसंख्या १३२ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

## बाजीरावेण सद्गुरुप्रसादत्यागः




बहुतांचे अन्न तुझे पदरीं । प्रसाद बांधोनि वस्त्री । निजमंदिरापर्यंत नेई :
स्वामीवचन ऐकतांही भूनाथ । फलमंत्राक्षता घालितां पदरांत । प्रसाद टाकित दासपदरीं ॥

अध्याय बेचाळिसावा

शिवचिदम्बर

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नगः ।। ॐनमो गुरुजी त्रैमूर्ती ।। आनंदघना सावित्रीपती ।। ब्रग्हादिक तुज वंदिती ।। निजहित साधावया ।। १ ।। तुज वंदितो दयासिंधु ।। माझी मती करोनि विशदु ।। चरित्र वदवी दीनबंधु ।। कथास्फूर्ती देईं आतां ।। २ ।। द्विजेंद्रासी सांगे मुनीश्वर ।। दिवाकरासी बोलावोनि चिदम्बर ।। उदयीक मुहूर्त सुंदर ।। म्हणे जावूं गुरुपुरासी ।। ३ ।। यज्ञावशिष्ट जे पदार्थ ।। तेणें आराधोनि विप्रजात ।। मग येइ स्वस्थानाप्रत ।। तंव विनवित दिवाकर ।। ४ ।। तुम्हाविण कैसी द्विजाराधना ।। माझेनी घडेल दयाघना ।। ऐसी ऐकोनि पुत्रप्रार्थना ।। हसत निघे चिदम्बर ।। ५ ।। पुत्रासवें कोठीगृहासी ।। येवोनि पाहे जंव सामग्रीसी ।। तंव जितुकी राहिली तिसरे दिवसीं ।। तितुकी सामग्री देखिली ।। ६ ।। अगा वत्सा अजूनि सामग्री ।। दिसूं येतसे भारी ।। यास्तव समाराधना करी ।। यापुढें पांच दिवस ।। ७ ।। तंव विनवी दिवाकर ।। द्विजाराधना पंच वासर ।। जरी करणें असेल तर ।। परिसेवी प्रार्थना एक माझी ।। ८ ।। कार्यांतरी गुंतल्याकारण ।। म्यां यज्ञविधी संपूर्ण ।। न देखिला यास्तव करवीन ।। मागुती सोमयाग ।। ९ ।। दिवाकराची ऐकतां प्रार्थना ।। हांसत गेला स्वामी स्थाना ।। इकडे आणवोनि योग्य ब्राम्हणा ।। आरंभी दिवाकर सोमयाग ।। १० ।। मागुती पांच दिवस ।। द्विजसंतर्पण केलें विशेष ।। पांच दिवसात तीन लक्षास ।। दोन सहस्त्र उणे जाहले ।। ११ ।। यापरी क्रतु संपलियावरी ।। सुमुहूर्त पाहोनि एक्या वासरीं ।। सर्वांसी बोलावोनि श्रीहरी ।। फलमंत्राक्षता देतसे ।। १२ ।। म्हणे द्विजेंद्र हो आपण ।। श्रमित जाहले मज कारण ।। योग्यतानुरूप सन्मान ।। घडला नाहीं माझ्याने ।। १३ ।। क्षमा करोनि आपण ।। लोभ ठेवा मजवरी पूर्ण ।। जावें आतां आनंदेकरून ।। स्वस्थानासी द्विजेंद्रहो ।। १४ ।। यापरी श्रीगुरुवचनामृत ।। सेवितां तुष्टले द्विज समस्त ।। निघाले प्रेमे नाग गर्जत ।। चांदण्यात चहूवाटें ।। १५ ।। इकडे श्रीचिदम्बर ।। समरोपोनि वैंश्वानर[1] ।। आरणी घेवोनि सत्वर ।। भार्यासवें प्रस्थान करी ।। १६ ।। इतुक्यात भूमिपाळ ।। प्रस्थानचिन्हें

..........................

१. अग्नी.

शिवचिदम्बर

भूषित सकळ ।। मिळाले श्रीगुरुजवळ ।। स्वस्वदळ घेवोनिया ।। १७ ।। श्रीगुरुप्रस्थान ऐकोनि ।। आला आम्रायीचा धनी ।। विनवी म्लानवदन करोनि ।। स्वामीचरणीं तेधवां ।। १८ ।। स्वामीराया सर्व ब्राम्हण ।। गेले आम्रफळ खावोन ।। गेलें माझें वार्षिकान्न ।। काय करूं याउपरी ।। १९ ।। तंव स्वामी बोले सुमंद हासें ।। ब्राम्हणानुग्रहीं लाभ असे ।। ब्राम्हणयोगें कांही न नासें ।। काय विचित्र बोलसी तूं ।। २० ।। वृथा ब्राम्हणावरी अपराधा ।। न ठेवी बापा सुबुध्दा ।। पाहोनि येइ आम्रवृंदा ।। मग तूतें सांगेन ।। २१ ।। जावोनि पाहे आम्रवना ।। ऐसें ऐकोनि श्रीगुरुवचना ।। निघाला आम्रायीसी जाणा ।। पाहाव्वया तो अधिकारी ।। २२ ।। जावोनि जंव पाये आम्रायी ।। फळभारें वृक्ष सर्वही ।। वांकोनि लागले होते मही ।। मग तो जाहला विस्मित ।। २३ ।। येवोनि विनवी स्वामीसी ।। फार अपराध घडला मजसी ।। वृथा बोल ठेविले द्विजांसी ।। नोळखतां तुझ रूप ।। २४ ।। तुझी लीला असे आगाध ।। मी होवोनि मतिमंद ।। तुजवरी ठेविला शब्द ।। दयाघना क्षमा करी ।। २५ ।। यापरी अधिकारी विनवीत ।। आंगणी लोळे गहिंवरत ।। तंव त्यांसी उठवोनि दयावंत ।। संबोखित नानापरी ।। २६ ।। वर देवोनि तदिच्छित ।। पाठवी करोनि शांतचित्त ।। मग निघतां श्रीदीक्षित ।। करी प्रणिपात[१] यागभूमीसी ।। २७ ।। तंव आलियां भूसुरांसी ।। वंदोनि आनंदमानसी ।। सालंकृत गोदान परियेसी ।। देवोनिया तोषवित ।। २८ ।। स्वामीदर्शनासी आलिया ।। आचांडालाहि पौरसमुदाया ।। तत्तदिच्छित देवोनिया ।। तोषवित श्रीगुरु ।। २९ ।। मग हातीं घेवोनि दोहि अरणी ।। मौनेंचि निघाला दीक्षितमणी ।। तंव निघाली राजवाहिनि[२] ।। पुढें करोनि सेनाधिपती ।। ३० ।। रथ पदाति[३] वाजी[४] कुंजर[५] ।। पुढे चालिले चतुरंग दळभार ।। शांतिसूक्त पठत व्दिजवर ।। स्वामीसभोवतीं चालती ।। ३१ ।। पादाचारें सीमा ओलांडोनि ।। श्रीगुरु बैसला शुद्ध अवनी[६] ।।

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

१. नमस्कार. २. सैन्य. ३. पायदळ. ४. घोडे. ५. हत्ती. ६. भूमिवर.

शि व चि द म्ब र

तंव नृपाळ[1] सन्निध येवोनि ।। करिती विनवणी नम्र भावें ।। ३२ ।। स्वामीराया चालणें असे दूरी ।। अश्व किंवा रथावरी ।। बैसोनि चलावें भक्तकैवारी ।। म्हणोनि परोपरी प्रार्थिती ।। ३३ ।। नृपांसी सांगे श्रीगुरू ।। अरणीसंस्थ वैश्वानरू[2] ।। हातीं असे निर्धारू[3] ।। स्पर्शदोष घडेल ।। ३४ ।। ऐकतांचि श्रीगुरुवचन ।। कुशल ब्राम्हणा स्नान घालोन ।। आणिले पीतांबर नेसवोन ।। सारथ्यकर्म करावया ।। ३५ ।। मग श्रीगुरू सर्वांसी ।। वाहनावरी बैसवोनि प्रेमेंसी ।। दोघी भार्या आणि अरणीसी ।। घेवोनि रथीं बैसत ।। ३६ ।। गहींवरित ग्रामजनांसी ।। संबोखोनि सांगे सर्वांसी ।। आपण खंती करू नका मानसीं ।। सुखें निजसदनीं रहावें ।। ३७ ।। मागुती घडेल पुनर्दर्शन ।। जावें आतां सुखें आपण ।। ऐसें सर्वांसी संबोखोन ।। प्रेमभावें परतवित ।। ३८ ।। स्वामी चालतां मग वाटें ।। रथ चालिले घडघडाटें ।। गज वाजि पायाळ भटे ।। चालिले सपाटे स्वामीसवें ।। ३९ ।। मृदंग भेरी आनक ।। कहाल वाजंतुरे गोमुख ।। वाद्यें वाजवितां दशदिशा देख ।। प्रतिनादें दुमदुमित ।। ४० ।। तंव निघाल्या राजस्त्रिया ।। रथ शिबिकेमाजीं बैसोनिया ।। चित्र वस्त्र लेवोनियां ।। शोभिन्नल्या देवांगनापरी ।। ४१ ।। खर[4] खेंचर उंट घोडे ।। बैल गाड्या आणि रेडे ।। ओझें घेवोनि चालिले पुढें ।। स्वामीकडे पाहात ।। ४२ ।। सर्वही वस्त्रालंकार सुशोभित ।। रथीं बैसोनि वारांगना समस्त ।। स्वर्गणिकापरी मार्गी शोभत ।। नृपसेनांमाजीं ते वेळां ।। ४३ ।। शुभ्र पताका छत्र चामर ।। सद्वस्त्र आणि रत्नालंकार ।। यावरी पडतां चंद्रघस्त्र[5] ।। चांदणें प्रकाशे द्विगुणपणें ।। ४४ ।। यापरी शांत समयीं ।। चांद्रण्यात मार्ग चालत पाही ।। मार्गश्रम न मानितां कांहीं ।। सुखें येती स्वामीसवें ।। ४५ ।। येणेंपरी मार्ग चालत ।। अरुणोदयीं नवलगुंदाप्रत ।। पातले श्रीगुरुनाथ ।। तंव दर्शनार्थ आले ग्रामजन ।। ४६ ।। आबालवृद्ध नारीनर ।। पातले दर्शनार्थ सत्वर ।। आला सुवासिनीभार[6] ।। मंगळारती घेवोनिया ।। ४७ ।। केळीं नारळ चित्रान्न ।। आधीं ओवाळणी करोन ।। मग अक्षता वाहोन ।। आरत्या ओवाळिती

शि व चि द म्ब र

१. राजेलोक. २. अग्नी. ३. निश्चित. ४. गाढव. ५. चंद्रकिरण. ६. सुवासिनींचा समूह.

|| ४८ || मग गेलिया पुरंध्रीवर्ग[१] || नगरीं प्रवेशी गंगोत्तमांग[२] || त्यामागे घेवोनी सैन्यसंघ || नृपाळही चालिले || ४९ || स्वामी येता नगरांत || नगर श्रृंगारलें होतें बहुत || सुगंध जळें संमार्जित || शोभतसे राजमार्ग || ५० || उभारले होते जे वीथी वीथी[३] || चित्रध्वजपताका तळपती || स्वर्ण पल्लवादि तोरणपंक्ति || सुशोभित चहूंकडे || ५१ || पुष्पमाळा मुक्ताहार || चित्रवस्त्र पीतांबर || द्वारीं द्वारीं अपार || शोभार्थ बांधिले होते || ५२ || प्रती प्रती द्वारापुढें || फलपल्लवशोभित रोकडे || पूर्ण कुंभ ठेविले होते चहूंकडे || धूपामोदित[४] वेदीवरी || ५३ || प्रतिप्रति वेदीमाजीं || लेवोनि नववस्त्र रत्नालंकारराजी || उभ्या सुवासिनीगण विराजी || स्थिरपणें बाहुल्यापरी || ५४ || लाविल्या होत्या दीपावळी || नक्षत्रमाळाच कीं बांधिल्या सोज्वळी || गुग्गुलु अगरु धूप धूमावळी || उत्सर्पती[५] चहूकडोनि || ५५ || आरती करावया सुवासिनीवर्ग || प्रतिद्वारापुढें अडविती मार्ग || यास्तव मंद मंद चालिला भर्ग[६] || निसर्गसुंदर श्रीदीक्षित || ५६ || जननयनामृत सुंदरमूर्ती || आलिया वृत्त ऐकतां योषिती[७] || हर्षें धांवत येतां मार्गी गळती || कबरमाल्य पदरभूषण || ५७ || पदर सावरित वेंगीं || माडी चढताती अवघी || कित्येक उभ्या राहोनि मार्गी || मुख चंद्र पाहती स्वामीचा || ५८ || कित्येक सोडोनि बाहकांसी || गोपुर चढतासी वेगेसी || कित्येक सोडोनि गृहकार्यासी || चंद्रशाळेसी धांवत || ५९ || स्वामीदर्शनार्थ धांवता चित्त || देहभान विसरोनि समस्त || चढल्या माडीवरी दर्शनार्थ || कुलयोषिता तेधवां || ६० || एकीं घरिला असे कलश || एक आली धरोनी दोहनपात्रास[८] || एक येई सावरित केशास || दधिलिप्त[९] हस्त एकीचा || ६१ || कुंकुमकरंडहस्त || कित्येक स्त्रिया सुशोभित || कित्येक गृहकृत्यचिन्हित || आल्या दर्शनार्थ श्रीगुरूच्या || ६२ || लेवोनि स्वर्ण मौक्तिकादि भूषण || प्रासादावरी सुंदरीगण || हाती पुष्पहार घेवोन || देवांगनापरी

१. स्त्रीसमुदाय. २. चिदंबरस्वामी. ३. रस्त्यारस्त्यावर. ४. धूपसुगंधित. ५. पसरतात.
६. शंकर. ७. स्त्रिया. ८. धार काडण्याचे भांडे. ९. दह्याने भरलेला.




शिवचिदम्बर

शोभती ।। ६३ ।। श्रीचिदम्बर रम्यमूर्तीवरी ।। सर्वेंद्रियपुष्प समर्पोनि सुंदरी ।। शोभताती प्रासादशिखरीं ।। सिध्दांगनापरी व्योमयानि[१] ।। ६४ ।। अनिमिषें[२] पाहतां श्रीगुरूसी ।। सीमंतिनी शोभताती बहुवसीं ।। नेत्रेंदीवरमाळ[३] स्वामीसी ।। समर्पोनि पूजिती कीं ।। ६५ ।। नातरी ब्रम्हदेवें भक्तीनें ।। श्रीगुरूसी पूजावया करणें ।। शोभती विधुमाळ[४] निर्मिल्याप्रमाणें ।। स्त्रीवदनपंक्ती पंक्तीशां ।। ६६ ।। श्रीगुरूवरीं सुवासिनीगण ।। केळीं बत्तासे लाह्या सुमन ।। उडविताती भावेंकरोन ।। प्रियवचन बोलत परस्पर ।। ६७ ।। ऐसीया कौतुके स्त्रिया ।। बोलत असतां चित्रवाक्या ।। स्वामी त्यांना पाहात कृपादृष्ट्या ।। चालिलासे मंदमंद ।। ६८ ।। मार्गी नमस्कृत जनांसी ।। श्रीगुरू उठवित प्रेमेंसी ।। तोषवी मृदु वचनें त्यासी ।। कुशल प्रश्न विचारोनि ।। ६९ ।। यापरी दीक्षित सद्‌गुरू ।। सर्वे घेवोनि सर्व परिवारू ।। प्रवेशिला लालगडांते[५] सत्वरू ।। पूर्व निवासस्थान जेथें ।। ७० ।। म्हणती स्वामीसी त्रयस्थ जन ।। आजचा हा दिवस सुदिन ।। जाहलें तव पदाब्जदर्शन[६] ।। कैलासनाथाचें भूवरीं ।। ७१ ।। सर्वांसी आदरें सन्मानोनि ।। तेथें भोजनार्थ निमंत्री त्या दिनीं ।। मग आपण स्नान करोनी ।। मंथोनि स्थापित यज्ञेश्वरासी ।। ७२ ।। नानाविध पक्वान्नें त्या दिवशीं ब्राम्हण संतर्पोनि महाहर्षी ।। मग भक्तासवे आपण भोजनासी । सारोनी विश्राम्यर्थ निरोपित ।। ७३ ।। दुसरे दिवशी प्रातःकाळीं ।। सर्व नृपांसी बोलवोनि जवळीं ।। फलमंत्राक्षता देवोनि त्या वेळीं ।। आनंदे बोळवितसे ।। ७४ ।। ऐसें पाठवोन सर्वांस ।। आपण तेथें कांहीं दिवस ।। केला असतां सुखनिवास ।। आला दर्शनार्थ बाजीराज ।। ७५ ।। तंव करुणाकर चिदम्बरें ।। आतिथ्य केलें नृपासी सादरें ।। नृपासारखें सैन्य सारे ।। कृपासमुद्रें तोषविलें ।। ७६ ।। त्याचें आतिथ्य पाहतां भूपती ।। अति विस्मित जाहला चित्तीं ।। म्हणे काय असे चिदम्बराची शक्ती ।। ऐसें आतिथ्य नोहे माझ्यानीं ।। ७७ ।। यापरी राजा चिदम्बरस्तुती ।। करित असतां विस्मित चित्तीं ।। तंव दुर्मंत्री दुष्टमती ।। नृपासी बोलत तेधवां ।। ७८ ।। लक्ष सेनासहित

.........................

१. विमानात. २. पाते न हलविता. ३. नेत्रकमळमाळ. ४. चंद्रमाळ. ५. लालकिल्यांत. ६. चरणकमलांचे दर्शन.




शिव चिदम्बर

शि व चि द म्ब र

तुम्हांसी ।। समत्वें केलें आतिथ्यासी ।। म्हणोनि आपण विस्मित मानसीं ।। येथें काय विस्मयहेतू[१] ।। ७९ ।। आपण येणेचा वृत्तांत ।। जाणत होता आधींच दीक्षित ।। मांडलीकांचे सहाय घेवोनि बहुत ।। सामग्री संपादित अति यत्नें ।। ८० ।। तेणें वर्तलें कालचें आतिथ्य ।। आपण म्हणतां अवतारकृत्य ।। आम्हासी न वाटे हें सत्य ।। यांत काय असे अवतारक्रिया ।। ८१ ।। जरी होय हा अवतारिक ।। प्रयत्न घेवोनि पाहूं कौतुक ।। आजसारिखें जरी उदईक ।। आतिथ्य करील तरी शिव हा ।। ८२ ।। श्रीगुरूची परीक्षा घेवूं म्हणती ।। तेची जाणपा मूढमती ।। अंती त्यासी नरकवस्ती ।। म्हणोनी छळती श्रीगुरूसी ।। ८३ ।। दुर्मंत्रियाचें दुरालोचन[१] ।। कालानुसारे नृपास जाण ।। सत्य वाटोनि महत्परीक्षण ।। हित मानोनि तुष्टला ।। ८४ ।। जैसा संग तैसी होय मती ।। यास्तव करूं नये दुःसंगती ।। विषवल्लीची घडता संगती ।। अमृतवल्लीचेही नासती गुण ।। ८५ ।। क्षीरघटामाजी[२] पडंता लवण ।। तत्क्षणीं होय क्षीर अवगुण ।। तैसी दुःसंगती घडतांक्षण ।। नृपालाचे अंतःकरण पालटले।। ८६ ।। प्रातःकाळीं श्री चिदम्बर ।। निरोप द्यावया सत्वर ।। पाचारितां जावोनि नृपवर ।। दोनी कर जोडोनी विनवित ।। ८७ ।। स्वामीराया आज येथें ।। प्रसाद घेवोनी अनुग्रहातें ।। घेतों इतुके कृपादानातें ।। द्यावें मजलागी यावेळीं ।। ८८ ।। तंव बोले सुमंदहसित ।। ऐक राया माझी मात ।। मी असे तुझा धर्माश्रित ।। न घेईं आतां सत्व माझें ।। ८९ ।। तुझा आगमनवृत्तांत ।। ऐकोनी मी सहाय्यार्थ ।। मंडलीकां बोलावोनि समस्त ।। यत्नें सामग्री संपादिली ।। ९० ।। काल एक दिवस आतिथ्य ।। करितां झालों मी कृतकृत्य ।। यापुढे न घेई माझे सत्व ।। निश्चयेंसी नृपवर्या ।। ९१ ।। इतुकें स्पष्ट सांगतांही श्रीगुरू ।। न करितां वाक्यार्थ विचारू ।। आग्रह धरित नृपवरू ।। पुनरपि प्रसादार्थ ।। ९२ ।। तव सांगे दयानिधी ।। तरी एकटा येई सुबुद्धी ।। यापुढें सोडी बा दुर्बुध्दी ।। परीक्षा घेणें विषयीं ।। ९३ ।। तव बोले नृपनाथ ।। सैन्य आले प्रसादार्थ ।। त्यांसी सोडोनि एकटा मी येथ

१. आश्चर्याचे कारण. २. दुष्टविचार. ३. दुधाच्या भांड्यात.

शि व चि द म्ब र

शि व चि द म्ब र

|| कैसा समर्था घेवूं प्रसाद || ९४ || आपणासी काय न्यून || गज संतोषावया ससैन्य || भोजनोत्तर आम्हां जाण || स्यामीरायें निरोप द्यावा || ९५ || तंव बोले श्रीगुरुनाथ || राजा जरी पाहूं इच्छिसी सत्त्व || उपाय न चले माझा येथ || त्राता समर्थ असे जगदीश || ९६ || बरें यावें सेनेसहित || भोजनमात्रें होई संतृप्त || ऐसें बोलोनि श्रीदीक्षित || कोठीस्थाना पातले || ९७ || पाहतां कोठींत सामग्री || सव्वाशें जनासी होय पुरी || इतुकी निघतां भक्तकैवारी || म्हणे सामग्री उदंड असे || ९८ || पाक करविला प्रहरांत || राजा आला परिवारासहित || पाट मांडिले होते अद्‌भुत || झाला विस्मित पाहोनि नृप || ९९ || नृप अमात्य आदिकरोन || सैनिकापर्यंत समस्तें जाण || पाट रंगवल्ली कर्दळी पान || मांडिले होते सारिखे || १०० || पूर्व दिवसाहूनी शतगुण || अधिक केलें आतिथ्य जाण || अन्नपूर्णेचें करितां स्मरण || न्यून नसे पूर्णपाकां || १ || चतुर्विध भैक्ष्य पक्वान्न || आतृप्त जेविले नृप जन || तरी पाक दिसे पूर्वीप्रमाण || ग्रामस्थादि तृप्त जाहले || २ || सव्वाशें जनापुरता || त्या दिनीं पाक केला होता || सव्वालक्ष जन जेवितां || मुळीं पाकातें नसे न्यूनता || ३ || तंव लज्जित होवोनि नृपती || जेवोनि आला स्वामीप्रती || फलमंत्राक्षता घेवोनि हातीं || बोले नृपासी चिदम्बर || ४ || होणाऱ्या अनुसरोनि मती || सर्वांसी होतसे भूपती || आतां विचारोनि माझी भारती[1] || घेई फलमंत्राक्षता || ५ || बहुतांचे अन्न तुझे पदरीं || आहे यास्तव सांगतों ये अवसरी || प्रसाद बांधोनी सदृढ वस्त्रीं || निजमंदिरापर्यंत नेई || ६ || ऐसें बालोनि श्रीदीक्षित || फलमंत्राक्षता घालित पदरांत || स्वामीवचन ऐकतांही भूनाथ || प्रसाद टाकित दासपदरीं || ७ || हें पाहतांचि सत्वर || स्वामीनेत्रीं वाहे अश्रुनीर || म्हणे राजा काय असे उदार || निजसर्वस्व दीधलें सेवकां || ८ || आंता यासी कायसे करणें || दैवगती उल्लंघवें कवणें || ऐसें बोलोनि खिन्न मनें || बैसले मौनेंची श्रीगुरू || ९ || श्रीगुरूचे वचनार्थ गौरव || न विचारता तो दुर्दैव || स्वामीसी

शि व चि द म्ब र

१. वाणी.

वंदोनि नरदेव ।। निघाला स्कंदपर्वतासी[1] ।। ११० ।। इकडे सर्वांसी सांगे श्रीगुरू ।। कालगतीसी नसे प्रतिकारू ।। अब्रम्हण्यसमय आला निर्धारू ।। यापुढती भूवरीं ।। ११ ।। यानंतर द्विज अनाथ जाहले ।। ब्रम्हणाभिमानी कोणी न उरले ।। शंकरेंचि पाहिजे सांभाळिलें ।। ब्राम्हणाभिमान यापुढें ।। १२ ।। परधर्मी ताम्रमुखांनीं ।। राज्य करिता असतां अवनी ।। पापभरे पीडित होवोनि ।। शरण जाईल शंकरासी ।। १३ ।। भूमीचें आक्रंद ऐकोन ।। गो–विप्र–श्रुतीरक्षणाकारण ।। मागुती अवतार तो घेवोन ।। धर्म स्थापील निश्चयें ।। १४ ।। आपण तावत्कालपर्यंत ।। दूर्जनें पीडितांही बहुत ।। स्वधर्म आचरोनि भावे सतत ।। भजन चालवा शिवाचें ।। १५ ।। कष्ट काळ असतांही जो भावें ।। शिवासि भजी सुखभावें ।। त्याचा योगक्षेम सदाशिवें ।। चालविणें निश्चयें ।। १६ ।। यापरी सर्वांसी बोध ।। सांगोनी बोळवी आनंदकंद ।। तेही स्मरोनी भावी समय अगाध ।। शंकरपद स्तवूं लागले ।। १७ ।। करुणासिंधो महादेवा ।। त्राहि त्राहि बापा भूदेवा ।। धर्मपंथ सांभाळी देवदेवा ।। अनन्यगतिक भूवरीं ।। १८ ।। ऐसें प्रार्थित शिवासी ।। भूसुर गेले स्वस्थानासी ।। सांगे चिदम्बरकिंकर सर्वांसी ।। चित्तीं गुरूसी आठवा सुखार्थ ।। १९ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्‌गुरुनाथ ।। यास्तव ऐका श्रोते समस्त ।। द्विचत्वारिंशोऽध्याय स्वादुतर हा ।। १२० ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे यज्ञवैभवखण्डे बाजीरावकृतसद्‌गुरुशक्तिपरीक्षणं तेन च सद्‌गुरुदत्तप्रसादत्यागो नाम द्विचत्वारिंशोऽध्याय: ।। ४२ ।। ओवीसंख्या १२०।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

........................

१. सह्याद्रीस.

# चतुर्भुजाख्यानम्




पाक केला क्षण न लागतां । द्विजेंद्राने त्या स्थळीं : तुझा संकल्प सिद्ध झाला । ऊठ सत्वर भोजनाला ।

चिदम्बरचरित्र म्हणोनि राव भोजनार्थ बैसला । साशंक चित्त जेवताही अध्याय त्रेचाळिसावा

शि
व
चि
द
म्ब
र

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। जो सूक्ष्मस्थानीं जरी हृदयीं ।। ध्यातां शिव सर्वव्यापक पाहिं ।। प्रसन्न होतो त्या चिदम्बरपायीं ।। चित्त ठेवूनी चरित्र ऐका ।। १ ।। होता सप्त गोदावरीतीरीं ।। भूमिपालक एक सदाचारी ।। नाम त्यांचे अवधारी ।। चतुर्भुज ऐसें ।। २ ।। नित्य शिवासि ध्यात अंतरीं ।। धर्म करीतसे नानापरी ।। ऐसें वर्ततां एके अवसरीं ।। आलें वैरिसैन्य युध्दासी ।। ३ ।। त्यासवें राजा युध्द करित ।। दैवयोगें जाहला पराजित ।। शस्त्रप्रहारें होवोनि पीडित ।। दीक्षितासि चित्तांत आठवी ।। ४ ।। म्हणे यासमयीं मजसी ।। चिदम्बरा दयाराशी ।। प्राण वाचवोनि जरी पाळिसी ।। चरणदर्शनासी येतों सत्य ।। ५ ।। ऐसें श्रीगुरूचें स्मरण ।। करूनि नवस करितां क्षण ।। शेष सैन्यासि आवेश चढून ।। युध्द दारुण आरंभिलें ।। ६ ।। क्षणामाजीं शत्रुसैन्य ।। पराभवूनि पावला जय ।। आनंदभेरी वाजवित मग राय ।। निजसैन्यें प्रवेशिला नगरीं ।। ७ ।। मग सुखें राज्य करीत ।। श्रीमदें होवोनि उन्मत्त ।। विसरला पाय झाला भ्रांत ।। प्राणरक्षक श्रीगुरूचें ।। ८ ।। ऐसें वर्तता क्वचित्काळ ।। मागुती आले वैरीदळ ।। युध्दी जर्जर होवोनि नृपाळ ।। पडला भूतळीं शस्त्रघातें ।। ९ ।। त्यासामयीं चिदम्बरासी ।। नृप आठवोनि मानसीं ।। मागुती धांवा करी बहुवसी ।। अपराधासी क्षमा मागत ।। १० ।। स्मरद्‌भयविध्वंसक ।। चित्तीं स्मरतांक्षणीं गुरुनायक ।। नृपाचें दूर करोनि दुःख ।। दीधला हरिख[1] विजयनिमित्तें ।। ११ ।। त्याच दिवसीं नृपस्वप्नीं ।। आला महाराज दीक्षितमणी ।। नृपासि बोले कोमल वचनीं ।। प्राणरक्षकांस विसरलासि ।। १२ ।। ज्याचिया कृपें तू सुटलासी ।। मृत्युमुखांतून परियेसी ।। त्या शिवासी विसरलासी ।। राज्यमदें करूनियां ।। १३ ।। राज्यादि सुख भोगित असतां ।। मूढ पावतो उन्मत्तता ।। न जांई नृपा त्यापंथा ।। सत्वर जाइ शिवदर्शन ।। १४ ।। यापरी स्वप्नीं नृपासी सांगोन ।। चिदंबर पावला अंतर्धान ।। तंव राव प्रबुध्द होवून ।। स्वप्नार्थ स्मरोनि विस्मित चित्तें ।। १५ ।। म्हणे सद्‌गुरु असे दयानिधी ।। जाणीतलें मीच असे अपराधी ।। न विचारितां

शि
व
चि
द
म्ब
र

१. संतोष.

शिवचिदम्बर

माझी कुबुध्दी ।। अनुग्रह करूं इच्छित ।। १६ ।। मी दुर्दैवी दुराचारी ।। गुरूस विसरोन पडलों संसारीं ।। तथापि मजला ये अवसरीं ।। बोधिले स्वप्नामाजीं ।। १७ ।। मायामय असे संसार ।। कोणासी लागेल याचा पार ।। स्वामीनें मजवरी उपकार ।। केला ये अवसरीं निश्चय ।। १८ ।। यापरी म्हणत भूमिपाळ ।। पुरोहितासि बोलावूनि तत्काळ ।। पुत्रासि पट्टाभिषेक सोज्वळ ।। करिता जाहला हृष्ट चित्तें ।। १९ ।। मग सवें चतुरंग सैन्यासी ।। मंत्री पुरोहित दासदासी ।। स्वजन आप्तइष्टमित्रांसि ।। घेवून करित प्रस्थान ।। २० ।। सर्वांस वर्तला आनंद ।। म्हणती पांहू श्रीगुरूचें पद ।। दर्शनमात्रें छेदूं संसारबंध ।। पापूं स्वानंद श्रीगुरुकृपें ।। २१ ।। चिदंबराचें दर्शन घेवूं ।। त्याचे पदीं मस्तक ठेवूं ।। हृद्‌गत निवेदोनि पावूं ।। कृतकृत्यता या संसारीं ।। २२ ।। यापरी आनंद गाढे ।। जन चालिले असतां पुढें ।। राजा लक्ष लावोनि स्वामीकडे ।। संकल्प करी दुर्धर ।। २३ ।। ज्याचिया कृपें वांचलों ।। युध्दरंगी विजय पावलों ।। त्या दयानिधीसि विसरलों ।। राज्यमदें मूढ मी ।। २४ ।। आतां श्रीचिदम्बरदर्शन ।। जंव नोहे तोंवरी न घेई अन्न ।। ऐसा संकल्प करूनि दारुण ।। उपवासें मार्ग चाली ।। २५ ।। एक योजन चालोनि वाट ।। संध्यासमय येतां निकट ।। शिबिर बांधिती राजभाट ।। वास करीं तो त्या ठायीं ।। २६ ।। नृपशिबिरा सभोंवतीं ।। नग्न शस्त्रधारी पाहरे करती ।। आंत बैसोनि राव चित्तीं ।। चिदंबरमूर्ती ध्यातसे ।। २७ ।। विसरोनि क्षुधातृषाभान ।। सप्रेमें करी चिदंबरभजन ।। इकडे राजनिर्बंध ओळखोन ।। जाहला सुप्रसन्न चिदंबर ।। २८ ।। भक्तवत्सल कृपावत्सल कृपामूर्ती ।। सर्व सामग्री घेवोनि हस्तीं ।। जेंवि निशांतीं उगवे गभस्ती[1] ।। तेंवि नृपापुढे उभा ठेला ।। २९ ।। रायासि आशीर्वाद बोलोनी ।। म्हणे विप्र मी आलों क्षुधित होवोनी ।। मला भोजन घालिसी म्हणोनी ।। तवसन्निधीं पातलों ।। ३० ।। जरी किंचित देशी स्थळ येथें ।। तरी सत्वर करोनि पाकातें ।। भोजन सारून स्वस्थ चित्तें ।। यथासुखें जाईन ।। ३१ ।। राव अवलोकोनि सुंदर मूर्ती ।।

शिवचिदम्बर

१. सूर्य.

शिवचिदम्बर

विस्मित जाहला निज चित्तीं ।। उठोनि पायीं सत्वर गती ।। करी प्रणती[1] द्विजेंद्रातें ।। ३२ ।। विप्रवचनार्थ न विचारितां ।। तथास्तु ऐसें बोलतां ।। पाक केला क्षण न लागतां ।। द्विजेंद्राने त्या स्थळीं ।। ३३ ।। मग दोन पात्रें वाढोनि ।। भोजनार्थ नृपालागोनी ।। पाचारितां राव तत्क्षणीं ।। हस्त जोडोनि विनवित ।। ३४ ।। संकल्प असे माझा एक ।। न पाहतां चिदंबरपादुक ।। न घे मी अन्नोदक ।। आपण सुखे जेवावें ।। ३५ ।। तंव नृपासि बोले द्विजेंद्र ।। सर्वात्मा असे श्रीचिदम्बर ।। त्यावीण नसे स्थळ अणुमात्र ।। तोच असे तुज मजठायीं ।। ३६ ।। तुझ संकल्प सिध्द जाहला ।। ऊठ सत्वर भोजनाला ।। तूं समक्ष चिदंबराला ।। पाहिलेंसी निश्चयें ।। ३७ ।। जरी मूढ भावें आग्रह घेसी ।। तरी न करी मी भोजनासी ।। देवभक्त तूं अससी ।। न खंडी बा ब्राम्हणाशा ।। ३८ ।। यापरी ऐकतां द्विजवचन ।। ब्रम्हक्षोभ घडेल म्हणोन ।। भिवोनि राजा अंतरीं पूर्ण ।। उठे सत्वर भोजनासी ।। ३९ ।। माझा संकल्प गेलिया जरी ।। ब्राम्हण संतोष होतो भारी ।। यापुढें परमार्थ कोणता तरी ।। शिवासि प्रियकर असे ।। ४० ।। ऐसें म्हणोनि भोजनार्थ ।। राव बैसला साशंक चित्त ।। जेवितांही नरनाथ ।। जाहला गुप्त ब्राम्हण तो ।। ४१ ।। राजा मनीं विचार करी ।। कोण आला हा द्विज येथवरी ।। माझा संकल्प नासोनी क्षणांतरीं ।। गेला कोठें न कळे मज ।। ४२ ।। पहारेकरी जागतां इतुके ।। अन्य आंत कोण येवूं शके ।। माझा प्राणरक्षक कौतुकें ।। आला असेल चिदंबर ।। ४३ ।। जरी होय श्रीचिदंबर ।। पुनरपि भेटेल निर्धार ।। ऐसा मनीं संकल्प थोर ।। केला पूर्ववत ।। ४४ ।। दुसरे दिवशींही चिदंबर ।। मायेनें भुलवोनि नृपांतर ।। त्यासी जेववोनि सत्वर ।। अंतर्धान पावले ।। ४५ ।। चिदंबरचरण धरूं म्हणोनि ।। राजा संकल्प करी प्रतिदिनीं ।। स्वामीही नाना लीला दावोनि ।। पुनः पुनः जेववित ।। ४६ ।। ऐसें नृप वाट चालत ।। पातला नवलगुंदपुराप्रत ।। चिदंबरेंही इतक्यांत ।। तेथोनि प्रस्थान केलें असे ।। ४७ ।। ग्रामसीमा ओलांडोनी ।। बैसला होता कैलासधनी

शिवचिदम्बर

.........................

१. नमस्कार.

शि
व
चि
द
म्ब
र

।। तंव तेथें राजा येवोनी ।। भावें चरण वंदित ।। ४८ ।। स्वागी पुसे नृपासी ।। चतुर्भुजा कुशल असती ।। भेटलासी बहुत दिवसासि ।। येथें आलासी काय इच्छून ।। ४९ ।। तंव विनवी चतुर्भुज[1] ।। कां बा वचनें गोहविसी मज ।। नित्य पंक्तीभोजनीं सहज ।। दर्शन देत होतासी ।। ५० ।। ऐसें बोलोनि नरदेव ।। स्वामीचरणीं अर्पोनि निज वैभव ।। अंगीकारोनि दास्यभाव ।। राहिला तेथें त्याच दिनीं ।। ५१ ।। मग स्वसैन्यें मार्गीं रक्षित ।। श्रीसवें पातला गुरुपुराप्रत ।। गुरुकृपें साधावया पुरुषार्थ ।। निश्चय केला अंतरीं ।। ५२ ।। मग बोलावोनि स्वजनांसी ।। निज मनोगत सांगे त्यासी ।। हा देह चिदंबरचरणासी ।। समार्पिला येथोनी ।। ५३ ।। मजवरी दया ठेवोन ।। आपण करावें स्वदेशगगन ।। धर्माविरी विश्वास ठेवून ।। सुखें करावा संसार । ५४ ।। नृपवचन परिसोनि ।। गहिवरले सर्व मनीं ।। राजासि करिती विनवणी ।। परोपरी यावया ।। ५५ ।। त्यासि संबोखोनि नानापरी ।। शांतवन करोनि त्या अवसरीं ।। परत पाठवोनि निज पुरीं ।। आपण सेवा करीं वैराग्यें ।। ५६ ।। एके दिवशीं श्रीगुरू ।। परीक्षावया नृपनिर्धारू ।। जवळ बोलावूनि करुणाकरू ।। म्हणे सांगणें एक असे तुजसी ।। ५७ ।। एकादश नर्मदाबाण ।। मजसी पाहिजेती सुलक्षण ।। देसी काय पां आणोन ।। पूजनार्थ भक्तराया ।। ५८ ।। ऐसे ऐकतां श्रीगुरुवचन ।। राजा करी पायीं वंदन ।। आज्ञाप्रमाण बाण घेवोन ।। येतो सत्वर दयाघना ।। ५९ ।। तंव राव जावोनि नर्मदेसी ।। सुंदर बाण एकादशी ।। आणोनि गुरुपुढें प्रेमेंसी ।। ठेवूनि करितसे प्रणाम ।। ६० ।। बाण पाहोनि दीक्षित ।। नृपासि बोले हांसत ।। हे लिंग मजसी नावडत ।। देई बा कोणास तरी ।। ६१ ।। जाई सत्वर घेवोनि लिंग ।। ऐसें बोलतां सर्वांतरंग ।। नृप करोनि विनवी साष्टांग ।। स्वीकारावे लिंग गुरुवर्या ।। ६२ ।। आज्ञा केली म्हणोनी ।। लिंगें आणली कष्ट करोनि ।। इतुकी सेवा मजकडोनि ।। अंगीकारी दयानिधी ।। ६३ ।। तंव म्हणे श्रीचिदम्बर ।। बाण न घे मी निर्धार ।। पाहोनि योग्य द्विजवर ।। त्यासि समर्पोनि कृतार्थ

शि
व
चि
द
म्ब
र

[1] तो राजा.

शि व चि द म्ब र

हो ।। ६४ ।। स्वामीराया गजवरी ।। ऐशी उपेक्षा न करी ।। बाण घेवोनि ये अवसरीं ।। श्रम निवारी या दासाचे ।। ६५ ।। नानापरी गहिंवरत ।। स्वामीसि विनवी नरनाथ ।। आग्रह धरोनि श्रीदीक्षित ।। ने घे म्हणत बैसले ।। ६६ ।। राजा पाहोनि स्वामीनिर्बंध ।। अंतरीं होवोनि सखेद ।। उठोनि वंदी गुरुपद ।। लिंग घेवोनि निघाला ।। ६७ ।। मग गलप्रभेचिये डोहीं ।। लिंगे टाकोनि सर्वही ।। देह सोडूं म्हणोनि पाहीं ।। पाषाण पोटीं बांधित ।। ६८ ।। चिदम्बरा ऐसे उच्चारित ।। उडी घेई नृपनाथ ।। तत्काळ प्रगटूनि श्रीगुरुनाथ ।। काढी बाहेर हात धरोनी ।। ६९ ।। म्हणे श्रीगुरू नृपासी ।। बाण देई सत्वर मजसी ।। अंगीकार करितों परियेसी ।। प्राण सोडसि कां वृथा ।। ७० ।। राव विनवी मागुती ।। चरणीं करोनिया प्रणती ।। देव जरी बाण स्वीकारिती ।। पुनरपि आणोनि देईन ।। ७१ ।। ऐसें बोलोनि भूपती ।। प्रतिज्ञा करी स्वामीपुढती ।। बाण देई पुढें समर्पोनि गुरुमूर्ती ।। भोजन करीत निश्चयें ।। ७२ ।। यापरी प्रतिज्ञा करोनि ।। राव निघाला तत्क्षणीं ।। योजन एक पथ चालोनि ।। राहिला त्या दिनीं एके ठायीं ।। ७३ ।। त्या दीनीं उपोषण होतां ।। राजा पावला दुर्बलता ।। दुसरे दिवशी वाट चालतां ।। थकोनि राहिला क्रोशद्वयांत ।। ७४ ।। अघोर वनीं बसोनि नृपाळ ।। गुरुस्तवन आरंभी रसाळ ।। तंव मध्यरात्र येतां जवळ ।। निद्रा आली किंचित ।। ७५ ।। तेथें झोप घेतां नृपनाथ ।। स्वप्न पडलें अवचित ।। दीन दयाळ कृपावंत ।। राजासवें बोलता जाहला ।। ७६ ।। अगा सुबुध्दा सोडी निर्बंध ।। येणें होईल प्राणापवाद ।। मज हत्या घडेल अगाध ।। यास्तव भोजन करी बापा ।। ७७ ।। अन्नानें देह वाढतो ।। अन्नरसें नर बलिष्ट होतो ।। अन्नबळें प्राण चालतो ।। जीव जातो अन्नाविणें ।। ७८ ।। ऐसें अन्नत्यागें कर्म कांहीं ।। न चाले निश्चयें जाणापां हृदयीं ।। यास्तव कर्म आरंभिता पाहीं ।। न धरावी जाण फलाशा ।। ७९ ।। काम साधो किंवा न साधो ।। जन निंदो अथवा वंदो ।। समबुध्दीसि न देतां बाधो ।। आचरावें कर्तव्यकर्म ।। ८० ।। कर्तव्यकर्म करितांही

शि व चि द म्ब र

..........................

१. शंकर.

|| परपीडा न करावी पाहीं || न देतां क्लेश आत्म्यासही || करावें कर्म सत्त्वबुध्दी || ८१ || ऐसे आचरितां सत्कर्म || संतुष्ट होतो चंद्रललाम[1] || हे सोडोनि करितां सत्कर्म || न लाधे सुख कोणाही || ८२ || तंव विनवी राव स्वामीसी || जें सांगतां सत्व निश्चयेंसी || पूर्वी ऐसेंच केलिया मजसी || आयास मात्र वृथा झाले || ८३ || कृत कर्म देवासि नावडतां || जिणे कासया पाहिजे वृथा || यास्तव देह त्यागावधी आतां || केलासे गुरुनाथा निर्बंध || ८४ || यापरी ऐकतां नृपवचन || श्रीगुरूचें द्रवलें अंतःकरण || भक्तासि देवूनि आलिंगन || बैसवीत मांडीवरी || ८५ || म्हणे वत्सा निर्बंध सोडी || तुजसाठीं आलों करोनि तांतडी || कवळ घालितों मुख उघडी || लाडू आणिले तुजकरितां || ८६ || यापरी नृपासी संबोखोनि || सुतमुखीं कवळ जेंवी जननी || घाली तैसे प्रेमेंकरोनि || भक्तवदनीं घालित || ८७ || पुण्यशीळ धन्य तो भक्त किंचित || स्वामीहस्ते मुखी ग्रास घेत || तृप्त होवोनि पुरे पुरे म्हणत || विनवितसे स्वामीसी || ८८ || स्वामी म्हणे घेई || नृप म्हणे इच्छा नाहीं || आकंठ पोट भरलें पाही || पुरे करी देवराया || ८९ || तरी उरले ते अर्ध लाडू || नदीमाजीं टाकोनि सोडूं || जळचर ही भक्षोनि उदंडू || तेणें तृप्त होतील || ९० || ऐसे बोलत चिदम्बर || स्वप्नीं गुप्तगती पावला सत्वर || मग प्रबुध्द होवोनि नृपवर || पाहे सर्वत्र दृष्टी घालोनि || ९१ || श्रीगुरूही न दिसे कोठें || जेवल्यापरी तृप्ती वाटे || म्हणे काय हें चरित्र मोठें || मुखीं घास असे अजूनि || ९२ || नदींत अर्ध टाकितों ऐसें || म्हणाले अभिप्राय याचा कायसे || पाहूं म्हणतां पुढें दिसे || पूर्वी ऐसी नर्मदानदी || ९३ || यापरी चिदम्बरलीला || पाहतां नृप विस्मित जाहला || म्हणे मज गुरुनाथ पावला || वांचविले प्राण माझे || ९४ || आनंदभरें स्फुंदत || दयानिधीचे गुण मुखें गात || श्रीगुरुचरित्र आठवित || विसरोनि बैसला देहभान || ९५ || मग प्रातःकाळीं उठोनि || निघाला सुंदर बाण घेवोनि || आनंदें गुरुचरण पाहोनि || वंदोनि लिंग समर्पित || ९६ || रायाची दृढभक्ती पाहोन || श्रीगुरू जाहला सुप्रसन्न || म्हणे येथ राहिलासि काय इच्छोन || माग वर देतों सत्य

।। ९७ ।। तुष्टलों तुझिया भक्तीसी ।। माग जें अभीष्ट मानसीं ।। तें दुर्लभ जरी द्यावया मजसी ।। मागोनि शिवासी देतों सत्य ।। ९८ ।। ऐसें स्वामीचें अभय वचन ।। ऐकतां राजा चरण वंदोन ।। मज देसी तरी वरदान ।। देई एक स्वामीराया ।। ९९ ।। ज्ञानमार्ग सांगे मजप्रत ।। जो असे योगांगे विलसत ।। जेणें भवसमुद्र क्षणांत ।। तरोनि जावूं परपदासी ।। १०० ।। यापरी भक्तविनंती ।। ऐकतां तुष्ट श्रीगुरु चित्तीं ।। भक्तासी नेवोनि एकांतीं ।। ज्ञानोपदेश दीधला ।। १ ।। श्रीगुरुकृपें चतुर्भुज ।। कृतकृत्य जाहला सहज ।। जाणोनि योगज्ञानबीज ।। संसार पैलतीर पावला ।। २ ।। श्रीगुरुआज्ञा घेवोनी ।। स्वच्छंदें प्रवेशिला महावनीं ।। एकांती बैसोनि गुहासदनीं ।। समाधि योग अभ्यासित ।। ३ ।। गोमृगकाकचर्या ।। कधीं कधीं आचरोनिया ।। वशी करित योगक्रिया ।। अजगरचर्या घेत केधवा ।। ४ ।। जडांध बधिर मूकधाटी ।। केधवां दावितसे गोमटी ।। केधवां पंडित परिपाठी ।। दावोनि बोध मांगतसे ।। ५ ।। त्याचिया उपदेशें बहुत जन ।। ज्ञानमार्गी जाहले निपुण ।। कित्येकां लागलें योगज्ञान ।। समाधी साधत निरायासें ।। ६ ।। ज्याचा उपदेश होताक्षणीं ।। तत्काळ निर्विकल्प स्थिती साधोनि ।। राहती श्रीचिदंबरचरणी ।। लीन होवोनि कित्येक ।। ७ ।। श्रीगुरू कृपापात्रभूत ।। त्याचा उपदेश होतां अद्‌भुत ।। कार्य सर्वही साधत ।। वश्य होती सर्व सिध्दी ।। ८ ।। यास्तव श्रोते तुम्ही समस्त ।। भजा भजा श्रीगुरुपदांबुजाप्रत ।। सर्व लोकीं ज्याचे भक्त ।। मान्य होती निश्चयें ।। ९ ।। श्रीचिदंबरचरित्रपाठ ।। करितां जन्मांतरीचे कष्ट ।। आणि इहलोकीचे सर्वारिष्ट ।। नासोनि सुख मिळे अविनाश ।। ११० ।। निजचरित्र श्रवण पठण ।। भावें करितां श्रीगुरुराण ।। त्याचे हृदयीं वसोनि पूर्ण ।। निजज्ञान देतो निश्चयें ।। ११ ।। एकवारही हा यज्ञखंड ।। कानीं पडतां होय दुखंड ।। संसारीं सुख मिळे उदंड ।। श्रीचिदंबरकृपें ।। १२ ।। यज्ञ करावया जे असमर्थ ।। त्याहीं ऐकावें हें चरित्र ।। चिदम्बरकृपें त्यासी निश्चित ।। यज्ञफळ मिळतसें ।। १३ ।। आनंदमूर्ती चिदम्बरासी ।। भावें ध्यावूनि मानसीं ।। निरायासें लुटा सुखरत्नराशी ।। म्हणे सर्वांसी चिदंबरकिंकर ।। १४ ।। स्वस्ति




शिवचिदम्बर

श्रीचिदंबरचरित. ।। ऐक़तां तुष्टे सद्‌गुरुनाथ ।। यास्तव ऐका श्रोते समस्त ।। त्रिचत्वारिंशोऽध्याय गोड हा ।। ११५ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे यज्ञवैभवखण्डे चतुर्भुजाख्यानं नाम त्रिचत्वारिंशोऽध्यायः ।। ४३ ।। ओवीसंख्या ११५ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

।। यज्ञवैभवखण्डसमाप्तिः ।।



शिव चिदम्बर

## सन्यासिनें रामेश्वरस्वरूपप्रकटनम्




संपता एकेक आवर्तन । हस्तें करी स्पर्शन । तव दीक्षित न दिसतां जाण । लागत हातासि दिव्यलिंग ॥
आहे कैसे रामलिंग । डोळे भरून पाहूं म्हणे ।

शिवचिदम्बर

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। ॐ नमो श्रीगुरु धर्ममूर्ती ।। पापपुण्यातीत आत्मज्योती ।। निवारोनि माझी अहंकृती ।। देईं सत्यवृत्तीं दयाळा ।। १ ।। श्रीगुरुनाथा कृपावंता ।। श्रीकंठा श्रीसखार्चिता ।। श्रीपत्रपूजिता[1] ।। श्रितक्षेमदाता ।। श्रीशिवानाथा तुज नमो ।। २ ।। श्रीगंगाधरा श्रियाळसखा ।। श्रेयःकारका श्रितमोक्षदायका ।। श्रीवरवल्लभा श्रीमदहारका ।। श्रीप्रदायका तुज नमो ।। ३ ।। नमो लोकमान्य वदान्या[2] ।। नमो अगणितपुण्या वेदवर्ण्या ।। नमो अर्धांगीकृतशैलकन्या ।। अपूर्वलावण्या तुज नमो ।। ४ ।। मुमुक्षुजन निज हृदयीं ।। मोक्षसिध्यर्थ सर्वही ।। तव ध्यानें भवसिंधू पाही ।। तरताती निरायासें ।। ५ ।। द्विज पुसती मुनीश्वरासी ।। श्रीचिदम्बरतेजोराशी ।। करोनि महायागासी ।। स्वकीर्तीनें आच्छादी लोकत्रय ।। ६ ।। महाक्रतु समापलिया[3] मग ।। काय करी गुरुपुरीं सर्वांतरंग ।। ज्या चरित्रवर्णनमात्रें अघौघ[4] ।। होती भस्म क्षण न लागतां ।। ७ ।। पीतां श्रीचिदंबरकथामृत ।। जाहलें आमुचें मन तृप्त ।। तथापि पिपासा नवजात ।। स्वादलोभीं गुंतोनिया ।। ८ ।। श्रोतेंद्रियासि जें अमृत ।। श्रवणें चित्तमल दग्ध होत ।। वैराग्य भक्ती द्यावया समर्थ ।। असे चरित्र चिदंबराचें ।। ९ ।। जें स्वसुखार्थ आर्यजन सेविती ।। जरी होय तेथें अलंमती ।। मग तयांसि सुखप्राप्ती ।। कल्पांतिंही न मिळे ।। १० ।। भवारण्यासि जें हुताशन[5] ।। जें तापशमनार्थ होय घन[6] ।। रोगनाशनीं अमृतरसायन ।। तें चिदंबरचरित्र सांगपां ।। ११ ।। यापरी द्विजेंद्रविनंती ।। ऐकतां मुनीश तुष्टला चित्तीं ।। म्हणे द्विजांसी पूण्यमूर्ती ।। धन्य आपण कलिकाळीं ।। १२ ।। चिदम्बरकथामृत प्यावया ।। जंव इच्छितां द्विजवर्या ।। गेली तुमची मोहमाया ।। आटला भवसिंधू निश्चयें ।। १३ ।। तुमचियायोगें माझे हृदयीं ।। आठवलें श्रीगुरुचरित्र पाही ।। बोलविल्यापरी सद्‌गुरूही ।। माझे हृदयीं प्रगटला ।। १४ ।। गुरुलीलासिंधुमथनार्थ ।। मंदराचलापरी समर्थ ।। तुमची मती असे निश्चित ।। पाहतां तुष्टलों तंव सांगे ।। १५ ।। जें ऐकतां संसारखंती ।। तिळप्राय न उरे अज्ञानभ्रांती ।। उडोनि झळके आत्मज्योती ।।

१. बिल्वपत्रानें पूजिलेला आहे असा. २. उदार. ३. उरकल्यावर. ४. पापसमूह. ५. अग्नि. ६. मेघ.

शिवचिदम्बर

शिव चिदम्बर

ऐशी असे चिदंबरलीला ।। १६ ।। श्रवणकपाट उघडोन ।। द्विजगण बैसले सावधान ।। चिदंबरकथा पीयूषघन[1] ।। वर्षता जाहला मुनीश्वर ।। १७ ।। म्हणे राजद्विजासहित चिदंबर ।। द्रव्य वेंचूनि अपार ।। सोमयाग करोनि थोर ।। आच्छादित दिगंतर स्वयशें ।। १८ ।। मग येवूनि गुरुपुरासी ।। सुखे राहिले असतां यशोराशी ।। गंगा घेवोनि एक संन्यासी ।। रामेश्वरयात्रेसि निघाला ।। १९ ।। मार्गी संन्याशाचे स्वप्नीं ।। विप्ररूपें रामेश प्रगटोनि ।। म्हणे यतीशा निजगुज कानीं ।। ऐक चित्त देवोनि सांगतों ।। २० ।। रामेशअभिषेकार्थ ।। गंगा घेवोनि निघालासि त्वरित ।। तरी मी नसे तेथ ।। वसतों आतां गुरुपुरीं ।। २१ ।। चिदंबरनामें वसतों तेथें ।। त्वां नच जावें सेतुबंधातें ।। येवूनि गुरुनवपुरातें ।। पूजी मातें एकोभावें ।। २२ ।। येविषयीं तुवा शंका ।। न ध्यावी यतिनायका ।। ऐसे बोलोनि गुप्त गती देखा ।। पावला तेंव्हा सेतुनाथ[2] ।। २३ ।। मग यतीश प्रबुध्द होवोनि ।। स्वप्नार्थ विचारोनि अंतःकरणीं ।। निघाला निश्चय करोनि ।। चिदंबरदर्शनार्थ ।। २४ ।। येवोनि गुरुपुरासि यतीश ।। सभेमाजीं पाहतां श्रीगुरूस ।। वंदावें म्हणूनि कावडी भूमीस ।। ठेवितांच उठे दीक्षित लागवेगें ।। २५ ।। आश्रमधर्मासी विरुध्द ।। यती करील वंदन निषिध्द ।। म्हणोनि श्रीदीक्षित सुबुध्द ।। यतिपद वंदितसे आधि ।। २६ ।। यतीचे हात धरोनी ।। नेत स्वामी सभास्थानीं ।। बैसवोनि उत्तमासनीं ।। यथाविधीनें पूजित ।। २७ ।। मग जोडोनि दोन्ही हात ।। यतीस पुसे श्रीदीक्षित ।। जाणे असे कोठपर्यंत ।। येथें आलात कोठोनी ।। २८ ।। तंव बोले यतीश्वर ।। येथूनि नसे गमन अन्यत्र ।। घेवोनि निघालों गंगानीर ।। रामेश अभिषेकार्थ ।। २९ ।। रामेश्वर सेतुबंधी नाही म्हणोनि ।। स्वप्नामधीं स्वये सांगता दयानिधी ।। आलों रामेशदर्शनार्थ ।। ३० ।। रामेश मम विश्वेशा ।। बापा पुरवी माझी आशा ।। तुझिया कृपामात्रें सहसा ।। पावेन शाश्वत पदासी ।। ३१ ।। तंव बोले चिदंबर यतीसी ।। रामेश येथें आहे म्हणसी ।। दावी कोठे तो मजसी ।। दर्शनास मीही येईन ।। ३२ ।। तुमच्यायोगें मज गृहस्थासी

१. अमृतरूपी मेघ. २. रामेश्वर.

शिव चिदम्बर

|| भेट होईल परियेसी || तंव यति बोले श्रीचिदंबरासी || मजसीं वंचोनि कां बोलसी दयाळा || ३३ || तूंचि गिरिजानायक || तुजसीच करावया अभिषेक || आलों येथवरी देख || पुरवी मनोरथ देवराया || ३४ || तंव बोले चिदंबर || दोघी भार्या सहा पुत्र || मनुष्य मी कैसा रामेश्वर || कां वृथा करितां नरस्तुती || ३५ || माध्यान्हसमय जाहला संप्राप्त || भिक्षार्थ यावें हो त्वरित || परी यती बोले दीक्षिताप्रत || निज निर्धार तयेवेळीं || ३६ || आज रामेश्वर अभिषेक || करूनि भिक्षा घेणें देख || तव बोलत सावित्रीप्राणसख || मंदहासे यतीशासी || ३७ || येथोन शत योजन || दूर असे सेतुबंधन || आज कैसा अभिषेक करून || भिक्षा घ्याल यतीश्वरा || ३८ || यती म्हणे माझेसन्निध || असे रामेश सेतुबंध || नररूपें त्यासि मी शुध्द || अभिषेकोनि भिक्षा घेतों || ३९ || पंथीं रामेश स्वप्नीं प्रगटोन || निरोपि तूंचि रामेश म्हणोन || यास्तव तव अभिषेकालागून || गंगातोय आणिलें || ४० || ऐसें बोलोनि यतीश्वर || कावडींतूनि गंगापात्र || काढोनि स्वामीपुढें सत्वर || ठेवी एकोभावें तेधवां || ४१ || चिदंबर पूजोनि गंगेसी || समर्पोनि वस्त्र कुंकुमादिकेसी || हस्त जोडून विनवी यतीसी || न धरा आग्रह अभिषेकास्तव || ४२ || यती न सोडी निज हट्ट || अभिषेक न घे दीक्षितश्रेष्ठ || तेणें यति होवोन परम रुष्ट || आपटोन फोडी गंगापात्र || ४३ || म्हणे माझी पूजा तुझें मना || नये जरी कासया ठेवूं प्राणा || करोनि शेवटचे वंदना || गिरिजारमणा देह सोडतों || ४४ || यापरी वंदोनि संन्यासी || निर्बंधें निघाला देहत्यागासी || हें पाहोनि स्वामी म्हणे मानसीं || धन्य निष्ठा यतीची || ४५ || मग बोलावून यतीसी || प्रेमानंदें बोले तेजोराशी || अभिषेक करूं इच्छिसी || करी वेगें निज सुखार्थ || ४६ || तंव विनवी यतीश्वर || जरी घेसी अभिषेक तर || पुनः काशीस जावोन निर्धार || आणितो सत्वर गंगोसी || ४७ || तंव बोले श्रीचिदंबर || स्नान करोनि यावें सत्वर || आज पुरविती शंकर || तुमचे मनोरथ निश्चयें || ४८ || स्वामीवचन परिसोनि भिक्षुकें || नदींत स्नान करोनिया हरिखें || गृहा येतां श्रीगुरु कौतुकें || होमशाळेंत नेत हात धरोनि




शिवचिदम्बर

|| ४९ || हात सोडोनि सत्वरी || स्वामी बैसले बृहत्पात्रीं[१] || मग बोले भक्तकैवारी || नेत्र झांकोनि करी संकल्प || ५० || पूजा संपलिया यथासांग || नेत्र उघडोनि पाहे मग || ऐसें बोलतां गंगोत्तमांग[२] || नवल वर्तलें परियेसा || ५१ || यतीपुढें द्विधा जाहली धरणी || गंगापात्र निघाले तेथोनि || हें चरित्र पाहतांच अंतःकरणीं || तुष्टला संन्यासी तेधवां || ५२ || एकादशावर्तन || रुद्राभिषेक करीन || ऐसा संकल्प करोन || पूजा आरंभी नेत्र झांकोनी || ५३ || संपता एकएक आवर्तन || हस्तें करी स्पर्शन || तंव दीक्षित न दिसतां जाण || लागत हातासी दिव्य लिंग || ५४ || यती जाहला हर्षपूर्णांतर || म्हणे हाचि असे अपर्णावर[३] || माझें सुकृत होतें थोर || म्हणोन येथवरी पातलों || ५५ || प्रेम भरला चित्तांत || कंठ जाहला सद्‌गदित || नेत्रीं आनंदाश्रू लोटत || अंगी रोमांच उभारिले || ५६ || गर्जोन बोले रुद्रावर्तन || प्रति आवर्तन संपतांक्षण || लिंगशिरीं मस्तक ठेवोन || आलिंगन घेतसे प्रेमभावें || ५७ || दश आवर्तन यापरी || पूर्ण होतांचि चित्तीं विचारी || रुद्रावर्तन अभिषेकां तरी || स्वामी न बैसले येथें || ५८ || दश आवर्तन यथासांग || केलें असता यतीश निस्संग || आहे कैसें रामलिंग || डोळेभर पाहूं म्हणे || ५९ || जंव डोळे उघडोनि पाहत || तंव दिव्य लिंग पुढें देखत || अगाधचरित्र पाहोनि तटस्थ || मुनीशाचें उडालें देहभान || ६० || श्रीरामेश्वर सेतुनाथ || पाहतां यती करी प्रणिपात || आसन सोडोनि आनंदें नाचत || तंव बोलत रामलिंग || ६१ || यतिराया जंव डोळे उघडिले || तंव तुमचें पूजन संपलें || ऐसें बोलोनि गुप्त जाहलें || रामलिंग तत्क्षणीं || ६२ || परी लिंगाठायी चिदम्बर || उभा दिसत यतीसमोर || मग परमानंदें यतीश्वर || स्तोत्र अपार करूं लागत || ६३ || जय जयाजी चिदम्बरा || जगन्निवासा रामेश्वरा || आलों शरण तवांघ्रिशतपत्रा[४] || मज अनाथासी सांभाळी || ६४ || तूं स्वानंदसागरीची प्रेमलहरी || तूं विश्वव्यापक निर्विकारी || तुझे गुण विवरतां भारी || चारी वेद मौनावले || ६५ || जय विश्वपते चिदम्बर

१. मोठ्या भांड्यात. २. शिवचिदंबर. ३. शंकर. ४. तुझें चरणकमलास.

जय रामेश जगन्निवासित ।। तव पादसरोजिनीं हर शरणं यातमव प्रभोऽधुना ।। १ ।। कलिकल्मषदूनमानसान् कृपया त्रातुममून् समागतम् ।। नररूपिणमार्यसेवितं शरणं याहि चिदम्बरं मनः ।। २ ।। मम दुर्जरसंसृतेर्भयं हर कारुण्यनिधे चिदम्बर ।। त्वदनन्यगतेर्गतिप्रद भुवि कैलासपतिर्भवानिह ।। ३ ।। न हि मे गतिरस्ति चान्यथा नरवेषं विरहय्य शंकरम् ।। करुणाकर दीनमागतं शरणं मामव पादयोस्तव ।। ४ ।। यदि मां विजहासि सर्वग त्वदृतेन्यः कतमोऽस्ति रक्षिता ।। जननी जनकस्त्वमेव सत्यं मम देह्याशु करावलम्बनम् ।। ५ ।। निजभक्तजनैरगेन्द्रकन्यया हरिपादाब्जभुवादिभिर्युत ।। जनजन्तुततीः सहन्नसाववविता मे अस्तु गतिः समे प्रभुः ।। ६ ।। इति स्तुवन्तं बहुशो नमन्तं प्रेमाश्रुमन्तं यतिशेखरं तम् ।। आश्वास्य भूयो यतिसद्गतीशो वरान्ददौ तन्मनसीप्सितांश्च ।। ७ ।। येणेपरी स्तोत्र करोनि ।। यति वंदी सद्गुरुचरणीं ।। तंव स्वामी संतुष्ट होवोनी ।। वरद पाणी शिरीं ठेवित ।। ६६ ।। यतीस दीधला ब्रम्होपदेश ।। तेणें होवूनि अज्ञाननाश ।। तत्काळ पावला जीवन्मुक्तीस ।। ऐसा महिमा श्रीगुरुचा ।। ६७ ।। जैसा उगवतां भास्कर ।। सत्वरचि पळे अंधार ।। कीं उगवतांच रोहिणीवर ।। सुटे पाझर चंद्रकांता ।। ६८ ।। तैसा सच्चिदानंद परमेश्वर ।। यतीसि दाखवूनि आत्मदिनकर[१] ।। मग आदरें बोले करुणाकर ।। भिक्षा घ्यावी स्वामी आमुची ।। ६९ ।। भिक्षा करवूनि यतीसी ।। आदरें बोळवी कैलासवासी ।। हा इतिहास ऐकतां सर्वांसी ।। हर्ष मानसीं न समाये ।। ७० ।। रामेशबुध्दीने चिदम्बरासी ।। भजूं लागले प्रेमेंसी ।। जे स्वहित इच्छिती मानसीं ।। तिहीं चिदम्बर सेवावा ।। ७१ ।। हृदयीं चिदम्बर घ्यावा ।। वाचें चिदंबर गावा ।। सप्रेमयुक्त भजावा ।। **चिदम्बर गुरुराज** ।। ७२ ।। चिदम्बर करें पूजावा ।। चिदम्बर चित्तीं स्मरावा ।। भावबळें आळवावा ।। **श्रीचिदम्बर गुरुराज** ।। ७३ ।। हृत्पद्मीं चिदम्बर ध्यातां ।। तेणें तुष्टती सर्व देवता ।। पुरवोनि सकळ मनोरथा ।। **आहोरात्री पाळिती** ।। ७४ ।। आनंदें हस्त करोनि वरती ।। चिदम्बरकिंकर भक्तांप्रती ।। अती आदरें करी

१. अत्माराम.

शिवचिदम्बर

विनंती ॥ सेवा चिदम्बरलीलामृत ॥ ७५ ॥ स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ॥ ऐकतां तुष्टें सद्गुरुनाथ ॥ यास्तव ऐका श्रोते समस्त ॥ चतुश्चत्वारिंशोऽध्याय गोड हा ॥ ७६ ॥ इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे मोक्षवैभवखण्डे संन्यासिने पूजार्थं रामेश्वरस्वरूपप्रगटनं नाम चतुश्चत्वारिंशोऽध्यायः ॥ ४४ ॥ ओवीसंख्या ७६ ॥

॥ श्रीचिदम्बरार्पणमस्तु ॥

## संसारचन्द्रोगनिवारणम्




चिदम्बरा ऐसे म्हणोनि । उडी टाकी दुर्गावरुनि । तव प्रकटला दयाखाणी । राजरक्षणीं चिदम्बर ॥
खाली मंचक असे विशाल । गादी अंथरलीसे मृदुलः

शि
व
चि
द
म्ब
र

॥ श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ॥ ज्यासि स्मरता दूरस्थही[1] ॥ महामृत्युभयें मुकतो पाही ॥ भाव ठेवूनि त्या चिदंबरपायीं ॥ चरित्र सांगतों परियेसा ॥ १ ॥ श्रोत्यास म्हणे मुनीश्वर ॥ श्रवणमात्रें चिदंबरचरित्र ॥ देहात्मबुध्दी करोनि दूर ॥ देत सत्वर निंजानंद ॥ २ ॥ काश्मीरदेशीं एक नृपती ॥ परोपरी करी द्विजभक्ती ॥ धर्मकार्यी अति प्रीती ॥ संसारचंद नाम त्याचें ॥ ३ ॥ दातृत्वें होता प्रख्यात ॥ ज्याची ऐकोनि कीर्ती विख्यात ॥ द्विजगण येती याचनार्थ ॥ त्यासी देत द्रव्य बहु ॥ ४ ॥ त्यांत जे चिदंबरचरित्र ॥ सांगती त्यास वस्त्रपात्र ॥ आदि करोनि द्रव्य अपार ॥ प्रेमभावें देतसे ॥ ५ ॥ बहुतांचे मुखें चिदंबरकथा ॥ ऐकतां राव जाहला ज्ञाता ॥ चिदंबरभजनें काळ क्रमितां ॥ धर्म आचरी शास्त्रोक्त ॥ ६ ॥ ऐसें असतां क्वचित्काळ ॥ प्राक्कर्मयोग होतां सबळ ॥ तेणें नृपदेहीं झाला प्रबळ ॥ असह्य रोग राजयक्ष्मा ॥ ७ ॥ तेणें जाहला अत्यंत पीडित ॥ वैद्य आणिले नाना देशस्थ ॥ औषधोपाय करी बहुत ॥ परी रोग शांत न होय ॥ ८ ॥ ज्योतिषी सांगती प्रश्न ॥ करविती ग्रहहवन ॥ मांत्रिक करती यंत्रबंधन ॥ समाधान तरी नोहे ॥ ९ ॥ जप होम सुरार्चन ॥ नानापरी करितांही जाण ॥ न होतां रोगशमन ॥ होय प्रतिदिन वृध्दिंगत ॥ १० ॥ अंगशक्ती क्षीण जाहली ॥ रांत्रदिन राव तळमळी ॥ म्हणे उचित या वेळीं ॥ प्राण सोडूं सुखार्थ ॥ ११ ॥ यापरी निश्चय करोनि मनीं ॥ जाहली असतां मध्य रजनी ॥ चहूंकडे स्तब्धता पाहोनि ॥ संसारचंद ऊठिला ॥ १२ ॥ एकटा चालत मंदमंद ॥ बुरुजावरी चढला स्वच्छंद ॥ शोकें दाटलें चित्त अमंद ॥ बैसोनि आरंभी रोदन ॥ १३ ॥ जन्मादारभ्य संचित ॥ निजकर्म चित्तीं आठवित ॥ बैसला दीर्घ शोकें स्फुंदत ॥ होवूनि आतुर प्राणभयें ॥ १४ ॥ उपजल्यापासोन आजपर्यंत ॥ जें स्मरणमात्रें पाप जाळित ॥ शिवपदांबुज नाठविलें चित्त ॥ केला व्यर्थ आयुर्व्यय ॥ १५ ॥ अथवा स्वर्ग सुखदायक ॥ नाचरिले क्रतुनायक[2] ॥ आतां माझे महादुःखहारक ॥ या समयीं कोण भेटेल ॥ १६ ॥ स्त्रीधन आप्तसुतादिक

शि
व
चि
द
म्ब
र

१. दूर असणारा. २. श्रेष्ठयज्ञ.

शि व चि द म्ब र

॥ इतुकेंचि संसारीं परम सुख ॥ ऐसें मानोनि नाना यत्न देख ॥ यांचे हितार्थ आचरिले ॥ १७ ॥ परी ते सर्व वायां गेले ॥ त्यांनीं मजसी काय सुख दीधलें ॥ आतां प्राणसंकट येतां बळें ॥ तारक मिळे कोण मला ॥ १८ ॥ सत्कर्महीं न संपादिलें ॥ वेदांतशास्त्र न ऐकिलें ॥ अथवा गुरुपादसेवाबळें ॥ न खंडिलें देहबंधन ॥ १९ ॥ नाहीं केल्या तीर्थयात्रा ॥ द्रव्य न वेंचिलें सत्पात्रा ॥ आतां कोण होईल मजसी त्राता ॥ महारोग पीडितासी ॥ २० ॥ ज्या देहपोषणीं होवोनि प्रसक्त ॥ कृपण मी कुमती जाहलों उन्मत्त ॥ सत्पुरुषबोधीं न देतां चित्त ॥ विषयलोभास्तव यत्न केले ॥ २१ ॥ आतां रोगधनंजयामाजी[१] ॥ पोळत असतां काया[२] माझी ॥ कोण मजसी कृपाराजी ॥ तारक दयाळू मिळेल ॥ २२ ॥ यापरी निजकर्म आठवित ॥ राव निरुपायें होऊन अस्वस्थ ॥ काय करूं कोठें जावूं म्हणत ॥ दुखे रड़त बैसला ॥ २३ ॥ भूदेवमुखे[३] श्रुतगण इतुक्यांत ॥ चित्तीं आठवला श्रीदीक्षित ॥ मग क्षणमात्र होउनि स्वस्थ ॥ एकोभावें आठवी ॥ २४ ॥ मग पूजोनि मानसीं ॥ राव प्रार्थी करुणानिधीसी ॥ अगा दयाळा ज्ञानराशी ॥ स्मरलासी माझे सुदैवें ॥ २५ ॥ तप यज्ञ जप ध्यान दान ॥ बहुत करितांही होमहवन ॥ न भेटे तो दीनदयाघन ॥ नाना उपाय करितांही ॥ २६ ॥ तोही आपण दीनरक्षणासाठीं ॥ दया फार उपजतां पोटीं ॥ मनुष्यत्वें अवतरलासी भूपृष्ठीं ॥ मी त्या तुजसी न भेटलों ॥ २७ ॥ अगा दीननाथा सांबा शंकरा ॥ मृत्युंजया श्रीचिदम्बरा ॥ भवसिंधूत बुडोन दातारा ॥ नोळखिला तव प्रभाव ॥ २८ ॥ दयाळा मी होउनि मदांध ॥ तुझी कीर्तीही ऐकतां अगाध ॥ न सेवी तव पदांबुजद्वन्द्व ॥ निजानंददानी जे समर्थ ॥ २९ ॥ भूवरीं महाराज मोक्षदानी ॥ आले असतां अवतरोनी ॥ राज्यमदें शरण तव चरणीं ॥ आलों नाहीं मी पतित ॥ ३० ॥ श्रीचिदंबरा ज्या देहावरी ॥ प्रभुत्व मानोनि अंतरीं ॥ सुगंध जल वस्त्रभूषणें भारी ॥ लेत होतों मोहममत्वें ॥ ३१ ॥ तो हा देह आतां मजसी ॥ दुःख देतसे बहुवसी ॥ तुजविण जाहलों

१. रोगाग्नींत. २. शरीर. ३. ब्राम्हणांच्या मुखानें.

शि व चि द म्ब र

मी परदेशी ।। अनन्यगतिक या समयीं ।। ३२ ।। तुच्छदेहावरी प्रभुत्व ।। जो मानी मूढ मानव ।। तोचि संसारीं दुःस्वभाव ।। नरपशू नांव त्याचें ।। ३३ ।। व्यथा फक्त माझ्यासारखी ।। त्यासी मिळेल दुर्गती शेखीं[१] ।। ऐसिया पतितासी परलोकीं ।। श्रीचिदंबरा सांभाळी ।। ३४ ।। देहाभिमानयोगें महादुःख ।। न सोसतां चढलों दुर्गमस्तक ।। येथोनि उडी घेवूनि देख ।। देह सोडूं इच्छितों ।। ३५ ।। अगा दयासागरा चिदंबरा ।। फार संकटीं पडलों दातारा ।। न दिसे मज दोहींकडे थारा ।। दीनकैवारिया धांव आतां ।। ३६ ।। आत्मघातभयें परलोकीं ।। यमयातनीं कैसा होय सुखी ।। असह्य रोग असतां इहलोकीं ।। सदा दुःख दीननाथा ।। ३७ ।। इकडे पाहतां विहीर ।। तिकडे दिसे तलाव घोर ।। मध्ये सांपडलों मी पामर ।। तारी मजला चिदंबरा ।। ३८ ।। माझें होतें पाप अघोर ।। म्हणोनि पडला तुझा विसर ।। मागें वाघ पुढें अजगर ।। दयासागरा तारी मजला ।। ३९ ।। दोहींकडोनि काष्ठासी ।। पेटला असतां आश्रयासि ।। मध्यस्थ जेंवि कृमीराशी ।। चरफडी तैसा जाहलों ।। ४० ।। पुढें धनुर्धर व्याध ।। मागें धांवत वृकवृंद[२] ।। मध्यस्थ हरिणावरी आपद ।। आले तैसेचि मज या वेळा ।। ४१ ।। श्रीमच्चिदंबरा परलोकबंधू ।। वेदांतवेद्या करुणासिंधू ।। शरण आलों तव पदारविंदू ।। परलोकभयें दयाळा ।। ४२ ।। तुझे दिव्यपादद्वन्द्व ।। चित्तीं दृढ धरोनि निर्द्वन्द्व ।। प्राण सोडितों मी स्वच्छंद ।। वेदांतवेद्या तारि मजला ।। ४३ ।। मुमूर्षूसि[३] द्यावया सद्गती ।। जो समर्थ कैलासपती ।। स्मरणमात्रें जो निवारी भीती ।। त्या शिवासी असो नमस्कार ।। ४४ ।। ऐसें चिदम्बरपदकमळ ।। कायावाचामनें केवळ ।। प्रेमें आठवोनि नृपाळ ।। नमन केलें साष्टांगें ।। ४५ ।। चिदम्बरा ऐसें उच्चारोनि ।। उडी टाकी दुर्गावरूनी ।। तंव प्रगटला दयाखाणी ।। राजरक्षणीं चिदम्बर ।। ४६ ।। वीज चमकतां जैसी कांती ।। नामासवें तैसा शिवापती ।। प्रगट होवूनि चित्रकृती ।। दुर्गाखालीं दावित ।। ४७ ।। खालीं मंचक असे विशाल ।। त्यावरी गादी अंथरलीसे मृदुल ।। चहूं कोनीं दीप सोज्वळ ।। लाविले

१. शेवटीं. २. लांडग्यांचा तांडा. ३. मरणाची इच्छा करणाऱ्याला (मरण्यास टेकलेल्यास).




शिवचिदम्बर

असती ।। ४८ ।। दुर्गावरोनि जंव नृपती ।। उडी घाली तंव खालती ।। पडला मवाळ गादीवरती ।। स्वामींनीं हातीं धरियलें ।। ४९ ।। मग नृपासि शय्येवरी ।। सावध करोनि भक्तकैवारी ।। बैसवूनि म्हणे मध्यरात्रीं ।। कोण तूं प्राण देवूं इच्छिसी ।। ५० ।। भयंकर असतां आत्मघात ।। कां अंगीकारसी सुखार्थ ।। प्राण देवोनि अपयशमात ।। कोणा देवूं इच्छिसी ।। ५१ ।। ऐसी नृपासि तर्जना[१] करित ।। बोलत असतां श्रीगुरुनाथ ।। राजा मनीं होवूनि विस्मित ।। नेत्र उघडोनि पाहतसे ।। ५२ ।। जैसें उगवतां सूर्यमंडळ ।। प्रकाश फांके सोज्वळ ।। तैसा तेजस्वी भक्तवत्सल ।। पुढे उभा देखिला ।। ५३ ।। करुणार्णव श्रीचिदम्बर ।। भस्मरुद्राक्ष अलंकार ।। लेवूनि शोभतसे कर्पूरगौर ।। भक्त तारावया पातला ।। ५४ ।। सुशोभित शुभ्रवस्त्रयुग्म ।। अमृतकलश हातीं उत्तम ।। सुमंदहास मेघश्याम ।। आनंदधाम पुढें चमके ।। ५५ ।। राजा करी चित्तीं वितर्क ।। काय जाहलें हें कौतुक ।। कां असेल रमानायक ।। कीं उमासख आलासे ।। ५६ ।। मी न सोसतां रोग दारूण ।। सुखार्थ देत होतों प्राण ।। हा कोणयेथवरी येवून ।। माझे प्राण वांचवी ।। ५७ ।। चिदम्बर नाम गर्जोनि ।। उडी घेतली दुर्गावरूनी ।। यास्तव आला असेल धांवोनी ।। दयानिधी श्रीचिदम्बरा ।। ५८ ।। कां असेल याज्ञवल्क्य ।। अथवा वामदेव दत्तात्रेय ।। परोपकारार्थ सदय हृदय ।। सर्वांठायीं संचरती ।। ५९ ।। असतां मध्यरात्रसमय[२] ।। हें स्थान असे निर्जनप्राय ।। येथें याचें कार्य काय ।। राहावया वैभव घेवूनि ।। ६० ।। यास्तव माझे प्राणरक्षणार्थ ।। दयाळू श्रीचिदम्बरदीक्षित ।। या दुर्गम स्थानीं आले निश्चित ।। नातरी येथें कोण राहूं शके ।। ६१ ।। ऐसें विचारिता चित्तांत ।। प्रेमआसवें नेत्रभरित ।। स्वामीपायीं प्रेमळ भक्त ।। करी दंडवत आनंदें ।। ६२ ।। तंव कृपार्द्रचित्त चिदम्बर ।। शिरीं ठेवोनि अभय कर ।। नृपासि उठवोनि सत्वर ।। प्रेमालिंगन देतसे ।। ६३ ।। मग राव सावध होवोनि ।। वस्त्रें दोन्ही नयन पुसोनि ।। आदरें दोन्ही हस्त जोडूनि ।। मृदुवाणी बोलत ।। ६४ ।। येथील प्रजापालक

१. दटावणी. २. मध्यरात्रीच्या वेळीं.

।। राजा मी संसारचंद नामक ।। न सोसतां यक्ष्मरोगदुःख ।। प्राणत्यागार्थ उडी घेतली ।। ६५ ।। निर्जन ठायीं निशीथसमयी[२] ।। दयानिधी मज अनाथाविषयीं ।। प्राणारक्षणार्थ धांवलासि पाही ।। आपण कोण नाम कायसे ।। ६६ ।। येथ कासया केली वस्ती ।। कोणी न दिसती सोबती ।। कृपा करोनि मजवरती ।। ओळख निश्चयें सांगा तुमची ।। ६७ ।। ऐसें विनवितां नृपाळ ।। बोलतसे भक्तकनुवाळ ।। मजसी म्हणती जन सकळ ।। चिदम्बर नाम ऐसें ।। ६८ ।। मी दक्षिण देशस्थ ब्राम्हण ।। तीर्थयात्रार्थ माझें आगमन ।। राहिलों येथें एकांत पाहोन ।। शंकरें तुझे प्राण वांचविले ।। ६९ ।। ऐसें बोलत श्रीदीक्षित ।। मागुती पुसे नरनाथ ।। एकटे येतां तीर्थयात्रार्थ ।। मंचकादि वैभव कैसेनी ।। ७० ।। तंव हांसत बोले श्रीदीक्षितेंद्र ।। मंचकादिकांचा अभ्यास थोर ।। बाल्यापासोनि असे निर्धार ।। त्यांविण निद्रा न ये मजसी ।। ७१ ।। प्राण त्यजसी कवण्या कारणें ।। तें सांगपां मजकारणें ।। संतुष्ट होवोनि स्वामीप्रश्नें ।। नृप बोले तेधवां ।। ७२ ।। यक्ष्मरोगे पिडिलो भारी ।। कष्ट न सोसितां ये अवसरीं ।। प्राणत्यागार्थ मी तरी ।। उडी घेतली दयाळा ।। ७३ ।। तंव पुसे भक्तासि कनुवाळ ।। रोग कैसा असे तुझा सबळ ।। सांग मजसी उपाय प्रबळ ।। आरोग्यार्थ करितों मी ।। ७४ ।। तंव राजा पाहे स्वदेहाकडे ।। रोगचिन्हही न दिसे थोडें ।। सुवर्णापरी चहूंकडे ।। अंगकांती फांकतसे ।। ७५ ।। सर्वांगीं शक्ती भरली सदृढ ।। ऐसें चरित्र पाहतां प्रौढ ।। श्रीगुरुपदीं मिठी घालोनि गाढ ।। स्तोत्र करी नानापरी ।। ७६ ।। जय षड्गुणैश्वर्या निरुपमा ।। षड्गुणातीता आनंदधामा ।। षट्चक्रसंचारक[१] ज्ञानात्मा ।। षडाननजनका तुज नमो ।। ७७ ।। तूं भवसागरप्राशक अगस्ती ।। अज्ञानतमनाशक गभस्ती[२] ।। सर्व ब्रम्हांडी करोनि वस्ती ।। न पडसी दृष्टीं शोधितां ।। ७८ ।। येणेंपरी स्तवन करूनि ।। मग विनवी हात जोडोनी ।। गृहां येईं दयाखाणी ।। म्हणोनि देवासी पाचारित ।। ७९ ।। नृपाळ जातसे पुढें ।। मार्गे पाहत स्वामींकडे ।। चिदंबरही धड पुढें ।। नृपामागें चालत ।। ८० ।। यापरी महाद्वारापर्यंत

१. मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत विशुध्द आणि आज्ञाचक. २. सूर्य.




शिव चिदम्बर

शिवचिदम्बर

|| नृपामागून आले श्रीदीक्षित || राव पाय ठेवतां उंबऱ्यांत || गुप्त जहाले श्रीगुरू || ८१ || राजा फिरोन पाहे तंव || मागे न दिसे दीक्षितराव || राजा पावोनि विव्हल भाव || विसंज्ञ पडला भूवरीं || ८२ || मुहूर्तांतीं सावध होवोनी || स्वामी गुप्त जाहला ज्या अवनीं || त्या ठाया वंदन करूनी || चिदम्बरध्यानीं बैसला || ८३ || मग भूपती उठोनि प्रातःकाळीं || बैसता निज सिंहासनास्थळीं || नृपासि पाहोनि त्या वेळीं || विस्मित जाहले सभासद || ८४ || तेधवां सर्व वृत्तांत || नृप सांगे सभासदांप्रत || सर्वही आनंदें डोलत || श्रीदीक्षितासि वंदिती || ८५ || म्हणती प्रत्यक्ष शंकर || चिदंबरनामें अवतार || घेउनि आलासे निर्धार || जगदुध्दार करावया || ८६ || सर्वही चित्तीं धरोनि विश्वास || चिदम्बरनामें जयघोष || करूं लागले बहुवस || चित्रचरित्र पाहतां || ८७ || मग तो स्वामीसि नृपाळ || द्रव्यालंकार पीतांबर सोज्वळ || देवोनि प्रधानासि तत्काळ || स्वामीकडे पाठवी || ८८ || तोही गुरुपदासि येवोनी || सर्व वस्तु स्वामीचरणीं || प्रेमभावें समर्पोनि || सर्व वृत्तांत निवेदित || ८९ || जन ऐकोनि स्वामीलीला || आनंदें डोलती त्या वेळा || श्रीगुरूही बोळवोनि मंत्र्याला || फलमंत्राक्षता देतसे || ९० || नृपासि देई फल मंत्राक्षता || न करितां संसारचिंता || विश्वास ठेवूनि शिवावरता || सांगपां सुखें राज्य करी || ९१ || धर्मे राज्य पाळावें || प्रेमें शिवभजन करावें || यापरी काल क्रमितां स्वभावें || जन्म सार्थक होय तेणें || ९२ || ऐसा बोध सांगोनी || मंत्र्यासी पाठवी कैलासधनी || तो नृपासि विनवोनी || निवेदित श्रीगुरुबोध || ९३ || ऐकोनि श्रीमुखांचा बोध || नृप पावोनि परमानंद || चित्तीं आठवीत श्रीगुरुपद || राज्यभार सुखें करी || ९४ || श्रीचिदम्बरभजनबळें || इह भोगून विषय सकळ || अंतीं पावला स्वस्थळ || शिवभक्तीवीण दुर्मिळ जें || ९५ || असें चिदम्बरचरित्र || भक्तीनें सेविती पवित्र || होती ते प्रीतिपात्र || श्रीचिदम्बरासी || ९६ || एतदर्थी चिदम्बरकिंकर || श्रोत्यांस विनवी वारंवार || स्वहितार्थ निरंतर || चिदम्बरसेवा चालवा || ९७ || स्वस्ति श्रीचिदम्बरचरित || ऐकतां सद्‌गुरुनाथ || यास्तव ऐका श्रोते समस्त

शिवचिदम्बर

|| पंचचत्त्वारिंशोऽध्याय गोड हा || ९८ || इति श्रीचिदग्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे मोक्षवैभवखण्डे संसारचंदरोगनिवारणं नाम पंचचत्वारिंशोऽध्यायः || ४५ || ओवीसंख्या || ९८ ||

|| श्रीचिदम्बरार्पणमस्तु ||



शि व चि द म्ब र

# विधवासौभाग्यप्रदानम्




तीसि पाहता दीक्षितमौळी । आशीर्वाद बोलत ते वेळी । अष्टपुत्रवती हो बाळी । सौभाग्यवती ऊठ म्हणे ।

अध्याय सेहेचाळिसावा

|| श्रीचिदम्बरमहागुरवे नमः || नमो नमो आदिपुरुषा || भक्तवत्सला चिदम्बरेशा || नमो मायामानुषवेषा || मुक्तिकंठभूषा तुज नमो || १ || चित्पुष्करणीसहस्त्रपत्रा[१] || घनानंदा चिन्मात्रगात्रा || अज्ञानध्वांतप्रचंडमित्रा[२] || चिदंबरा तुज नमो || २ || तूं चिदम्बरीचा[३] मार्तंड || तूं मोहकर्दळीवनींचा वेतंड[४] || स्मरणमात्रें पाप प्रचंड || उडविसी भवतारका || ३ || दीनरक्षका दैन्यहारका || भक्तसख्या सावित्रीनायका || रमानायकाराधितपादुका[५] || भवतारका तुज नमो || ४ || भ्रूमध्याकाशीचिये ठायीं || आनंदविग्रह जो विलसे पाही || भाव ठेवुनी त्याचे पायीं || अवधान हृदयीं साठवा || ५ || मुनीश्वर पाजवी द्विजेंद्रांस || चिदम्बरकथासुधारस || जे सेवितांक्षणीं पुरुष || काळमृत्यूस जिंकितसे || ६ || एके दिनीं श्रीगुरुपट्टणीं || आला राम नामा एक मुनी || अण्णंभट्टाचे सदनीं || वसतीसी तो राहिला || ७ || त्याचे घरीं एकांत स्थान || एक घेवोनी तो ब्राम्हण || राहिला स्वेच्छेंकरून || अनुष्ठान करीत एकचित्तें || ८ || तो ब्राम्हमुहूर्तीं[६] स्नान करूनि || ध्यानस्थ बसे एकांत सदनीं || सार्ध प्रहर होतां रजनी[७] || आसन सोडोनि उठतसे || ९ || ऐसें होतां आठ दिवस || स्नानसमयीं अण्णंभट्ट त्यास || विचारी कासया करिता एकांतवास || आला किमर्थ येथवरी || १० || तंव त्यासी सांगे रामयोगी || आलों चिदम्बरदर्शनालागी || हें वचन ऐकतां अंतरंगीं || भट्ट विस्मय पावला || ११ || मागुती योगिरायासी पुसे || चिदम्बर गांवींच असे || एकांतीं बैसतां कैसें || दर्शन घडेल तुम्हांसी || १२ || ब्राम्हणासी सांगे योगीश || सर्वज्ञ असे श्रीचिदम्बरेश || येथील जाणतो माझा निवास || मजसी भेटतो येथेंच येवोन || १३ || ऐसें बोलोनि योगीराज || नदीस गेला स्नानकाज || इकडे निघाला तो द्विज || चिदम्बरदर्शनार्थ || १४ || भट्टासी पाहतां श्रीगुरुनाथ || बोलतसे मंद हंसत || आपण आहा महदाश्रित || धन्य तुमचा संसार

१. चित्तरूपी तळ्यांतील कमळ. २. अज्ञानरूपी काळोखाचा नाश करणारा सूर्य. ३. चिदाकाशींचा. ४. हत्ती. ५. विष्णू ज्याच्या पादुकांची आराधना करतो असा. ६. पहाटे. ७. रात्र.




शिव चिदम्बर

॥ १५ ॥ तंव पुसे तो विप्र ॥ काय आमुचे धन्यत्व तर ॥ मागुती बोले श्रीचिदम्बर ॥ मधुरवाचेंकरूनी ॥ १६ ॥ योगेश्वराचा वास तुमच्या घरीं ॥ त्याची संगती मिळतां तुजसरी ॥ धन्य कोण सांगपां ये अवसरीं ॥ दुर्मिळ साधुसंगती ॥ १७ ॥ दरिद्रिया घरीं कामधेनू ॥ नातरी येतां क्षीराब्धिसूनु[1] ॥ काय याची धन्यता वानू ॥ त्याप्रमाणें तुझें दैव ॥ १८ ॥ त्यासी सांगा इतुकें ॥ यदर्थ बैसलां आपण सुखें ॥ तें काम साधलें निःशंकें ॥ अनुष्ठान करावें संपूर्ण तें ॥ १९ ॥ अनुष्ठान सांगता व्हावया ॥ ब्राम्हणभोजन करावया ॥ निरोप असें या समया ॥ मग जावें यथासुखें ॥ २० ॥ ऐसें बोलोनि भक्तकैवारी ॥ फळमंत्राक्षता विप्रकरीं ॥ देवोनि म्हणे ते अवसरीं ॥ पोहचवा सत्वरीं योगींद्रांसी ॥ २१ ॥ स्वामीआज्ञा घेवोनि तो भट्ट ॥ सत्वर आला योगीनिकट ॥ गुरुआज्ञा तंव स्पष्ट ॥ सांगोनि देत फळमंत्राक्षता ॥ २२ ॥ ऐकतां तोही योगींद्र ॥ जवळीं एक ताम्रपात्र ॥ संग्रही होतें तें सत्वर ॥ विप्राहातीं देतसे ॥ २३ ॥ येणें द्रव्य येईल जितुकें ॥ तेणें ब्राम्हणासी हरिखें[2] ॥ दध्यन्न वाटोनि सुखें ॥ तोषवी म्हणोनि सांगत ॥ २४ ॥ द्विजाराधन झालियावरी ॥ त्या दिनीं योगीश पारणें करी ॥ निघाला तंव एकांत मंदिरीं ॥ भेटला श्रीगुरु एकाएकी ॥ २५ ॥ तंव तोही सद्भावें चरणीं ॥ साष्टांग प्रणिपात करोनि ॥ उभा राहे बध्दपाणी[3] ॥ तंव दयानिधी बोलत ॥ २६ ॥ वैराग्य घेवोनी[4] प्रखर ॥ तूं आचरसी तप दुष्कर ॥ तें येथूनि आतां पुरें कर ॥ ऐक सत्वर गोष्ट माझी ॥ २७ ॥ मीच असे परब्रम्ह ॥ जग सर्व जडस्तोम ॥ जैसा शिंपींत रौप्यभ्रम ॥ तैसें सर्व मिथ्या असे ॥ २८ ॥ तूंच मी मीच तूं ॥ ऐसें जाणपां निश्चितु ॥ जें जें दिसे वस्तुजातु ॥ तें तें भावी मिथ्याभूत ॥ २९ ॥ मनासह सहा इंद्रियांसी ॥ अगोचर जें तेजोरासी ॥ ते तुझें स्वरूप निश्चयेंसी ॥ ऐसे मानसीं दृढ धरी ॥ ३० ॥ ओष्ठ जिव्हा न हालवितां ॥ क्षणमात्र मौनें बैसतां ॥ कंठी बोलिल्यापरी भासे आयता ॥ भवमूळ तेंचि मन ॥ ३१ ॥ संकल्प वासनात्मक ॥ मनस्वरूप

.........................

१. लक्ष्मी. २. संतोषानें. ३. हात जोडून. ४. बाणवून.




शिव चिदम्बर

शिवचिदम्बर

जाणपां निष्टंक[१] ।। संकल्प वासना स्वरूपीं एक ।। भेद विशेष न दिसे ।। ३२ ।। जें जें विषयीं आदौ[२] स्फुरण ।। त्याचें नाम संकल्प जाण ।। विषयाकडे अभिमुख होवोन ।। जी जाय वृत्ती तीच वासना ।। ३३ ।। संकल्पवासनाविरहित ।। मनरूप नसे यत्किंचित ।। दोन्ही उठतां[३] उद्‌भवत ।। मिथ्याभूत मनोरूप ।। ३४ ।। मनोयोगें संसार ।। मनोयोगें दुःख अपार ।। मनोयोगे देहाहंकार ।। भवभय थोर मनोयोगें ।। ३५ ।। जंव मन आपण जाणूं शक्य ।। असें जें संकल्याचे उत्पत्तीलय ।। तंव कळे आपणां अवश्य ।। संकल्पसाक्षी रूप तुझें ।। ३६ ।। संकल्पसाक्षी जें विलसें ।। तोचि जाणपां शिव ऐसें ।। त्याचीच कूटस्थ नाम असे ।। जो कूटस्थ तोचि तूं ।। ३७ ।। तेथें चित्त करी समाहित[४] ।। जे जे उठत संकल्प सतत ।। ते ते जंव तुज दिसत ।। त्याचा साक्षी तूं आहें ।। ३८ ।। ऐसें साक्षित्व सदा ओळखत ।। उत्पन्न कल्पना पाहे तूं सतत ।। जवं जवं पाहसी कल्पनाप्रत ।। तंव तंव तू वेगळा होसी ।। ३९ ।। साक्षित्वें पाहतां स्वस्वरूप ।। तात्काळ लया पावती संकल्प ।। संकल्प नसता कूटस्थ निष्पाप ।। आपोआप प्रकाशे हृदयीं ।। ४० ।। यापरी साक्षित्वाभ्यास ।। नेमें करितां प्रतिदिवस ।। क्षीणदशा पावे त्याचे मानस ।। अल्प दिवसें जाणपां ।। ४१ ।। अभ्यासें मन होतां क्षीण ।। शुध्दात्मा हृदयीं भासे परिपूर्ण ।। निवांत दीपापरी अकंपमान ।। स्वप्रकाशें असंगत्वें ।। ४२ ।। ऐसा जो आत्मसाक्षात्कार ।। तीचि जाणपां तुर्यावस्था थोर ।। ऐसिया स्वरूपीं पावतां निर्धार ।। तो न पाहे काळमृत्यूसी ।। ४३ ।। हें जें जें दिसें दृश्यमात्र ।। तें नाहीं म्हणोनि करी निर्धार ।। जैसे गगनीं गंधर्वनगर ।। अथवा मृगतृष्णा मरुस्थळीं ।। ४४ ।। जें कांहीं न दिसत ।। यत्नें दवडिल्या न जात ।। तें मनःषष्ठेंद्रियातीत ।। तदाकार तूं होई ।। ४५ ।। जे अस्ति भाति प्रियत्वें ।। भासे सर्वत्र अंतरयामित्वें ।। तें भानमात्र जाणपां सत्यत्वें ।। तेथें नामरूप मायिक ।। ४६ ।। कोणतेंही दृश्य पाहतां ।। तेथें अस्तिभातिप्रियरूपता ।। इतुकेंचि भावितां चित्ता ।। सोडी मायिक नामरूप ।।

शिवचिदम्बर

१. स्पष्ट. २. प्रथम. ३. उत्पन्न होता. ४. स्थिर.

४७ ।। अस्तित्व म्हणजे आहे तें ।। भाति म्हणजे दिसतें ।। प्रिय नांव आवडतें ।। नामत्रयें वस्तू एक ।। ४८ ।। या एकरूपी मायायोगें ।। नामरूपें दृश्य अवघें ।। दिसतीं भिन्नभिन्न सत्याजोगें ।। अज्ञान दशेमाजीं ।। ४९ ।। नामरूपें सोडोनि अवघी ।। अस्तित्वमात्र पाहतां जगीं ।। निजरूप विलसें अंतरंगीं ।। सर्वही मीच ऐसें ।। ५० ।। संकल्पसाक्षित्व अभ्यासितां ।। अंतरंगीं प्रकाशें शुध्दात्मता ।। अभाव भावना करितां ।। बाह्य द्वैत आटे सर्वही ।। ५१ ।। ऐसे अंतर्बाह्य शुध्द होतां ।। गगनापरी निर्मल स्वसत्ता ।। व्यापे तंव निज सर्वात्मता ।। अनुभवासी येतसे ।। ५२ ।। यापरी जाणणें गुरुमुखांतून ।। त्यांसी म्हणती परोक्षज्ञान ।। येणें नासतें सर्व विघ्न ।। पुण्यात्मा होय मानव ।। ५३ ।। मग दृढ वैराग्याभ्यासें ।। मीच पूर्ण ब्रम्ह ऐसें ।। जेव्हां निश्चयज्ञान ठसें ।। त्यासी म्हणती अपरोक्ष ज्ञान ।। ५४ ।। अपरोक्ष ज्ञान बाणतां चित्तीं ।। हातां लाधली जीवन्मुक्ती ।। जीवन्मुक्त तो कैवल्यमूर्ती ।। भगवान्सर्वात्मा पूर्णब्रम्ह ।। ५५ ।। ऐसें बोधागृतवर्षण ।। सांगोनि तेथेंचि गुरुराण ।। एकाएकीं पावले अंतर्धान ।। योगी पूर्ण पद पावतां ।। ५६ ।। तोही ऐकतां चिदम्बरबोध ।। तत्काळ पावला निर्विकल्प पद ।। स्वामीसी वंदोनि सानंद ।। हिंडे स्वच्छंद भूतळीं ।। ५७ ।। त्या दिवसापासोनि ।। रामयोगी म्हणोनि ।। प्रख्यात झाला भुवनीं ।। चिदम्बरभक्तांमाजीं ।। ५८ ।। ज्याचिया उपदेशें समकाळ ।। कित्येक जाहले ब्रम्हज्ञ निर्मळ ।। कित्येक जाहले भक्त प्रेमळ ।। श्रीचिदम्बरचरणीं ।। ५९ ।। यास्तव मोक्षार्थी जन ।। धरा धरा चिदम्बरचरण ।। अनायासें भक्तिज्ञान ।। होय निश्चयें तुम्हासी ।। ६० ।। श्रीचिदम्बरकृपालेश जरी ।। मिळतां तरोनि संसारसागरीं ।। मृत्युंजय पद पावतो निर्धारी ।। म्हणे चिदम्बरकिंकर ।। ६१ ।। तंव मुनीसि पुसे द्विजेंद्र ।। श्रीचरित्र अगाध सुधासागर ।। श्रवणमात्रें धन्य आम्ही थोर ।। जेणें जाहलों कृतकृत्य ।। ६२ ।। पाजोनि चिदम्बरकथामृत ।। आम्हां मुनींद्रा केलें पुनीत ।। कथास्वादलुब्ध आमुचें चित्त ।। जाहलें असे करोनि या समयीं ।। ६३ ।। मार्तंडक्षेत्रासी श्रीगुरु ।। गेल्यावेळीं चरित्र अपारू ।। जाहलें असे श्रुतमात्रू ।। काय ते कृपा करोनि सांगावें ।। ६४ ।। तंव बोले मुनीश्वर

शिवचिदम्बर

|| धन्य आहां आपण निर्धार || प्यावया इच्छितां कथामृतसार || तेणें फार तुष्टलों || ६५ || अगाध असे श्रीगुरुचरित्र || यथामती सांगतों तुम्हांप्रत || आतां करोनि ऐका सावध चित्त || मार्तंडयात्रा श्रीगुरूची || ६६ || कन्यागती आला बृहस्पती || कृष्णायात्रार्थ श्रीगुरुमूर्ती || जावया संकल्प करोनि चित्तीं || सुमुहूर्ती केलें प्रस्थान || ६७ || भक्त ब्राम्हण यात्रिक || आप्त बंधू नागरिक || सवें निघाले बहुत लोक || तीर्थविधी करावया || ६८ || गोवृषभ महिषी पशू || पावले जणू संतोषु || पूर्वपूण्ये प्रसन्न मनसु || की घडे यात्रा स्वामीसवे || ६९ || मार्गी बैसावया नाना यान || भोजनार्थ उत्तमान्न || रात्रीं निवासार्थ शिबिरसदन || कोणासही न्यून नसे || ७० || सर्व बाळांसीं गोपय || वेळोवेळीं समर्पिती स्वामीशिष्य || स्त्रियांसी तैल उष्ण तोय || नाहूं म्हणता सिध्द करिती || ७१ || सर्वही स्वगृहनिवासांपरी || सुखें चालिले ते अवसरीं || प्रवासश्रम तिळभरी || न वाटे कोणासी || ७२ || श्रीस्वामी मार्गी चालत असतां || सेवार्थ सर्वही देवता || प्रगटवित स्वसत्ता || भोवती दाटले || ७३ || वसंत सेवी तये वेळीं || उद्भवोनि सुगंध कुसुमावळी || टवटवित भूरूहावळी[१] || नव पल्लव धरोनिया || ७४ || वाहोनि नाना पुष्प गंध || मलयानिल सेवी मंदमंद || जेणें संतुष्ट होय यात्रिकवृंद || अध्वश्रम[२] निवारणें || ७५ || श्रीचिदम्बरपादस्पर्शे || भूदेवी अंगी रोमहर्षे || वनीं वृक्ष भासती तैसें || फलपल्लव सुमनभरें || ७६ || नातरी षड्ऋतुगण || श्रीचिदम्बरचरण || भावार्थे सेवावया कारण || कीं एकदाचि प्रगटत || ७७ || श्रीगुरूचे प्रवासवेळीं || पादचारियांचे पायातळीं || खडे कंटक न लागतां ते वेळीं || मृदुत्वें सेवित वसुंधरा[३] || ७८ || बाळकें जेथें तृषाकांत || तेथेंचि जळोद्गम दावित || जंव मार्गी क्षुधें आक्रंदित || फळभार वाहोनि येती पुढें || ७९ || स्वामीसवें जे चालती || गुप्तरूप देवती || त्यांचे मनोरथ पुरविती || जें चिंतिती तें देवोनि || ८० || मंदोष्णप्रकाशें चंडकिरण[४] || सेवितसे श्रीचिदम्बरचरण || मेघ सेविती छायेंकरून || तुषार

शिवचिदम्बर

१. वृक्षपंक्ति. २. प्रवासाचा शीण. ३. भूमि. ४. सूर्य.

वर्षत उष्णकाळीं ।। ८१ ।। फळभार घेवोनि शिरीं ।। पुढें येती गुप्त निर्जरी[1] ।। क्षुधें होता त्रास भारी ।। यात्रिकजनांसी ।। ८२ ।। फळ पुष्प छाया समर्पोनि ।। जे जे सेविती श्रीगुरुचरणीं ।। धन्य धन्य त्याची जनीं ।। कुजन्म जरी वृक्षाचें ।। ८३ ।। स्मरणमात्रें पापहारक ।। जो विलसे गिरिजासख ।। त्याची सेवा भवब्धिशोषक ।। म्हणोनि वृंदारक[2] सेविती ।। ८४ ।। यापरी सर्वांकडूनी ।। श्रीचिदम्बरदिनमणी ।। सेवा घेत चालिले अवनीं[3] ।। यात्रिकांस तोषवित ।। ८५ ।। ज्याचें चरणतीर्थ अगाध ।। त्रिलोकीं पावलें पावनपद ।। त्यासीं कायसे यात्रासंबंध ।। लोकोध्दारार्थ दावितसे ।। ८६ ।। यापरी श्रीगुरु मार्ग चालत ।। एक्या गांवीं वस्तीसी राहत ।। प्रभातीं एक यात्रिक विनवित ।। बाळाअंगीं देवीस्फोट दिसती ।। ८७ ।। हें वर्तमान ऐकतां जगदीश ।। विश्वकुटुंबी तेथें करी निवास ।। आरोग्य व्हावया सर्व मुलांस ।। दिन सत्तावीस लागले ।। ८८ ।। तो पर्यंत कामरूप ।। स्वकुटुम्बापरी सर्व यात्रिक ।। सांभाळित नित्य नूतन कौतुक ।। दावित राहिला श्रीगुरू ।। ८९ ।। बापूनामा दीक्षितकुमर ।। बाळत्वींही द्विजसंतर्पणतत्पर ।। हें पाहोनि तुष्टला चिदंम्बर ।। नाम देत वररुची ऐसें ।। ९० ।। त्यासी देतसे अगाध वर ।। तुझिये जिव्हाग्रीं निरंतर ।। ब्रम्हकुमारी[4] राहील निर्धार ।। तुज सांगातीं मी वसतों ।। ९१ ।। या वरसत्तें बापूदीक्षित ।। वाक्सिध्दीनें जगीं जाहले ख्यात ।। इकडे येरे दिवशीं श्रीदीक्षित ।। सहपरिवार निघाले ।। ९२ ।। महदानंदें वाट चालत ।। सद्बोध कथा इतिहास सांगत ।। सर्व यात्रिकांसी आनंदवित ।। गालवक्षेत्रासी[5] पातले ।। ९३ ।। ऐकतां श्रीगुरुचें आगमन ।। दर्शनार्थ आले पौरजन ।। स्वामीपुढें ठेवोनि उपायन[6] ।। करिती नमन साष्टांगें ।। ९४ ।। आदरें गांवीं प्रवेशिती ।। रम्य मंदिरीं करविती वस्ती ।। सर्व यात्रिकांसी दाविती ।। निवासार्थ विशालगृह ।। ९५ ।। मग श्रीगुरुही सपरिवार ।। तीर्थविधीही यथाशास्त्र ।। करोनि नाना पक्वान्नें अपार ।। द्विजसंतर्पण चालवी ।। ९६ ।। सर्वांकडोनि तीर्थश्राध्द ।। करवोनि पूर्णानंदकंद ।। दक्षिणा दान नानाविध ।।

१. देव. २. देव. ३. भूमिवर. ४. सरस्वती. ५. गलगलीस. ६. आहेर.



शिव चिदम्बर

शिवचिदम्बर

|| देवोनि क्षेत्रस्थ तोषविले || ९७ || कृष्णेजवळी उभा राहोनि || भावार्थे जोडोनि उभय पाणी || प्रवर्तले श्रीकृष्णास्तवनीं || श्रीचिदम्बर तेधवां || ९८ || श्रीचिदम्बर उवाच || नमः कृष्णे कृष्णप्रपदजनिते भूष्णुसलिले || क्षमायामायासप्रशमनि समा का तव नदी || नृणां पापं तापं हरसि नयनाध्वन्यपि गता || जगन्मातः स्नातुं यततमव मां पाथसि तव || १ || भवासाराधोरा मयचयहरा भासि सततं || पयः पूराकारा स्मृतजनि हरानन्तसुखदा || सदा जीयान्मायामयजनसमुध्दारणतया || मुदा स्नातं जातं नयसि मनुजानां हरिपदम् || २ || अये मातः कृष्णे तव पयसि यः स्नाति विमले || गहीलोके लोकेश्वरि भवति सत्पुण्यनिलयः || इदं त्वत्तोयेऽस्मिन् वसति महिमेन्द्रादिगरिमा || स मामव्यद्‌भव्याकृतिरिह सुहव्यादविनुतः || ३ || तवाप्यम्भो रम्भाद्यमरवनितारम्भितपयः– सुखक्रीडापीडोद्‌गलितवनितादेहजमलम् || दधन्नैल्यं मातस्तदपि विबुधैः सेव्यमभवत् || सतां संगोत्तुङ्गः क इह न दधत्पावनपदम् || ४ || यदा माता यातावनितलमियं तापशमनी || तदा दूता भीता दिनकरसुताज्ञानरहसः || गता दूरं नीरं श्रुतिपथचरं यस्य न च तम् || विचेतुं नेतुं वै हरिपदजनुर्मामवतु सा || ५ || भवत्याः सत्पाथो वितरतु सुखं मेऽनवरतम् || दिवःस्वामी कामी मुनिवरवधूट्यामपि तदा || मुनेः शापात्तापाकुलितहृदयो यध्दिमजले || सकृत्स्नातः पूतोऽभवदखिलतापादिरहितः || ६ || अये कृष्णे जिष्णौ महिमनि तवाम्ब प्रकटति || तदा साम्बो लम्बोदरजनक आसीन्मुनिवरः || हरिः शेते सिन्धौ विधिरपि तपःकर्मणि पटुः || सुखं देवाः सेवन्त्यनिशमवनौ त्वां प्रवहतीम् || ७ || भवत्तीरे धीरे पयसि तरुकोटान्तरगता || मरुन्नीराहारः कृमिजलचराः सज्जनवराः || यतो मोहं देहं तव पयसि सन्त्यज्य निलयम् || हरेर्यान्ति भ्रान्तिं त्यजत भजतेमां नरवराः || ८ || इति स्तुत्वा नमस्कृत्य स्नातुकामे चिदम्बरे || तत्रैका पूर्वसुभगा स्वमिनं द्रष्टुमागता || ९ || येणेपरी स्तोत्र करोनि || श्रीगुरू स्नान करी इतुक्या क्षणीं || दूरुनि वंदित एक विधवा येवोनि || एकोभावें तये वेळीं || ९९ || तीसी पाहतां दीक्षितमौळी || आशीर्वाद बोलत ते वेळीं || अष्टपुत्रवती हो बाळी || सौभाग्यवती ऊठ म्हणे || १०० || प्रेक्षकजन

शिवचिदम्बर

विस्मित होवोनि ।। स्वामीसी करिती विनवणी ।। ही विधवा कैसेनी सुवासिनी ।। पुत्रवंती होईल ।। १ ।। जन ऐसें विनवित असतां ।। विधवा पाय वंदी मागुतां ।। पुनरपि आशीर्वचन बोलतां ।। ऊठ सुवासिनी म्हणतसे ।। २ ।। जनासी सांगे चिदम्बर ।। ही माझी वाणी नसे निर्धार ।। माझे मुखें कोणी निर्जर[1] ।। बोलिले ऐसें वाटतें ।। ३ ।। मागुती वदे कैलासधनी ।। ही कृष्णा असे पापहारिणी ।। निःसंशयें होय विधवा इची वाणी ।। माझे वदनीं उमटली ।। ४ ।। सत्य करावया निज वचन ।। असे कृष्णामाई समर्थ पूर्ण ।। आतां ईसी महा संकल्प सांगून ।। स्नान करवून आणा वेगीं ।। ५ ।। ऐसें सर्वांसी चिदंबर ।। सांगोनि वाक्य निर्धार ।। कृष्णास्नान करी शीघ्र ।। यथाशास्त्र सकुटुंब ।। ६ ।। स्नान वस्त्र देवोनि पुरोहितासी ।। नव वस्त्र नेसोनि यज्ञराशी ।। नानोपचारें पूजित कृष्णेसी ।। सर्वांसी सवें घेवुनि ।। ७ ।। स्त्रियांकडोनि शूर्पदान[2] ।। देववोनि दयाघन ।। ब्राम्हणांसी देवोनि अपार दान ।। गंगाराधन करीतसे ।। ८ ।। ज्याची पाहतां वितरणशक्ती ।। क्षेत्रस्थ सर्व झाले विस्मिती ।। म्हणती हा असेल श्रीपती ।। म्हणोनि या रीतीं दान करी ।। ९ ।। नातरी कैलासनाथ ।। आला असेल तीर्थयात्रार्थ ।। अष्टमहासिध्दिबळें येथ ।। समर्पितसे महादान ।। ११० ।। याची दानशक्ती पाहतां ।। लज्जित होवोनि निज चित्तां ।। कर्णादिक यासि मुख न दावितां ।। कीं मार्गेंच होवोनि गेले ।। ११ ।। यांचे दातृत्व पाहोनि ।। कल्पतरू लपले स्वर्गभुवनीं ।। कामधेनूं पशुत्व घेवोनी ।। गेली पळोनि गोलोकासी ।। १२ ।। चिंतामणी होवोनि लज्जित ।। खड्यांमाजीं जाहले गुप्त ।। यासरी कोण दाता समर्थ ।। धुंडिता मिळेल त्रिभुवनीं ।। १३ ।। ऐसें स्तवित असतां जन ।। स्नान करोनि दीक्षितराण ।। आले स्वपरिवार घेवोन ।। निज स्थानासीं तेधवां ।। १४ ।। मग कुशल विप्र तीस ।। संकल्प सांगोनि सुरस ।। आज्ञा देत स्नान करावयास ।। नदीमाजी तेधवा ।। १५ ।। विप्राज्ञा मानोनि शिरीं ।। नदीमाजीं उतरली ती नारी ।। जंव बुडाली तये अवसरीं ।। न ये मुहूर्तमात्र ।। १६ ।। तंव

१. देव. २. सुपवाण.

विप्र घाबरला ।। कायहो नवलाव वर्तला ।। काय सांगूं श्रीगुरुला ।। अवचित बुडाली अल्प जळीं ।। १७ ।। कितीही यत्न करोनि ।। नदींत धुंडिता तरी भामिनी ।। बुडाली तीं न मिळे म्हणोनि ।। ब्राम्हण मनीं चिंतावला ।। १८ ।। एकाएकीं मध्य नदींतुनी ।। तंव बाहेर आली एक रमणी ।। नवयौवन सुंदरी नागवेणी ।। नानालंकार लेवोनिया ।। १९ ।। टवटवित दिसे मुखचंद्रकांती ।। रत्नमुक्तास्वर्णालंकार झळकती ।। कबरीबध्दमाळा[१] तळपती ।। मुख शोभत हरिद्राकुंकुमें ।। १२० ।। चुडे कंकण झणत्कारिती ।। कंठसूत्र पदक दीप्ती ।। नक्षत्रापरी पसरत सभोंवतीं ।। पीतांबर नेसलीसे ।। २१ ।। सुगंध चर्चिलेसे सर्वांगीं ।। सिंदूरबिंदु विलसे उत्तमांगी ।। कामशर रोवित कामुकांतरंगी ।। अपांगपातें[२] पाहतां ।। २२ ।। शरच्चंद्रमरीचिकेपरी[३] ।। जिची मुखप्रभा पसरी ।। दोन्ही हातें निवारीत लहरी ।। येत तीरीं मंद मंद ।। २३ ।। तंव तो भिवोनि द्विजवर ।। चित्तीं करूं लागला विचार ।। जी जळीं बुडाली ती तर ।। गेली निर्धार निःसंशयें ।। २४ ।। ही कोण अवचित नदींतुनी ।। दिव्यरूपिणी लावण्यखाणी ।। उठली जेंवि समुद्रमंथनीं ।। इंदिरेपरी[४] शोभतसे ।। २५ ।। कीं असे सिध्दकन्या ।। नातरी क्षीराब्धितनया[५] ।। श्रीस्वामीदर्शन घ्यावया ।। आली असेल ।। २६ ।। नातरी येत कीं मेनका ।। अथवा नागकन्यका ।। पातालाहुनी श्रीगुरुपादुका ।। पूजावया पातली ।। २७ ।। येणेपरी तो द्विजवर ।। वितर्क करित असतां फार ।। ती येवोनि तीरासी सत्वर ।। वंदितसे विप्रपायीं ।। २८ ।। तंव तो विप्र भिवोनि ।। पुसे तीसी मार्गे सरोनि ।। कोण अससी तूं भामिनी ।। कोठून आलीस ।। २९ ।। जळीं कैसा तुझा वास ।। कासया येथवरी आलीस ।। सांगे सविस्तर आम्हांस ।। वृत्त काय तें तुझें ।। १३० ।। मग ती हंसूनि अंगना ।। म्हणे भ्रांत झालासी ब्राम्हणा ।। संकल्प सांगोनि मज स्नाना ।। पाठवोनि इतुक्यांत ।। ३१ ।। भ्रमूं नको मजकारण ।। श्रीचिदम्बर करुणाघन ।। त्याचिये कृपें सौभाग्य पूर्ण ।। मजसी हें लाधलें ।। ३२ ।। हें चित्रचरित्र पाहतां ।। द्विज तुकवी आनंदें माथा

१. वेणीत माळलेल्या माळा. २. कटाक्षानें. ३. शरदऋतूंतील चंद्रकिरणाप्रमाणें. ४. लक्ष्मीप्रमाणें. ५. लक्ष्मी.

शि व चि द म्ब र

।। ही प्रगटली चिदम्बरी सत्ता ।। म्हणे जाहलें परमाश्चर्य ।। ३३ ।। हर्षभरें मुख फुललें ।। दोन्ही नयन आसवें भरिले ।। अंगीं रोमांच उभारिले ।। कंठ दाटला गहिंवरत ।। ३४ ।। द्विज आनंदें स्फुंदत ।। तीसवें मंद मंद चालत ।। श्रीगुरूनामें किंकाटित ।। पातला स्वामीजवळीं ।। ३५ ।। तिजकडोनि नमन ।। स्वामीसी करवोनि आपण ।। मौनेंचि राहतां ब्राम्हण ।। श्रीगुरुराण पुसतसे ।। ३६ ।। कोण बाई आलीस कोठून ।। काय असें तुझें अभिधान ।। हें सविस्तर मजकारण ।। सांग सुंदरी ये समयीं ।। ३७ ।। तव तिनें स्वामीचें हृद्गत ।। ओळखोनि केले प्राणिपात ।। मग सर्व द्विजांसी प्रार्थित ।। दोन्ही हात जोडोनिया ।। ३८ ।। सर्वांसी व्हावया प्रत्यय ।। मज पुसतसे देवराय ।। यास्तव वंदोनि स्वामिपाय ।। प्रश्नाभिप्राय सांगतें ऐका ।। ३९ ।। मी पूर्वी विधवा होतें ।। भेटीसी आलें ठावें तुम्हांतें ।। नदींत वंदितां स्वामींनीं मातें ।। आशीर्वचनातें दीधलें ।। १४० ।। अष्टपुत्रसौभाग्यवती ।। होई ऐसें बोलिले निश्चिती ।। मग निरोप घेवोनि त्यावरती ।। स्नानार्थ गेले नदीसी ।। ४१ ।। संकल्प सांगतां ब्राम्हण ।। नदीमाजीं मीं केलें स्नान ।। इतुक्यांत देवकन्यका येवोन ।। पाताळसदनीं नेती मजसी ।। ४२ ।। तेथें सिंहासन रत्नखचित ।। त्यावरी बैसले होते हेच दीक्षित ।। देवकन्या आनंदभरित ।। यासीच पूजित होती ।। ४३ ।। मातें पाहतां हा करुणाकरू ।। देवकन्येसी आज्ञापी सत्वरू ।। इसी सुवासिनीवेष सुंदरू ।। देवोनि पाठवा भूवरीं ।। ४४ ।। मजसी मग त्या देवकन्या ।। सुवासिनीचिन्हें देवोनिया ।। मातें नदींत लोटत्या झाल्या ।। तत्क्षणीं आलें मी वरती ।। ४५ ।। हा दीक्षित देवदेव ।। साक्षात् असे महादेव ।। त्रिलोकवासी सर्वजीव ।। एकोभावें पूजती यासी ।। ४६ ।। यासी मनुष्य जे म्हणती ।। तेचि जाणावे मूढमती ।। सत्य सत्य हाचि कैलासपती ।। अगाध कृती असे याची ।। ४७ ।। कर्पूरगात्रा चंद्रशेखरा ।। दीनदयाळा शुभ्रवस्त्रा ।। त्रिलोकपूज्या चिदंबरा ।। तारि तारि मज अनाथा ।। ४८ ।। म्हणे जगदात्म्या चिदंबरमूर्ती ।। निगमागवंद्या[1] कैलासपती ।।

शि व चि द म्ब र

१. वेदशास्त्रांना वंद्य असणारा.

शिवचिदम्बर

ब्रम्हांडाधीशा तुझी कीर्ती ।। सदा गाती अमर असुर[1] ।। ४९ ।। तूं सर्वोत्तम सर्वेश्वर ।। सर्वातीत अगोचरू ।। सर्वाध्यक्ष वज्रपंजरू ।। साक्षीरूपें तिष्ठसी ।। १५० ।। मदनताता मनरंजना ।। मंदाकिनीधरा मन्मथदहना ।। मंदारकुसुमप्रिया त्रिनयना ।। मंदराचलनिवासिया ।। ५१ ।। काय माझें सुकृत ।। आज भेटुनी सद्‌गुरुनाथ ।। मज देती सौभाग्य सार्थ ।। काय महिमा बोलूं आतां ।। ५२ ।। धन्य धन्य चिदंबर माउली ।। सुकली वेली पुनः रोविली ।। मजवरती पूर्ण छाया केली ।। अक्षयसौभाग्याची ।। ५३ ।। मज अभागिनीस कैचें कनकु ।। माझे भाळीं कैचे कुंकूं ।। तें सर्व दीधलें भक्तवरदायकु ।। महिमा अद्‌भुत काय वर्णूं ।। ५४ ।। भाळ ठेवित सद्‌गुरुचरणीं ।। आनंदाश्रू लोटती नयनीं ।। म्हणे माझें शरीर ओवाळुनी ।। तुजवरून टाकतें ।। ५५ ।। येणेंपरी ती सुंदरी ।। स्तोत्र करित परोपरी ।। वारंवार दंडवत करी ।। प्रेम अंतरीं न समावतां ।। ५६ ।। तव एक गंगातीर्थधर ।। आला तेथें जटाधारी विप्र ।। त्याची पाहोनी करूणाकर ।। त्या सुंदरीसी पाचारित ।। ५० ।। अये गुणवंती ऐक गोष्टी ।। हा कोण पाहे जाउनी निकटी ।। स्वामीवचन ऐकतां उठाउठी ।। त्यावरी दृष्टी घालित ।। ५८ ।। आपादमस्तक पाहतां ब्राम्हण ।। भ्रतारलक्षणें परिपूर्ण ।। त्यासी पाहतां लज्जेनें अधोवदन ।। करोनि उगी राहिली ।। ५९ ।। मग श्रीगुरु शांतिपूर्वक ।। दोघांचा विवाह सम्यक ।। मागुती करवोनि देख ।। स्वस्थानासी पाठवित ।। १६० ।। चिदंबरकृपें मग ती नारी ।। पुत्रवती होवोनि चिदंबरी ।। विश्वास ठेवोनि अहोरात्रीं ।। श्रीगुरुभजनीं विनटली[2] ।। ६१ ।। येणेंपरी चरित्र अगाध ।। क्षणोक्षणीं दावित आनंदकंद ।। खेळतों त्यांचें चरित्र मी मंद ।। काय वर्णूं शकेन ।। ६२ ।। ऐसेंपरी श्रीचिदंबर ।। कृष्णायात्रा करोनि सत्वर ।। पुढे निघाले सपरिवार ।। मार्तंडक्षेत्रयात्रार्थ ।। ६३ ।। पुढें निघेल रसाळ कथा ।। एकाग्र चित्त करोनि आतां ।। ऐका म्हणोनि श्रोतियां समस्तां ।। विनवी चिदंबरकिंकर ।। ६४ ।। स्वस्ति श्रीचिदंबरचरित ।। ऐकतां तुष्टे सगुद्रुनाथ ।। यास्तव ऐका

शिवचिदम्बर

१. दैत्य. २. रममाण झाली.

श्रोते समस्त ।। षट्चत्वारिंशोध्याय गोड हा ।। १६५ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे मोक्षवैभवखण्डे विधवासौभाग्यप्रदानं नाम षट्चत्वारिंशोऽध्यायः ।। ४६ ।। ओवीसंख्या १६५ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।



शिवचिदम्बर

## मृतब्राह्मणसञ्जीवनम्




शिलाघातें तो ब्राह्मण । ढेकणापरी झाला चूर्णः शिथिलांगाचे करोनि संधान । मृत्यंजय मंत्र जपाने :
त्यासि धरोनि श्रीदीक्षित । बाहेर येत हात धरोनि ॥

चिदम्बरचरित्र

अध्याय सत्तेचाळिसावा

शि
व
चि
द
म्ब
र

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। ॐनमः पुण्यपुरुषा वेदवरेण्या ।। अगणितलावण्या त्रिलोकमान्या ।। हिरण्यवर्त्म[1] तूं भवारण्या ।। दीक्षिताग्रगण्या तुज नमो ।। १ ।। स्मरणमात्रें हरिसी जन्ममरण ।। ऐसें श्रुतीमाजीं विवर्णन ।। जाणोनि चरणसेवार्थ शरण ।। आलों गुरुराया तारि मजलां ।। २ ।। तव स्मरण दुःखहारक ।। तव पूजन सौख्यदायक ।। तव चिंतन बंधमोचक ।। तुजसम तारक दुजा कोण ।। ३ ।। बुडत बुडत भवाब्धीमाजी[2] ।। निर्विण्ण झालों सोमयाजीं ।। वेगें पदांबुजनौकेंत आजी ।। बैसवोनि परतीरा लावी ।। ४ ।। ब्रम्हानंदबीज दीक्षितराजा ।। सर्वथा भाव सोडोनि दुजा ।। शरण आलों तव पदांबुजा ।। पुरवा माझें मनोरथ ।। ५ ।। चिदम्बरानंदीं विमग्न ।। द्विजासी मुनीश म्हणे सोडा उद्विग्न ।। सर्व विघ्नौघ जें करी भग्न ।। तें चरित परियेसा ।। ६ ।। गालव क्षेत्राहुनी चिदम्बर ।। असंख्य यात्रिकांबरोबर ।। मार्ग चालत सपरिवार ।। हिप्परगीपुरा पातला ।। ७ ।। मणिमल्लवधास्तव ।। जेणें धरिलें रूप भैरव ।। तो हा सर्व देवाधिदेव ।। मार्तंडभैरव जेथे वसे ।। ८ ।। जान्हवी गिरिजा दोघी स्त्रिया ।। गंगा म्हाळसा नामें ज्याचिसा भार्या ।। तो मार्तंडदेव वसे ज्या ठायां ।। तेथें पातले श्रीगुरू ।। ९ ।। दुरूनि पाहतां हिप्परगी गांव ।। चरणीं चालत दीक्षितराव ।। धूळिपाहें दर्शनास्तव ।। देवालयीं प्रवेशित ।। १० ।। पांचमुष्टी रुपये ठेवोनि पुढें ।। प्रेक्षकां अंतरीं जेंवि जडे ।। तैसा दीक्षितराव बालेदुचूडें[3] ।। नमन केलें एकोभावें ।। ११ ।। इतुक्यांत करिती सेवकगण ।। देवालयाभोंवतीं ।। मंडप निर्माण ।। तैसेंचि शिबिरसंस्थापन ।। यात्राजननिवासार्थ ।। १२ ।। त्यांत वसवोनि यात्रिकांसी ।। आपण वसत मार्तंडनिवासीं ।। मग स्नान करोनि देवासी ।। महाभिषेक करवित ।। १३ ।। जैसें मन निवे पाहतांक्षणीं ।। तैसें हरिद्राचूर्ण कुंकुमें करोनि ।। पत्र पुष्प माल्य तंडुल योजोनि ।। देवासी महापूजा बांधवित ।। १४ ।। आरती नैवेद्यादि समर्पोनि ।। स्वामी आले ब्राम्हण-भोजनालागोनि ।। तव अपार ब्राम्हण सुवासिनी ।। देवसदनीं प्रवेशिले ।। १५ ।। बैसवोनि सर्व ब्राम्हणांसी

१. अग्नि. २. संसारसागरांत. ३. चिदम्बरानें.

शि
व
चि
द
म्ब
र

शिवचिदम्बर

।। समर्पोनि चतुर्विध पक्वान्नराशी ।। दक्षिणादानें तोषवोनि सर्वांसी ।। निरोप देत श्रीगुरू ।। १६ ।। मग भक्तपरिवारासहित ।। आपण भोजन करोनि स्वस्थ ।। उत्सवमूर्ती आणावया गांवांत ।। पातले रात्रिसमयीं ।। १७ ।। वस्त्रादिकें उत्सवमूर्ती ।। सप्रेमें पूजित सावित्रीपती ।। सालंकृत अश्वावरी ती ।। स्थापिती आधीं श्यामसुंदर ।। १८ ।। मग आणोनि मैराळमूर्ती ।। भक्त बैसविती रथावरती ।। नाना मंगल वाद्यें वाजविती ।। आणि गर्जती सप्त कोटिं नामें ।। १९ ।। छत्रचामरादि राजोपचार ।। भोंवती मिरविती अपार ।। बिरुद वाखाणिती वेत्रधर ।। मणिमल्ल प्रतिभटाचे ।। २० ।। मंद मंद ओढितां रथ ।। वीरवेषें शोभत म्हाळसाकांत ।। आजचि कीं मणिमल्लवधार्थ ।। कैलासनाथ अवतरला ।। २१ ।। विद्युल्लतापरी लखलखित ।। तीक्ष्ण खड्ग हातीं चमकत ।। कीं वीरश्रीचा धरावया हात ।। अश्व नाचवित पुढें येतो ।। २२ ।। यापरी मार्तंड येतां मंद मंद ।। भक्तहृदयीं न मावतां आनंद ।। प्रेमरंगीं होवोनि धुंद ।। दाविती स्वच्छंदें पवाड ।। २३ ।। निशाचूर्ण[1] उडविती किती एक ।। नाचती उडती कित्येक ।। एळ कोटि नामें सकौतुक ।। घे घे म्हणत गर्जती ।। २४ ।। लोहगोळीनें मारुनी घेती ।। निजमस्तकें पाषाण फोडिती ।। शस्त्रें पोटीं टोचुनी घेती ।। नाम गर्जत सप्रेमें ।। २५ ।। पोटऱ्यांत पहार हाणिति ।। कित्येक हस्तपाय जिव्हावरती ।। दाभण टोचूनि दीप लाविती ।। तणे करिती आरती देवासी ।। २६ ।। देवा समर्पण्या मान कापोनि घेत ।। भक्त भंडारा आणोनि लाविती ।। तेणें पावति ते निजस्थिती ।। मागुती गर्जती पूर्ववत ।। २७ ।। अहहा काय हा अपूर्व ।। मार्तंडभैरवसत्तावैभव ।। इतुकें करोनि घेतांही घाव ।। पावती पूर्वस्वभावा तत्क्षणीं ।। २८ ।। भक्तवत्सल देव मार्तंड ।। निजनामप्रतापप्रचंड ।। सर्वांसी दावितसे करोनि उघड ।। अक्षतपणें ठेवोनि भक्तांसी ।। २९ ।। ऐसियापरी महोत्सवें ।। देवासि आणोनि राजवैभवें ।। देवसदनीं चिदंबर देवें ।। प्रेमभावें स्थापिलें ।। ३० ।। नवरात्रविधीनें तेथें ।। नित्य करी महापूजनातें ।। द्विजसंतर्पण

१. हळदीची पूड.

शिवचिदम्बर

श्रीदीक्षितें ।। सुप्रीत चित्तें आरंभिलें ।। ३१ ।। नानाविध पक्वान्न ।। नित्य करवित द्विजाकारण ।। आणि अपार दक्षिणादान ।। देत असे प्रत्यहीं ।। ३२ ।। ऐसें असतां ऐके दिनीं ।। श्रीचिदंबर मार्तांडसदनीं ।। पूजा करित स्वस्थपणीं ।। बैसले होते मध्यान्हीं ।। ३३ ।। इतुक्यांत दिवाकर दीक्षित ।। नम्रभावें स्वामीसी विनवित ।। ब्राम्हण झाले अतिक्षुधित ।। परिवेषणार्थ[1] निरोप द्यावा ।। ३४ ।। तंव बोलें श्रीचिदम्बर ।। आज भोजनसमय असे उशीर ।। न करि गडबड दिवाकर ।। आज्ञापीन तंव पात्र मांडी ।। ३५ ।। मुहूर्तमात्र करोनि उशीर ।। मागुती विनवी दिवाकर ।। स्वामी देत तेंचि उत्तर ।। नको करूं गडबड ऐसीं ।। ३६ ।। मागुती विलंबोनि किंचित ।। म्हणे ब्राम्हण झाले क्षुधित ।। आलस्य करितां किमर्थ ।। पाक सर्व सिध्द असे ।। ३७ ।। पाकाविषयीं कांहीं असिध्द ।। नसे परी कारण असे अगाध ।। गडबडीने न करी तूं स्वच्छंद ।। स्वस्थ बैसपां याममात्र ।। ३८ ।। ऐकतां ऐसें स्वामीवचन ।। दिवाकर चित्तीं कोपून ।। स्वामीसी न विचारितां आपण ।। वेगें पात्रास्तरण करवित ।। ३९ ।। घृत सूपान्नादि पदार्थ ।। पात्रीं वाढिले समस्त ।। मग पात्र प्रोक्षावया त्वरित ।। हातीं जळपात्र स्वीकरी ।। ४० ।। इतुक्यांत एक अगाध ।। प्रवर्तला अद्‌भुत प्रमाद ।। देवालयीं बैसावया जनवृंद ।। छायार्थ छत बांधिले होतें ।। ४१ ।। त्याच्या रज्जू बांधावया सदृढ ।। वरी मोठमोठे दगड ।। ठेविले होते उदंड ।। तंव उठला चक्रवात ।। ४२ ।। खडतर नादें गर्जत ।। गगनछत्राचें दंडवत ।। देवळाभोंवतीं उन्नत ।। गरगरा फिरूं लागला ।। ४३ ।। सुटता तो प्रलयप्रभंजन[2] ।। धुळीनें भरलें तंव गगन ।। त्यामाजीं देवसदन ।। दिसेनासें जाहलें ।। ४४ ।। न दिसती कोणी कोणासी ।। विसरल्या स्त्रिया तान्हे कुमारासी ।। धूळी वर्षावतां सर्वांसी ।। वाटे प्रळयची कीं आतां ।। ४५ ।। निज हस्तें नेत्र झांकोनि ।। कित्येक बैसती भिंतीस टेकोनि ।। कित्येक पडले मूर्च्छित होवोनि ।। गडबडोनि पात्रीं लोळत ।। ४६ ।। एक मुहूर्तपर्यंत ।। हलकल्लोळ करी मारुत ।। समूळ उपटोनि वृक्ष

..........................

१. वाटणेस. २. भयंकर वादळ.



शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

जात ।। पाडितसे देवळाभोंवतीं ।। ४७ ।। क्षणांत मांडव उडाले ।। दोर तुटोनि वितान[1] पडलें ।। पात्र सर्व धुळीनें भरलें ।। तेर्णे घसरल्या बंधनशिळा ।। ४८ ।। एक मुहूर्तावरी अद्‌भुत ।। प्रभंजन तो जाहला शांत ।। जन जाहले सावधचित्त ।। पाहती नेत्र उघडोनि ।। ४९ ।। तंव तेथें एक ब्राह्मण ।। बैसला होता भिंतीस टेकोन ।। वायुवेगें देवळावरून ।। त्याचे शिरीं शिळा पडली ।। ५० ।। शिळाघातें तो ब्राह्मण ढेंकुणापरी झाला चूर्ण ।। हा आघात पाहतां सर्व जन ।। चहूंकडोन धांविन्नले ।। ५१ ।। हाहाकार करित त्या वेळां ।। म्हणती हा काय समय उदेला ।। क्षुधित ब्राम्हण भोजनाला ।। विघ्न केवढें ओढवलें ।। ५२ ।। मृत ब्राम्हणासी पाहतां ।। खेद जाहला द्विजासमस्तां ।। स्त्रीजनही हें वृत्त ऐकतां ।। आला धांवत शोकाक्रांत ।। ५३ ।। त्याचिया कांतेसी इतुक्यांत ।। कळला भ्रतारवृत्तांत ।। धबधबा वक्षस्थळ[2] पिटित ।। येत धांवत पतीजवळीं ।। ५४ ।। पतीसी पाहतां तत्काळीं ।। मूर्च्छित होवोनि भूतळीं ।। मुहूर्तमात्र विसंज्ञ पडली ।। सावध करिती स्त्रिया समस्त ।। ५५ ।। तंव ती सावध होवोनि ।। म्हणे प्राणसख्या मज सोडोनी ।। कोठें गेलासी सौभाग्यधनी ।। अव्हेरोनि मज अनाथा ।। ५६ ।। अगा शंकरा दीनबंधू ।। पाहिलासी काय माझा अपराधू ।। ज्या कर्माचें फळ अगाधू ।। मज दीधलेंसी ये वेळीं ।। ५७ ।। तुझिये दर्शनमात्रें ।। सुख पावले हे यात्रिक सारे ।। मी एकटीच पापिणी बारे ।। म्हणोनि दुःखार्णवी[3] लोटिली ।। ५८ ।। अगा सुखदायका चिदम्बरा ।। तूंचि जरी माझिया भ्रतारा ।। नेसी तरी मज आतां थारा ।। सांग दातारा कोण देईल ।। ५९ ।। अगा गुणनिधी प्राणेश्वरा ।। कां मज उपक्षिलें सुंदरा ।। मज कोठेंही न दिसे थारा ।। तुझविण बैसावया ।। ६० ।। एतावता[4] मज रक्षोनि प्रेमरंगा ।। आज धरिलेंसी परलोकमार्गा ।। तुजसी सोडोनि मी दुर्भगा ।। कोठें जावूं दैन्य दावित ।। ६१ ।। मजविण धर्मार्थकाम ।। नाचरिलेसी कांहीं कर्म ।। आज कैसें स्वर्गसुखधाम ।। एकटाची भोगिसी ।। ६२ ।। जड जाहले मी तुजसी

१. छत. २. ऊर. ३. दुःखसागरांत. ४. आतांपर्यंत.



शिवचिदम्बर

।। आजची प्राणप्रिया सुखराशी ।। म्हणोनि मज सोडोनि निघालासी ।। बोल बोलगा एक आतां ।। ६३ ।। पतिप्रेतावरी लोळतसे ।। शिर आफळोनि फोडूं घेतसे ।। स्त्रिया संबोखितां विशेषें ।। आक्रोशितसे शोकभरें ।। ६४ ।। हृदय पिटतसे धडधडा ।। अलंकार फेकतसे तडतुडा ।। म्हणतसे दुर्विधीरे मूढा ।। कां प्राणजोडी विघटिसी ।। ६५ ।। तिचा शोक पाहोनि सर्व स्त्रिया ।। भोंवतीं भारी दुःख करूं लागल्या ।। त्यांत कित्येक वृध्द स्त्रिया ।। उगी राहे म्हणत सांतविती ।। ६६ ।। त्यांचें वचन ऐकतां ।। द्विगुण दुःख दाटोनि चित्तां ।। म्हणे माय बहिणीहो आतां ।। सांतवितां काय दुर्भगेसी ।। ६७ ।। हरिद्रा कुंकुम भार जाहले ।। चुडे कंकण कोठें गेले ।। गळसरीसी चोर पडले ।। काय झालें अवचित ।। ६८ ।। मी आलें चिदम्बरदर्शनासी ।। पुत्रसंतान मागावयासी ।। त्याणेंचि लाधलें वैधव्य मजसी ।। दुर्विधी कैसा माझा असे ।। ६९ ।। व्याघ्रभयें भिवोनि ।। गाय जातां शरण म्हणोनि ।। तेथेंचि यवन येवोनि ।। वधिल्यापरी जाहलें ।। ७० ।। नातरी आरोग्याकरितां ।। वैद्याकडोनि औषध घेतां ।। तेंचि विष होवोनि तत्त्वता ।। प्राण घेतल्यापरी जाहलें ।। ७१ ।। भूतळीं श्रीचिदम्बरू ।। अनाथासी कल्पतरू ।। ऐसें याचें यश थोरू ।। ऐकोनि येथवरू आलें मी ।। ७२ ।। मायबहिणीहो सर्वजन ।। तुम्ही भजतां भाव धरोन ।। करितो तुमचे मनोरथ पूर्ण ।। मजकारण कीं निर्दय ।। ७३ ।। मूकाकरवीं वेद वदविले ।। मृत बाळा उठविलें ।। कासया मजकारण केलें ।। कठिण चित्त दीक्षितेंद्रें ।। ७४ ।। यापरी श्रीगुरूसी आळवित ।। शोक करितसे बहुत ।। तिचा शोक पाहतां तटस्थ ।। जन समस्त राहिले ।। ७५ ।। इतुक्यांत एक ब्राह्मण ।। देउळासी गेला धांवोन ।। सांगे सर्व वर्तमान ।। श्रीचिदम्बरापासी ।। ७६ ।। ऐकतां ब्राम्हणमुखें वृत्त ।। श्रवणीं हस्त ठेवोनि श्रीदीक्षित ।। उठिले शिव शिव म्हणत ।। दीननाथ तेधवां ।। ७७ ।। शुभं ब्रूयात् शुभं ब्रूयात् ।। ऐसें म्हणत कृपावंत ।। जेथें पडिलें होतें विप्रप्रेत ।। धांवत आले त्या स्थळां ।। ७८ ।। पाहतां श्रीदीक्षितासी ।। दुःख उचंबळलें तिचे मानसीं ।। म्हणे तूं परमपुरुष म्हणविशी ।। अव्हेरिसी कां मजला ।। ७९ ।। काय माझेनीं अपराध घडला

|| म्हणोनि माझिया प्राणवल्लभाला || पाठविलें परलोकाला || सांग दयाळा चिदम्बरा || ८० || तूं मजवरी कृपा करशील || माझे मनोरथ पुरतील || भेटावया तव पदकमळ || आलें वल्लभासवें[1] दूरूनी || ८१ || येथें सौभाग्य तुजसी समर्पिलें || माझे सर्व मनोरथ पुरले || जातें तव अनुग्रहबळें || देह सोडोनि यमालयासी || ८२ || तुझें यश पसरूं दे विस्तीर्ण || माझे काम केले पूर्ण || आतां तवकीर्ती सर्वे घेवोन || लोकांतरीं वाखाणितें || ८३ || शोकबळें ती नारी || बोलत असतां नानापरी || म्हणे श्रीगुरू अये सुंदरी || धीर धरी क्षणमात्र || ८४ || उगी राहे सोडी शोक || येथें जागतो म्हाळसासख || मनीं राहे तूं निःशंक || मृत्युंजय तो असे || ८५ || ऐसें तीसी समाधान सांगोनि || विप्रप्रेत वस्त्रीं बांधवोनि || ठेववी मग मार्तंडसदनीं || जना दूर करोनि द्वार बांधत || ८६ || आंत बैसोनि आपण || शिथिलांगाचें करोनि संधान || मृत्युंजयमंत्र जपोन || मार्तंडतीर्थ प्रोक्षित || ८७ || मुखीं तयाच्या घालोनि भस्म || सुधादृष्टीनें पाहत सर्वोत्तम || आणि वरदहस्तांबुधाम[2] || सर्वांगी फिरवित || ८८ || तत्काळ तो ब्राम्हण || सर्वांगी जीव भरोन || अंग मुरडित उठोन || बैसला निर्व्रण[3] पूर्ववत || ८९ || अंगीं व्यथा नसे किंचित || विप्र जाहला सावधचित्त || चहूंकडे पाहतां पुढें मूर्तिमंत || श्रीदीक्षितेंद्र देखिला || ९० || तंव तो भावें प्रणिपात || स्वामीसी वेगें करित || त्यासी उठवोनि श्रीदीक्षित || बाहेर येत हात धरोनि || ९१ || मृत ब्राह्मण संजीवन || पाहोनि येथील सर्वजन || क्षुधित आनंदें तृप्त होवोन || क्षुधातृषा विसरले || ९२ || चिदम्बराचे भोंवतीं || जन सर्व धांवोनि येती || तंव ब्राम्हणाची सती || आली ती ही स्वामीजवळी || ९३ || पूर्ववत निजपतीसी || पाहतां तुष्टली मानसीं || लोटांगण घालित बहुवसी || जयजयाकारें गर्जतसे || ९४ || उपहासप्रिय भक्तकैवारी || तंव तीसी म्हणे ते अवसरीं || स्तोत्र नावडे ऐक सुंदरी || मज तोषार्थ विनोदवचन || ९५ || पूर्वी जैसें प्रेमवचन || बोलिलीस तूं मजकारण || तैसें आणखी

१. पतीसह. २. उजव्या हातांतील मंत्रित पाणी. ३. व्रणरहित.




शिव चिदम्बर

शि व चि द म्ब र

गोड भाषण ।। बोल बाई एकवार ।। ९६ ।। श्रीगुरुवचन ऐकतां अंगना ।। लज्जेनें खाली करोनि वदना ।। एकही न बोलता वचना ।। मौन धरोनि राहिली ।। ९७ ।। तंव तिचा प्राणनाथ ।। श्रींगुरूसी करोनि प्रणिपात ।। आनंदें वारंवार स्फुंदत ।। स्तोत्र आरंभित सप्रेमें ।। ९८ ।। वृत्त ।। शिव चिदम्बरा कामदायका ।। सुरवरार्चिता दिव्यपादुका ।। प्रहसिताननना भक्तिवर्धका ।। तारकेश्वरा तुज नमो नमो ।। ९९ ।। त्रिविधतापसंतापहारका ।। ध्यनानमात्र तूं सौख्यदायका ।। दीक्षितात्मजा सच्चरित्रका ।। तारकेश्वरा तुज नमो नमो ।। १०० ।। भूवरीं महा दीक्षितात्मजा ।। रक्षणार्थ तूं धर्मगोद्विजा ।। जन्मलासि बा जाणतों अजा ।। तारकेश्वरा तुज नमो नमो ।। १ ।। अयि महागुरो तव दयालुता ।। धर्ममंदिरीं[1] पाहिली स्वता ।। बंधमोचका मम यमार्चिता ।। तारकेश्वरा तुज नमो नमो ।। २ ।। अज्ञमनुज हे नेणती तुला ।। विभव हा तुझा मीच पहिला ।। यमहि भीतिनें तुजसि पूजिला ।। तारकेश्वरा तुज नमो नमो ।। ३ ।। अद्‌भुता क्रिया नित्य पाहतां ।। कासया तुम्ही मोह पावतां ।। तारकेश हा सर्व जाणता ।। सोडुनी भजा मोह आयता ।। ४ ।। सदय मानसा मृत्युहारका ।। तव पदांबुजीं पार्वतीसखा ।। चित्त राहुं दे ज्ञानदायका ।। तारकेश्वरा रक्षि बालका ।। ५ ।। तव कथाश्रवीं कर्ण राहुं दे ।। नेत्र हे तुझें रूप पांहु दे ।। जीभ ही तुझें नाम सेवुं दे ।। तारकेश्वरा हेंचि मजसि दे ।। ६ ।। येणेंपरी स्तोत्र करोनि ।। सर्व जनांसी करी विनविणी ।। वारंवार चिदम्बरचरणीं ।। नमन करित सप्रेमें ।। ७ ।। जनहो संशय सोडोनी ।। चित्त ठेवा श्रीचिदंम्बरचरणीं ।। हाचि निःसंशय कैलासधनी ।। यमसदनीं म्यां वोळखिला ।। ८ ।। सर्वही तुम्ही चित्त ठेवोनी ।। ऐका माझी दिव्य वाणी ।। विश्वास ठेवा श्रीगुरुचरणीं ।। ऐकतांक्षणीं मोह उडे ।। ९ ।। शिलापातें तुम्ही मजसी ।। पाहिलें होतें चूर्णांगासी ।। मग दूतें नेले मज यमालयासी ।। यम मजसी पुसत होता ।। ११० ।। इतुक्यांत हा करुणाकर ।। भस्म रुद्राक्ष गुंडीधर ।। तेजस्वी जैसा भास्कर ।। दयासागर चिदम्बर ।। ११ ।। हाचि

शि व चि द म्ब र

१. यमाचें घरीं.

श्रीगुरु देवाधिदेव ।। तेथ पातला दीक्षितराव ।। यासी पाहता तो यमदेव ।। गडबडोनि उठियला ।। १२ ।। चरणीं वंदोनि सद्भावें ।। सिंहासनीं बैसविला यमदेवें ।। मग पूजिला देव वैभवें ।। म्यां पाहिंलें प्रत्यक्ष ।। १३ ।। मग हात जोडोनि यमू ।। पुसे काय आगमनकामू ।। तंव मंद हासें आत्मारामू ।। यमासी आज्ञा करी ।। १४ ।। ऐक धर्मराया माझें वचन ।। जरी गतायुषी हा ब्राम्हण ।। आणिलासी तुवा आज्ञेंवरून ।। तथापि सोडिला पाहिजे ।। १५ ।। ऐसें ऐकतां श्रीगुरुवचन ।। यम साष्टांगें करी वंदन ।। म्हणे तुझी आज्ञा प्रमाण ।। मजसी जगत्पालका ।। १६ ।। मग तथास्तु म्हणतां यम ।। माझा हात धरोनि पूर्णकाम ।। येथें प्रवेशित श्रीमार्तंडधाम ।। मागुती पूर्ववत ।। १७ ।। पहा पहा यमानें पूजित ।। गंध तुळसी पायीं दिसत ।। ऐसें बोलतां गहिंवरित ।। कंठ दाटोनि मौनावला ।। १८ ।। नेत्रीं प्रेमाश्रू वाहतसे ।। सर्वांग शोभत रोमहर्षे ।। प्रेमभरें अंग कांपतसें ।। करितसे पुन्हा दंडवत ।। १९ ।। हें चरित्र पाहतां सर्व जन ।। प्रेमानंदें करिती नर्तन ।। जयजयकारें गर्जोन ।। वारंवार श्रीपदीं नमिती ।। १२० ।। चिदंबरीं विश्वास ठेवोन ।। सर्वही जाहले सेवानिपुण ।। श्रीगुरूही सर्वांसी सांतवन ।। करोनि तोषवितसे ।। २१ ।। मग पाक करवोनि अन्य ।। जेववोनि द्विज समुदाय ।। तांबूल दक्षिणा देवोनी स्वामिराय ।। तोषवी अपार सर्वांसी ।। २२ ।। यापरी नवरात्रोत्सव ।। पूर्ण करोनि दीक्षितराव ।। महोत्सवें मार्तांडदेव ।। स्वस्थानासी पोहोंचवित ।। २३ ।। तद्देशनिवासी सर्व ब्राम्हण ।। चिदंबरनिकट येवोन ।। निज संदिग्धार्थ विचारोन ।। यथार्थ मार्ग जाणोन घेती ।। २४ ।। स्मृतिशास्त्रार्थाविषयीं ।। संदिग्धार्थ जे जे सर्वही ।। चिदंबरमुखें निश्चयार्थ ग्राही ।। ऐकोनि शांती पावती ।। २५ ।। येणेपरी मार्तंडयात्रा थोर ।। संपादोनि सपरिवार ।। स्वस्थानासी श्रीचिदंबर ।। पातले आनंदभरित ।। २६ ।। श्रीचिदंबरचरित्र मनोहर ।। जे ऐकती पढती सादर ।। त्यासी अनायासें इहपर ।। साधतसे सत्य सत्य ।। २७ ।। श्रीचिदबरचरित्र हेंचि अमृत ।। जो भावें सेवी गुणवत ।। तो जन्म जरा मृत्युपंथ ।। जिंकोनि मुक्त होय संसारीं ।। २८ ।। ऐसें सर्वांसी चिदंबरकिंकर ।। हात जोडोनि विनवी वारंवार

|| ज्यासी पाहिजे इहपर || त्यांहीं चिदंबर भजावा || २९ || स्वस्ति श्रीचिदंबरचरित || ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ || यास्तव ऐका श्रोते समस्त || सप्तचत्वारिंशोऽध्याय रसाळ हा || १३० || इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे मोक्षवैभवखण्डे मृतब्राम्हणसंजीवनं नाम सप्तचत्वारिंशोऽध्यायः || ४७ || ओवीसंख्या १३० ||

|| श्री चिदम्बरार्पणमस्तु ||

## वृक्षमूले व्यङ्कटेशमूर्तिदर्शनम्




सर्वासि संबोखोनि विश्वंभरु। व्यंकटेशमूर्ती काढोनि बाहेरु। अर्चा करोनि प्रीतिपुरःसरू। चिदम्बरी विश्वासू ठेवित

चिदम्बरचरित्र अध्याय अठ्ठेचाळिसावा

शिवचिदम्बर

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। ॐनमो ब्रम्हण्यदेवा ।। निर्विकारा महादेवा ।। सुरासुरेड्यनिजवैभवा[1] ।। श्रीचिदंबरा तुज नमो ।। १ ।। तूं निजानंद बुध्दिप्रकाशक ।। स्मरणमात्रें देसी ज्ञानसुख ।। चिदंबरा तव पायीं मस्तक ।। ठेवोनि विनवितों एकोभावें ।। २ ।। श्रीचिदंबर दिव्य चरित्र ।। वरदग्रंथ करी निरंतर ।। कलिमलोपहतदुष्टनर[2] ।। श्रवणमात्रें पुनीत व्हावें ।। ३ ।। श्रुतिमाजीं जेंवि उपनिषद ।। मुक्तिदानीं सुप्रसिध्द ।। तेंवि मूळनाम स्वतःसिध्द ।। चिदंबर चतुरक्षर ।। ४ ।। तैसें चिदंबर स्वचरित्र ।। सुप्रसिध्द करी निरंतर ।। श्रवणमात्रें नारीनर ।। पावावे स्वमनोरथ ।। ५ ।। द्विजेंद्रासी मुनीश म्हणे ।। ऐका सुचरित्र एकोमनें ।। श्रवणमात्रें सर्व विघ्नें ।। दूरावतीं साधकांचीं ।। ६ ।। ज्याची कीर्ती शुध्दचंद्रिका[3] ।। भुवनत्रयीं जिची प्रकाश देखा ।। कर्णभूषण जी ब्रम्हादिका ।। जडजीवमोचना समर्थ ।। ७ ।। ज्याची सत्कीर्ति विलासिनी[4] ।। जिची अव्याहत गती त्रिभुवनीं ।। समर्थ जी जीवसंतरणी[5] ।। मनमोहन ब्रम्हादिकांचें ।। ८ ।। तो धर्मस्थापन लोकोध्दारण ।। करावया शिव येतो अवतरोन ।। नानावतारांचें कारण ।। इतुकेंचि जाणावें निर्धार ।। ९ ।। श्रीगुरूची कळा ऐसी ।। अंत नलगे ब्रम्हादिकांसी ।। उघड लीला निज भक्तांसी ।। दावी प्रेमेसी चिदम्बर ।। १० ।। कलियुगीं अवतार धरोनि ।। दावी सत्य युगाची राहणी ।। कलिराज पुढें हात जोडोनि ।। आज्ञा वंदोनि द्वारीं तिष्ठे ।। ११ ।। असोनि कलिजनांचा संग ।। न करी कोणाचा मनोभंग ।। अलिप्त राहोनि निःसंग ।। यथासांग दावी ब्रम्हकर्म ।। १२ ।। नित्य अपार यात्रादाटी ।। सर्व देशींचे जन भेटी ।। ज्याची इच्छा जैसी वसे पोटीं ।। तैशा गोष्टी सांगत ।। १३ ।। अंतरीचे हेतु[6] पुरवित ।। निश्चयें सांगतसे दृष्टांत ।। स्वप्नीं कांहीं पदार्थ देत ।। तोचि जागृतींत प्रगट दिसे ।। १४ ।। श्लोक ओव्या अभंग मंत्र ।। स्वप्नीं सांगत करुणाकर ।। ज्ञान जैसें होय सुस्थिर ।। तैसें अपार बोधितसे ।। १५ ।। प्रातःकाळीं होतां दर्शन ।। पुसे स्वप्नींचें वर्तमान ।। विस्मृती होता सांगे आपण ।। अनुभवखूण दावी

१. सुरासुरमान्य. २. कलिपापानें दूषित झालेले लोक. ३. शुभ्र चांदणें. ४. पसरणारी. ५. जिवास तारणारी. ६. इच्छा.

शिवचिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

ऐसी ।। १६ ।। सगुणब्रम्ह चिदम्बर ।। जो अंतरसाक्षी ईश्वर ।। लीला दावी अनंत अपार ।। पूर्णब्रम्ह स्वामी माझा ।। १७ ।। देशोदेशीची यात्रा येती ।। जैसी असे जयासी भक्ती ।। तैसी दावित तयाप्रती ।। उघड प्रचीती सर्वांसी ।। १८ ।। ऐसा लीलाधारी सर्वेश्वर ।। कलियुगीं स्वामी चिदम्बर ।। नित्य नूतन चमत्कार ।। दावी अपार यात्रेमाजीं ।। १९ ।। धनार्थियांसी देतसे धन ।। नानापरी कौतुक दावोन ।। डाळ देवोनि करितसे होन्न ।। करावें वर्णन कोठवरी ।। २० ।। विचित्र कळा नानापरी ।। निघे द्रव्य नारळाभीतरीं ।। डाळ तांदुळाचें सुवर्ण करी ।। लीलाधारी चिदम्बर ।। २१ ।। चमत्कार दावितसे नित्य नूतन ।। कोणासी धान्य देवोनि आपण ।। म्हणे देतसां आलियां अन्न ।। न सरे धान्य ते कधीं ।। २२ ।। जैसी जयाची वासना ।। तीच पुरवितसे जाणा ।। जैसी ज्याची उपासना ।। रूपें तैसीं धरितसे ।। २३ ।। विष्णुभक्तांसी विष्णुरूप ।। शिवभक्तांसी शिवस्वरूप ।। शक्ति गणेश मारुतीरूप ।। तत्तदुपासकां दावितसे ।। २४ ।। नृसिंहभक्त एक ब्राम्हण ।। छळावया आला दारुण ।। तेणें नृसिंहरूप दुरून ।। पाहतां लोटांगण घातलें ।। २५ ।। राव रंक ज्यासी समान ।। स्वामी दयाळू कृपाघन ।। सर्वां भूतीं समसमान ।। भक्तवत्सल श्रीचिदम्बर ।। २६ ।। नाना यात्रा नित्य दाटी ।। दर्शना येती जीवकोटी ।। त्या सर्वांसी देवोनि भेटी ।। निववी पोटीं चिदम्बर ।। २७ ।। पूर्णब्रम्ह लीलानाटकी ।। अवतार घेती कर्नाटकीं ।। दर्शना येती जार चोर बटकी[1] ।। लोककंटकें अपार ।। २८ ।। आनंदमूर्ती चिदंबर ।। विश्वकुटुंबी विश्वंभर ।। अठरा जाती अविंध[2] फकीर ।। सर्वांचें अंतर निववित ।। २९ ।। भाषापरत्वें नाना जन ।। फारशी अरबी भाषा छप्पन्न ।। ज्याचे त्यासी बुझवून[3] ।। करी समाधान सर्वांचें ।। ३० ।। ज्याचें स्वरूपासी नसे अंत पार ।। शुध्दब्रम्ह जें निर्विकार ।। चिदाकाश तें चिदंबर ।। मूर्तिमंत सगुण जाहला ।। ३१ ।। उघड दावितसे वर्तणूक ।। नाना प्रत्यय दावी कौतुक ।। अज्ञान जन कलियुगीं लोक ।। नोळखिती दृष्टी पाहोनि ।। ३२ ।।

शि
व
चि
द
म्ब
र

१. हलक्या दर्जाची स्त्री. (दासी) २. मुसलमान. ३. सांगून.

यात्रेसी येतां भक्त भाविक ।। त्यासी देता प्रसाद नारळ एक ।। तदुपास्य दैवत नैष्ठिक ।। नारळांत निघतसे ।। ३३ ।। कोणासी फळांत निघे गणपती ।। कोणासी शालिग्राम विष्णुमूर्ती ।। कोणा एकासी बाण पशुपती ।। सूर्यकांत निघत नारळांत ।। ३४ ।। कोणासी निघे मारुती ।। जैसी असे ज्याची प्रीती ।। त्याची पाहोनि निष्ठा भक्ती ।। तेचि मूर्ती निघतसे ।। ३५ ।। भाव देखोनि निर्मळ ।। कोणासी देतां पूगीफळ[1] ।। त्याचें उपास्य दैवत तत्काळ ।। बनतसे देख त्याचे हातीं ।। ३६ ।। कोणासी होय स्फटिकलिंग ।। नर्मदा गणपती बाण अभंग ।। पोफळी दिल्ही असतांही चांग ।। निज आराध्य देव होतसे ।। ३७ ।। कोणासी रुद्राक्ष देतां होय बाण ।। नारळ होय वृक्ष सुलक्षण ।। भक्त पूजा करिती लावोन ।। फळ येतां होन्न निघे त्यांत ।। ३८ ।। द्राक्ष देतां एका हातीं ।। तदर्ध बाण पशुपती ।। जाहले अर्ध निश्चिती ।। फळ राहिलें मृदुपणें ।। ३९ ।। पायातळीची मृत्तिका घेतां ।। मृत्तिकेचे कुंकू होय तत्त्वता ।। ऐशा अगाध अपार आयता ।। लीला दावी चिदंबर ।। ४० ।। व्याधिग्रस्त बहुत लोक ।। देशोदेशीचे येती देख ।। तयासी दर्शनेंचि सुख ।। आरोग्य तैसेचि होतसे ।। ४१ ।। कोणी गलत्कुष्टी रक्तपित्ती ।। ऐसे नाना रोगी सांगो किती ।। स्वामीपासी येतां रोगनिवृत्ती ।। प्रत्यय येती बहुतांसी ।। ४२ ।। मुके येवोनि वेद पठती ।। अंधाहातें वाचवी पोथी ।। पंगूसी बोलावितां धांवोनि येती ।। ऐसा कृपामूर्ती चिदंबर ।। ४३ ।। बधिरासी देतसे कर्ण ।। नपुंसकासी पुरुषत्व पूर्ण ।। वांझेलागी पुत्रसंतान ।। देतसे गुरूराण चिदम्बर ।। ४४ ।। वांझ स्त्री आणि वृध्दपण ।। भ्रतारही वृध्द मान ।। तयांसी देतसे पुत्रसंतान ।। आश्चर्य जन करिताती ।। ४५ ।। ऐसा स्वामी कृपाघन ।। त्याची अपार लीला वर्णी कोण ।। चमत्कार पाहती थोर लहान ।। अवतार पूर्ण चिदम्बर ।। ४६ ।। अवतारसामर्थ्ये करणी अघटित ।। ब्रम्हलेख मागें सारित ।। अपार कृत्य आपुलें दावित ।। न कळे मात देवादिकां ।। ४७ ।। ऐसा प्रत्यय नानापरी ।। चिदंबर दावित सृष्टीवरी ।। कीर्ती वर्णन कोठवरी

१. सुपारी.



शिवचिदम्बर

शि व चि द म्ब र

।। लिहिणार कोण ऐसा ।। ४८ ।। पत्र करितां धरित्रीसी ।। दौत समुद्र शाई ऐसी ।। लेखनी करोनि कल्पतरूसी ।। लिहितां शारदेसी पुरेना ।। ४९ ।। गुणानुवादस्य पारं न याति ।। ऐशा बोलिल्या सर्व श्रुती ।। तेथें मूर्ख मंदमती ।। गुण कीर्ती वानूं काय ।। ५० ।। गालवक्षेत्रीं येतां श्रीगुरू ।। ज्वरमारिकादि पीडा अपारू ।। तेणें तळमळित होते नारीनरू ।। तत्पुरप्रांतस्थ ।। ५१ ।। त्यासी पाहोनि करुणाकरू ।। कृपें द्रवला श्रीगुरू ।। आपण सर्व रोगभारू ।। घेतले सप्त दिन ।। ५२ ।। शय्येवरी निजतां रोगियापरी ।। दिसत होता भक्तकैवारी ।। शय्या सोडितां सर्व कर्म आचरी ।। निरोगियापरी चिदंबर ।। ५३ ।। यापरी सप्तरात्रपर्यंत ।। रोग दारुण सोसोनि समस्त ।। निरोगी होतां सर्व प्रांतस्थ ।। टाकितसे कृष्णेंत शय्येसी ।। ५४ ।। ऐसा लीलाधारी चिदंबर ।। सर्वांचे करोनि रोग दूर ।। निरामय आपण निर्विकार ।। नाना चरित्र दावितसे ।। ५५ ।। धर्मस्थापन लोकोध्दारण ।। करावया गिरिजारमण ।। भूवरीं अवतार घेवोन ।। अघटितचरित्र ।। करितसे ।। ५६ ।। श्रवणमात्रें पापहारक ।। असंख्य चरित्र मनोहारक ।। छप्पन्न वर्षेपर्यंत गुरुनायक ।। भूवरीं दाखवि ।। ५७ ।। भूतळीं असतां चिदंबर ।। सुखी होते सर्व नारीनर ।। मार्यरिष्टादि दुर्वार्ता तर ।। कोणींही न ऐकिली ।। ५८ ।। काळकाळीं पर्ज्यन्य वर्षत ।। सुभिक्ष होते देश स्वस्थ ।। व्युत्क्रममरणवृत्तांत[1] ।। कोणींही न ऐकिला ।। ५९ ।। वेदपाठी सर्व ब्राम्हण ।। स्वकर्माचरणीं धुरीण ।। कित्येक श्रौत स्मार्त परायण ।। जाहले ते वेळीं ।। ६० ।। स्नानसंध्या जपानुष्ठान ।। पुराणश्रवण भजन पूजन ।। इत्यादि सत्कर्मी कालहरण ।। करित होते ध्दिज समस्त ।। ६१ ।। कित्येक वेदान्तविचारीं निष्णात ।। कित्येक जाहले श्रीगुरुभक्त ।। स्वामिशिक्षेसी भिवोनि समस्त ।। निज दुर्वृत्त गुण सोडिती ।। ६२ ।। कोणाचाही मनोभंग ।। न करितां सर्वांतरंग ।। दुर्वृत्तासी शिक्षा भोग ।। देत होते अपार ।। ६३ ।। दुराचार करोनि रात्रीसी ।। नृप एक प्रभातीं आला दर्शनासी ।। सर्वज्ञ भेट न देतां त्यासी ।। प्रायश्चित्त देववी शिष्याहातें ।। ६४ ।। शिष्य

१. विपरीत मरणवृत्तांत.

शि व चि द म्ब र

देती नृपासी शिक्षण ।। निज कर्म स्वमुखें उच्चारोन ।। प्रसादप्रदक्षिणा[१] तीन ।। करितां पावन होसी तेणें ।। ६५ ।। तोही नृप आज्ञेप्रमाण ।। प्रदक्षिणा करोनि तीन ।। घेई श्रीगुरुदर्शन ।। पावोनि अंतरीं पश्चात्ताप ।। ६६ ।। ऐसेंचि एक व्यभिचारिणी ।। संतान इच्छुनी वसता श्रीचरणीं ।। दयाळु तिचे दुर्गुण सोडवुनी ।। पुत्र देवोनि तोषवित ।। ६७ ।। हे वृत्तांत ऐकतां सर्व जन ।। श्रीगुरुजवळी राहती भिवोन ।। कोणीही आचरितां दुराचरण ।। त्यापुढें प्रगटोन उभा राहत ।। ६८ ।। ऐशा अगाध लीला दावित ।। खेळे सर्वज्ञ श्रीदीक्षित ।। चिदंबर असतां जागृत ।। निंदकही क्षितींत लोपले ।। ६९ ।। निंदकासही सहज ।। शिक्षा देतसे स्वामिराज ।। कलबुरगीपुरीं एक द्विज ।। होता त्याचें चरित्र परियेसा ।। ७० ।। लोक स्तवितां चिदंबरासी ।। तो विश्वनाथ खवळोनि मानसीं ।। अपार निंदी श्रीगुरूसी ।। निर्निमित्त[२] दुर्वृत्तपणें ।। ७१ ।। देखोनि सज्जनांचे आचार ।। कुजनास वाटे त्रास फार ।। कानीं पडतां भगवच्चरित्र ।। सहज संतापतो दुर्जन ।। ७२ ।। कीं देखोनि राजहंसास ।। मनांत चरफडी वायस[३] ।। नातरी पाहतां पतिव्रतेस ।। परम संतापत जारिणी ।। ७३ ।। कृष्णमहिमा ऐकतां सबळ ।। क्रोधें खवळे जेंवि कंस खळ ।। कीं हरिभक्त प्रल्हादबाळ ।। दुष्ट दैत्यासी आवडेना ।। ७४ ।। सत्त्वगुणी जो सुबुध्द ।। त्याचें वचन ऐकतां बध्द ।। की सहज पाहतां हरिणवृंन्द ।। खवळे व्याध घातुकपणें ।। ७५ ।। ऐसा तो खळ विश्वंभर ।। स्वामीसी निंदित असता अपार ।। त्याचे उध्दारार्थ श्रीचिदंबर ।। चित्रचरित्र दावित ।। ७६ ।। एके दिवशीं तो ब्राम्हण ।। ग्रामांतरा जात होता जाण ।। अर्ध क्रोश मार्ग चालतां क्षण ।। त्यासी निद्रा आली असह्य ।। ७७ ।। एका वृक्षातळीं मुहूर्तमात्र ।। निजोनि तो उठला सत्वर ।। तंव दिसूं लागलें वन अघोर ।। गगनचुंबित वृक्ष जेथें ।। ७८ ।। व्याघ्र वारण[४] भल्लूक ।। वराह अजगर जंबूक ।। नानाविध श्वापद भयानक ।। संघशाा दिसूं लागले ।। ७९ ।। घोरवन पाहतां तो ब्राम्हण ।। प्राणापायभयें भिवोन ।। क्षणोक्षणीं मूर्च्छित

१. वाड्यास प्रदक्षिणा. २. कारण नसतांना. ३. कावळा. ४. हत्ती.




शिवचिदम्बर

पडोन ।। होतसे सावध मागुती ।। ८० ।। भय पावोनि उत्कट ।। शोक करूं लागला अचाट ।। म्हणे काय समय दुर्घट ।। मी कोठचा आलों कोठें ।। ८१ ।। माझी पुरी राहिली कोठें ।। हें वन कोठुनी आलें मोठें ।। आंता दयाळू कोण मज भेटे ।। कवण्या वाटे जाऊं पुढें ।। ८२ ।। विचार न सुचतां पुढें ।। भयातुर दीर्घ स्वरें रडे ।। इतुक्यांत वनचर आले पुढें ।। रोदनशब्द पडतां कानीं ।। ८३ ।। तिहीं विचारितां ब्राम्हण ।। सविस्तर सांगे स्ववर्तमान ।। मग त्यासी करुणा येवोन ।। म्हणती भिऊं नको धीर धरी ।। ८४ ।। येथुनी अर्ध क्रोशांतरीं ।। बनवासी नामें असे एक पुरी ।। तेथें पोहोंचवितो ये आम्हांसरी ।। म्हणतां त्यांसरी चालिला ।। ८५ ।। त्यासवें जातां विप्र गांवासी ।। तेथें पाहतां ग्रामजनांसी ।। पावला समाधान मानसीं ।। स्ववृत्त सर्वांसी सांगत ।। ८६ ।। इतुक्यांत तेथील जन ।। चिदंबरदर्शना कारण ।। निघाले होते त्यांसवें ब्राम्हण ।। गुरुपुरासी पातला ।। ८७ ।। श्रीगुरू पाहतां विश्वंभरासी ।। मागें सारोनी सर्व यात्रिकांसी ।। म्हणे भिउं नको तूं मानसीं ।। भूतादि बाधा नसे कांहीं ।। ८८ ।। तंव जनकामी एके समयीं ।। व्यंकटेशप्रतिमा सांपडली पाही ।। ती न पूजिता तवजनकेही ।। वृक्षातळी निक्षेपिंली ।। ८९ ।। त्यादेवताक्षोभे तुजसी ।। ही दशा घडली परीयेसी सत्वर जावोनि गांवासी ।। मुर्तीअर्चा करवी बा ।। ९० ।। आलस्य न करी बा येथुनी ।। आजपासोनि चवथे दिनीं ।। घरासी जाई त्वरा करोनि ।। नातरी पुढें अनर्थ दिसे ।। ९१ ।। ऐसें सांगोनि श्रीगुरू ।। त्यासी देत उत्तम वारू ।। तोही होवोनि फार घाबरू ।। वंदोनि श्रीगुरूसी निघाला ।। ९२ ।। रात्रंदिन वाट चालत ।। चतुर्थ दिनी होतां निशीथ[1] ।। पातला निज गृहाप्रत ।। हांक जोडित पितृनामें ।। ९३ ।। पुत्रशब्द ऐकतां तात ।। सावध होवोनि चिंतित ।। कीं माझा पुत्र व्याघ्रभक्षित ।। आला येथें भूत होवोनि ।। ९४ ।। आंत बैसोनि सर्व वृत्तांत ।। पुत्रमुखें जनक ऐकत ।। मग होवोनि हर्षयुक्त ।। द्वार उघडोनि भेटला ।। ९५ ।। पुत्राचें घेवोनि आलिंगन ।। पिता करितसे

१. मध्यरात्र.

रुदन ।। इतुक्यात माता आली धांवोन ।। मिठी मारोन रडतसे ।। ९६ ।। बा रे पुत्रराया भेटलासी ।। तरी बरवें केलें गुणराशी ।। नातरी उदईक तव कांतेसी ।। येत होती अवलक्षण दशा ।। ९७ ।। सर्वांसी संबोखोनि विश्वंभरू ।। व्यंकटेशमूर्ती काढोनि बाहेरू ।। अर्चा करोनि प्रीतिपुरःसरू ।। चिदंबरीं विश्वास ठेवित ।। ९८ ।। त्या दिवसापासोनी ।। निंदास्वभाव सोडोनि ।। आला स्वपरिवार घेवोनि ।। श्रीगुरुदर्शनार्थ भक्तीनें ।। ९९ ।। यापरी निंदकाचेही मनोभंग ।। न करितां सर्वांतरंग ।। शासन करोनि भक्ती अभंग ।। देतसे श्रीचिदंबर ।। १०० ।। कलियुगीं चिदंबर ।। भक्तवत्सल करुणाकर ।। मूर्तिमंत हाचि श्रीशंकर ।। भक्तसंकट निवारितो ।। १ ।। ज्यासी पाहिजे स्वहित ।। तिंहीं भजावा श्रीदीक्षित ।। भजनमात्रें निजपद देत ।। म्हणे चिदम्बरकिंकर ।। २ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ ।। यास्तव ऐका श्रोते समस्त ।। अष्टचत्वारिंशोऽध्याय गोड हा ।। १०३ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे मोक्षवैभवखण्डे वृक्षमूले व्यंकटेशमूर्तिदर्शनादि नानाचरित्रवर्णनं नाम अष्टचत्वारिंशोऽध्यायः ।। ४८ ।। ओवीसंख्या १०३ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।





शिव चिदम्बर

## बन्धितपतिव्रतायै चिदम्बरदर्शनम्




पातिव्रत्यपुण्य मजजवळी । कांहीं असेल गुरुमाउली । मज भेट देई येवेळी ः इत्यादी स्मरत असता अंतरी ।
श्रीगुरु प्रकटला माझघरी । अवचित दृष्टीपुढे

चिदम्बरचरित्र

अध्याय एकोणपन्नासावा

शि व चि द म्ब र

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। नमोजी चिदम्बर कल्पतरू ।। भक्ताभीष्ट द्यावया सत्वरू ।। तुजसमान जगीं कोण थोरू ।। म्हणोनि सुंदरांघ्रीं शरण आलों ।। १ ।। सांगे मुनीश्वर विप्रासी ।। चिदम्बरकथा प्रेमेंसी ।। जो भावें सादर श्रवणासी ।। सर्व सिध्दी त्यासी लाधती ।। २ ।। एक्या समयीं श्रीगुरु ।। मुरगोडीं असतां करुणाकरु ।। नव्वद वर्षांचा एक द्विजवरू ।। आला दर्शनासी लग्नेच्छुक ।। ३ ।। त्यासी पाहतां पुसे दयानिधी ।। काय इच्छुनी आलासी सुबुध्दी ।। सांग म्हणतां विप्र मनामधीं ।। लाजोनि मौनावला ।। ४ ।। स्वामी पुसतसे वारंवार ।। काय इच्छा सांगपा सत्वर ।। वृध्द लाजोनि मौनेंचि स्थिर ।। बैसला सभेसी न्यहाळीत ।। ५ ।। स्वामी पुसे कीं विवाह इच्छिसी ।। सांग तूं न धरितां लज्जेसी ।। वृध्द म्हणे काय सांगू सर्वज्ञासी ।। स्वामी जाणसी सर्वांतरंग ।। ६ ।। श्रीगुरू म्हणे न करि चिंता ।। लग्न करितों तुझें तत्त्वतां ।। दृढ विश्वास असो दे चित्तां ।। ऐकपां वचन एक माझें ।। ७ ।। येथोनि एक योजनावर ।। मुनिवल्ली नामक असें नगर ।। तेथें नारायण नामा वसतो विप्र ।। दयाळू शिवभक्त धार्मिक ।। ८ ।। द्वादश वर्षात्मक त्याची कन्या ।। असे लावण्यवती द्विजवर्या ।। माझिया आज्ञें तेथ जावोनिया ।। मागतां कन्या देतो तुजसी ।। ९ ।। मग खर्चासी देतों द्रव्य ।। लग्न करोनि सुखें गार्हस्थ्य ।। आचरी म्हणतां श्रीगुरुराय ।। द्विज अपार तुष्टला ।। १० ।। स्वामीवचन ऐकतां निजांगें ।। वृध्दही तरुणापरी हर्षयोगें ।। ब्राम्हण पळतसें लागवेगें ।। मुनिवल्लिसी तेघवां ।। ११ ।। नारायणगृहासी जंव ।। ब्राम्हण जाय कन्यार्थी तंव ।। कन्या पावलीसे पंचत्व ।। मातापितर होते शोकाक्रांत ।। १२ ।। त्यासमयीं जावोनि विप्र ।। कन्या मागे गुरुआज्ञेवर ।। नारायण बोले शोकातुर ।। भ्रांत निर्धार तूं अससी ।। १३ ।। कन्येची काय झालीसे दशा ।। वृथा गुरुआज्ञा सांगसी पिशा ।। जा म्हणतां न करितां निराशा ।। वृध्द हांसोनि बोलतसे ।। १४ ।। चिदम्बरवचन नोहे मिथ्या ।। वस्त्रें झांकोनि ठेवी कन्या ।। सत्वर येतों स्वामीसी पुसोनिया ।। न करी संस्कार तोंवरी ।। १५ ।। ऐसें बोलोनि तो ब्राम्हण ।। आला स्वामीपासी धांवोन ।। विप्र सांगतां सर्व वर्तमान ।। स्वामी हंसोन

शि व चि द म्ब र

बोलत ॥ १६ ॥ घेवोनि जाई ही विभूति ॥ कन्यामुखीं घाली पां कन्यार्थी ॥ सजीव होईल निश्चयें मागुती ॥ म्हणोनि निरोपिती श्रीगुरु ॥ १७ ॥ विभूती घेवोनी तो ब्राह्मण ॥ कन्यासदना आला धांवोन ॥ शवावरचें वस्त्र उकलोन ॥ विभूती मुखीं घालित ॥ १८ ॥ विभूती वदनीं पडतां ॥ कन्यकांगीं भरोनि चेतनता ॥ उठोनि बैसली तत्त्वता ॥ विप्रचित्तां हर्षवित ॥ १९ ॥ म्हणे विप्र करोनि तांतडी ॥ कासया उशीर आतां लग्न मांडी ॥ विप्रवाणी ऐकतां धडपुडी ॥ माता चित्तीं गडबडली ॥ २० ॥ एकांतीं विचारी वल्लभासी ॥ वृध्दासी कन्या देतां कैसी ॥ तंव पती बोले कांतेसी ॥ वांचली ज्याच्या प्रयत्नें ॥ २१ ॥ त्याचें वचन जरी मोडिसी ॥ क्षेम नोहे तव कन्येंसी ॥ यास्तव कन्यादानविधीसी ॥ करोनि देईं प्रीतचित्तें ॥ २२ ॥ येणेंपरी कांतेसी संबोखोनि ॥ म्हणे विप्रासी वेगें जावोनि ॥ येई लग्नार्थ द्रव्य घेवोनि ॥ असे अवकाश चार दिन ॥ २३ ॥ यापरी वाङ्निश्चय होतां ॥ द्विज चित्तीं हर्ष न मावतां ॥ आला श्रीगुरुपासी मागुता ॥ निवेदावया वृत्त सर्व ॥ २४ ॥ मग श्रीगुरूने दिधले द्रव्य ॥ लग्न करोनि जरठवर्य ॥ सुखें करितां गार्हस्थ्य ॥ जाहला पुत्र एक गुरुकृपें ॥ २५ ॥ ऐसें अघटित महिमान ॥ श्रीगुरूचें वर्णूं शके कोण ॥ ज्यावरी श्रीगुरुकृपा पूर्ण ॥ तोचि वर्णील यथामती ॥ २६ ॥ एके दिवशीं अरण्यांत ॥ होता एक शूद्र फिरत ॥ तंव व्याघ्रें येवोनि आकस्मात ॥ कंठ धरियला तयाचा ॥ २७ ॥ तंव तो शूद्र घाबरोनि ॥ चिदम्बरासी आठवी मनीं ॥ गुरुस्मरणमात्रें भिवोनि ॥ कंठ सोडोनि पळाला व्याघ्र ॥ २८ ॥ रक्त वाहत होतें धडाधडा ॥ पांथस्थ त्यांसी पाहोनि पुढा ॥ निचेतन पडला होता निधडा ॥ उचलोनि आणिती स्वामीपासी ॥ २९ ॥ कृपादृष्टीनें पाहोनि त्यासी ॥ सांगती श्रीगुरु ग्रामस्थांसी ॥ औषधोपाय करोनि यासी ॥ आरोग्य करोनि पाठवा ॥ ३० ॥ श्रीगुरुआज्ञेवरूनि ग्रामस्थ ॥ उपचार करोनि बहुत ॥ आरोग्य केलें आठ दिवसांत ॥ मग तो आला दर्शनासी ॥ ३१ ॥ त्यासी पाहोनि श्रीगुरुनायक ॥ देत दोन खारिका कल्याणदायक ॥ मग तो निरोप घेवोनि देख ॥ स्वस्थानासी पातला ॥ ३२ ॥ खारीक फोडी भक्षणार्थ जंव ॥ आतुनी होन्न




शिवचिदम्बर

निघाले तंव ।। त्यापासोनि बहु वैभव ।। भोगूं लागला श्रीगुरुकृपें ।। ३३ ।। पदोपदीं चित्रलीला ।। दावितसे स्वामी सर्वांला ।। तें सविस्तर सांगावयाला ।। न चले मति ब्रम्हादिकां ।। ३४ ।। एके समयीं एक भूसुर ।। मागतां साधारण एक वस्त्र ।। स्वप्नीं देवोनि दिव्य पीतांबर ।। जागृतींत तयासी तोंषवी ।। ३५ ।। अगाध चिदंबरलीला ।। किती म्हणोनि सांगूं तुम्हाला ।। स्वयें कैलासनाथ अवतरला ।। जगदुध्दार करावया ।। ३६ ।। एक होता शूर शिलेदार ।। दारिद्र्याने होवोनि बेजार ।। आला दर्शनार्थ सत्वर ।। सुखार्थी श्रीगुरूचें ।। ३७ ।। त्यासी पाहतां बोले श्रीगुरू ।। जरी सुखार्थ आलासी येथवरू ।। अंतरीं असेल दृढ निर्धारू ।। तरीच राहवें स्वस्थपणें ।। ३८ ।। जंव देईन निरोप तुजसी ।। तेव्हांचि जावें स्वस्थानासी ।। श्रीगुरुवचन ऐकोनि विनयेसी ।। तथास्तु म्हणोनि राहिला ।। ३९ ।। प्रत्यही येत होता भेटीसी ।। पदरमोड करोनि योगक्षेमासी ।। चालवित राहिला स्वामीपासी ।। दोन मास येणेंपरी ।। ४० ।। जवळीचें द्रव्य सरलें ।। स्वामीचा निरोप न मिळे ।। मग जवळचें वस्त्रपात्र विकलें ।। तेणें योगक्षेम चालवी ।। ४१ ।। शिलेदार जाहला चिंतातुर ।। म्हणे निरोप नेदी सर्वेश्वर ।। दिवस जाहले तीन मास तर ।। खर्चासी लेशही नसे द्रव्य ।। ४२ ।। कुटुंबाचें काय वर्तमान ।। येथें कैसें करूं अश्वरक्षण ।। पुढें माझें उदरंभरण ।। कवण्यापरी चालेल ।। ४३ ।। फार चिंतातुर होवोन ।। स्वामीसी करितसे वंदन ।। यासी पाहोनि श्रीगुरुराण ।। मौन धरोनि बैसला ।। ४४ ।। दागिने सर्व विकले मग ।। वैरणमात्रें ठेविला तुरंग[१] ।। अश्व जाहला क्षीणांग ।। तेणें तो जाहला चिंताक्रांत ।। ४५ ।। षण्मास लोटले येणेंपरी ।। शिलेदार तळमळी अहोरात्रीं ।। निरोप नेदी भक्तकैवारी ।। आजवरी कवण्या गुणें ।। ४६ ।। ऐसें चिंतित असतां शिलेदार ।। स्वामी ओळखोनि त्याचें अंतर ।। जवळीं बोलवित सत्वर ।। आज निरोप असे तुजसी ।। ४७ ।। याच क्षणीं निघोनि जाईं ।। अवसर नसे क्षणमात्रही ।। आज्ञा म्हणोनि तो स्वारही ।। निघाला पायीं वंदोनिया

१. घोडा.

शिव चिदम्बर

शिव चिदम्बर

|| ४८ || आषाढमास पर्जन्य फार || पडत होता घोर समीर[१] || दिवस उरलासे घटिकामात्र || निघाला स्वार त्या समयीं || ४९ || क्रोशमात्र मार्ग चालतां || रात्रिसमय आला तत्त्वता || अरण्यांत एक देवालय पाहतां || वस्तीं करितां राहिला || ५० || अश्व बांधावया खुंटी || मारूं लागला भूमिपृष्ठीं || तेथेंचि निधी देखोनि दृष्टीं || वेगें खणोनि घेतला || ५१ || सर्वेचि घालोनि अश्वावरी || मागुती आला श्रीगुरुपुरीं || स्वामी त्यासी सर्वेचि माघारी || पाठवितसे संबोखोनि || ५२ || ऐसें अघटित चरित्र || प्रत्यहीं होतसे अपार || स्मरतां रोमांच उठती अंगावर || कोठवर सांगूं तुम्हांसी || ५३ || विस्मृति पडतसे क्षुधे तृषेची || गोडी लागतां चरित्राची || यथामति मागुती तेंची || चरित्र तुम्हांसी सांगूं ऐका || ५४ || चिदम्बराप्रीत्यर्थ द्विजसंतर्पण || चालिलें असतां एक शिष्ट ब्राम्हण || घेऊ नये परान्न म्हणून || स्वयंपाक करून जेविला || ५५ || तंव त्याचें उपास्य दैवत || नरसिंह येवोनि अंगांत || चिदम्बरस्तुती करोनि बहुत || प्रसाद सेवोनि गुप्त जाहला || ५६ || ज्या प्रसादा देवादिक || दुर्लभत्वा मानोनि सकौतुक || गुप्त रूपें येवोनि सेविती देख || त्यासी परान्न म्हणे कोण || ५७ || अनंतशयनाचा भक्त नृपाळ || सर्वे दहा सहस्त्र दळ || घेवोनि दर्शनार्थ केवळ || निघतां तत्काळ प्रगटला तेथें || ५८ || सर्वांसी स्वामी भेट देती || चार दिवस तेथें राहती || नृपासी हर्ष देवोनि चित्तीं || परतवोनि जाहले गुप्त || ५९ || वेंकटेशगिरींत एक ब्राम्हण || दोन वर्षे करितां अनुष्ठान || त्यासी निरोपी लक्ष्मीरमण || चिदम्बराकडे जावया || ६० || वेंकटेशआज्ञे तो ब्राम्हण || मागावया बाराशें होन्न || श्रीगुरुजवळीं त्वरा करोन || आला गुरुनवपुरासी || ६१ || श्रीगुरुची घेवोनि भेटी || सांगे निज दृष्टांत उठाउठी || मजवरी करोनि कृपादृष्टी || होन्न देई बा द्वादश शत || ६२ || स्वामी म्हणे त्या द्विजासी || मी गरीब ब्राम्हण परियेसी || बाराशें होन्न तुजसी || देवूं सांगपां कोठूनी || ६३ || दिवस जाहला दोन प्रहर || स्नान करोनि जेवा अगोदर

१. वारा.




शिवचिदम्बर

|| जें देईन शक्त्यनुसार || तेणें पावावा संतोष || ६४ || द्विज म्हणे आधीं द्यावें होन्न || मग सुखें करीन भोजन || मागुती करावया अनुष्ठान || जातों गिरीसी नातरी || ६५ || अत्याग्रह करीत असतां विप्र || नानापरी संबोखोनि चिदम्बर || भोजन करवोनि सत्वर || पाठविती बिन्हाडासी त्या दिनीं || ६६ || अति यत्न केलिया त्या दिवशीं || आंत न सोडिती स्वामीशिष्य त्यासी || मध्यान्हीं दुसरे दिवशीं || एकांतीं भेटले श्रीगुरू || ६७ || पुनरपि विप्र मागे होन्न || स्वामी त्याचा तांब्या हिरोन || बलात्कारें विहिरींत टाकोन || म्हणती घेवोन येई सत्वर || ६८ || विप्र होवोनि भयातुरू || म्हणे विहिरींत कैसा उतरू || प्राण जाईल माझा निर्धारू || काढवोनि देववा आपण || ६९ || स्वामी म्हणे जळ आहे अल्प || उतरतांचि लाभ असे अनल्प || व्यर्थ न करितां दुःसंकल्प || विश्वासें आंत उतरी बा || ७० || मग धैर्य करोनि ब्राम्हण || विहिरींत उतरला जाण || पाणी होतें कटिप्रमाण || मग शोधोनि घेतलें स्वपात्र || ७१ || हातीं जंव घेत पात्र || होन्न भरले होते तावन्मात्र || वरी येवोनि मोजतां क्षणमात्र || गणित जाहले बारा शतक || ७२ || तंव तो आनंदें ब्राम्हण || स्वामीपायीं करितसे वंदन || स्वामी त्यासी करोनि सांतवन || वर देवोन पाठवी || ७३ || मनोरथ होतां परिपूर्ण || विप्र हर्षे पावला स्वसदन || ऐसें श्रीगुरूचें महिमान || होतसे लोकोत्तर प्रत्यहीं || ७४ || पदोपदीं चित्र चरित्र || दावोनि खेळत श्रीचिदम्बर || वर्णन करावें कोठवर || अल्पमती मानवें || ७५ || एकाचे नेत्रद्वयीं || वडस वाढले होते पाही || जंव सेवेसी राहिला स्वामीपायीं || वडस जाऊनि आले नेत्र || ७६ || ऐका आणीक चरित्र सरस || शंकरदीक्षितलग्ना वेंकटेश || आला होता म्हणोनि सप्त दिवस || यत्नेंही नुघडे देवद्वार || ७७ || आठवे दिवशीं श्रीवेंकटेश || स्वप्नीं द्वार उघडी म्हणे बावास || दीक्षितां घरीं लग्नकार्यास || गेलों होतों आजवरी || ७८ || दुसरे दिवशीं उघडितां द्वार || सहज उघडलें सत्वर || दिव्य गंध पुष्प तुळसी हार || देवावरी शोभत || ७९ || अगाध चरित्र श्रीगुरूचें || कवण वर्णूं शके वाचें || वचनमात्रें श्रीगुरूचें || विधवागर्भ विराला




शिवचिदम्बर

शि व चि द म्ब र

।। ८० ।। दुष्कर्मे विधवा गर्भ धरी ।। सात मास ती होतां अंतुरीं[1] ।। पश्चात्ताप पावोनि भारी ।। एकांतीं भेटली श्रीगरूसी ।। ८१ ।। पश्चात्तापें स्वदुष्कर्म सर्व ।। सांगतां तिणें श्रीगुरुराव ।। नसे गर्भ नाभी म्हणतां अपूर्व ।। जहाले ऐका तत्क्षणीं ।। ८२ ।। गर्भ विरोनि गेले ।। पोट पाठीसी लागलें ।। आश्चर्ये तिणें वंदिले ।। भावें चरण श्रीगुरूचे ।। ८३ ।। शिरहट्टीपुरीं एक वैष्णव ।। होता निंदक दुःस्वभाव ।। त्याचिया कांतेचा भक्तिभाव ।। होता सर्वोत्तम श्रीगुरुपदीं ।। ८४ ।। दोघांचि संगती पाहतां ।। ऐसें वाटे प्रेक्षकचित्ता ।। सुवर्ण लोह एकत्र घडतां ।। दिसे केउता त्यापरी ।। ८५ ।। कीं राजहंस आणि वायसा[2] ।। संगती घडली कीं सहसा ।। नातरी अजापाळ[3] आणि विद्वांसा ।। मैत्री सहसा योजिली ।। ८६ ।। कीं निवडुंगासी कल्पवल्ली ।। दुर्विधिबळें[4] वेष्टिली ।। कीं यवना हातीं सांपडली ।। सहज येऊनि कामधेनू ।। ८७ ।। नातरी राक्षसा हातीं ।। सांपडली कीं पद्मिनी युवती ।। ऐसें त्या दुष्टाचे सोबती ।। भक्तिमतीसी घडलीसे ।। ८८ ।। असे बाईचे मानसीं ।। जाणें चिदम्बरदर्शनासी ।। प्रेम विलसे रात्रंदिवशीं ।। परी पतिमानसीं द्वेष वसे ।। ८९ ।। स्वामीदर्शनासी जातें म्हणोनि ।। पतीसी तिणें केली विनवणी ।। तंव तो पती क्रोधावोनि ।। म्हणे कामिनी ऐक गोष्ट ।। ९० ।। अज्ञानें बोललीस ये वेळीं ।। त्याविषयीं क्षमा केली ।। यापुढें अशी बोलसी बोली ।। शिक्षा असह्य पावसील ।। ९१ ।। आम्ही असो पूज्य सद्वैष्णव ।। आम्हां विरुध्द तो असे शैव ।। त्याचे दर्शनें दोष असे यास्तव ।। यापुढें ऐसें न बोली ।। ९२ ।। पतिवचन ऐकोनि ती चित्तीं ।। उदास होवोनि करी खंती ।। ऐसें कृचित्काळ लोटतां एकांतीं ।। पुसे मागुती पूर्ववत ।। ९३ ।। मागुती तो पती पापिष्ठ ।। तीसी मारूं जातसे उध्दट ।। पतिव्रता न सोसोनि कष्ट ।। क्षमा मागत वंदोनिया ।। ९४ ।। ऐसें कृचित्काळ लोटतां ।। स्वामी आला शिरहट्टीसी आयता ।। चित्तीं झुरे ती पतिव्रता ।। दर्शन कैसेंनी घडेल ।। ९५ ।। स्वामी येतां निजपुरासी ।। धूर्त तो सांगे निज सतीसी ।। जरी गुप्त

शि व चि द म्ब र

१. गर्भिणी. २. कावळ्याची. ३. धनगर. ४. दुर्दैवानें.

दर्शनार्थ तूं जासी ।। प्राणां मुकसी सांगतों ।। ९६ ।। तेथेंच स्वामी कांहीं दिवस ।। चरित्र दावित करी निवास ।। समाधान नसे तिचे चित्तास ।। म्हणे मज कैसें दर्शन घडे ।। ९७ ।। काय असेल माझें दुर्दैव ।। कैसा पती मिळाला दुःस्वभाव ।। कोटि जन्मीचें पुण्य सर्व ।। खर्चितांही न घडें दर्शन ।। ९८ ।। तैसा दयाळू सदाशिव ।। जवळीं आलासे महादेव ।। काय त्याचें सद्वैष्णवत्व ।। द्वेषस्वभाव पोटीं ठेवोनि ।। ९९ ।। ऐसें विचारी इतुक्यांत ।। शेजारी आले श्रीगुरुनाथ ।। दर्शनार्थ निघाली ती गुप्त ।। पश्चिम द्वारें तेधवां ।। १०० ।। तेथेंचि आला निजनाथ ।। कांतेसी पाहतां कोपाक्रांत ।। ताडन करोनि अत्यंत ।। घरांत कोंडोनि ठेविलें ।। १ ।। पतिव्रता श्रीगुरूसी ।। प्रेमभावें आळवी दिवानिशीं ।। पराधीन मी मज कैसी ।। भेट देसी श्रीगुरुराया ।। २ ।। पातिव्रत्यपुण्य मजजवळीं ।। कांहीं असेल तरी गुरुमाउली ।। मज भेट देईं येवेळीं ।। दयाळे चिदम्बरमाते ।। ३ ।। इत्यादि नानापरी ।। स्मरत असतां अंतरीं ।। श्रीगुरू प्रगटला माजघरीं ।। अवचित दृष्टीपुढें ।। ४ ।। म्हणे अवो माते न करी चिंता ।। तुजसी घेवोनि तव भर्ता ।। आमुचे गांवा येतो तत्त्वतां ।। धीर धरी चित्तीं सप्त दिवस ।। ५ ।। ऐसें बोलोनि श्रीगुरुनाथ ।। सर्वेंचि जाहले तेथें गुप्त ।। पतिव्रतेनें केला प्रणिपात ।। दिव्य रूप पाहोनि स्वामीचें ।। ६ ।। दृष्ट रूप चित्तीं ध्यात ।। सती राहिली घरीं स्वस्थ ।। स्वामी पातले हुब्बळ्ळीप्रत ।। पुढें अवचित दुष्काळ पडला ।। ७ ।। घरचें सर्व द्रव्य सरलें ।। पोटभरी अन्न दुर्लभ जाहलें ।। वैष्णव रडे दैवबळें ।। काय करूं म्हणे या वेळीं ।। ८ ।। तव पतिव्रता सुमंद हासें ।। मधुरोत्तरें बोलतसे ।। विश्वंभर श्रीदीक्षित असे ।। कासया करितां अन्नचिंता ।। ९ ।। आपण जावें त्याचे दर्शनासी ।। दर्शनमात्रें सुख तुम्हासी ।। होय भरवसा मानसीं ।। व्यर्थ क्रोधवश होऊं नका ।। ११० ।। कांतावचन पडतां कानी ।। आचार्य भारी कोपला मनीं ।। कुशब्दें बहु ताडोनि ।। म्हणे कासया भेटी इच्छिसी ।। ११ ।। त्याचें दर्शन घेऊं नये आम्ही ।। तरी तुज शिक्षा देणें असे पाही ।। एतदर्थ




शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

जातों त्याठायीं ।। दर्शननिमित्त करोनिया ।। १२ ।। हातीं घेवोनि रज्जूविळा[1] ।। म्हणे अबले ऐक माझे बोला ।। तेथें कांहीं जरी न मिळे मजला ।। येणेंचि तुजला मारितों ।। १३ ।। ऐसें बोलोनि तो ब्राम्हण ।। हुब्बळ्ळीसी क्रोधें निघोन ।। जाय तेथें असंख्य यात्राजन ।। यासी दर्शन न घडें सत्वर ।। १४ ।। सर्वांचीं नावें लिहोन ।। भेट करविती आंत नेवोन ।। तैसे त्यासि तिसरे प्रहरीं जाण ।। आंत नेवोनि भेटविती ।। १५ ।। न करी भावें तो वंदन ।। तरी स्वामी हांसोनि आपण ।। बोले त्यासी जवळीं बोलावून ।। स्वयंपाका आपणां उशीर झाला ।। १६ ।। शेर डाळ तांदूळ देवोनि आचार्यासी ।। म्हणे खिचडी करोनि जेवा वेगेंसी ।। अर्ध उरेल ते नेवोनि घरासी ।। कांतेसीही प्रसाद द्यावा ।। १७ ।। तथास्तु म्हणोनि ब्राह्मणें ।। पाक करोनि भक्षिला स्वस्थपणें ।। अर्ध ठेविला पत्नीकारणें ।। सुखें निजला रात्रीसमयीं ।। १८ ।। प्रभातीं आला श्रीगुरूजवळी ।। म्हणे निरोप द्यावा मज ये वेळीं ।। जातों म्हणतां श्रीगुरुमाउली ।। वंदोनि म्हणें जावें आतां ।। १९ ।। कांहीं न देतां लीलाधारी ।। निरोप देतां क्रोधावोनि आचारी ।। म्हणे पापिणी मज फसविलें भारी ।। माझें कारण काय होतें ।। १२० ।। आतां दुर्वृत्तेसी सत्वर ।। जीवेंचि मारूं म्हणत निर्धार ।। निघतां तंव बोले विश्वंभर ।। प्रसाद मात्र द्यावा कांतेसी ।। २१ ।। आचार्य न बोलतां कांहीं ।। क्रोधावेशें गांवा आला पाही ।। आधीं हातीं घेत रज्जूविळाही ।। उच्चस्वरें कांतेसी बोलावित ।। २२ ।। पतिशब्द ऐकोनि कांता ।। आली हर्ष चित्तीं न मावतां ।। स्वामीदर्शन घेउनी भर्ता ।। आला धन्य जन्म माझें ।। २३ ।। भावें वंदोनि पुसे पतिचरणीं ।। स्वामींनीं काय दिल्हें तुम्हालागोनि ।। दावा म्हणतां प्रियकामिनी ।। ओठ चावोनि बोले विप्र ।। २४ ।। आधीं पाहे ही गांठोडी ।। असे तव वधास्तव तांतडी ।। म्हणे मजपुढें गोडगोडी ।। बोलोनि मजसी फसविलें ।। २५ ।। जीवें मारितों मी तुजसी ।। सत्वर पाहे गांठोडीसी ।। ऐसें बोलतांही ती मानसीं ।। न भीतां गांठोडी उकलित ।। २६ ।। गांठ उकलोनि आंत पाहतां

........................

१. दोर व कोयता.

शिवचिदम्बर

।। सुवर्णकांती फांके तत्त्वतां ।। ते पाहतां चित्तीं हर्ष न मावतां ।। पतिचरणीं नमियली ।। २७ ।। तोही सुवर्णकांती पाहोनि ।। प्रेम लज्जा चित्तीं उचंबळोनि ।। क्षणमात्र मूर्च्छित होवोनि ।। पडियेला धरणीं तेधवां ।। २८ ।। सावध होवोनि मग आचारी ।। नेत्रें स्त्रवित प्रेमवारी ।। कांतेसी सांतवी परोपरी ।। निजापराध प्रकटवित ।। २९ ।। भक्तशिखामणी अससी तूं ।। मी असे महा पतितु ।। अविचारें निंदिला जगन्नाथु ।। तुझा घातु करू इच्छिला ।। १३० ।। स्वामीराया चिदम्बरा ।। दुराचारी मी पतित खरा ।। अपराध माझा नाणितां अंतरा ।। दारिद्रसंहार केलासी ।। ३१ ।। ऐसिया त्रिलोकनाथासी ।। भजत असतां तूं भावेंसी ।। विघ्न केलें पापिष्ठ मी दोषी ।। नमन एकही नाचरिलें ।। ३२ ।। यापुढें अपराधशांत्यर्थ ।। येथुनी दंडवत करित ।। दर्शनासी जाईन म्हणत ।। संकल्पोनि निघाला ।। ३३ ।। मुखें स्वामीनाम उच्चारित ।। भावें मार्गी दंडवत ।। घालित आला हुब्बळ्ळीप्रत ।। कांतेसहित आठवे दिनीं ।। ३४ ।। सहकुटुंब तो आचारी ।। दुर्गुण सोडोनि अंतरीं ।। श्रीगुरूसी भेटोनि ते अवसरीं ।। कृपापात्र जाहला श्रीगुरूचे ।। ३५ ।। तुंगातीरीं देवपुर नामक ।। नगर होतें सुप्रसिध्द एक ।। तेथें बाबा भागवत नामक ।। एक होता भाविक भक्त ।। ३६ ।। हरिभजनें रात्रंदिन ।। कंठितसे सानंदमन ।। प्रत्यहीं करितसे अन्नसंतर्पण ।। द्विज विमुख नोहे कवणे काळीं ।। ३७ ।। तो ऐकोनि चिदम्बरकीर्ती ।। धरणें बैसला दर्शनार्थी ।। दोन सप्तक येणेंरीती ।। लोटले जलही न सेवितां ।। ३८ ।। भक्तवत्सल त्याचे भक्तींसी ।। वश होवोनि चौदावे दिवशीं ।। हांक मारित त्याचे कांतेसे ।। मध्य रात्रीसी प्रगटले ।। ३९ ।। कोमल शब्द पडतां कानीं ।। द्वार उघडी कांता उठोनी ।। अवचित पाहे पुढें नितंबिनी ।। तेजोमूर्ती दिव्य रूप ।। १४० ।। काय तेथें प्रगटला वासरमणी[1] ।। ऐसें चिंतित असतां सुवासिनी ।। वेगें धांवोनि दयाखाणी ।। भक्तासन्निधानीं बैसले ।। ४१ ।। त्याचे निकट भक्तीधैर्यादिगुण ।। जाणि संप्राप्त कष्टदशा दारुण ।। पाहतां कोमलांतःकरण ।। द्रवोन बोलत श्रीगुरु ।। ४२ ।। बाबा

१. सूर्य.



शि व चि द म्ब र

बाबा उठी म्हणत ।। स्वहस्तें उठवी जगन्नाथ ।। सर्वांगी फिरवी वरद हस्त ।। प्रेमालिंगन देवोनिया ।। ४३ ।। जगदीशाचे लागतां हस्त ।। सर्वांगें सावध झाला भक्त ।। तंव बोले श्रीगुरु हंसत ।। तामस भक्ती करूं नये ।। ४४ ।। धरणें घेवोनि भक्तवर्या ।। फार कष्टलासी प्राणप्रिया ।। तुझेकरितां चार लाडू सखया ।। आणिलें ते भक्षण करी ।। ४५ ।। ऐसें बोलत सर्वेश्वर ।। त्यासी घेवोनि मांडीवर ।। कवळ[1] मुखीं घालित चिदम्बर ।। दैव थोर त्या भक्ताचें ।। ४६ ।। प्रेमें सेववोनि कवळ नीर ।। सावध करोनि अगोदर ।। मग भक्तासवें बोले मधुर ।। कृपातरंग लोटित ।। ४७ ।। धरणें घेवोनि कासया ।। आत्मारामा दुखविसी वाया ।। सात्विकभक्तीनें सखया ।। संतोष फार देवाजीसी ।। ४८ ।। श्रीगुरुवचन ऐकोनि भागवत ।। म्हणे धरणें सगुण दर्शनार्थ ।। घेतलें म्हणतां बोले श्रीगुरुनाथ ।। असे सर्वगत सगुणमूर्ती ।। ४९ ।। आम्हां तुम्हां ठायीं सर्वात्मा ।। परिपूर्ण असे श्रीचिदात्मा ।। विचारमात्रें सुलभ असतां ।। वृथा श्रम घेऊं नये ।। १५० ।। असो हे घेई बा होन्न ।। उदईक येईल एक ब्राम्हण ।। याचनार्थ चिदम्बर आज्ञेवरून ।। त्यासी देवूनि कृतार्थ होई ।। ५१ ।। ऐसें बोलोनि आत्माराम ।। तेथेंचि गुप्त झाले सगुणधाम ।। ही लीला पाहोनि सर्वोत्तम ।। म्हणे भगवंत कृतार्थ झालों ।। ५२ ।। धन्य माझें जिणें ।। सगुण दर्शन झालें जेणें ।। ज्याकरितां घेतलें होतें धरणें ।। तें श्रीगुरुनें पूर्ण केलें ।। ५३ ।। दृष्ट रूप हृदयीं ध्यात ।। जेथें जाहले श्रीगुरू गुप्त ।। त्या ठायीं करोनि प्राणिपात ।। बैसला निवांत स्वसुखलाभें ।। ५४ ।। स्वामिवचनासरिसे ।। प्रभातीं विप्र याचनामिसें[2] ।। गुरुनाम सांगत येतां हर्षे ।। होन्न समर्पोनि वंदिले ।। ५५ ।। ऐशा विलक्षण गुरुलीला ।। ब्रम्हादिकां न कळे ज्याची कळा ।। तें श्रीगुरुचरित्र वर्णावयाला ।। भूमंडळी कोण शके ।। ५६ ।। मुरगोडीं होते श्रीगुरू ।। आषाढ एकादशी आली थोरू ।। त्या दिनी यात्रा आपारु ।। दर्शनार्थ आले श्रीगुरूचे ।। ५७ ।। रामेश्वरासी निघाले होते ।। सहज श्रीगुरूचे दर्शनातें ।। घेवोनि जावूं म्हणत तेथें ।।

१. घास. २. भिक्षेच्या निमित्ताने.

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

(१०८. ब)

पातले सर्व यात्रिक ।। ५८ ।। स्वसत्ता कळवावया भक्तांसी ।। श्रीदीक्षित चार कारकुनासी ।। नेमोनि लिहवी नामनिशीं ।। यात्रिकांचा पत्ता सर्वही ।। ५९ ।। मग येवोनि कारकून ।। सर्वांचीं सांगती नामें वाचोन ।। वीस पन्नासा आंत बोलावोन ।। दर्शन देत श्रीगुरू ।। १६० ।। त्यांचे मनोरथ सकळ ।। पुरवावया श्रीगुरु दयाळ ।। अर्ध नारळ डाळ तांदुळ ।। गोजोनि देववी प्रसाद ।। ६१ ।। प्रत्येकासी शेर तांदूळ ।। अर्ध नारळ अच्छेर डाळ ।। देवोनि बोळवीतसे यात्रा सकळ ।। प्रसादफळ घ्या म्हणत ।। ६२ ।। दुकानाहूनि धान्य कित्येक ।। आणोनि पुरविती सकौतुक ।। गोजोनि सिधा देती कित्येक ।। श्रीगुरुआज्ञें यात्रिकांसी ।। ६३ ।। दिवस आला तीन प्रहर ।। धर्मशाळेंत उभा चिदम्बर ।। तरी यात्राजन बाहेर ।। दिसति अपार दर्शनोत्सुक ।। ६४ ।। बाहेर तो कमाविसदार ।। बाजाराची घेतसे खबर ।। डाळ तांदूळ सरले निर्धार ।। म्हणोनि हेर सांगती ।। ६५ ।। तंव होवोनि चिंतातुर ।। आंत आला कमाविसदार । काय करूं म्हणोनि म्लानवक्त्र ।। बैसला श्रीगुरुनिकटीं ।। ६६ ।। तंव सर्वज्ञ श्रीगुरुनाथ ।। ओळखोन त्याचे मनोगत ।। त्यासी बोलावुनि सुमंदहसित ।। तांदूळ पांहू आणा म्हणे ।। ६७ ।। चार पायली शिल्लक तंडुल ।। त्यांतील आणवी मुष्टिमात्र केवळ ।। हातीं घेवोनि भक्तकनुवाळ ।। टाकी म्हणे राशींत ।। ६८ ।। सहज आणवोनि डाळ ।। तैसेंचि करी कर्पूरधवल ।। मग आपण नारळाजवळ ।। सहज येवोनि बैसले ।। ६९ ।। अजमासें होते पंच शतक ।। हातीं घेतलें एक फलक ।। सुधादृष्टी पाहोनि गुरुनायक ।। सर्वेचि ठेवी राशींत ।। १७० ।। मग शिष्यांसी सांगे श्रीगुरू ।। प्रसाद वाटावा सत्वरू ।। रात्र फार होईल निर्धारू ।। यात्रा अपारू दिसतसे ।। ७१ ।। वेगें पाचारोनि यात्रावृंदा ।। सत्वर देवोनि पाठवी सिधा ।। धान्य पाहोनिं तैसेंचि बहुधा ।। शिष्य चित्तीं आनंदले ।। ७२ ।। पांच घटी रात्र जाहली ।। सिधा नेत यात्रिकमंडळी ।। तरी सामग्री देखिली ।। पूर्वा तितुकीच उरलीसे ।। ७३ ।। अगाध लीला श्रीगुरूची ।। वर्णावया शके मती कवणाची ।। ज्यावरी होईल कृपा त्याची ।। संक्षेपें तोचि वर्णूं शके ।। ७४ ।। देवादिक वर्तती ज्याचिया धाकें ।। त्याचे

चरित्रं कोण वानु शके ।। एके समयी श्रीसावित्रीसखे ।। आरंभिले हरिखें ब्राम्हणभोजन ।। ७५ ।। भोजनार्थ ब्राम्हण बैसले ।। घृतांत सर्व पदार्थ वाढले ।। इतुक्यांत पर्जन्यवेगबळें ।। द्विज घाबरले पंक्तीमाजीं ।। ७६ ।। जनसंकट पाहोनि सोमयाजी ।। श्रीगुरु आले पंक्तीमाजीं ।। पांच नारळ आणोनि सहजीं ।। मेघराजीं पाहत फोडिले ।। ७७ ।। मग द्विजांसी भोजनार्थ ।। आज्ञापितसे श्रीगुरुनाथ ।। द्विज आपोशन घेती इतुक्यांत ।। मेघ वर्षत कडकडोनि ।। ७८ ।। मळ्याच्या शेरतटाबाहेर ।। पर्जन्य पडतसे अपार ।। आंत न पडे थेंबमात्र नीर ।। अगाध चरित्र श्रीगुरूचें ।। ७९ ।। जानुमात्र बाहेर जंळ ।। धडाधडा वाहतसें निढळ ।। आंत स्वस्थ जेविती द्विजमेळ ।। अगाध खेळ श्रीगुरूचा ।। १८० ।। कीं वरी धरिलें गगनछत्र ।। म्हणोनि न पडती थेंब मात्र ।। नातरी प्रगटले जगत्पवित्र ।। श्रीगुरुचरित्र अघटित ।। ८१ ।। ब्राम्हण जेवोनि उठिले स्वस्थ ।। तदुपरि पंक्ती जेविली यथास्थित ।। मग श्रीगुरु गेले भोजनार्थ ।। तोंवरी तेथ उभे होते ।। ८२ ।। ब्राम्हण गेलिया समस्त ।। श्रीस्वामी बैसलिया भोजनार्थ ।। मग आंत पर्जन्य वर्षत ।। अघटित कृत्य श्रीगुरूचें ।। ८३ ।। कोठवरी करावें वर्णन ।। पदोपदीं मनमोहन ।। चरित्र दावी विलक्षण ।। अवतार पूर्ण चिदम्बर ।। ८४ ।। गुरुनवपुरीं एके दिवशीं ।। आनंदें क्रीडत होते ज्ञानराशी ।। आली आषाढ कृष्ण एकादशी ।। श्रीगुरू पूजेसी बैसले ।। ८५ ।। इतुक्यांत एक महाभक्त ।। गोदातीरीं होता विख्यात ।। योगभक्तिज्ञाननिष्णात ।। शिवभजनीं रत अहर्निशीं ।। ८६ ।। योगाभ्यासबळें सर्व सिध्दी ।। वसत होत्या त्याचे पदीं ।। तो निजायुर्व्यय[1] पाहोनि त्रिशुध्दी ।। इच्छी गुरुपदीं देहत्याग ।। ८७ ।। मग योगाभ्यासबळें तो योगी ।। व्याघ्रवेष घेउनी निःसंगी ।। गुरुपुरीं प्रवेशिला विरागी ।। अरुणांगी[2] उदया येतां ।। ८८ ।। एक लोहाराचें घर ।। व्याघ्रें देखिलें समोर ।। मौनेंचि आंत शिरला सत्वर ।। तंव तो लोहारें देखिला ।। ८९ ।। व्याघ्रासी पाहोनि दृष्टी ।। लोहार भ्याला बहु पोटीं ।। आक्रोश करित चोहाटीं ।। धांवत

१. स्वतःच्या आयुष्याचा अंत. २. सूर्य.




शिव चिदम्बर

शि व चि द म्ब र

भूपृष्ठीं पडियला ।। १९० ।। व्याघ्रवृत्त पडतां कर्णपुटीं ।। त्याचे निकट मिळाली जनदाटी ।। कित्येक धीर धरोनि पोटीं ।। व्याघ्रासी दृष्टी पाहूं जाती ।। ९१ ।। जनासी पाहतां कपटवाघ ।। वारंवार आपटी पुच्छभाग ।। घोररवें[1] गर्जोनि सवेग ।। जना अवघे मारूं येत ।। ९२ ।। कित्येकांसी संकुचितनखें ।। भय दावित मारिल्यासारिखें ।। दांतीं कित्येकांचीं मस्तकें ।। धरोनि कौतुकें सोडित ।। ९३ ।। स्वामी बैसले होते पूजेसी ।। व्याघ्रवृत्त कळतां सांगे शिष्यासी ।। तो वाघ नसे महाभक्त ज्ञानराशी ।। आला भेटीसी मारूं नका ।। ९४ ।। ऐसें सांगत असतांही श्रीगुरू ।। न ऐकतां दुर्जन म्हणती व्याघ्र मारूं ।। आक्रोश करित असतां लोहारू ।। जन अपारू मिळाले सायुध ।। ९५ ।। कित्येकांचे हातीं कुऱ्हाड ।। कित्येकीं घेतलें तीक्ष्ण खड्ग ।। कित्येक घेती लोहदंड ।। पदरीं दगड बांधोनि कित्येक ।। ९६ ।। तंव व्याघ्र धरोनि महाशांती ।। नेत्र झांकोनि बैसला एकांतीं ।। कित्येक दगड गुंडे मारिती ।। तरी न ढळे शांती वाघाची ।। ९७ ।। कोपतां जरी व्याघ्र देखा ।। एकदांचि मारितां शेंकडो लोकां ।। शांतीने ध्यात श्रीगुरुपादुका ।। योग्यासारिखा बैसला स्वस्थ ।। ९८ ।। इतुक्यांत तेथें एका दुष्टें ।। व्याघ्रा गोळी घातली कोपिष्ठें ।। गोळी लागतांही व्याघ्र न उठे ।। नुघडी नेत्रपुट ध्यानस्थ ।। ९९ ।। गोळीशब्द ऐकोनि श्रीगुरु ।। आसन सोडोनि उठिले सत्वरू ।। आले वेगीं लोहारमंदिरू ।। क्रोधें सर्व नरू दूर सारित ।। २०० ।। व्याघ्राजवळी जंव आले ।। तंव व्याघ्रे नेत्र उघडले ।। पुढे स्वामीसी पाहतां नमियलें ।। शिर लावोनि भूमीसी ।। १ ।। सर्वेचि गर्जत उच्चस्वरें तत्काळ मुकला कलेवरे[2] ।। गर्जनांती ऐकिलीं चतुरक्षरें ।। चिदम्बर ऐसें कोमळशब्द ।। २ ।। तंव स्वामीसी आला क्रोध अचाट ।। म्हणे काय केलें हें वोखट ।। वाघ म्हणोनि भक्तश्रेष्ठ ।। मारोनि अरिष्ट संपादिलें ।। ३ ।। मग वाघाचा करवोनि संस्कार ।। आपण स्नान करोनि सवस्त्र ।। आसनादि सर्व पूजासंभार ।। टाकिले सत्वर नदीमाजीं ।। ४ ।। शांत्यर्थ लक्ष लिंगार्चन ।। आणि करविले लक्ष हवन ।। तैसेंचि लक्ष

शि व चि द म्ब र

१. भयंकर आवाजाने. २. देह.

ब्राम्हणभोजन ।। व्याघ्राकारण करितसे ।। ५ ।। ऐशा विलक्षण श्रीगुरुलीला ।। ब्रम्हादिकां न कळे ज्याच्या कळा ।। त्या श्रीगुरूचें चरित्र वर्णावयाला ।। भूमंडळीं शके कोण ।। ६ ।। अष्टमहासिध्दी ज्याचे स्वाधीन ।। त्याचा महिमा वानूं शके कोण ।। दोन शेर घालोनि पुरण ।। सहस्त्र ब्राम्हण जेवविले ।। ७ ।। ऐसें अघटित कौतुक ।। पदोपदीं दावी सावित्रीसख ।। परी नोळखती मूर्ख लोक ।। कदापि सम्यक श्रीगुरूसी ।। ८ ।। श्रीगुरू दयाळू सर्वांभूतीं ।। लोकोध्दारार्थ ज्याची कृती ।। एका श्रीमंतें अफूसेवनार्थी ।। निज संपत्ती हरवली ।। ९ ।। पोटासी दुर्लभ झालें अन्न ।। तरी अफूविषयीं न विटे त्याचें मन ।। अफूविण व्याकुळ होतां प्राण ।। आला दर्शनार्थ श्रीगुरूचे ।। २१० ।। त्याचे स्वप्नीं करुणाकरू ।। म्हणे न तूं बा घाबरू ।। अफू घेई एक शेरू ।। अल्पमात्रु घेत जाईं ।। ११ ।। ऐसें बोलोनि त्याचे हातीं ।। अफू देतसे कृपामूर्ती ।। मग तो होवोनि जागृती ।। प्रत्यक्ष अफूं हातीं पाहे ।। १२ ।। मग आनंदें अफू सेवितां ।। चित्तासी आली स्वस्थता ।। अफूगुण अंगीं न येतां ।। आली नैराश्यता अफूवरी ।। १३ ।। मग सोडोनि व्यसन ।। भजूं लागला श्रीगुरुचरण ।। ऐशीपरी विलक्षण ।। अघटित करणी श्रीगुरूची ।। १४ ।। गलितकुष्ट एक ब्राम्हण ।। हात पाय पडले होते गळून ।। दर्शनेंचि त्याचा गेला रोग दारुण ।। झाला तत्क्षण सुंदरांग ।। १५ ।। एक आला द्विज श्वेतकुष्ठी ।। श्रीगुरूचे दर्शनासाठीं ।। स्वामी त्यासी क्रोधे न देतां भेटी ।। लोकदृष्टी बाहेर घालित ।। १६ ।। तो होवोनि खिन्न वदन ।। राहिला देवालयीं जाऊन ।। तेथूनि बाहेर घाला म्हणून ।। श्रीगुरुराण शिष्य धाडिती ।। १७ ।। तो ब्राह्मण फार खेद करित ।। गांवाबाहेर बैसत ।। तंव नदी पार करावा म्हणत ।। मागुतीं पाठविती शिष्यासी ।। १८ ।। मग तो अत्यंत दुःखिष्ट ।। बैसोनि म्हणे नदीनिकट ।। काय माझें दुर्दैव बलिष्ठ ।। येथेंही कष्ट होतसे ।। १९ ।। जन म्हणती पूर्ण कनवाळू ।। चिदम्बरासी दीन दयाळू ।। तो जरी मजविषयीं क्रोधशीळू ।। आहे दयाळू म्हणूं कैसे ।। २२० ।। आतां कासया पाहिजे जिणें ।। बरें वाटे प्राण सोडणें ।। ऐशा परमदुःखें मार्गानें ।। चालतां ब्राम्हण रडतसे ।। २१ ।। कंठशोषें होतसे उबारा

शि व चि द म्ब र

।। अंगें कांपती थरथरा ।। अंगीं घाम वाहे झरझरा ।। बैसला वारा घेत वृक्षातळीं ।। २२ ।। वस्त्रें पुसोनि सर्वांग ।। सहज पाहिला करपृष्ठभाग ।। सुवर्णापरी दिसत रंग ।। मग सर्वांग पाहतसे ।। २३ ।। सुवर्णापरी फांके अंगकांती ।। हें पाहोनि द्विज तुष्टला चित्तीं ।। म्हणे दयाळु बा कृपामूर्ती ।। तूंचि शिवापती ओळखिलें ।। २४ ।। वरिवरीं क्रोध दाविशी ।। माझें पाप न पाहतां कृपाराशी ।। मजवरी पूर्णानुग्रह केलासी ।। व्यर्थ मी मानसीं रागावलों ।। २५ ।। ऐसेंपरी द्विज स्तोत्र करित ।। वारंवार लोटांगण घालित ।। गागुती आला दर्शनार्थ ।। स्वामी बोलावित आदरें त्यासी ।। २६ ।। त्याची इच्छा करोनि पूर्ण ।। स्वस्थाना पाठवी दयाघन ।। कोठवरी करावें वर्णन ।। जेथें चतुर्वदन मौनावला ।। २७ ।। गर्जेंद्रगडीचा सराफ एक ।। भेटीसी आला मेलगिरी नामक ।। जन्मांध तो दर्शनमात्रें देख ।। तत्क्षणीं नेत्रा पावला ।। २८ ।। नवलगुंदपुरीं श्रीचिदम्बरू ।। द्विज संतर्पण आरंभी थोरू ।। इतुक्यांत पर्जन्य आला अपारू ।। जाहले भयातुरू द्विज सर्व ।। २९ ।। श्रीदीक्षित म्हणे भिऊं नका ।। स्वस्थपणें भोजन होऊं दे ऐका ।। मग एका ब्राम्हणा पदरीं देखा ।। नारिकेळ[1] बांधोनि म्हणे ।। २३० ।। मैदानांत ब्राम्हण बैसले ।। पर्याप्तभोजन[2] तरी पाहिजे झालें ।। यास्तव बुरजावरी तूं भुजबलें ।। नारळ फिरवित उभा राहे ।। ३१ ।। तथास्तु म्हणोनि तो ब्राम्हण ।। वस्त्र फिरवित उभा राहतां जाण ।। मेघ फिरूं लागले गरगरोन ।। कडकडोन शब्द करीत ।। ३२ ।। सव्य अपसव्य दोन्हीकडे ।। द्विज फिरवी फळ जिकडे ।। सव्यापसव्य गगनीं धडपुडे ।। तिकडे फिरे अभ्रमंडल[3] ।। ३३ ।। कडकडोनि गर्जतसे भारी ।। थेंबमात्रही न पडे भूवरीं ।। स्वामी फिरती पंक्तीमाझारीं ।। म्हणे धणीवरी करा भोजन ।। ३४ ।। ब्राम्हण जेविले आतृप्ती ।। उठोनि सर्वही आंचविती ।। बुरजावरोनि उतरा म्हणती ।। सभापती तेव्हा ब्राम्हणासी ।। ३५ ।। फिरविणें सोडोनि ब्राम्हण ।। उतरी इतुक्यांत मेघवर्षण ।। चालिलें गर्जत कडकडोन ।। स्तब्ध हेते तों वरी ।। ३६ ।। सर्व ही माथा तुकविती ।।

शि व चि द म्ब र

१. नारळ. २. पूर्ण जेवण. ३. ढगांचा समूह.

काय श्रीगुरूचे कौतुके[1] म्हणती ।। ऐसे चरित्र तुम्हा सांगो किती ।। नये गती देवादिकां ।। ३७ ।। भावें चिदम्बरचरित्र ऐकतां ।। इहपर सुख लाधे हातां ।। यास्तव विनवी श्रोतयां समस्त ।। चिदम्बरकिंकर सानंदे ।। ३८ ।। स्वस्ति श्री चिदम्बपरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्गुरूनाथ ।। यास्तव ऐका श्रोते समस्त ।। एकोनपंचाशत्तमोऽध्याय गोड हा ।। २३९ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे मोक्षवैभवखण्डे बन्धितपतिव्रतायै चिदम्बरदर्शनं तत्सदृशानेकलीलाप्रकटनंच नाम एकोनपञ्चाशत्तमोऽध्यायः ।। ४९ ।। ओवीसंख्या २३९ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

शिव चिदम्बर

शिव चिदम्बर

१. लीला.

# चिदम्बरलिङ्गावतारवर्णनम्

महाद्वार



श्रीचिदम्बरलिङ्ग



मन्दिरद्वार दत्तपादुकामन्दिर



मातृरौदुम्बर



मार्तण्डपंचायतन



होमशाला



सुब्रह्मण्यक्षेत्रीं वसतो सांप्रत । अश्वत्थतळीं लिंगरूपें : कंगेरीक्षेत्रीं लिंगस्थापन करी ।
[illegible] । प्रत्यक्ष जागतो लिंगस्थानी ।

शि
व
चि
द
म्ब
र

।। श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ।। भक्तवत्सला भवसंकटहरणा ।। श्रीचिदंबरा आनंदघना ।। आदिमूर्ती श्रुतिपथपालना ।। दीक्षितराणा तुज नमो ।। १ ।। मंदस्मितवदना दयाळा ।। मदनदहना वास्तव्यगंदराचळा ।। मंदाकिनीधरा मंदारमाळा ।। सर्वमंगला प्रियकर जो ।। २ ।। पंचपातकनाशकपंचानन ।। पंचभूतातीत पन्नगभूषण ।। पतितपावन पार्वतीरमण ।। परममंगल असें जो ।। ३ ।। शुभ्रजटा शुभ्रकांती ।। चर्चितपयःफेनविभूती[१] ।। डमरुशूळादि आयुधें हातीं ।। शोभतीं ती जयाचिया ।। ४ ।। जय त्रिविधतापहारका त्रिनेत्रा ।। त्रिगुणातीता त्रिलोकसूत्रा ।। त्रिपुरांतका शुध्दसत्त्वगात्रा ।। चित्रचरित्रा तुज नमो ।। ५ ।। श्रीगुरुचरित्र भवरोगरसायन ।। सुदैवें लाधलें तुम्हांलागून ।। मुनीश्वर म्हणे सेवा श्रोतेजन ।। जन्ममरण फेरे सुटती जेणें ।। ६ ।। येणेंपरी विचित्रलीला दावित ।। नित्यश्री नित्यमंगल श्रीदीक्षित ।। क्रीडत असतां धरित्रींत ।। छप्पन्न वर्षे लोटलीं ।। ७ ।। एके दिवशीं श्रीचिदंबर ।। चित्तीं करी ऐसा विचार ।। संपलें अवतारकृत्य तर ।। वेदोध्दार जाहला ।। ८ ।। गोब्राम्हणदेवदूषक ।। होणार भाव्य राजे लोक ।। काम्यार्थी म्लेंछ प्रमुख ।। येऊं लागले दर्शनार्थ ।। ९ ।। कलिकाल वाढला ओखट ।। लोक होणार कर्मभ्रष्ट ।। या समयीं राहणें प्रगट ।। उचित नोहे ।। १० ।। यास्तव भक्तोध्दारार्थ ।। येथेंचि राहणें गुप्त ।। ऐसे श्रीगुरु चित्तांत ।। जंव योजित विचार ।। ११ ।। तंव सत्य लोकीं ब्रम्हादिक ।। ऐसें विचारिती वृन्दारक[२] ।। भूवरी गेले कैलासनायक ।। अद्यापि राहिले तेथेंचि ।। १२ ।। त्याविण आमुचें कार्यगौरव कांहीं न चले यास्तव ।। जेथें वसे सदाशिव ।। सर्व वैभव वसती तेथें ।। १३ ।। एतदर्थ त्यासी बोलावया ।। कोणासी तरी पाठवूं या समया ।। इतक्यांत महाकाल त्या ठाया ।। आला विधिदर्शनाकारणें ।। १४ ।। त्यासी आज्ञापी चतुर्मुख ।। तुवां जावोनि भूमीवरीं देख ।। बोलावोनि आणावा उमासख ।। त्याविण आमुचें कार्य न चले ।। १५ ।। ऐसें ऐकोनि विधातृवचन[३] ।। काल बोले चरण

शि
व
चि
द
म्ब
र

१. दुधाच्या पांढऱ्या फेसाप्रमाणें विभूति लावलेला. २. देव. ३. ब्रम्हदेवाचें वचन.

(११० ब)

शि व चि द म्ब र

वंदोन ।। त्याचे नामचिंतक जे जन ।। त्यांसीही पाहावया भितों मी ।। १६ ।। माझें हस्तगत बहुत जीव ।। सोडवित जो स्वसत्तें सदाशिव ।। काय टिकेल माझें महत्त्व ।। प्रत्यक्ष त्यापुढें गेलियां ।। १७ ।। याचें अवतारचरित्र जो पढे ।। न शकें मी जावया त्यापुढें ।। प्रत्यक्ष भेटणें कोणीकडे ।। त्या महाकालकालासी ।। १८ ।। ज्याचे भक्त माझे शिरीं ।। पाय ठेवोनि कैलासमंदिरीं ।। जावोनि बैसती निर्भय तरी ।। त्यापुढें जाऊं कैसा मी ।। १९ ।। ज्याची आज्ञा वाहोनि शिरीं ।। भीत भीत सचरतों भूवरीं ।। त्यापुढें कैसेनी सर्गकारी[1] ।। जाऊं शके सांग पां ।। २० ।। ऐसें काळवचन ऐकतां ।। काळासी बोधित विधाता ।। सर्वात्मा दीक्षित सर्व जाणता ।। तुझे मनोरथ पुरवितो ।। २१ ।। त्याचिया नगरानिकटीं ।। जावोनि बैसे गुहातटीं ।। तो चिदंबर असे ज्ञानदृष्टी ।। ओळखतो तुजसी ।। २२ ।। मग तथास्तु म्हणोनि महाकाळ ।। वंदोनिया विधातृपदकमल ।। विरक्त वेष घेवोनि प्रबळ ।। सिध्दगुहास्थळीं बैसला ।। २३ ।। पृच्छकांसी सांगे सकौतुक ।। आलों श्रीदीक्षितदर्शनार्थ देख ।। जावोनि भेटा म्हणतां पौरलोक ।। म्हणे सर्वज्ञ जाणतो मजसी ।। २४ ।। इकडे एकदां श्रीगुरुनाथ ।। एकांतीं बोलावोनि निजभक्त ।। सांगे धर्माचार हितार्थ ।। भावी अनर्थ टाळावया ।। २५ ।। एकचित्तें ऐका माझी गोष्ट ।। भावी समय असे दुर्घट ।। धीरचित्तें रक्षावी धर्मवाट ।। क्वचित्काळ यानंतर ।। २६ ।। नित्यनैमित्तिक कर्म आचरावें ।। यदृच्छालाभें संतुष्ट रहावें ।। यथाशक्ति दान करावें ।। न ध्यावें दुरन्न[2] दुर्दान ।। २७ ।। दारिद्यासमय अवघड ।। आला तरी धीर न सोडावा दृढ ।। शूद्रान्नें होय मती जड ।। तें यत्नें दूर करावें ।। २८ ।। फार सांगणें कायसे ।। अब्रम्हण्य समय भरवसे ।। क्वचित्काळ जैसें तैसें ।। सुखें सत्कर्म करित राहावें ।। २९ ।। मागुती कैलासरमण ।। वेदमार्ग रक्षितों अवतरोन ।। तोंवरी धर्मे सत्त्व राखोन ।। काळ कंठावा शिवचिंतनीं ।। ३० ।। राजारामादिक महाभक्त ।। येणेंपरी श्रीगुरुप्रोक्त ।। ऐकोनि भविष्य कलिवृत्त ।। खिन्न चित्तें प्रश्न करिती ।। ३१ ।। स्वामी कर्तुमकर्तु

शि व चि द म्ब र

.............................

१. उपद्रव देणारा. २. वाईट अन्न.

(११० ब)

समर्थ ।। असोनि भावी अनर्थ ।। निवारणाविषयीं यदर्थ ।। असमार्थापरी बोलसी ।। ३२ ।। अवतार संपवूं इच्छिसी ।। ऐसें वाटतें येणें आम्हासी ।। क्षणापरी इतके वर्षासी ।। तव सन्निधीं मानिले ।। ३३ ।। आसनीं शयनीं भोजनीं ।। भाषणीं मंत्रणीं सभास्थानीं ।। न राहिलासी आम्हां सोडोनि ।। आज कैसेनी आम्हां अव्हेरिसीं ।। ३४ ।। आम्हासही सवें नेईं ।। तुजविण न गमे आम्हां क्षणही ।। ऐसें विनवित साश्रुनेत्र पायीं ।। आडवे पडती गहिंवरित ।। ३५ ।। यापरी विरहभयें दुःखिष्ट ।। निजभक्तांचे पाहोनि कष्ट ।। भक्ति स्नेहभरें दीक्षितश्रेष्ठ ।। चित्तीं द्रवोनि बोलत ।। ३६ ।। तुम्हांसी सोडोनि कधीं ।। मागें गेलों नाहीं सुबुध्दी ।। सत्य सांगतों तुम्हां कधीं ।। आतांहि न सोडितों ।। ३७ ।। एतावत्कालपर्यंत ।। प्रगट होतो धर्मस्थापनार्थ ।। आतां येथेंचि वसतों गुप्त ।। भक्तरक्षणार्थ निःसंशय ।। ३८ ।। अवतारकृत्य सर्व संपले ।। यापुढें भक्तकार्य मात्र राहिलें ।। पुढें न प्रेरिसी म्हणोनि दयाळे ।। हातीची ठेविली लेखणी ।। ३९ ।। माता पिता आप्त बंधू ।। सखा भ्राता करुणासिंधू ।। स्मरणमात्रें छेदिसी भवबंधू[१] ।। ज्ञानानंदू चिदंबरा ।। ४० ।। तूं प्रेरेसी ज्यारीतीं ।। त्यापरी नाचती बुध्दिवृत्ती ।। आतां लिहावया देसी मती ।। घेतली हातीं लेखणी ।। ४१ ।। जेणें उध्दरती जड मूढ जन ।। जैसें भक्तिमार्गस्थापन ।। भूवरी करोनि आपण ।। पावा शाश्वत पद माझें ।। ४२ ।। ऐसें ऐकतां श्रीगुरुवचन ।। भक्त विनविती म्लानवदन ।। कैसें राहूं तुज सोडून ।। या घोरांधार काळिकाळीं ।। ४३ ।। तंव बोलत चिदंबरदेव ।। भिऊं नका धरा धीर भाव ।। सांगतों माझें रहस्य सर्व ।। एकोभावें परियेसा ।। ४४ ।। मागें कधींही भक्तांसी ।। सोडिलें नाहीं भरवसी ।। पुढें मी सत्य तुम्हांसी ।। न सोडितों निश्चयें ।। ४५ ।। माझें प्रीतिस्थान केंगेरी ।। तैसीच जाणावी गुरुपुरी ।। नित्य निवसोनि मलापहातीरीं ।। भक्तोध्दार करितों निरंतर ।। ४६ ।। महा क्षेत्र माझें जे निवासस्थान ।। सर्व काशी आदिकरोन ।। गंगादि सर्व तीर्थेही जाण ।। वसती येथें लोकोध्दारार्थ ।। ४७ ।। केंगेरी हीच वाराणशी[२]

१. संसारबंधन. २. काशी.




शिवचिदम्बर

|| ऐसा प्रत्यय द्यावया सर्वांसी || मातुरौदुंबरांतुनी गंगेसी || प्रगट करोनि दावित || ४८ || औदुंबर कोटरांतुनी || सप्त रात्रपर्यंत शुध्द पाणी || वाहत होतें हें पाहोनी || सर्व जाहले भाविक || ४९ || एके दिवशीं श्रीगुरु || जनासी म्हणे दाखवितों चमत्कारू || म्हणोनि आले गांवा बाहेरू || विहीर जेथें तळ्याखालीं || ५० || मध्य जळीं तरती पिंडत्रय || पहा म्हणतां जनसमुदाय || पिंडतरण काय हें आश्चर्य || सांगा म्हणोनि पुसतसे || ५१ || तंव स्वामी निवेदी दोन ब्राम्हणांसी || विहिरीमाजी बाह्य प्रदेशीं || निजोनि प्रभातीं या मजपाशीं || दृष्टांत होईल तो सांगा || ५२ || आज्ञानुसारें ब्राम्हण दोन्ही || तेथें निजोनी आले सभास्थानीं || दुसरे दिवशीं दृष्टांतकथनीं || सादर झाले स्वामीपुढें || ५३ || अंतस्थ म्हणे एक सुवासिनी || सर्वांगीं सर्वालंकारधारिणी || कडेवरीं सुवर्ण कलश घेवोनि || आली ती जाहली जळीं गुप्त || ५४ || वरचा सांगे निज दृष्टांत || सवत्स गाय एक तृषाक्रांत[1] || वापीपाशी[2] येतां जलपानार्थ || भरोनि आलें वरी जळ || ५५ || गाय वत्स जळांत शिरले || जळ मागुतीं खालीं गेले || इतके दृष्टांत म्यां पाहिले || म्हणोनि सांगे तो ब्राम्हण || ५६ || तंव सभासदांसी स्वामी पुसे || सांगा दृष्टांतार्थ कायसे || सविनयें सभ्य विनवितसे || अर्थवेत्ते श्रीगुरु समर्थ || ५७ || मग सांगे श्रीगुरुनाथ || सभासदांसी दृष्टांतार्थ || सुवासिनी गंगा जाणा निश्चित गाय जी गया तीच || ५८ || दोघी येवोनि एकत्र || राहिल्या विहिरींत निर्धार || म्हणोनि तरती पिंड मात्र || गंगा गयासत्ता प्रगटावया || ५९ || यास्तव केंगेरी हीच काशी || तेथेंचि मी वसतों भरवसी || ऐसा चमत्कार भक्तांसी || दावोनि मागुती सांगे बोध || ६० || जगीं चिदंबरसांप्रदाय || वाढवावा भक्तिवृध्दीस्तव || माझे हृद्गतवेत्ते हे सहा तनय || तुम्हांसी साहाय्य करितील || ६१ || माझे स्थानीं भाव धरोनि || वसे जो सांप्रदायविधी जनीं || प्रगटवित त्याचे अंतःकरणीं || पूर्णपणें वास करितों || ६२ || चिंता न करावी आपण || सुरवर इच्छिती

१. तान्हेली. २. विहिरीजवळ.




शिव चिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

माझें आगमन ।। सिध्ददरींत मज कारण ।। ब्रम्हदास[1] येवोन बैसलासे ।। ६३ ।। अनुज्ञा द्यावी संतुष्टचित्त ।। जातों मी त्याचें संतोषार्थ ।। शाश्वत वसतों येथेंचि गुप्त ।। लौकिकार्थ देह सोडोनिया ।। ६४ ।। खंती[2] करूं नका आपण ।। संत जे करिती शांतांतःकरण ।। जे करिती वेदाज्ञा पालन ।। त्यांचे हृदयीं वसतों पूर्णत्वें ।। ६५ ।। मत्कीर्तन मत्कथाश्रवण ।। जे सदा करिती माझे चिंतन ।। त्यांचे हृदयीं माझें सदन ।। जाणा भक्तार्या भरवसें ।। ६६ ।। सर्वांठायीं समत्वें जो वर्ते ।। न शिवे तैसेंचि परनिंदेतें ।। जयाची दृष्टी हरिहरातें ।। न पाहे भेदें तेथें वसतों ।। ६७ ।। परस्त्री परद्रव्यापहरण ।। परनिंदा आणि भूतहिंसन[3] ।। स्वप्नींही न शिवे ज्यांचे मन ।। तेथें वसतों पूर्णपणें ।। ६८ ।। असत्य बोलणें कापट्य करणें ।। गोब्राम्हणग्रास हरणें ।। जो स्वप्नींही न शिवे मनानें ।। तेथें पूर्णपणें वास माझा ।। ६९ ।। राजारामकृत अभंगीं ।। विश्वासें जो भजे निःसंगीं ।। मी सर्वात्मा त्याचे अंतरंगीं ।। सतत राहतों निश्चयें ।। ७० ।। प्रेमभरें माझें नाम गातां ।। रोमांच हर्षाश्रू आयता ।। जेथें विलसे तेथें तत्त्वतां ।। वसतों पूर्णत्वें परियेसा ।। ७१ ।। शिवशास्त्री त्वां रचित ।। माझें स्तवन प्राकृत संस्कृत ।। जो भक्त पढे प्रीतियुक्त ।। तेथें निश्चित मी वसतों ।। ७२ ।। बहुत काय असे सांगणें ।। भक्तासन्निधीं माझें राहणें ऐसे बोलोनि सावित्रीरमणें ।। अभय वचन दाधलें ।। ७३ ।। चिदंबराचें अभय वचन ।। ऐकोनि सर्व भक्तजन ।। ।। अंतरीं समाधान पावोन ।। स्वस्थपणें राहिले ।। ७४ ।। चिदम्बरचरित्र परमपावन ।। श्रवणमात्रें करी पाप दहन ।। ऐकोनि करा जन्म साफल्यपूर्ण ।। म्हणे चिदम्बरकिंकर ।। ७५ ।। मग मार्गशीर्ष कृष्ण चतुर्थीसी ।। श्रीगुरु सारोनि प्रातःकर्मासी ।। जावोनि अग्निहोत्रसदनासी ।। वेदीमध्यें बैसती ।। ७६ ।। क्षणमात्र बैसोनि ध्यानस्थ ।। ब्रम्हाहमस्मि ऐसें उच्चारत ।। चिदानंदीं ऐक्य पावत ।। मृत्युंजय लीलानाटकी ।। ७७ ।। हें पाहोनि समस्त भक्त ।। दीनवदन दुःखाक्रांत ।। दिवाकर येवोनि इतुक्यांत ।। होमशाळाव्दारीं बैसला ।। ७८ ।। न ऐकतां कोणाचें

१. महाकाल. २. विशाद. ३. प्राणिहिंसा.



शि
व
चि
द
म्ब
र

वचन ।। करितसे आक्रोश दारुण ।। म्हणे स्वामीसी न सोडीन ।। कर्म न करी पुढील ।। ७९ ।। मजसवें जाईल जरी श्रीगुरु ।। जावो सुखें कैलासमंदिरू ।। नातरी प्राण देईन निर्धारू ।। म्हणोनि मारूं येत सर्वांसी ।। ८० ।। दिवस जाहला तीन प्रहर ।। शांत चित्त नोहे दिवाकर ।। उभे राहवया त्याचेसमोर ।। कोणीही न शके ।। ८१ ।। तंव श्रीगुरुभक्त धुरंधर ।। आला शिवशास्त्री समोर ।। त्यासी पाहतां क्रोधें दिवाकर ।। सत्वर उठला मारावया ।। ८२ ।। तथापि भय न पावतां शास्त्री ।। हात जोडोनि प्रार्थित शाळाव्दारीं ।। दक्षिणायनीं भक्तकैवारी ।। असे निरुध्द[1] स्वर्गव्दार ।। ८३ ।। एतावत्कालपर्यंत ।। भूवरीं अगाध दावोनि चरित ।। शिवावतार म्हणविला निश्चित ।। अंतीं अवघड का केलें ।। ८४ ।। शिवशास्त्रीं प्रार्थिता दीनवाणी ।। श्रीगुरु शिवशिव म्हणोनि ।। बैसले तत्काळ उठोनि ।। पुत्रासी पाचारोनि बोलती ।। ८५ ।। अस्तमानसमय झाला संप्राप्त ।। ब्राम्हण झाले अति क्षुधित ।। कायगा बैसलासी भ्रांतवत ।। पाकोद्योग न दिसे अजूनि ।। ८६ ।। चरणीं मिठी मारोनि ।। दिवाकर करी विनवणी ।। आपणच जातां आम्हां सोडोनि ।। मग स्मरण कोणाचें ।। ८७ ।। स्वामी बोले दिवाकरासी ।। अज्ञापरी हें काय बोलसी ।। तुम्हाऐसें प्रेमळ भक्तांसी ।। सोडोनि मी राहूं कोठें ।। ८८ ।। निरंतर वसतों याचि क्षेत्रीं ।। सत्य जाण तूं अंतरीं ।। ब्रम्हांड प्रळय झाला तरी ।। न हाले मी येथूनि ।। ८९ ।। ऐसें पुत्राचें करोनि सांतवन ।। तत्काळ पाक सिध्द करवोन ।। पूर्ववत् ब्राम्हणसंतर्पण ।। आरंभिलें श्रीगुरूनें ।। ९० ।। पूर्ववत् अगाध लीलेस ।। दावित स्वामी चार दिवस ।। काळ कंठोनि दिवाकरास ।। बोलतसे पाचारोनि ।। ९१ ।। दैवयोगें समय दुर्घट ।। आला होता मजही निकृष्ट[2] ।। जंव देवकृपें दूरावलें अरिष्ट ।। तंव मीं देवासी नवस केले ।। ९२ ।। मार्तंड आणि पांडुरंग ।। दोघांचें दर्शन घेऊं यथासांग ।। परी मज असे अन्य कार्यभाग ।। यास्तव तूंचि जावोनि येईं ।। ९३ ।। मायालाघवीचें ऐकतां वचन ।। सूर्यांश जरी दिवाकर आपण ।। स्वामीचिया

१. बंद. २. वाईट. ३. पहाटे.

वंचनें मोह पावोन ।। तथास्तु म्हणोनि निघाला ।। ९४ ।। आधीं पाहोनि मार्तंडचरण ।। मग घ्यावया पांडुरंगदर्शन ।। जातसे तो त्वरा करोन ।। पितृभक्त दिवाकर ।। ९५ ।। इकडे श्रीगुरु काय करी ।। शके सत्राशें सदतीस वरी ।। पौष शुद्ध चतुर्थी युव संवत्सरीं ।। ब्राम्ह[1] मुहूर्ती उठियले ।। ९६ ।। नित्यकर्म आटपोनि सर्व ।। पूजितसे गोद्विजदेव ।। आदित्याचें करोनि स्तव ।। करी पंचाग्नी प्रज्वलित ।। ९७ ।। सालंकृत गोदान ।। देवोनि वंदित सर्व ब्राम्हण ।। वेदीमाजीं करोनि दर्भास्तरण ।। मध्यें दयाघन बैसला ।। ९८ ।। जाया सुत निज भक्तांस ।। आप्त इष्ट सर्व यात्रिकांस ।। बोलावुनि म्हणे जगन्निवास ।। आज मागा इच्छितवर ।। ९९ ।। सर्व संपलें अवतारकृत्य ।। भक्तोध्दारार्थ येथेंचि वसतों सत्य ।। यास्तव सर्वही आपण अवश्य ।। दया ठेवा सुखें रहा ।। १०० ।। ऐसें ऐकतां श्रीगुरुवचन ।। विरहभयें दुःखित जन ।। जे जे वर मागती ते संपूर्ण ।। दानशौंड श्रीगुरु देतसे ।। १ ।। इतुक्यांत प्रभाकर येवोनि ।। विनवितसे चरण वंदोनि ।। कलिसिंधूंत आम्हां लोटोनि ।। कैसें जासी देवराया ।। २ ।। आपणसवें मजसीही ।। स्वामिराया घेवोनि जाई ।। ऐसें भ्रातृदैन्यवचनही ।। ऐकोनि बोले सुमंदहास ।। ३ ।। भिवूं नको वत्सा धीर धरी ।। सुखें राहे गालवक्षेत्रीं ।। तुझी कीर्ती भूवरीं ।। तेथें राहतां होय विस्तृत ।। ४ ।। कांहीं दिवस राहोनि भक्तमेळीं ।। माझा सांप्रदाय भूतळीं ।। वाढवोनि मागुती मजजवळीं ।। येई म्हणोनि सांतवित ।। ५ ।। ब्रम्हादिक देव इतुक्यांत ।। आले चिदंबरदर्शनार्थ ।। व्दिजवेषें येवोनि होमशाळेंत ।। वंदोनि पाहती दिव्य मूर्ती ।। ६ ।। भस्मावलिप्त सर्वांग ।। वरी त्रिपुंड्र धरिलेसे अव्यंग ।। रुद्राक्षभूषण नाशकाघौ[2] ।। सर्वांगीं ल्यालासे ।। ७ ।। शुभ्रवस्त्रद्वयमंडित ।। पंकजास्य[3] सुमंदहसित ।। नेत्रांबुज शोभती अर्धोन्मीलित ।। शोभे सर्वांगसुंदर ।। ८ ।। ज्ञानमुद्रा धरिलीसे हातीं ।। ज्वलत्पंचाग्निमध्यस्थ[4] तेजोमूर्ती ।। तुलसीमंजरी कर्णी झळकती ।। कृपामूर्तीच्या सुरेख ।। ९ ।। तेजे तळपत होमशाळा ।। शिवपंचायतन वक्षस्थळा ।। दर्शनोत्सुक यात्रिक

१. पहाटे. २. पापसमुदायनाशक. ३. कमलमुख. ४. धगधगीत पंचाग्नीच्या मध्यस्थानीं.




शिवचिदम्बर

श्रीगुरूला ।। अनिमेषपातें पाहती ।। ११० ।। शिवनामगर्जन अखंडित ।। मुखें चाललेसें सतत ।। प्रेक्षकांचे जे जे मनोरथ ।। दर्शनमात्रें पुरवित ।। ११ ।। ऐसिया श्रीचिदम्बरासी ।। पाहोनि ब्रम्हादिक आनंदेंसी ।। स्तोत्र आरंभिती प्रेमेंसी ।। वारंवार करिती दंडवत ।। १२ ।। नमो नमो क्षितिभारनाशना ।। विप्रोत्तमरूपा विज्ञानघना ।। विख्यातचरित्रा भक्तपालना ।। श्रीचिदम्बरा तुज नमो ।। १३ ।। अतींद्रिया निर्गुण निराकारा ।। दीक्षितनामें घेवोनि अवतारा ।। स्वयशें त्रिजग आच्छादिलें दातारा ।। आतां निजमंदिरा यावें सुखें ।। १४ ।। गायकासी अखंड मंगलदायक ।। जेणें स्वचरित्र मनोहारक ।। भूवरीं स्थापिलें त्याचे पादुक ।। वंदूं स्वसुख साधावया ।। १५ ।। तुझे आज्ञाधारक आम्ही ।। तुजसी सेवित स्वस्वधामीं ।। वसतों आम्हा पाहोनि महास्वामी ।। स्वधामासी यावें देवराया ।। १६ ।। यापरी ब्रम्हादिकांची विनंती ।। ऐकतांची तुष्टले कैलासपती ।। मग सुत शंकराचे हातीं ।। पंचायतन मूर्ती समर्पित ।। १७ ।। तंव पांचही श्रीगुरुपुत्र ।। साश्रुनयन म्लानवक्त्र ।। नमस्कार करोनि विनवित ।। गद्‌गदाक्षरें स्वामीसी ।। १८ ।। या घोरांधार संसारीं ।। कैसें राहूं महीवरीं ।। आम्हां अव्हेरुनी आपण तरी ।। दुःखहारी निघाला ।। १९ ।। तंव सदानंद चिदम्बर ।। सर्वांसी बोलावोनि समोर ।। भिऊं नका म्हणे धरा धीर ।। ऐका व्यहार[1] एक माझें ।। १२० ।। जें जें म्यां दाविलें सत्कर्म ।। जो चाले धरोनि तेचि वर्त्म[2] ।। चालवितो मी त्याचा योगक्षेम ।। जाणा नेमस्त वचन माझें ।। २१ ।। ऐसें बोलोनि श्रीचिदम्बरेश ।। जवळी बोलावोनि दोन्ही स्त्रियांस ।। पाठीवरीं फिरवोनि स्वहस्तास ।। निज तेजास घेतसे ।। २२ ।। जायापुत्र भक्तयात्रिकांसी ।। इच्छित देवोनि वरांसी ।। हर्षचित्त करोन सर्वांसी ।। ज्योतिर्ध्यान करू लागलें ।। २३ ।। दर्भास्तृत वेदीपृष्ठीं ।। पद्‌मासन घालोनि जगजेठी ।। नासाग्री अर्धोन्मीलित दृष्टी ।। ठेवोनि वेदीतटीं बैसले ।। २४ ।। ज्ञानमुद्रा विलसित दोही कर ।। शोभताती हृदयावर ।। कुंभकें प्राणापान संचार ।। स्तब्ध करोन बैसले

१. वचन. २. वाट. ३. पवित्र.

शि व चि द म्ब र

।। २६ ।। गुहूर्त घेवोनि योगस्थिति ।। मग ब्रम्हाहमस्मी ऐसें बोलती ।। सर्वेचि घेतली निजानंदास्थिती ।। अंतःश्वासगती करोनिया ।। २६ ।। यापरी ज्योतिरूप श्रीगुरु ।। पावता सर्व नारीनरू ।। अस्तंगत होतां दिनकरू ।। पांखरांपरी गौनावले ।। २७ ।। कित्येक खिन्न होतां चित्तीं ।। त्यापुढें चिदम्बरमूर्ती ।। प्रगटोनि समाधान स्थिती ।। सांगोनि गुप्तगती पावतसे ।। २८ ।। मग सर्वही पावोनि आनंद ।। वेदपाठ आणि जयघोष शब्द ।। करिती कित्येक गाती प्रबंध ।। नाचती स्तविती तैसेंची ।। २९ ।। मग सर्वही वैदिक पंडित ।। अहिताग्नीविधी शास्त्रोक्त ।। धरोनि शंकरहातें विध्युक्त ।। करविती पुत्रधर्म ।। ३० ।। ताळ वीणा मृदंग ।। वाजविती भक्तसंघ ।। भजनीं भरोनि प्रेमरंग ।। स्वामीपुढे निःसंग नाचती ।। ३१ ।। कित्येक खारिका देख ।। उडविती लाह्या कित्येक ।। सुगंध चूर्ण तैल फल कदंबक ।। कोणी अलौकिक वर्षती ।। ३२ ।। शुचिष्मंत[१] व्दिजवृंद ।। रथ ओढिती मंदमंद ।। मुखे पढत उपनिषव्देद ।। उत्तर दिशेसी चालिले ।। ३३ ।। गगनीं विमानस्थ सुरवर ।। पुष्पवृष्टी करिती अपार ।। दहि दुग्ध अक्षता कुंकुम नीर ।। हरिद्रा निकर वर्षती ।। ३४ ।। तैसेंचि नाना सुगंधचूर्ण ।। वरूनि पडतां शोभे गगन[२] ।। इंद्रधनूपरी विचित्र वर्ण ।। पाहती दूरून प्रेक्षक ।। ३५ ।। वितस्तिमात्र[३] भूतळीं ।। सुगंध चूर्ण पसरले ते वेळीं ।। ऐशा महोत्सवें केंगेरीस्थळीं ।। औदुंबराजवळीं पातले ।। ३६ ।। हा वृत्तांत ऐकोन ।। ग्राम खेट[४] निवासी सर्व जन ।। आले पहावया स्वामीनिर्याण ।। वृध्द बाल तरुण नारीनर ।। ३७ ।। तंव रुद्रापुरींचा देसाई ।। दर्शनार्थ निघाला तोही ।। इतुक्यांत श्रीचिदम्बरही ।। त्याच ठायीं प्रगटले ।। ३८ ।। तंव देसाई विस्मित होवोन ।। साष्टांगें करूनि वंदन ।। पुसे एकाकी आपण ।। कवण स्थानासी निघाला ।। ३९ ।। त्यासी सांगे सुमंदहसित ।। निघालो रामेश्वरदर्शनार्थ ।। मागे येती सेवक भक्त ।। जाहले गुप्त बोलोनी ऐसें ।। १४० ।। तंव देसाई म्हणे मनीं ।। काय ही अगाध श्रीचिदम्बरकरणी ।। मी निघालों निर्याणवृत्त ऐकोनि ।। प्रत्यक्ष भेटोनि गुप्त जाहले

शि व चि द म्ब र

१. पवित्र. २. आकाश. ३. टिचभर. ४. खेडें.

|| ४१ || उत्तर भागीं तरी वाद्यनाद || ऐको येतसे विशाद || मी तरी प्रत्यक्ष गुरुपाद || देखिले अगाध काय हें || ४२ || यापरी विस्मित चित्तें || देसाई आला मुरगोडातें || स्वामीचें प्रस्थान पाहोनि तेथें || सांगें स्ववृत्त भक्तांसी || ४३ || त्याच दिवशीं पंढरीक्षेत्रीं || दिवाकरासी चंद्रभागातीरीं || भेटोनि जाति सत्वरी || पांडुरंग देऊळांत || ४४ || पांडुरंगीं श्रीचिदम्बर || अदृश्य होतचि वदत मधुर || दिवाकरा धरीं पदर || फळमंत्राक्षता समर्पितों || ४५ || जंव दिवाकर पुढें पसरी पदर || तंव झाला चिदम्बर || पांडुरंग पुढें करोनि स्वकर || फलशुभ्राक्षता समर्पित || ४६ || आणि स्वकंठस्थ तुळशीमाळा || घातली दिवाकराचिया गळां || तंव तो दिवाकर घाबरला || पाहोनी तुळशी शुभ्राक्षता || ४७ || फळमंत्राक्षता देतों म्हणीतले || श्रीगुरु कोठें गुप्त जाहले || पांडुरगें कैसे दीधले || प्रसाद मज यासमयीं || ४८ || म्हणे हीं चिन्हें पाहतां || देह सोडोनि गेला मम पिता || ऐसा निश्चय करोनि चित्ता || सर्वेचि निघता जाहला || ४९ || जेथें जेथें होते निजभक्त || ते दिनीं त्यासी श्रीदीक्षित || भेटूनी सर्वां सांतवित || अघटित चरित्र श्रीगुरूचें || १५० || ऐसा अगाध महिमा श्रीगुरू || देह सोडित लोकाचारू || केंगेरी क्षेत्री निरंतरू || वसत सर्वेश्वरू पूर्णपणें || ५१ || मग पुत्रादिक मिळोनि || रामचंद्रदेवळा दक्षिणीं || औदुंबराचे उत्तर स्थानीं || चिदम्बरस्थान कल्पिलें || ५२ || चंदनागरु इंधन योजूनि || श्रौताग्नीनें संस्कारूनी || सर्वही अवभृथ स्नान करोनि || चिदम्बरस्थानीं पातले || ५३ || औदुंबरावरी वन्हिज्वाला || जात असतांही त्या वेळा || न सुकता औदुंबरांकुरदळा || सतेज कळा वाढली || ५४ || पर्जन्य वर्षत असतां || जैसी दिसावी सरसता || तैसी चिदम्बरज्वाळा लागतां || सरसता शोभे औदुंबरीं || ५५ || त्या रात्रीं चिदम्बराग्निप्रकाशीं || ब्राम्हण बैसले भोजनासी || त्यांत एका व्दिजमानसीं || चिंता ऐसी शंका उपजली || ५६ || भोजन सोडोनि व्दिज तो उठतां || तत्काळ उपजली कुक्षिव्यथा || पश्चात्तापें प्रसाद स्वीकारितां || गेली व्यथा तत्क्षणीं || ५७ || रात्रंदिन मार्ग चालत सत्वर || तिसरे दिवशीं दिवाकर || येवोनी

शि व चि द म्ब र

शि व चि द म्ब र

करी आक्रोश थोर ।। फोडोनि शिर देऊं म्हणे ।। ५८ ।। लौकिकार्थ जाहलों मी गुप्त ।। येथेंचि राहतों शाश्वत ।। सुब्रम्हण्यक्षेत्रीं मी वसतों सांप्रत ।। लिंगरूपें अश्वत्थातळीं ।। १६० ।। स्वयंप्रकाशेश्वर परम गुरु ।। त्याचे भेटीस्तव गेलों निर्धारू ।। आचंद्रार्क माझा वास मंदिरू ।। केंगेरी क्षेत्रू जाणपां ।। ६१ ।। तें लिंग आणोनि येथें स्थापन ।। करी बा मग भक्तकाम पूर्ण ।। यथा प्रकारें करितो पूर्वीप्रमाण ।। सत्य सत्य वचन माझें ।। ६२ ।। एसें श्रीगुरूचें अभयोक्त ।। ऐकतांचि होवोनि विश्वस्त चित्त ।। भ्रम सोडोनि दिवाकरसुत ।। करी आनंदें द्विजाराधना ।। ६३ ।। दिव्यान्न बहु दक्षिणादान ।। अपार देवोन तोषवी ब्राम्हण ।। मग त्या स्थानीं देवसदन ।। मनोरम विस्तीर्ण निर्मिलें ।। ६४ ।। मग चिदंबराज्ञेवरून ।। सुब्रम्हण्य क्षेत्रीं निर्दिष्ट स्थान ।। शोधितां लिंग लाधलें सुलक्षण ।। तें आणिलें दिवाकरें ।। ६५ ।। शास्त्रविधी अनुसरोन ।। अंगीकरोनि पंचकुंडविधान ।। तेथें केलें लिंग स्थापन ।। दिवाकरें भक्तीनें ।। ६६ ।। गुप्तरूपें त्या लिंगस्थानीं ।। प्रत्यक्ष जागतो कैलासधनी ।। कित्येक भक्तांसी प्रत्यक्ष भेटूनि ।। मनोरथ त्यांचें पुरविले ।। ६७ ।। भक्तांचें पाहोनि निकट ।। लिंगस्थानीं दीक्षितश्रेष्ठ ।। काळकाळीं होवोनि प्रगट ।। मनोभीष्ट पुरवितसे ।। ६८ ।। ऐसा भक्ताभिमानी चिदम्बर ।। लोकोध्दार करावया निरंतर ।। रात्रंदिन जागतो परमेश्वर ।। म्हणोनि किंकर सांगे सर्वांसी ।। ६९ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ ।। अवधान द्यावें श्रोते समस्त ।। पंचाशत्तमोऽध्याय स्वादु हा ।। १७० ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे मोक्षवैभवखण्डे श्रीचिदम्बरलिंङ्गावतारवर्णनं नाम पंञ्चशत्तमोध्यायः ।। ५० ।। ओवीसंख्या १७० ।।

**।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।**

शिवचिदम्बर

|| श्रीचिदम्बरमहागुरवे नमः || ॐनमोजी शिव चिदम्बरा || मायातीता करुणासागरा || भवभयभंजका भवानीवरा || परात्परा तुज नमो || १ || चैतन्यघना सद्‌गुरुनाथा || अविनाशपद निजसुख दाता || तूं आदिमध्यांतरहिता || जगदाधारा तुज नमो || २ || जयजयाजी आत्मस्वरूपा || भक्तवरदा सुज्ञानदीपा || जयविश्वंभरा तेजअमूपा || बुध्दिसाक्षी पां तुज नमो || ३ || नमो पुरुषोत्तमा पुंडरीकाक्षा || अजा अव्यया अलक्ष || सद्‌भक्तां देवोनी गुरुदीक्षा || निजस्वरूपीं मेळविसी || ४ || त्रिपुटिरहिता परमेश्वरा || जीव शिव वसती त्वन्मंदिरा || तयांचें अधिष्ठान तूंचि खरा || चिदम्बरा श्रीगुरू || ५ || द्विज म्हणे मुनिपुंगवा || श्रीचिदम्बरचरित्र सर्वा || येथवरी सांगोनि मद्‌भावा || स्वानंदपुष्टी दीधली || ६ || परी देहभावें विस्मरण || हेचि मानवतेचें लक्षण || तरी पूर्वचरित्रानुसंधान || करविलें कीं पाहिजे || ७ || चिदम्बरचरित्रावतरणिका || सांगोनि सकलां सुरेखा || स्मरण द्यावें बां निजसुखा || योगींद्रा तूं दयाळा || ८ || मागा सांगोनि भगवंतें गीता || कृतार्थ केलें सुभद्राकांता[1] || परी सांगावी लागे परता || उत्तरगीता तयासी || ९ || ऐसें मानवधर्मानुसार || विस्मरण होतें वारंवार || म्हणोनि चिदंबरकथासार || सांगोनि स्मृति द्यावी जी || १० || ऐकोनि ही द्विजविनंति || परमानंदें मुनि डुल्लती || म्हणती द्विजेंद्रा तव प्रश्नोक्ति || तोष देई अपार || ११ || श्रीमच्चिदंबराचें चरित्र || ऐकिलें ते होती पवित्र || न ऐकल्याच्या मनींही थोर || होत आतुरता श्रवणार्थ || १२ || तव प्रश्नें मजही सम्यक || आठवें चरित्र आमूलाग्र देख || हा अवतरणिका अध्याय चोख || ऐकतां चित्तैक्य चिदम्बरीं || १३ || श्रीचिदम्बरचरित्र अपार || परी भक्त स्वाधिकारानुसार || सेविता तृप्तीचा एकच प्रकार || तृषार्ता सिंधुनीर जेविं || १४ || तो हा चिदम्बर सर्वी समान || जागृतस्वप्नसुषुप्तींत पूर्ण || तिही काळीं अद्वयानंदघन || प्रकाशमय भगवंत || १५ || त्यातें भजतां प्रीतिपूर्वक || सद्‌भक्तां देवोनि स्वानंदसुख || भवपार करितसे देख || नको

१. अर्जुनास.




शिव चिदम्बर

शि
व
चि
द
म्ब
र

अनुमान येविषयीं ।। १६ ।। आतां अवतरणिकाध्यायेसी ।। जेथें सिंहावलोकनकथेसी ।। श्रवण करितां सावधानेसी ।। भक्तिप्रेम लाधेल ।। १७ ।। प्रथमाध्यायीं मंगलाचरण ।। केंगेरीं येवोनि एक ब्राम्हण ।। नामसप्ताह करितां सात दिन ।। मुनीश्वर भेटले ।। १८ ।। वृध्द द्विजरूपी मुनीश्वर ।। ब्राम्हणेच्छा पाहोनि तीव्र ।। सांगत श्रीचिदम्बरचरित्र ।। भवरोगरसायन जे ।। १९ ।। द्वितीयाध्यायीं कथोपक्रम ।। करोनि मुनींद्रे उत्तम ।। चिदम्बरपूर्वजांचे नाम ।। मूळ पुरुषापासोनि सांगें ।। २० ।। कश्यपावतार मल्हारदीक्षित ।। ज्योतिर्वृत्तीनें होवोनि संत्रस्त ।। गोठे सोडोनि वाराणशींत ।। स्वयंप्रकाश गुरुजवळीं राहिला ।। २१ ।। अध्ययनोत्तर मुरगोडीं येवोन ।। अदिती लक्ष्मीचें केलें पाणिग्रहण ।। बहुत दिन संतान न होता विषण्ण ।। गेला सुगोला पुरश्चरणा ।। २२ ।। तेथून हिप्परगीं जावोन ।। कुलदैवत मार्तंडा केलें प्रसन्न ।। तदनुज्ञें चिदम्बरक्षेत्रीं प्रयाण ।। केले शिवाराधनेस्तव ।। २३ ।। तृतीयाध्यायीं चिदम्बर प्रसन्न ।। मीच अवतरेन ऐसें वरदान ।। देतां लक्ष्मीमाता गरोदर राहोन ।। झळकत विलक्षण ब्रह्मतेजें ।। २४ ।। नववे मासीं अष्टवर्षात्मक ।। चिदम्बर पाहोनि माता देख ।। विनवितां बाळरूप सुरेख ।। धरी कार्तिक कृष्ण षष्ठीस ।। २५ ।। बाळलीला विश्वरूपदर्शन ।। मातेपोटीं प्रभाकर शेषा जनन ।। शिवपूजनीं मृत्तिकाप्रसाद देतां जाण ।। साखर जाहली चवथ्यांत ।। २६ ।। पांचव्यांत व्रतबंध विद्याभ्यास ।। गजगौरीव्रता जातां होसूरास ।। पाहोनि सुवासिनींचा उपहास ।। मृद्‌गज लीलें चालवी ।। २७ ।। हळ्ळीहाळीं पित्यासह जात रामचन्द्रभक्ता ।। घरी तत्वता ।। चोरी गेले निधान परता ।। दावोनी तन्मन तोषवी ।। २८ ।। षष्ठाध्यायी वेडसूरात ।। ।। शिवप्रतिष्ठापनीं वृषभ मृत ।। उठवोनि करी सुमुहूर्त ।। भक्तमल्लाच्या विश्वासें ।। २९ ।। सातव्यांत माढळ्ळी उपनामक ।। लिंगोपंतें वरार्थी होवोनि देख ।। प्रार्थितां चिदम्बरा सम्यक ।। वरी सरस्वती सतीस ।। ३० ।। शेल्लीकेरीं बिष्टेशाची कन्या ।। सावित्री साध्वी परम मान्या ।। द्विभार्यायोगें स्वीकरी अन्या ।। प्रभाकरलग्नानंतर ।। ३१ ।। स्वयें असोनि पूर्णावतारी ।। आचरी गुरुसेवा परोपरी

शि
व
चि
द
म्ब
र

|| अज्ञ मूढा दावावया थोरी || अखंड पितृसेवेची || ३२ || अष्टमीं सरस्वतीचिये पोटीं || दिवाकर शंकर बालकें गोमटीं || अव्हेरुनी पुत्रवचना पडवळस्वीकृती || करितां माता निमाली || ३३ || लीला दावया अनुज्ञा देवोन || मार्तंड झाले निजानंदीं मग्न || चिताभस्म सारितां तृतीय दिन || औदुंबरांकुर दिसती तेथें || ३४ || द्विजभोजनीं अन्नपूर्णादर्शन || शूद्रासी दिलें निक्षिप्त धन || माहेरी सरस्वतीचें करितां छळण || टिपू अंधत्व पावला || ३५ || मग म्लेच्छें प्रार्थितां चिदम्बर || त्यातें नेत्र देवोनि सत्वर || सजीव करी यवनदळशार || करुणाकर सुष्टुदुष्टां || ३६ || नवमीं वर्णाश्रम धर्मपालन || पितृपुरश्चरणसांगतेकारण || करी अपार ब्राम्हणभोजन || दिलें सुवर्ण निर्धन द्विजा || ३७ || मृत्युंजय वररुची सरस्वतीचे कुशीं || तैसेचि काशिनाथ भास्कर सावित्रीसी || कृतकर्म सांगोनि पूर्व तैलिणीसी || पुत्रद्वय दीधलें || ३८ || गुरुवचन अवमानोनी लिंगोपंत || जावोनि देसायातें भेटत || तेथ त्याचा होता घात || ग्राम त्यजी स्वामी द्वादशाब्द || ३९ || निंदूनि महाप्रसाद त्यागितां || विप्र उन्मादें झाला बरळतां || श्रीआज्ञें तोचि प्रसाद सेवितां || गुण आला तात्काळ || ४० || तापसी नारायण यतींचा अधिकार || पाहोनि उपदेशी श्रीचिदम्बर || ब्रम्हनिष्ठ षट् शिष्यांत अग्रेसर || झाले सिध्दिसंपन्न गुरुकृपें || ४१ || व्याघ्रासवें क्रीडती यती || मृतबाळा सजीव करिती || रित्या कुंडीं भागीरथी आणती || चिदम्बरनामसामर्थ्ये || ४२ || देवलापुरीं श्रीसी भेटती || सब्दोधचर्चा निरूपणीं रमती || दत्तक्षेत्रा प्रेमें जावोनि मागुती || रंगती आत्मरंगीं ते || ४३ || सांगलीराया दृष्टांत देवोन || सखारामा सोडवी स्वामी बंदींतून || नाना तोही श्रीमच्चरित्र रचून || ख्यात झाला सर्वत्र || ४४ || एकादशी गोदातीरस्थ || बाळकृष्ण भक्त स्वभार्येसहित || चिदम्बर भेटि येता || मूल त्याचे मृत झालें || ४५ || तें तेथेंचि भूमींत पुरोनी || भेटूं आले चवथे दिनीं || तंव त्याचें म्लान मुख पाहोनी || स्वामी पुसतां वृत्त सांगे || ४६ || बाळकृष्णासी म्हणे चिदम्बर || बाळ नाहीं मेला साचार || सत्तीगेरीस पाहो जातां द्विजेंद्र || निजकुमार खेळे रांगत || ४७ || भंडिवाड देसाई संततिविषयक || प्रार्थितां

स्वामी म्हणती देख ।। प्रमथ कन्या त्यावरी सुरेख ।। पुत्र होईल सत्य हें ।। ४८ ।। परी ती कन्या आम्ही सांगूं त्यासी ।। द्यावी म्हणतां गेला होकारेंसी ।। लग्नसमयीं योजितां अन्य वरासी ।। कन्यें अंगीं ज्वर भरे ।। ४९ ।। पुनरपि ही ऐसें होता ।। ऊर्ध्वश्वासी कन्या रामासी देता ।। देवालयीं ती मृत्यु पावतां ।। उठवोनि लावी लग्न तिचें ।। ५० ।। द्वादशाध्यायीं रत्नाकर ।। यतित्रयाचें ऐश्वर्य थोर ।। हरावया येतां श्रीचिदम्बर ।। तद्भय निवारी दर्शनें ।। ५१ ।। तंव धोंडूं गोखले दर्शना येतां ।। रत्नाकरासी दंडी बा आतां ।। स्वामीची ऐसी आज्ञा होतां ।। युध्दीं मारिले तयातें ।। ५२ ।। पुढें धोंडूनें त्यागितां प्रसादफळ ।। धोंडीवाघें फोडिलें तत्कंठनाळ ।। बापूसी कळतां वाघाचें शिरकमळ ।। कांपोनि विजयी तो प्रसादफळें ।। ५३ ।। खलनिग्रह सद्भक्तरक्षण ।। तैसेंचि गोद्विजपालन ।। करवी मंडलाधिपां बोधून ।। करुणाकर चिदम्बर ।। ५४ ।। त्रयोदशीं चिदम्बराकडोन ।। सव्वालक्ष रुपये आणी मागून ।। बुवाजी ऐसें स्वप्न पाहून ।। येत चिदम्बरदर्शना ।। ५५ ।। व्यंकटेशा पूजूनि चिदम्बर ।। पालखींत ठेविती पांच वर ।। गिरिवरीं जावोनि बुवा सत्वर ।। मोजितां भरती सव्वालक्ष ।। ५६ ।। समुद्रीं बुंडू लागता जहाज ।। आंग्ल पुसे शिरस्तेदारा सहज ।। कोण देव तारक असे आज ।। लाभ चतुर्थांश देईन त्या ।। ५७ ।। वणिक्प्रश्न ऐकोनी शिरस्तेदार ।। सांगे समर्थ एकचि चिदम्बर ।। तंव विश्वासें व्यापारीं पडतां पार ।। पाठवी गिरींवर सव्वा लक्ष।। ५८ ।। उदक आणवी छब्बीपुरीं ।। पार्श्ववाडीं सगरघृत देतां नारी ।। नैवेद्य समर्पोनि विषबाधा हरी ।। तत्पुत्राची स्नुषाभक्तिस्तव ।। ५९ ।। चोरकर्मांतुनी चोरा सोडवी ।। कुसुगल्लीं राक्षसां सद्गति दावी ।। काशीराया परत राज्य देववी ।। बाजीरायांकडून ।। ६० ।। पडगानूर वैष्णवासी ।। बोधी हरिहर ऐक्यासी ।। सांगती यादगिरी देसायासी ।। सोडाया परस्त्री पंक्तिभेद ।। ६१ ।। परी दुर्दैव दोन्ही घडतां त्यासी ।। व्रणें व्यापिले त्याचे देहासी ।। पुनरपि प्रार्थितां चिदम्बरासी ।। दिव्यांग झालें तयाचें ।। ६२ ।। चौदाव्यांत रेणुकादर्शनोत्तर ।। मलापहातटीं पाहोनि मारुतीमंदिर ।। भक्तांकडोनि तेथें गुरुनवपुर ।। रचवोनि




शिवचिदम्बर

आपण राहिले ।। ६३ ।। वेदपठण ऐकावया शंकरभारती ।। शृंगेरीहुनी नवपुरा येती ।। चिदम्बरासी आठव देती ।। लोकोध्दारकार्याचा ।। ६४ ।। चिदम्बरें करितां अंघ्रिपूजन ।। म्हणती होऊं दे वाजीशाखोध्दरण ।। मग कर्म भक्ती आणि ज्ञान ।। वेदानुसारे स्थापीत्वा ।। ६५ ।। दुर्बुध्दीने एक उन्मत्त भूसुर "श्रीकलश घेता वृश्चिक प्रखर" पाहोनि स्तवितां दयासागर ।। तद्दारिध्र दुर्मति निवारी ।। ६६ ।। पंधराव्यांत उच्छिष्ट खर्जूर ।। स्नुषेसी पाठवितां चिदम्बर ।। आपणचि खाई शिष्यविप्र ।। मग जिव्हा छेदी अनुतापें ।। ६७ ।। चिदम्बरें त्यातें कृपा करून ।। जिव्हा देवोनिया तत्क्षण ।। उच्छिष्टें पुण्य जाय सरून ।। म्हणोनि सर्वां बोधिलें ।। ६८ ।। सशिष्य श्रीनिवासाचार्य ।। गुरूसी परीक्षावया जंव जाय ।। निंदें जिव्हा कुंठित होय ।। तैं तच्छिष्य प्रार्थिती ।। ६९ ।। तंव स्वामी कृपादृष्टीं पाहतां ।। जिव्हा आली शरणागता ।। सद्गुरु बोधिती जना समस्ता ।। कोणी कोणासी निंदूं नये ।। ७० ।। स्वधर्म आचरणारासी ।। स्थानीच भेटतो श्रीपति ।। वर्म निश्चयें दाखवायासी ।। व्यंकटेश भेटी येईल ।। ७१ ।। तैसे पंधरावे दिवशी श्रीरंग ।। पठाणवेषें येती परी तदंतरंग ।। कोणाही न कळे देव अभंग ।। गुप्त होय बोलोनी ।। ७२ ।। सोळाव्यांत शिवशास्त्र्यां भेट देवून ।। पटवी शिवावतार खूण ।। सद्भावें त्याच्या होऊन प्रसन्न ।। भक्तिमार्ग उपदेशी ।। ७३ ।। सप्तदशींत अकिंचन एक विप्र ।। स्वामीसी प्रार्थितां तुष्टोनि क्षिप्र[1] ।। वस्त्रीं मृत्तिका बांधोनि सावित्रीवर ।। म्हणे निज गृहींच गांठ सोडी ।। ७४ ।। परी अविश्वासें अर्धमार्गीं पाहतां ।। अर्धसुवर्ण अर्धमाती तत्त्वतां ।। पुनरपि चिदम्बरा भेटोनि परततां ।। चोरभय निवारी व्याघ्ररूपें ।। ७५ ।। आठराव्यात चौवेदी चौघे ब्राम्हण ।। परीक्षार्थ येतां काशीहून ।। बालकाप्रसाद देवोनि तद्गर्व हरण ।। करी वेद म्हणवोनिया ।। ७६ ।। एकोन विंशी गुप्त त्रीस्थळी यात्रा ।। भोजन दक्षिणा देई क्षेत्रस्थ विप्रां ।। गया पुरोहितासी रुपये सहस्त्रा ।। दिवाकराकडोनि देववी ।। ७७ ।। पुत्रासह वंदिता विधवेप्रति ।। अष्टपुत्र सौभाग्यवती हो म्हणती ।। वर्षांती

१. ताबडतोब.

आणवोनि तिचा क्षेत्रस्थ पति ।। सौभाग्य देती साध्वीसी ।। ७८ ।। शंकर तनयाच्या उपनयनांत ।। न्यून पडतां शतघट घृत ।। मलापहेंतुनी उसणें आणोनि परत ।। ऋण फेडी विसाव्यांत ।। ७९ ।। आणि धनार्थी येतां अनाथ द्विज ।। ओळखोनि तदंतरींचे गुज ।। हा सर्प घेईं तुझें काज ।। म्हणतां त्यासी भय वाटे ।। ८० ।। स्वामीवचनें धैर्य करून ।। धरिता सर्प होय चोख सुवर्ण ।। विप्र अंतरीं आनंदोन ।। जयजयकारें घरा येत ।। ८१ ।। एकविसाव्यांत राजाराम भक्त ।। सगुण दर्शनार्थ तळमळत ।। अंतरीं धरितां चिदम्बरहेत ।। दर्शन देवोनी तोषवी ।। ८२ ।। निरसतां अज्ञान भ्रम ।। साधक स्वयेंचि परब्रम्ह ।। हेंचि अनुभवी राजाराम ।। स्वामीबोधें द्वाविंशीं ।। ८३ ।। तेविसाव्यात राजारामासी ।। तत्त्वमस्यादि ज्ञान उपदेशी ।। मस्तकीं ठेवितां कृपाहस्तासी ।। कवित्व स्फुरे सद्‌गुरुकृपें ।। ८४ ।। चोविसाव्यांत मांत्रिक शास्त्री थोर ।। व्यंकटेश अष्टकला हरी क्रूर ।। सहा सहस्त्र रुपये मिळतां गिरीवर ।। निघाला स्वामीसी जिंकाया ।। ८५ ।। तंव विकल केलें चिदम्बरें त्यासी ।। पस्तावतां अनुग्रही सप्रेमेंसी ।। तैसेंची दोन होन्न देवोनि विप्रासी ।। यात्रा करवी काशीची ।। ८६ ।। पंचविसाव्यांत तेलंग नारायण ।। यावनाळा पाहून मागे शाल्यन्न ।। पंक्तिभेदास्तव तंडुल देतां जाण ।। गर्वे समाराधना आरंभी ।। ८७ ।। द्विजांचा अनादर ऐकोन ।। श्रीनें शुक्लवृत्ती भिक्षा मागोन ।। आणितां तद्‌दिनापासून ।। अक्षयतंडुल गुप्त होती ।। ८८ ।। चौघे वैष्णवभेटाया येती ।। नैवेद्य पाक स्वतःच करिती ।। सांभळींत पाहतां शालिग्राममूर्ती ।। न दिसती कोठेंही ।। ८९ ।। तंव स्वामीसी पार्थितां सविनयेसी ।। सांभारीं शोधाया सांगती सूदासी[1] ।। त्यानें काढोनि देता मूर्तीसी ।। आनंदे गर्जती हाचि विष्णू ।। ९० ।। गोदातीरवासी एक ब्राम्हण ।। सुतासह भेटाया येतां जाण ।। व्याघ्र धरी बाळालागोन ।। परी सोडी चिदम्बरनामें ।। ९१ ।। सव्विसाव्यांत अगडी रामशास्त्री ।। भेटतां भस्म घालोनी त्याचे वक्त्रीं ।। पुराण सांगवोनि गर्व हरी ।। पंडित त्र्यंबकशाास्त्र्याचा ।। ९२ ।। त्या अगडी राजपुरोहितासी

१. स्वैपाक्यास. २. दगड.




शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

।। दैन्यखंडनार्थ देत प्रस्तरासी[२] ।। अर्ध सुवर्ण होय पाहतां अर्ध वाटेसी ।। भाग्य तयाचें उजळलें ।। ९३ ।। तुंगातीरस्थ नारायण भक्त ।। पांडुरंगासी कुटुंबपोषणार्थ ।। प्रर्थितां तो म्हणे चिदम्बर समर्थ ।। तयाजवळीं जावें तुवां ।। ९४ ।। मग निरुपायें येतां स्वामीप्रत ।। नर काय देईल चिदम्बर म्हणत ।। स्वसंशय खूण चित्तीं बाणत ।। शरण आला गुरुपाया ।। ९५ ।। प्रसन्न होऊन चिदम्बर ।। पूर्णय्याकडे त्यास धाडी सत्वर ।। देववी त्यास रुपये पंच सहस्त्र ।। ऋणमोचन होय जेणें ।। ९६ ।। सत्ताविसांत सुगोल क्षेत्रीं ।। व्याघ्राजवळीं दिल्या पुत्रा ।। द्या जी ऐसे मागतां ।। व्याघ्रे प्रेमें दीघलें ।। ९७ ।। दोघे शूद्र दर्शना निघत ।। मार्गी एका व्याघ्र धरित ।। दुजा चिदम्बराची घालितां शपथ ।। सोडोनि दिलें तात्काळ ।। ९८ ।। तंव चिदम्बराकडे दोघे येत ।। सांगती ते व्याघ्रा कराया मुक्त ।। जाऊनि म्हणतां सुटली शपथ ।। गेला उडी ठोकींत वनामाजीं ।। ९९ ।। अठ्ठाविसांत तडग्नूरी ।। निर्जल स्थळीं उदकझरी ।। काढोनि सर्व जनांच्या अंतरीं ।। संतोष देती अपार ।। १०० ।। आपणास मानी अत्यंत श्रेष्ठ ।। आला गुरुपुरा हरिदास गर्विष्ठ ।। अहंपणा त्याचा नाशिला स्पष्ट ।। मंद तिम्माच्या कीर्तने ।। १ ।। एकोणतिसीं दावून नृसिंहरूप ।। नृसिंहभक्तगर्व हरी सकृप ।। प्रगटवी अद्भुत नामप्रताप ।। स्वीकारोनि पंक्ती बहिष्कृता ।। २ ।। नामे होय चित्तशुध्दी ।। नामे लाधती सकलसिध्दी ।। नामेचि मुक्ती त्रिशुध्द ।। निर्विकल्पस्थिति नामेचि ।। ३ ।। नामेंचि भक्ति ज्ञान विरक्ति ।। नामेंचि चित्स्वरूपप्राप्ति ।। नामें निजानंद निरतिशय शांति ।। ऐसें दाखवि सर्वांसि ।। ४ ।। तिसव्यांत क्षयनाम संवत्सरीं ।। दुर्भिक्ष पडतां अवनीवरी ।। मल्लभक्ताकडोनि यावनाळ भारी ।। देववोनि पीडितां तोषवी ।। ५ ।। एकतिसीं अन्न जल देऊन ।। कुसुगल्लीं तृप्त करी गृस्थजन ।। शिरहट्टी कार्तिकीं पर्जन्य पाडून ।। दुष्काळ निवारि गुरुदेव ।। ६ ।। चौद्विजां वाढवी ईप्सितान्न ।। शूद्रा देई निक्षिप्त धन ।। भक्ती अधिकार त्याचा पाहून ।। दिव्य ज्ञान बोधी तया ।। ७ ।। बत्तिसीं चिक्कोडी अण्णंभट्टास ।। प्रपंच परमार्थैक्य बोधोनि सुरस ।। स्वाधीन करी त्यक्त स्त्रीपुत्रास ।। व्रण पूर्ण

शिवचिदम्बर

शिवचिदम्बर

शमवोनी ।। ८ ।। तेहतिसीं घंटारव शास्त्रीगर्व ।। हरवी मुक्याकरवीं देव ।। कुष्टी गणिकेचा रोग हरोनि सर्व ।। द्विजोच्छिष्टमहिमा विशद करी ।। ९ ।। चौतिसाव्यांत नवलगुंदीं ।। काशिनाथ पुत्राची मौजी बांधी ।। विश्वंभर दिवाकर प्रार्थितां दयानिधी ।। उपोद्घात करी यज्ञाचा ।। ११० ।। पस्तिसीं यज्ञपूर्वांगकथन ।। शामभट्ट योगीरायाचें दर्शन ।। म्लेंच्छरूपें यज्ञेशांचे आगमन ।। नृपादि जनसंमर्द ये यज्ञार्थ ।। ११ ।। छत्तिसीं अथांग यज्ञवर्णन ।। बुडत विप्रा काढी मलापहेंतुन ।। भाजींत पडल्या सूदालागोन ।। आयुष्य देत दश दिन ।। १२ ।। समाधान हेंचि द्विजाचें धन ।। दिवाकरा ऐसें उपदेशून ।। अपार जनां घालोनि भोजन ।। अद्वयानंद बोध करी ।। १३ ।। सदतिसाव्यांत अवभृथ ।। स्नान करतां चिद्गंगेंत ।। गंगास्तुतीनें सकलांप्रत ।। जल समान होय तैं ।। १४ ।। मग या सोमयज्ञा अंतीं ।। चंद्रमस्यर्थ करितां विनंती ।। गरीबभक्तांकडून मात्र घेती ।। वेळ गेली म्हणती नृपां ।। १५ ।। यज्ञ द्विविध कर्म आणि ज्ञान ।। ज्ञानही त्रिप्रकार काया वाचा मन ।। अडतीसीं कायिक यज्ञवर्णन ।। देहस्थ ईश्वर भेटे निरहंपणें ।। १६ ।। एकोणचाळिसीं रुद्राक्षमहिमा ।। वाहक गर्दभ जाय मोक्षधामा ।। कुक्कुट मर्कट जाती राजजन्मा ।। रुद्राक्षधारणें वेश्येगृहींचें ।। १७ ।। भस्ममहिमा तध्दारणविधान ।। भद्रायुरोगहरण राक्षसमोचन ।। दुर्वत्तमृतविप्रकैलासगमन ।। चाळिसाव्यांत कथिलसे ।। १८ ।। वाचिक मानसिक यज्ञार्थ विशेष ।। एकेचाळिसीं करिती ब्रम्होपदेश ।। शिवस्मरण प्रेमळवचनें सर्वांस ।। संतोष होय तो वाग्यज्ञ ।। १९ ।। जयासी वाटे भवपार व्हावें ।। मनपशूसी निर्ममत्वें त्यानें वधावें ।। मग स्वानंदसाम्राज्यीं पहुडावें ।। मनोयज्ञ या नांव ।। १२० ।। बेचाळिसीं उर्वरित सामग्री योजून ।। दिवाकरें सोमगाय करविला पांचदिन ।। आम्रायी धन्याची प्रार्थना ऐकून ।। फळभारें वृक्ष वांकवि ।। २१ ।। मग सुमुहूर्तीं सोडोनि गोण्णागर ।। नवलगुंदा येती चिदम्बर ।। बाजीराव भेटतां सपरिवार ।। सत्कार तयासी दीधला ।। २२ ।। जावया निघता फलमंत्राक्षता ।। निजमंदिराप्रत न्यावयासि देतां ।। हळहळती दासपदरी टाकिले पाहतां ।। म्हणति अब्रम्हण्य समय पातला ।। २३ ।। कष्टकाळींही जो नर ।। भजे ईश्वरा



शिवचिदम्बर

निरंतर ।। तद्योगक्षेम वाही उमावर ।। सत्य सत्य त्रिवाचा ।। २४ ।। त्रेचाळिसीं चतुर्भुज राजाचा निर्धार ।। पाहोनि उपदेशी ज्ञान थोर ।। तोही दीर्घाभ्यासें पैलतीर ।। पावोनि कृतकृत्य जाहला ।। २५ ।। रामेश्वरी मी नाहीं यतीश्वरा ।। ऐशा द्रष्टांते गेला तो गुरुपुरा ।। अभिषेकितां देखिलें प्रत्यक्ष रामेश्वरा ।। चव्वेचाळिसीं निरूपण हें ।। २६ ।। पंचेचाळिसीं संसारचंद नृप ।। भजो लागला ऐकोनि स्वामीप्रताप ।। पुढें राजयक्ष्में त्यासी होतां ताप ।। आत्मघातां प्रवर्तला ।। २७ ।। तंव चिदंम्बर तेथें प्रगटोन ।। भक्तांचें केलें प्राणरक्षण ।। ऐसा सद्‌गुरूनाथ दयाघन ।। स्मरणमात्रें उध्दरित ।। २८ ।। सेचाळिसीं एकांतीं रामगोग्यासी ।। भेटोनि साक्षित्वाभ्यास उपदेशी ।। तत्कूटस्थ प्रकाशे हृदयाकाशीं ।। तूंचि मी मीच तूं बोधें ।। २९ ।। मार्तंडयात्रार्थ निघतां वाटेंत ।। गालवक्षत्रीं श्रीकृष्णेसि स्तवित ।। स्नानसमयीं सौभाग्य दे विधवेप्रत ।। आणि तैसेंचि पुत्र तिजला ।। १३० ।। सत्तेचाळिसीं हिप्परगी क्षेत्रिं ।। प्रचंड यात्रा जमले अवसरीं ।। ब्राम्हणभोजनीं एका द्विजावरी ।। शिला पडोनी मृत झाला ।। ३१ ।। तंव तत्कांतेचा आकांत पाहून ।। द्रवलें चिदाम्बरांचें अंतःकरण ।। यमाकडोनि तत्पति देववितां जाण ।। आश्चर्य आनंद सर्वासी ।। ३२ ।। अठ्ठेचाळिसीं स्वामीचें चित्रचरित्र ।। संक्षेपें वर्णिलेसे पवित्र ।। विश्वनाथा करोनि कृपापात्र ।। व्यंकटेशमूर्ती स्थापविली ।। ३३ ।। एकोणपन्नासीं जरठाचें लग्न ।। विप्रासि देत बाराशें होन्न ।। काशिनाथलग्नां वेंकटेशागमन ।। भक्तव्याधिहरण तैसेंचि ।। ३४ ।। व्याघ्ररूपी भक्तांचें उध्दरण ।। निंदक वैष्णवाच्या कांतेसि दर्शन ।। दिघल्या खिचडीचे करीं होन्न ।। शिलेदारा धनदान इथेंचि ।। ३५ ।। पन्नासाव्यांत श्रीचिदम्बर ।। ब्रम्हीलीन होतां शिवशास्त्रीं अपार ।। स्तवोनि करवी पुनरवतार ।। मार्गशीर्ष कृष्ण चदुर्थीसी ।। ३६ ।। मग पंढरीसी दिवाकरा धाडून ।। सर्व भक्तांसि स्वधर्म सांगोन ।। पुढें पौष शुध्द चतुर्थीदिनीं जाण ।। निजानंदीं विलीन पै ।। ३७ ।। दिवाकर परततां पुढें यथादिष्ट ।। जावोनि सुब्रह्मण्यक्षेत्रीं शोधत ।। तै सुलक्षणलिंग होतसे प्राप्त ।। स्थापी तें तो यथाविधी ।। ३८ ।। गुप्त रूपें राहून ।। भक्तां देत वर दर्शन ।।

शि
व
चि
द
म्ब
र

ऐसा सद्गुरुनाथ करुणाघन ।। भक्ताभीष्ट पुरवीतसे ।। ३९ ।। ऐकोनि ही अवतरणिका ।। द्विजवर म्हणे गुरुनायका ।। चरित्रामृत पुनः पाजोनि देखा ।। अमर केलें मजलागीं ।। १४० ।। परी अंतरीं वसे एक हेत ।। जाणावा सप्ताहविधि समस्त ।। सांगोनि करा मजला तृप्त ।। मुनीश्वरा सद्गुरो ।। ४१ ।। परिसोनि ही द्विजविनजवणी ।। म्हणती मुनीश्वरा ऐक सावधानीं ।। एकेचि स्थानीं शुचिर्भूत होवोनी ।। पूर्व वा उत्तराभिमुख बैसावें ।। ४२ ।। रंगवल्लयादिकें सुशोभित ।। ठेवावा जवळीं दीप तेवत ।। देशकालादि संकल्प विहित ।। करोनि पूजावा चिदम्बर ।। ४३ ।। चिदंबरजप कवचपठण ।। करोनि आरंभावें वाचन ।। असावें सदा समाहित मन ।। दीप जेवी निवांतीं ।। ४४ ।। गुरुस्मरणपूर्वक श्रीचरित्र ।। सप्ताह प्रारंभावा पवित्र ।। प्रत्येक ओवी संपलियावरी मात्र ।। म्हणावे चिदबरमहागुरवे नमः ।। ४५ ।। अथवा शिवचिदम्बर ।। म्हणताही महामंत्र ।। होतसे नर परम पवित्र ।। तैसें इष्टार्थ लाभही ।। ४६ ।। पाळोनि कामादिक नियम ।। भूमि शयन करावें आराम ।। आसन असावें उत्तम ।। दर्भ कृष्णाजिन कंबलाचे ।। ४७ ।। प्रथमदिनीं नऊ अध्याय वाचून ।। द्वितीयदिनीं षोडश करी पूर्ण ।। तृतीयदिनीं चोवीस वाचून जाण ।। बत्तीस अध्याय चतुर्थदिनीं ।। ४८ ।। पांचवे दिनीं वाचावे अडतीस ।। सेचाळिस षष्ठ दिनास ।। सातवे दिनीं वाचोनि पन्नास ।। अवतरणिका वाचावी ।। ४९ ।। मग प्रथम तीन अध्याय वाचन ।। करूनि भक्तिपूर्वक जाण ।। सप्ताह संपवावा संपूर्ण ।। हाचि विधी तयाचा ।। २५० ।। प्रतिदिनीं वाचन संपता ।। उत्तरांग पूजोनि तत्त्वतां ।। निवेदोनी उपहार पदार्था ।। सेवावें सावकाश साधकें ।। ५१ ।। सायंकाळीं भजनादि क्रमातें ।। आरती आणि मंत्रपुष्पदिकाते ।। सारोनि विश्रमावें स्वस्थचित्तें ।। गुरुस्मरणपूर्वक ।। ५२ ।। ऐसा सप्ताह आचरोनी ।। मंगल करावे ब्रम्हभोजनीं ।। यथाशक्ति दांपत्य सुवासिनी ।। करावें पूजन आदरें ।। ५३ ।। शक्त्यनुसार दक्षिणा द्यावी ।। गरीबा वस्त्रें अर्पावीं ।। क्षुधिता अन्नें तोषवी ।। न पुसतां जातगोत ।। ५४ ।। येणें रीतीं वाचतां चरित्र ।। सौख्य लाधें इहपरत्र ।। विजयी होय तो सर्वत्र ।। पुण्य जोडे तद्दर्शनें ।। ५५ ।। भक्तिप्रेमें सप्ताह

शि
व
चि
द
म्ब
र

करितां ।। चिदम्बर साक्षात् होतो तत्त्वतां ।। दिव्य ज्ञान लाधें हाता ।। जन्ममरणवार्ता नुरेचि ।। ५६ ।। तैसेचि भक्तिभावेंकरून ।। चरित्र ऐकती जे भक्तजन ।। तयांचेही मनोरथ पूर्ण ।। श्रवणमात्रें हेतील कीं ।। ५७ ।। मुख्य चिदम्बरसांप्रदाय ।। व्हावें भक्तें प्रेममय ।। का[illegible]यमनें सकलांचें हृदय ।। निवें ऐसें वर्तावें ।। ५८ ।। आर्जव सत्य सदाचरण ।। अक्रोधें नित्य कर्मानुष्ठान ।। अतिथिसत्कार ब्रम्हसंतर्पण ।। दयापूर्ण प्राणिमात्रीं ।। ५९ ।। श्रीचिदम्बरभजनपूजन ।। स्वानंदामाजीं कालहरण ।। सद्गुरूचें अखंड नामस्मरण ।। शांतांतःकरण सर्वदा ।। १६० ।। धन्य धन्य मल्हार दीक्षित ।। जेणें अवतार करविला कलींत ।। जड मूढ भक्त उध्दरित ।। प्रणिपात साष्टांग तयासी ।। ६१ ।। जेंवी चातकाचेनि मिसें ।। मेघ वर्षाव करीतसे ।। तेणें सहज तृप्ती पावतसे ।। प्राणिमात्र सर्वही ।। ६२ ।। नातरी सुस्वाद स्वयंपाक ।। नैवेद्यमिसें सिध्द होतां देख ।। तृप्त होती जन अनेक ।। आकंठवरी जेवोनी ।। ६३ ।। धन्य धन्य हा चिदम्बर ।। हरिहराचा पूर्ण अवतार ।। सकल जगाचा करी उध्दार ।। तत्पदकमलीं नमन माझें ।। ६४ ।। धन्य धन्य चरित्रवाचक ।। धन्य धन्य दास भजक ।। धन्य धन्य सांप्रदायिक ।। त्यांचे चरणीं नमन असो ।। ६५ ।। स्वस्ति श्रीचिदम्बरचरित ।। ऐकतां तुष्टे सद्गुरुनाथ ।। ऐका प्रेमळ भाविक भक्त ।। एकपंचाशत्तमोध्याय गोड हा ।। १६६ ।। इति श्रीचिदम्बरमहागुरुचरित्रे मुक्तिघण्टापथे मोक्षवैभवखण्डे पंचाशदध्यायसारे अवतरणिका नाम एकपंचशत्तमोऽध्यायः ।। ५१ ।। श्रीरस्तु ।। ओवीसंख्या १६६ ।।

।। श्रीचिदम्बरार्पणमस्तु ।।

|| ॐ ||

|| ॐ || श्री श्रीचिदंबर स्वामी पारायण

१) प्रथम दिवस — १ ते ९ = ०९

२) द्वितिय दिवस — १० ते १६ : ०७

३) तृतीय दिवस — १७ ते २४ ०८

४) चतुर्थ दिवस — २५ ते ३२ ०८

५) पाचवा दिवस — ३३ ते ३८ ०६

६) सातवा दिवस — ३९ ते ४६ ०८

७) सातवा दिवस — ४७ ते ५१ ०५

५१

## १३ अष्टौ ग्रामाः

### (१) सोगल

मुरगोडपासून ४ मैल अंतरावर लहानसा जलपात असलेले डोंगरभागातील एक छोटे खेडे आहे. यालाच पूर्वी सुगोल क्षेत्र असें म्हणत. येथें जाण्यास पक्का रस्ता असून जवळून एस. टी. चा मार्ग जातो. जीप, मोटारगाड्या, झटकावाहने वगैरे थेट डोंगरापर्यंत जाऊ शकतात.

गांव पठारावर असून डोंगरी भागांत जरा दूरवर जलपात (धबधबा) आहे. जलपाताकडे पायथ्यापासून बरेंच वर चढून जावें लागतें. जलपाताखालीं राहून स्नान करणेंत भारी मौज वाटतो. एकंदर दृश्य रमणीय आहे.

जलपाताच्या बाजूलाच सोमेश्वराचें पुरातन मंदिर आहे. श्रावण आणि फाल्गुनांत येथें यात्रा भरत असते. श्रावणी सोमवार विशेष महत्त्वाचे असतात. फाल्गुन महिन्याच्या आदल्या सोमवारी शिवपार्वतींचा विवाहसोहळा मोठ्या प्रमाणांत होतो. विवाहाकरितां लागणारें वस्त्र (कापूस पिंजण्यापासून तों विणण्यापर्यंत सर्व काम) त्याच दिवशीं तयार केले जातें.

श्रीमच्चिदम्बरांचे पितृचरण श्रीमार्तंडदीक्षित यांनीं हिप्परगीस जाणेपूर्वी याच ठिकाणीं गायत्रीपुरश्चरण केलें.

### (२) देवरहिप्परगी

देवर हिप्परगी याचा अर्थ देवांची हिप्परगी असा आहे. कर्नाटक राज्यातील विजापूर जिल्ह्यांत सिंदगी तालुक्यामध्यें वसलेला देवरहिप्परगी नामक एक मोठे गांव आहे. विजापूर गुलबुर्गा एस. टी. मार्गावर २५ मैलावर असलेल्या या गांवांत महास्वामींचे कुलदैवत म्हाळसाकांताचें देऊळ गांवापासून दोन फर्लांग अंतरावर आहे. देवळाचा बाहेरील आवार हजार माणसें बसतील एवढा विस्तीर्ण आहे. आवाराच्या बाहेरील बाजूसच तीर्थकुंड आहे.

देवालयांतील शिवलिंग गुप्तस्थानीं असून बाह्य भागावरच पूजोपचार चालतो. वर्षांतून अश्विन व मार्गशीर्ष शुक्लपक्षांत दोन मोठे उत्सव होतात. दीपाराधनाहि मोठ्या प्रमाणांत होते. उत्सवांतील वै

शिष्य म्हणजे गांवाच्या दुसऱ्या टोकास असलेल्या देवळांतील राऊतरावाची मूर्ति म्हाळसाकांताच्या मंदिरांत आणणें हें होय. उत्सवाखेरीज, इतर वेळीं राऊतरावास देवळांत आणण्याचा मान फक्त श्रीचिदम्बरदीक्षितांच्या घराण्यांतील लोकांनाच आहे. हें मोठें खर्चाचेंहि काम आहे.

महास्वामीच्या पितृचरणांनीं याच ठिकाणी म्हाळसाकांताची आराधना केली व स्वप्नदृष्टांताप्रमाणें आकाशचिदम्बर येथें तपश्चर्याकरितां जाते झाले.

### (३) आकाशचिदम्बरम्

हें शिवक्षेत्र मद्रासपासून अंदाजें १५० मैल दूर मद्रास-त्रिचनापल्ली लोहमार्गांवर आहे. आकाशलिंग स्थान असलेमूळें यासच आकाशचिदम्बर असें म्हणतात. याचें पूर्वीचें नांव व्याघ्रपुर असें होतें. चिदंबर स्थानकापासून गावांत जाण्यास वाहनांची सोय आहे. गांवापासून थोड्या दूरवर कोलम् नदी वाहते.

येथील अत्यंत प्राचीन अशा शिवमंदिराचा बाह्य प्राकार बराच मोठा असून जवळ जवळ चाळीस एकर क्षेत्रांवर ही वास्तू वसलेली आहे. निरनिराळ्या विभागांनी युक्त अशी ही वास्तू दहाव्या शतकाच्या प्रारंभीं बांधली गेली असावी. शिवमंदिराचे चित्सभा, कनकसभा, नृत्यसभा, देवसभा, राजसभा असे पांच विभाग आहेत.

प्रत्यक्ष शिवलिंग येथें नसल्यामुळें सर्व गोष्टी माणकाच्या व सुवर्णाच्या भोगमूर्तीवर होतात. राजसभेच्या बाजूलाच शिवगंगा नामक मोठें तीर्थ आहे. यांतीलच पाणी पूजाअर्चादिकांसाठीं वापरतात.

चित्सभेंत आकाशलिंग स्थान दाखविलें जातें. याचें छत सोन्याचें मढविलेलें आहे. कनकसभेंत पूजाअर्चादि होत असतात. नृत्यसभेंत नटराजाची मूर्ति आहे. वर्षांतून दोन वेळां या मूर्तीस महाभिषेक होतात. देवसभेंत उत्सवादि होतात. भव्य अशा राजसभेंत (४०X२५) अशा पंक्तींत सहस्त्रस्तंभ आहेत.

येथील सिध्दिविनायकाची मूर्ति ही अत्यंत सुंदर अशी आहे. आवाराच्या चारहि बाजूंस चार महाद्वार व त्यावर प्रेक्षणीय गोपुरें आहेत.

याच शिवक्षेत्रांत श्रीचिदम्बरमहास्वामींच्या पितृचरणांनीं मार्तंडेश्वराच्या आज्ञेवरून दूर्वांरसावर

(११६ ब)

राहून घोर तपश्चर्या केली व शंकरास प्रसन्न करून घेऊन आपल्यापोटीं चिदम्बरावताराचा वर प्राप्त करून घेतला.

**(४) मुरगोड**

बेळगावपासून ३० मैल व धारवाडपासून ४० मैल दूर एस. टी मार्गावर हा गाव वसलेला आहे. याचें पूर्वीचें नांव अमरकल्याण असें आहे. याच ठिकाणीं श्रीमच्चिदम्बरांचा अवतार झाला. जन्मस्थळाची खोली व देवस्थानची जागा अद्याप पाहावयास मिळतात.

अवतारसमाप्तीनंतर स्वप्नदृष्टान्ताप्रमाणें लिंगस्थापना होऊन देऊळ बांधविलेले स्थान श्रीक्षेत्र केंगेरी मुरगोडपासून सुमारें अर्धा मैल अंतरावर आहे. याच ठिकाणीं श्रीमच्चिदम्बरांनीं बांधविलेलें मल्हार पंचायतनाचें देवस्थान असून महास्वामींच्या मातृपितृ दैवतांचींहि स्थानें येथें आहेत. मुख्य देवालयाला लागूनच उजव्या भागास पितृचरणांचे दिव्यस्थान आहे. पितृचरणांनीं देह सोडलेवर अग्निसंस्कार करण्यांत आला त्या ठिकाणीं ३ऱ्या दिवशीं रक्षा गोळा करीत असतां त्याच स्थलांत टवटवीत असे औदुंबर वृक्षांकुर दृष्टोत्पत्तीस आले. पुढें या वृक्षांना सुव्यवस्थित कट्टा बांधण्यांत आला. त्यांस सध्या नित्यपूजा वगैरे होत असते. त्याच्याच शेजारीं मातृचरणांची जागा आहे. देवालयाच्या डाव्या बाजूस छोटेसे राममंदिर असून त्याला लागूनच पलीकडे मार्तंडेश्वर मंदिर आहे. त्याच्याच बाजूला पलीकडे थोड्याशा अंतरावर मोठी विहीर आहे. याच विहिरीचें पाणी अर्चनादींकरितां वापरलें जातें. मुख्य देवालयासमोर आवारांत मोठा अश्वत्थ वृक्ष असून त्याखालीं दत्तपादुका मंदिर आहे. त्याच्याच बाजूला उजवीकडे थोड्या अंतरावर दुसरा अश्वत्थ, महास्वामींचे प्रथम पुत्र दिवाकर यांचे चिन्ह म्हणून आहे. तसेंच उजवीकडे सभामंडप, डावीकडे कोपऱ्यांत कायमचा यज्ञमंडप उभा आहे. हे सर्व भव्य प्राकारामध्येंच स्थित आहेत.

येथील शिवलिंगाची त्रिकाळ पूजा होते. रात्रीं शेजारती वगैरे कार्यक्रम होतात. भक्तांचे रुद्राभिषेक सोमवारीं व गुरुवारीं विशेषत्वाने चालू असतात. दर सोमवारीं पालखीसेवेच्या वेळेस पालखी आवाराभोवती

फिरते. श्रावणांत लक्ष बिल्वाचन होतें. श्रावणांतील सोमवारीं रुद्राभिषेकादि करविणेस बरेच भक्त लोक येतात. कार्तिक वद्य षष्ठीस महास्वामींचा जन्मोत्सव होतो. मोठा उत्सव मार्गशीर्ष महिन्यांतील मल्हारी नवरात्रोत्सवांत सहा दिवस शैवागम पध्दतीनें होतो. षष्ठीला रथ ओढला जातो. पांच दिवसपर्यंत होमादिकर्मे, विवाहादि सोहाळे चालूं असतात. विवाहोत्सवांत भाग घेणेकरितां लोकांची अहमहमिका लागलेली दिसून येते. त्याचें फळहि लवकर मिळतें असा अनुभव आहे. महास्वामींच्या सेवेकरितां लोक येऊन राहतात. महास्वामींच्या सान्निध्यानें या स्थानांत दिव्यत्वाची कल्पना येते.

**(५) गुर्लहोसूर**

गुरुनवपुर यालाच पुढें गुर्लहोसूर असें म्हणू लागले. चिदम्बरमहास्वामींच्या करितां तत्कालीन संस्थानिकांनीं आपल्या अनेक राजवाड्यांसह मलप्रभा नदीतीरावर वसविलेला हा गांव हल्लीं मलप्रभेवरच बांधल्या जाणाऱ्या धरणामुळें जलस्थ झाला आहे. तेथें महास्वामींचे कनिष्ठ पुत्र श्रीबापू दीक्षित यांनीं बांधविलेलें भव्य मंदिर होतें. शेजारी चिदम्बरभक्त कैवल्यस्वामींची समाधीहि होती. गांवांत दास राजारामांना पादुकादर्शन दिलेलें स्थानहि होतें.

कैवल्यस्वामींचें स्थान मुनोळीस गेलें आहे. प्रस्तुत चिदंबरदेवस्थान व चिदंबर पादुकास्थान सवदत्तीच्या गांवठाण्यांत आणले असून पुनर्बांधणीचें काम चालूं आहे. आसपास व सभोवार गुर्लहोसूरचें पुनर्वसनही चालू आहे. या विभागास चिदंबरनगर असें नामाभिधान झालें आहे. येथील वार्षिकोत्सव कार्तिक वद्य प्रतिपदेपासून ६ दिवस चालतो. षष्ठीला रथोत्सव होऊन त्याची समाप्ती होते. नित्यसेवांतर्गत प्रतिसोमवारीं पालखीसेवाहि होते. सवदत्ती गांव धारवाडपासून २२ मैल अंतरावर बेळगांव जिल्ह्यांतील तालुक्याचें ठिकाण आहे. दोन्हीकडून एस. टी. ची सोय आहे, पण बेळगांवापासून तें अधिक दूर. यल्लम्माची सवदत्ती म्हणून हा गांव प्रसिध्द आहे. येथून ३ मैलांवरच डोंगरभागांत यल्लम्माचें (रेणुकेचें) प्रसिध्द क्षेत्र आहे. महास्वामींच्या प्रवासांत या भगवतीक्षेत्रांत त्यांचा मुक्काम होत असे.

### (६) बडली

बडली हा गाव मलप्रभा नदीच्या तीरावर होता. श्रीमहास्वामींच्या आदेशानुसार त्यांचे द्वितीय पुत्र श्री शंकर दीक्षित येथे रहात होते. मुरुगोड व गुर्लहोसूर येथे ज्याप्रमाणे आगमोक्त उत्सव होतो त्याप्रमाणे येथेही चैत्रशुध्द पौर्णिमेस रथोत्सव होत असे. येथे श्री चिदम्बरमहास्वामींचे देवूळ होते. महास्वामी स्वतः पूजा करीत असलेले पंचायतन त्यांच्या हातातील गुंडी (अक्षय कलश) दक्षिणावर्त शंड्ख वगैरे महास्वामीने निर्याणाच्या वेळी श्रीशंकरदीक्षितांच्याकडे सोपविले. श्रीसरस्वतीमातेला शंकरदीक्षितांच्याकडे रहाण्यास महास्वामीनें आदेश दिला. श्रीसरस्वती मातेची समाधि बडलीत होती. हा गाव मलप्रभेवर बांधलेल्या धरणामुळे जलस्थ झाला आहे. महास्वामींचे पौत्र श्रीशंकर दीक्षितांचे पुत्र श्रीमार्तंडदीक्षित मोठे तपस्वी सर्व विद्या पारंगत होते. त्यानीं श्री महास्वामींचा सत्संप्रदाय पुढे उत्कृष्टरीतीने चालविला. त्यानी दुर्मिळ ६००० हस्तलिखित ग्रंथांचा संग्रह केला. ग्रंथ संग्रह सध्या बेळगाव येथे श्रीजगन्नाथ दीक्षितां यांचे कडे आहे. पंचायतन गुंडी (अक्षय कलश) वगैरे हुबळी येथे श्रीमार्तांडदीक्षितांच्या घरी आहेत. नित्यपूजा वगैरे होत असून, कालपरिस्थितीस अनुसरुन श्रीचिदम्बर संप्रदाय चालवित आहेत. नवीन बडली ग्रामांत श्रीचिदम्बर देवूळ निर्माण करिता आले नाही.

### (७) गोण्णागर

बेळगांव जिल्ह्यांतील रामदुर्ग या मोठ्या गावापासून ७ मैल अंतरावर श्रीमच्चिदंबरांनीं केलेल्या महायज्ञानें पुनीत झालेली ही पुण्यभूमि वसलेली आहे. यज्ञानंतर यज्ञकुंडांत अंकुरित झालेला व आजला खूप विस्तार पावलेला कीं ज्याच्या छायेखालीं हजार माणसें सहज बसतील एवढा मोठा अश्वत्थवृक्ष उभा आहे. जणू कांहीं आठ दिशेला आठ तुळया टाकाव्या तशा याच्या आठ फांद्या सरळ व दूरवर पसरल्या आहेत. नुकत्याच झालेल्या उत्सवात याला कट्टा बांधण्यांत आला आहे. याच्याच समोर १०० एक फूट अंतरावर, स्वप्नदृष्टान्ताप्रमाणें मुंबापुरिस्थ एका सद्भक्तानें गुर्लहोसूर येथें तीर्थस्थानाजवळ उगवलेल्या औदुंबर वृक्षांचें रोपण केलें असून दोन वर्षांत ५-६ फुटापर्यंत

त्याची वाढ झाली आहे. एकान्तवास करून अनुष्ठान करणेस कुरवपुराप्रमाणेंच ही भूमि योग्य वाटते.

या अश्वत्थवृक्षास आजला सर्व लोक 'बाबानगिड' म्हणून ओळखतात. लोकांचें व यात्रिकांचें तें एक श्रध्दास्थान बनून राहिलें आहे व तदनुसार रुद्रस्वाहाकारादि वार्षिकोत्सव होऊं लागले आहेत.

गोण्णागराचे ग्रामदैवत मारुतीहि प्रसिध्द आहे. व गांवापासून २-३ मैल अंतरावर शबरीवन म्हणून ओळखली जाणारी डोंगरदरी पहाण्यालायक आहे. गोण्णागरास रामदुर्गापासून एस. टी. ने जाता येतें.

**(८) बाभुंळगांव**

बाभुळगाव, औरंगावाद जिल्ह्यांतील दौंड-मनमाड लोहमार्गावर असलेल्या पुणतांबे स्टेशनपासून ४-५ मैल अंतरावर गोदावरीतटाकीं वसलेलें लहानसें खेडें आहे. गांवाची हृध्द मात्र मराठावाड्यातील वैजापूर तालुक्यांत आहे. पुणतांबे स्टेशनपासून तेथें जाण्यास कच्चा रस्ता असून बैलगाडीने जाण्याची सोय आहे. मात्र गावाजवळ नदी ओलांडावी लागते.

श्रीमच्चिदंबरांच्या अवतारसमाप्तीनंतर दास राजाराममहाराजांनी घडवून घेतलेल्या श्रीमच्चिदंबर आणि सावित्री सरस्वतींच्या अत्यंत मनोहर मूर्ति येथें आहेत. गारुतीची पण तशीच मूर्ति आहे. येथील मंदिर अत्यंत साधे आहे. मूर्तिची पूजा वगैरे दास राजारामांचे वंशजच करीत असतात. त्यांचेकडून आल्या गेल्याचें आदरातिथ्य होत असते. याच ठिकाणीं दास राजाराम महाराजांनी लिहिलेल्या १,५१,४९१ अभंगांच्या हस्तलिखित प्रति एका मोठ्या पेटाऱ्यात ठेविलेल्या पाहावयास मिळतात. एकांतवासास योग्य ठिकाण आहे.

## १४ चत्वारः समानकालीनाः भक्ताः

### १ दास राजाराममहाराज

रजपूत वंशातील महान् भगवद्भक्त हरिसिंग व महान् पतिव्रता लक्ष्मीबाई यांचे पोटीं दास राजाराम यांचा जन्म शके १६९० म्हणजे १७६९ मध्यें बाभूळ गांव येथे झाला. लहानपणापासून राजारामांचा कल देवभक्तीकडे होता. पूजा, भजन, ध्यान व भगवत्कथा श्रवणांत त्यांचा काल व्यतीत होई.

बभूळगांवांत बाभुळेश्वरांचें मंदिर आहे. तेथें हरिसिंगाचे गुरु द्वारकादास राहात असत; त्यांचे मुखातून अनेक भक्तचरित्रे ऐकण्यांत राजाराम रमून जात. एकदा भागवतांतील ध्रुवाख्यान त्यांनीं ऐकले; व त्यांच्या मनांत खुपच चलबिचल झाली. पांच वर्षाच्या ध्रुव बाळाला जर परमेश्वराचें सगुण दर्शन होऊ शकतें तर आठ वर्षे उलटूनहि अद्याप मला देवदर्शन का होत नाही याची त्यांना सारखी खंत वाटू लागली. द्वारकादासाजरळ त्यांनीं आपली ही तळमळ बोलूनहि दाखविली आणि त्याच वेळी "तुलहि सगुणावतार चिदम्बराचें दर्शन होऊन तूं कृतकृत्य होशील" असें त्यांनीं राजारामाचें सांत्वन केलें.

परमेश्वरप्राप्तीकरितां साधना चालूं असतांनाच त्यांचा विवाह झाला. व प्रपंचाची जबाबदारी पार पाडण्याकरितां ते बाभूळगांव सोडून निघाले आणि एका संस्थानांत घोडदळाचे रिसालदार म्हणून राहिले. भगवंताच्या सगुण दर्शनाकरितां अखंड तळमळ लागून राहिली होतीच, व आकस्मात् एके दिवशीं कृष्णभट्ट नांवाच्या काशीयात्रेस जाणाऱ्या ब्राम्हणाची गांठ पडून त्याचे तोंडून साक्षात् परमेश्वर चिदम्बररूपानें मुरगोडी लीला दाखवीत आहे असें ऐकलें. द्वारकादासांनीं सांगितलेलें खरें होणार व केव्हां एकदा चिदम्बराचें दर्शन घडणार म्हणून त्यांचे मन उत्कंठित झाले.

लागलीच त्यांनी मुरगोडास जाण्याचा निश्चय करून नोकरीस तिलांजली दिली आणि गुरुबंधु निंबाजीसळ मार्गक्रमणास प्रारंभ केला. वाटेंत अत्यंत अडचणींतून पार पडावें लागलें. चिदम्बरांचा वास त्या वेळीं मुरगोडात नसून कुदगोळास आहे, अशी बातमी समजली म्हणून एकदाचे मजल दरमजल करीत त्यांनी कुंदगोळ गांठलें, तेथें श्रीचिदम्बरदर्शनानें त्यांचा जीवित हेतू सफळ झाला. चिदम्बरांची पूर्ण कृपा त्यांचेवर झाली. "पूर्णब्रम्ह झाला असे हो अवतार। पहा डोळेभर चिदम्बरा"। असे जनतेला हाकारले, व त्यांचेच बनून राहिले आणि सांगितले.

नर नोहे चिदम्बर, नारायण तो अवतार।
यासी मनुष्य जो का म्हणे, त्याच्या पूर्वजासी उणे।
नरका जाती बेचाळीस, जोंवरी सूर्य हे आकाश।
दास म्हणे हो निश्चिती, सुटका नसे बा कल्पांतीं।

भगवान् चिदम्बरावर त्यानी १,५१,४९१ अभंग गाथा लिहिली व विट्ठलावरील अभंगाची पूर्ती येथे झाली असें सांगितले. इतरही अनेक प्रकारे वाङ्मयसेवा करून चिदम्बरांचे जोडे उरावर वाहवून दिंडी घेऊन तीर्थयात्रा केली व शेवटीं शके १७६५ म्हणजे सन १८४३ मध्ये बेळगांव येथील शहापुरांत देह ठेवला. तेथेच त्यांची समाधी असून हल्लीं तेथें उत्सवादिक होतात.

देव अवतार घेती। भक्त समागमे येती ।।१।। बाकी नसे मजकडे। बरोबरी येणे घडे ।।२।। पांडुरंग अवतार। उघडजगी चिदम्बर ।।३।। तेव्हा होतो तुकाराम आता झालो राजाराम ।।४।। दुसरा दिला असे वेष। म्हणोनि नाम ठेविले दास ।।५।।

**२ भक्त = सखाराम त्रिंबक गर्दे**

भक्त सखारामाबद्दल विशेष अशी माहिती उपलब्ध नाही. सखाराम गर्दे हे मूळचे गुहागरचे होत. कालांतरानें ते सहकुटुंब कारागृहवासांत होते. तेथेंच चिदंबरावताराविषयीं त्यांनी कर्णोपकर्णी ऐकलें व मनांतून त्यांनीं चिदम्बराचि करुणा भाकावयास प्रारंभ केला. परिणामतः त्यानाही श्रीचिदंबरांनीं स्वप्नदृष्टान्त दिला कीं तूं तेथेंच लेखनभक्तीला सुरुवात कर. परंतु ते त्यामुळें बुचकळ्यांत पडले. कांहींहि साहित्य नाहीं व साहित्याचें ज्ञानही नाहीं, अशा संदर्भात लेखनभक्ति कशी करावी? पण गुर्वाज्ञेप्रमाणें शेणाची शाई व धाटाची लेखणी करून तुरुंगाच्या भिंतीवरच त्यांनी रचित पद्यांचें लिखाण करण्यास सुरुवात केली.

त्या योगें ज्या संस्थानिकाच्या तुरुंगांत ते होते त्यांना श्रीचिदंबरांनी स्वप्नदृष्टान्त दिला कीं गर्दे यांची शिक्षा संपवून त्यांना बंधमुक्त करावें व प्रत्यक्षांत तर चिदंबरशिष्य नारायण=यति यांनींहि श्री. गर्दे यांची तुरुंगात भेट घेऊन श्रीचिदंबरांच्या आज्ञेवरून त्यांची सुटका होणार असल्याचें सांगितलें. त्याप्रमाणे २५ दिवसांनतर गर्दे यांची तुरुंगांतून सुटका झाली.

तुंरुगाधिकाऱ्यांची परवानगी मिळवून भिंतीवरील पद्यसेवा त्यांनी कागदावर उतरवून घेतली, व लागलीच श्रीचिदंबरदर्शनाकरितां मुरगोड व गुर्लहोसुरास आले. श्रीचिदंबरांच्या प्रत्यक्ष दर्शनानंतर

तर तेथेंच आजन्म चिदंबरभक्त होऊन राहिले. श्रीमच्चिरित्र म्हणून त्यांनी २५०० पद्यांचा ग्रंथ रचलेला आहे. तो अद्याप अप्रकाशित व हस्तलिखितावस्थेंतच आहे. श्रीमच्चरित्र असें नांव कां दिले याबद्दल त्यांनी सांगितले आहे की,

।। श्रीशब्दमुख्य होय । सर्व शब्दांत श्रेष्ठ ही । लक्ष्मी–शोभा–ज्ञान–यश । श्री सुवाचक शब्द हे । **धावा** येई येई वो श्रीमंते पूर्णकृपावंते। यावे मजलागी मज अंबे श्रीचिदंबर गुरूमाते। येई येई वो ।।ध्रु।। ममता प्रवाही मी वाहे। म्हणूनि विनविताहे, वेगी येवोनिया, रक्षीतू, काढी आपुल्या बाहे ।।१।। भस्म सर्वांगी, करी गुंडी। शिरी राजे शेंडी, ऐसा व्यक्त तू। होवोनि भवभेदा दंडी ।।२।। वदे दासा हो सावध। तुजला वेध, न करी। चिंता तू। देतो मी घेई सुखबोध ।।३।। वाक्य सखाराम ऐकुनि। चित्ती संतोषोनी। चिदम्बर रूप पाहे व्याप्त हे जनि मनि ध्यानी ।।४।।

## ३ शिवभक्त–शिवशास्त्री

शिवशास्त्री हे महान् शिवभक्त त्रिकाल शिवार्चन करणारे, मद्रास राज्यांतील मत्सलीपट्टणम् या गावचे होत. हे स्वतः संस्कृत पंडित व गाढे विद्वान् होते. शिष्टसंरक्षण व दुष्टदंडन करून धर्मवृध्दि करणेकरितां शिवावतार श्रीचिदम्बरांचा वास गुर्लहोसुरांत आहे असें त्यांनीं कर्णोपकर्णी ऐकलें होतें. परंतु पापमय या कलींत ही गोष्ट शक्य आहे काय? अशी जबरदस्त शंका त्यांच्या पंडित आणि विद्वान् मनाला भेडसावूं लागली. शास्त्रपूत मन सहजासहजीं अशा गोष्टींवर विश्वास ठेवीत नसतें. म्हणून त्यांनीं प्रत्यक्षांत जाऊन पाहूनच खात्री करावी असा निश्चय केला.

गुर्लहोसूरास जाण्यास ते निघाले व प्रवासांतील पहिल्याच रात्रीं त्यांना स्वप्न दृष्टांत झाला. "पार्वतीपरमेश्वर आले आहेत. आणि ते शास्त्रींना विचारतात कीं, कलींत परमेश्वरावतार शक्य आहे काय? आपण तर तें शक्य मानून निघालात". तेव्हां तर त्यांचें कुतूहल अधिक झालें; व झपट्यानें ते इष्टस्थळीं येऊन पाहतात तो श्रीचिदम्बरांच्या ठिकाणीं पार्वतीपरमेश्वराचेंच रूप त्यांना प्रत्यक्ष दिसलें. शास्त्रींचा संशय फिटला. चिदम्बर शिवावतार

असल्याची खात्री पटली. तेथच्या तेथें त्यांनीं ॥ दयासमुद्रो दुरितापहारी॥ दुरन्त सत्तापनिवारकारी। स्वपदाभक्तस्य भवाब्धितारी चिदम्बरो मे भवतु प्रसन्नः।

असें म्हणून स्तुतीस आरंभ केला. तेव्हा श्रीचिदम्बरांनीं त्याना म्हटले, "अहो पंडितशास्त्री आपण नरस्तुति करतां आहांत, आपण नारायणाची स्तुति करावी, हे उचित होय."

शास्त्री गहिवरले व आपणच प्रत्यक्ष परमेश्वर आहांत व आपणास आरती ओवाळितो आणि त्या योगे ही गोष्ट सिध्द करून दाखवितो. आपण ही नरमाणूस मी तर पामरच तेव्हा मी तळहातावर कापूर पेटवून घेवून आरती ओवाळल्यास माझे हात साहजिकच जळतील असे म्हणून त्यांनी तळ हातावर कापूर पेटवून घेतला व गीर्वाण भाषेंतील ११७ श्लोकी भक्तानंद स्तोत्र गाऊन संपेपर्यंत श्रीचिदम्बराला आरती ओवाळली. त्यांच्या हाताला ना अग्नीचा स्पर्श झाला ना हात काळे झाले व सर्वांस त्यांनी दाखवून दिलें कीं, श्रीचिदम्बर हा साक्षात् परमेश्वराचा अवतार आहे; आणि तसे नसते तर माझे हात असे राहते ना? म्हणून त्यांनीं खणखणीतपणे सांगितले.

"बभूव भूमौ परमेश्वरोऽसौ। चिदम्बराख्यः स शिवोऽवतीर्णः ॥ त्यानंतर शिवशास्त्री तेथेंच सकुटुंब श्रीचिदम्बराचे भक्त होऊन राहिले. त्यानि श्रीचिदम्बरावर गीर्वाण भाषेंत खुपच वाङ्मय लिहिलें. तेंहि अद्याप अज्ञात व अप्रकाशित अवस्थेंत आहे. श्रीमच्चिदंबरांनी आपल्या निर्याणापूर्वी सर्वांना बोलावून सांगितलें कीं भक्त राजारामकृत अभंग आणि भक्त शिवशास्त्रीविरचित स्तोत्र यांना माझा आशीर्वाद आहे. बभूव भूमौ। परमेश्वरोऽसौ। चिदम्बराख्यः स शिवोऽवतीणः। यस्य प्रभावो निगमैरगम्यो। यन्मायया गृह्यत एव लोकः।

### ४ संत-विठाबाई

पंढरपुरांत पांडुरंगाच्या कृपाप्रसादानें विठ्ठलभक्त ठिकाणीं शके १७१४ मध्यें संत विठाबाईचा जन्म झाला. बालपणापासून हिचा कल परमार्थाकडे होता; व उपवर झाल्यावरहि लग्नाच्या विचारापासून दूर राहिली होती. परंतु मातापित्यांनी हिचे लग्न करून

दिलेंच.

दांपत्य-जीवनाच्या पहिलेच दिवशी रात्री विठ्ठलमूर्ती हृदयास कवटाळून रानांत पळून गेली व रानांत वाट चुकून भटकत चालली. विठ्ठलाच्या प्रार्थनेशिवाय तिचे जवळ कांहींच राहिलें नाहीं. आपण कोठें जात आहोंत कां जात आहोंत याचेंहि तिला भान राहिलें नाहीं. मार्ग न सापडल्यामुळे तिला अत्यंत त्रास होऊं लागला. अनन्यगतिक होऊन तिनें विठ्ठलाची करूणा भाकिली तेव्हा त्याच रात्री विठ्ठलाने तिला प्रत्यक्ष दर्शन देवून सांगितलें कीं, मी सध्यां कुंदगोळ ग्रामीं चिदम्बररूपानें वसतों आहें तेथें तूं जा. उद्या तुला दासराजारामाची गांठ पडेल.

त्याप्रमाणें दुसरे दिवशीं पहाटें तिला टाळमृदंगांचा व चिदम्बरनामाचा ध्वनी ऐकूं येऊं लागला. तेव्हां तिला मोठा धीर आला. आणि त्या दिशेनें तिनें वाटचाल केली; व संतश्रेष्ठ दास राजारामाची दिंडी जात आहे असे पाहिलें. तिनें धांवताच जाऊन राजारामांचें दर्शन घेतलें व आपणहि कुंदगोळास श्रीचिदम्बरांच्या दर्शनाकरितां येत असल्याचें सांगितलें. झाले दिंडी मजल दर मजल करीत कुंदगोळास आली. तेथें तिला श्रीचिदम्बराचें दर्शन घडलें; व त्यांनीं तिच्या मस्तकावर वरदहस्त ठेवून कृपा केली.

तत्काळ तिला पूर्वजन्माचे स्मरण झालें व आपण पूर्वी विलठ्ठभक्त जनाबाई असल्याचें स्मरलें. आतां प्रत्यक्ष विठ्ठलच चिदम्बररूपांनें अवतारला असल्याने तिनें अभंग भक्तीस प्रारंभ केला. श्रीमच्चिदम्बरावर तिनें जवळजवळ ४० हजार अभंग लिहिले आहेत. ते सर्व आजला गुप्तस्थळी आणि अप्रकाशित अवस्थेंत आहेत. श्रीचिदम्बर व दास राजाराम यांच्या निर्याणानंतरही तिनें चिदम्बरभक्ति करीत तीर्थयात्रा केल्या. श्रीक्षेत्र आळंदी येथें जाऊन श्री ज्ञानदेवापाशी चिदंबर संप्रदाय वाढत कां नाहीं म्हणून धरणें घेऊन बसली असतां ज्ञानदेव प्रत्यक्ष होऊन तिला आपणच योग्य वेळीं त्याकरितां अवतार घेणार आहोत असे सांगून तिचें सांत्वन केलें. श्रीचिदम्बराबद्दल संत विठाबाईला जो साक्षात्कार झाला त्याचें वर्णन तिनें आपल्या अभंगांत पुढीलप्रमाणे केले आहे.

रामकृष्ण अवतार। तोचि आतां चिदम्बर।

गरीब सोंग तो धरिला। विठ्ठल हो तोचि आला। विठ्ठल राई रखुमायी। चिदम्बर सावित्री सरस्वती आई। नामदेव राजाराम। ऐसे धरोनिया नाम। विठाबाई सांगते खूण। आण वाहूनिया जाण ।।१।।

संत विठाबाईने अनेक तिर्थयात्रा केल्या व शेवटीं ती शकें १७९०मध्यें गोकर्ण क्षेत्रांस गेली व समुद्राच्या पाण्यावरून दूरवर चालत जाऊन तेथेंच ती अदृश्य झाली.

(पद–रागभूप–ताल दीपचंदी)

पंढरिनाथा चिदम्बर रूप दाविले आता ।।१।। पाहताक्षणी ऐसे मागील जन्माचे। ज्ञान जाहले प्रभू स्वामीसी पाहतां। हिरण्यकश्यपाचे वेळी पद्मिनी नामे माझे दासीचे कुळी। त्यावेळी भेटले नरसिंह ते रूप। प्रल्हादाचे वेळी होते कृतायुग। दुसरा जन्म ऐका मंथरा नामे। लाथ दिधली माथा अंगद नामे। दोघे आले देखा। रामचंद्र पूर्ण ब्रम्ह देखिले ऐका ।।२।। कुब्जानामे माझा जन्म जाहला। उध्दव नामे तुझा, कृष्ण रूप। तेव्हा भेटी दिधली मला। काय मी मशक वर्णू रूपाला ।।३।। नामदेव जाहले सदा ध्यानी। विठ्ठली लागले त्यावेळी हो नामा। मीची जनी झाले। भेटी दिधली मला रूप विठ्ठले ।।४।। तुकाराम झाले राजाराम रूप धरूनी आले। झाले चिदम्बर पांडूरंग तोचि विठाबाई नाम धरूनी आहे हाती ।।५।। विठाबाई देखतां चिदम्बर चरण। आठवण जाहले मागील आचरण। चिदम्बर म्हणता चुकवा जन्म मरण दुःखासी कारण सर्वा तेंचि ।।६।।

## १५. "अनंतर कालिको द्वौ भक्तो"

### सद्गुरू श्रीशेषाचलस्वामीमहाराज आनंदवन अगडी

परम चिदम्बरभक्त नृसिंहभट्ट, साध्वी लक्ष्मीबाई यांच्या उदरी शके १७७० कीलक संवत्सर चैत्र वद्य पंचमीस श्रीशेषाचल महाराजाचा जन्म झाला. श्रीनृसिंहभट्ट मुरगोड संस्कृतपाठशाळेत अध्ययन करीत होते. तेव्हा पासूनच त्यांची श्रीचिदम्बरावर भक्ति जडली होती. विद्याभ्यास पूर्ण करून ते अगडीस येऊन राहिले. बरेच दिवस संतती न झाल्यामुळे नृसिंहभट्ट पुनः चिदंबरास शरण गेले. "शास्त्रीबुवा तुम्ही चिंता करू नका. बंकापूर येथे श्रीरामेश्वरास रुद्राभिशेक

करा. तुमचे अभीष्ट पूर्ण होईल. तुमच्या द्वितीय पुत्रात माझी विभूति प्रकट होईल". असा दृष्टांतरूपाने महास्वामीनी आशीर्वाद दिला. तो द्वितीय पुत्र म्हणजेच शेषाचल.

नृसिंहभट्ट पुढे लवकरच निवर्तले. ५व्या वर्षी श्रीशेषाचलांच्या विद्याभ्यासाला सुरवात झाली. पण लौकिक विद्याभ्यासात त्याना आसक्तीच नव्हती. उपनयन झाल्यावर मधुकरी करून वेदाध्ययन, शास्त्राध्ययन पूर्ण केले. लहानपणी सकाळी भजन व देवपूजेस बसले म्हणजे त्याना जगाचे भानच नसे. लोक त्यांस वेड लागले आहे असे म्हणत. पूजेच्या वेळी ते श्रीचिदम्बराशी तन्मय होतात हे विषयासक्ताना कसे कळणार?

गृहस्थाश्रम स्वीकारल्यानंतर त्यांची वृत्तीच अंतर्मुखी बनली. रोज सकाळी चिदम्बरध्यान, प्रार्थना, पूजा यातच ते रमून जात असत. संध्याकाळी मधुरस्वराने भक्तिपर अभंग, आरती नामस्मरण करीत असे. रोज दुपारी पूजेनंतर अतिथि अभ्यागतांचे सत्कार करुन अन्नदान करीत असत. धातृसंवत्सरात भीषण दुष्काळात अन्नछत्र ठेवून त्यांनी दुर्बलांचे रक्षण केले. महाराष्ट्र कर्नाटक प्रांतातील पुण्यक्षेत्रात संचार करुन श्रीचिदम्बरभक्ति प्रसाराचे कार्य केले. वेदशास्त्रसंरक्षणास आनंदवन येथे पाठशाळा स्थापिली. श्रीवररुची बापूदीक्षितांच्या आशीर्वादाने श्रीचिदम्बराच्या सेवेस आत्मार्पण केले. चिदम्बरनाम सामर्थ्याने अविस्मरणीय लीला करून भक्तांना चिदम्बर सेवेस लावले. त्यांच्या निःस्वार्थ निराडम्बर आचाराने त्यांचा शिष्य परिवार वाढला. सर्व भक्तांनी पुढे महाराजांचा जयंती उत्सव सुरु केला त्या उत्सवात 'अतिथिदेवो भव' याची प्रचीति अद्यापि येते. श्रीचिदम्बर महास्वामींच्या आशीर्वादाने शेषसद्गुरु यांच्या कृपेने श्रीचिदम्बर संप्रदाय येथें अखण्ड चालू आहे. याप्रमाणे चिदम्बर सेवा करींत शके १८३७ (१९१५ इसवी) भाद्रपद शुध्द सप्तमीस श्रीचिदम्बर चरणी लीन झाले.

श्री शेषाचलमहाराजांचे प्रपौत्र श्रीचिदम्बरमूर्ति अखंड चिदम्बर संप्रदाय पुढे चालवीत असून पाठशाळेचे बृहत्कार्य हाती घेतले आहे.

## २ श्रीमत्परमहंससद्गुरु कैवल्याश्रमस्वामी

वे.शा.सं. श्रीबाळकृष्णभट्ट, साध्वी अन्नपूर्णाबाई यांच्या उदरी शके १७७८ पौषवद्य १३ (दिनांक

२३-१-१८१७) गोकाक गांवी श्रीस्वामीजी जन्मास आले. पूर्वाश्रमाचि नाव रामचन्द्र.

केंगेरी क्षेत्रात संस्कृतविद्याभ्यास करीत असतानाच त्यांच्या अंगी चिदम्बरभक्ती रूजली. त्यांचे अध्यात्मजीवनाचे स्फूर्तिस्थान केंगेरी होय. संतराजाराम यांचे सच्छिष्य श्रीजीवबा अण्णा हे चिदम्बरसाक्षात्कारी पुरुष होते. त्यांच्या कडून श्रीचिदम्बर मन्त्रोपदेश मिळाल्यावर श्रीचिदम्बर संप्रदायप्रवर्तक अधिकारी पुरुष बनले.

गृहस्थाश्रम स्वीकारुन शुध्द सात्विक आचरणाने अखंड श्रीचिदम्बरस्मरण भजन सामर्थ्याने लोकोध्दाराचे व लोकसंग्रहाचे कार्य केले. पुढे संन्यास घेवून श्रीचिदम्बर महास्वामींच्या सेवेतच आपले शरीर झिजविले. श्रीचिदम्बरनामसामर्थ्याने अनेक अद्‌भुत लीला करून श्रीचिदम्बर संप्रदाय पुढे चालविले. निराडंम्बर अध्यात्मिक जीवनाने लोकमान्यांच्या सारख्या लौकिक पुरुषाना श्रीचिदम्बरमहात्म्याची जाणीव करून दिली. कर्नाटक व महाराष्ट्रात शिष्यपरंपरा वाढवून चिदम्बर संप्रदायाचा प्रचार केला. गुर्लहोसून येथे शैवागमोक्त उत्सव श्रीदीक्षितांच्या समवेत फार वैभवाने चालवीत असत. जीर्णोध्दार, सभामंडप, नगारखाना, श्रीराजाराम मठाचा दुरुस्तीचे कार्य यांच्या हयातीतच झाले.

श्रीचिदम्बरसंप्रदायातील प्रमुख भाग म्हणजे अतिथिसेवा, अन्नदान. या बाबतीत किंचितही न्यूनता न घडेल असे जातीने लक्ष देत असत. "श्रीचिदम्बरचरणी लक्ष ठेवून नामजप, भजन, कीर्तन करीत राहावे. शाश्वत सुखसमाधान देवून भक्तांचे रक्षण करण्यास तो समर्थ आहे असा त्यांचा दिव्य उपदेश होता". याप्रमाणे श्रीचिदम्बर भक्तिप्रसार करून शके १८३३ आश्वीन शुध्द नवमीच्या दिवशी ते श्रीचिदम्बरचरणीं लीन झाले. (दिनांक ९-१०-१९११)

गुर्लहोसूर येथे श्रीब्रम्हानन्दस्वामी (वररुची बापूदीक्षित) यांच्या समाधी शेजारीच त्यांची समाधी होती. मलप्रभा धरणाच्या योगाने गुर्लहोसूर जलस्थ झाल्यावर मुनवळ्ळी (तालुका सवदत्ती परसगड) येथे त्यांची समाधी हलविली. परम चिदम्बरभक्त व श्रीकैवल्याश्रम स्वामींचे अंतरंग शिष्य कै. श्रीविष्णुबुवानी स्थापित केलेल्या श्रीकैवल्याश्रमसंस्था द्वारा तेथे श्रीचिदम्बरसंप्रदायप्रवाह अखंड वाहत आहे.

# तपस्वी-श्रीमत्पूज्यगुरु-चिदम्बरदीक्षित-बडली-महोदयाः

तपस्वी-चिदम्बर-यज्ञेश्वर दीक्षिताः



जन्म : भाद्रपद शुद्ध अष्टमी
सर्वजित् शके १८०९

मृत्यु : माघ शुद्ध द्वादशी
विरोधी शके १८७१

श्रीचिदम्बर-सेवासमीत्या ऽ ऽ लयः



स्थापना सन् १९४४ [धारवाड] स्थळ : मदिहाळ

श्रीमत्पूज्यगुरु (अप्पनवरू) चिदंबर यज्ञेश्वर दीक्षित बडली हे महास्वामींचे द्वितीयपुत्र शंकर दीक्षित यांच्या वंशातील श्रीमच्चिदंबरापासूनचे ५ वे पुरुष होत.

ते अत्यंत साधे सरळ विचारसरणीचे तपस्वी जीवन जगणारे असे होते. भगवान् चिदम्बरोपदिष्ट मार्गाबद्दल त्यांना अत्यंत कळकळ होती. आणि त्यांच्याय हयागींत त्यांच्या पुत्रद्वयाच्या महान् खटपटीने सन् १९४४ मध्यें धारवाड (मदिहाळ) येथे सांस्कृतिक, लौकिक आणि वाङ्गयीन असे त्रिविध कार्य करून श्रीमच्चिदंबरांची सेवा करणेसाठी **चिदम्बर सेवा समीतीची** स्थापना झाली.

दोन दशकापूर्वी संस्थेची स्थिती अत्यंत नाजूक असूनही अहर्निश खटपट करून प्रस्तुत छापल्या जाणाऱ्या मराठी ओवीबध्द चिदम्बर चरित्राच्या द्वितीयावृत्तीचे काम अप्पनवरु यांनी चि. से. स. कडून करवून घेतले. व तसेच उपासना व कर्म मार्गातील छोट्या ग्रंथांचे संकलनही त्यांनी करून ठेवले.

आजला अशी सर्वांग परिपूर्ण तृतीयावृत्ती निघाली आहे हे पाहून त्यांच्या मनाला अमित आनंद झाला असता. प्रस्तुतचे पुनर्मुद्रण करणेचे काम त्यांनीच केल्या सारखे आहे. त्यानीच स्थापना केलेल्या समीतीने त्यांच्याच शिष्यसंततीकडून हे काम करवून घेतले आहे. हे पाहून त्यांच्या आत्म्याला निःसंशय समाधान वाटणार यात शंका नाही. त्यांच्याय आशीर्वादाने चि. से. स. चें कार्य पुढे चालू राहणार आहे.

मागील पानांत चित्ररूपाने दाखविल्याप्रमाणें मदिहाळ येथे चि. से. समीतीची मोठी वास्तू उभी असून प्रस्तुतवर्षी चाळीस (४०) विद्यार्थ्यांच्या वसतीची व भोजनाची सोय तेथें झाली आहे. त्या सर्वावर धार्मिक संस्कार कटाक्षाने केले जातात. लौकिक विद्यार्थीही यांत आहेत. संस्थेचे यापूर्वीचे वाङगयीन कार्य भक्तांपुढे रूजू झाले आहे व आजला होत आहे. यांपुढेंही चालू रहाणार आहे. ज्यांनी चि. से. स. स्थापन करून पुढील लोकांकरिता त्रिविध स्थान कल्पून ठेवले आहे त्याना (अप्पनवरूना) शतशः प्रणाम.

मागील दोनही ब्लॉक करणेचा व त्यांच्या छपाईच्या खर्चाबद्दल रुपये १५१-०० चि. से. समीतीचें माजी विद्यार्थी व अप्पनवरूचें मानसपुत्र श्री. शाम चिदम्बर देशपांडे (मुरगोड) पुणें यानीं दिले आहेत.